॥ श्रीविठ्ठलप्रसन्न ॥

# ज्ञानेश्वरांची प्रभावळ.

ज्ञानियांचा राजा गुरु महाराव ।
म्हणति ज्ञानदेव ऐसें तुम्हां ॥ १ ॥

* * *

जयानें घातली मुक्तीची गवांदी ।
मेळविली मांदी वैष्णवांची ॥ २ ॥

— तुकोबाराय

संपादक व प्रकाशक,

**लक्ष्मण रामचंद्र पांगारकर, बी. ए.**

संपादक 'मुमुक्षु' पुणें शहर.

माघ शुद्ध १० शके १८४९—जानेवारी १९२८

किंमत रुपये दोन.

# पांगारकरांचीं पुस्तकें.



**१ भक्तिमार्गप्रदीप** ( आवृत्ति तेरावी ).—यात साधुमताच्या प्रसिद्ध भूपाळ्या, आरत्या, श्लोक, अभंग, पदें वगैरे सर्व यथानुक्रम दिले आहेत नित्य-प्रार्थनेचें सर्वलोकप्रिय पुस्तक किं ८८.

**२ मोरोपंतचरित्र व काव्यविवेचन**—प्रकरणे २१ व पृ स. ६२५. 'जगाच्या वाङ्मयात पहिल्या दुसऱ्या प्रतीचे जे विरल ग्रंथ आहेत त्यात याची गणना' राजवाडे यानी केली आहे मोरोपंत व त्याची कविता याविषयी संपूर्ण विवरण करणारा हा ग्रंथ हस्तलिखित कविता व पत्रे मिळवून लिहिला आहे. किं रु २८४.

**३ ज्ञानेश्वरचरित्र व ग्रंथविवेचन** ( आवृत्ति दुसरी ):—' या ग्रंथाची भाषा भक्तिरसाने ओथंबलेली व वक्तृत्वपूर्ण असून विवेचन रसभरित आहे ' ( केसरी ) ' ज्ञानेश्वराचे उदात्त चरित्र मोहक व ओजस्वी भाषेत पांगारकरानी वर्णिले आहे, ' ( चित्रमय जगत् ) किं रु. १८८

**४ एकनाथचरित्र** ( आवृत्ति तिसरी ).—किं. ८१२

**५ तुकारामचरित्र** ( आवृत्ति दुसरी ).—' हा वारकरीसंप्रदायाचा रहस्य-ग्रंथच आहे यात वारकरीपंथाचा प्रमेये व विधिनियम, ज्ञाननिष्ठ सगुणोपासनेचे तत्व, चित्तशुद्धीचे उपाय, नामसंकीर्तनाचे महत्व, भक्तिरसाचा आनंद, इ. गोष्टींचा सांगोपांग विचार तुकोबाच्या अभंगाधारे केला आहे पांगारकरांची वाणी प्रसंगानुसार प्रेमळ पण सणसणीत, भाविक पण चिकित्सक, सरळ पण भेदक, व साधी पण वेधक अशी आहे ग्रंथ फार सुरस व हृदयंगम झाला आहे ' ( वि-विस्तार ) ' सर्व प्रकरणातून पांगारकराच्या व्यापक व विस्तृत व्यासंगाचा परिपाक अनुभवायला मिळतो. ' ( केसरी ). किं रु. २

**६ मुक्तेश्वरचरित्र आणि काव्यविवेचनः**—कवीचे चरित्र व त्याच्या काव्यातील गुणविशेषाची माहिती यातील विवेचनावरून व मार्मिक उताऱ्या-वरून सहज होणार आहे. सुंदर सृष्टिवर्णने, कुत्स्याची वर्णनें, सर्वत्र विखुरलेली नीतितत्वे, सर्व काही यात आहे किं. रु १

# पांगारकराचीं पुस्तकें.

**७ संतचरित्रमाला**—यात काही प्राचीन, काही अर्वाचीन व काही समकालीन अशा ४३ संतांची चरित्रे दिली आहेत किं रु. १।८

**८ मोरोपंती वेंचे** ( दुसरी आवृत्ति )—पंताच्या अगाध कवितासमुद्रातलि विविध विषयावरचे उत्कृष्ट वेंचे एका ग्रंथात पाहिजे असल्यास हा ग्रंथ अवश्य संग्रहावा काव्यशास्त्रावर प्रस्तावना देऊन पंताचे संक्षिप्त चरित्रही नवीन दिलें आहे कि रु १।१२

**९ समर्थसंजीवनी उर्फ रामदासी वेंचे**:—यात प्रपंच, परमार्थ, राजकारण, व विविध प्रकरणे ह्या चार भागात समर्थांच्या सर्व कवितेतील सुंदर वेंचे दिले असून प्रारंभी सर्व प्रकरणाचा विस्तृत सारांश जोडला आहे पृ स ४०० किं रु २

**१० सार्थ मनोबोध**—समर्थांचे मनाचे श्लोक सविस्तर विवरणासह दिले आहेत व मनाचें रूप, श्लोकांची संगती व श्लोकांचे वर्गीकरण केलें आहे किं ०।१२

**११ कविरामायण**—संस्कृत व प्राकृत रामायणें व शेंकडो स्फुट प्रकरणे यातून उत्कृष्ट वेंचे संगतवार दिले असून हे स्वतंत्र रामायण तयार केले आहे, कि ०४

**१२ आनंदलहरी** ( कवितासंग्रह )—ह्यात पांगारकराच्या कवितेपैकी ४० स्फुट प्रकरणें दिलीं आहेत १८ स्तोत्रें, ८ प्रकरणे महाराष्ट्र, संत व सद्ग्रंथ, ६ प्रासंगिक व ८ उपदेशपर किं ०।१२

**१३ नारदभक्तिसूत्रे**—ही ८४ संस्कृत सूत्रे, त्याचा अर्थ व त्यावरील विस्तृत विवरण पाहून भक्तिशास्त्राचा यात सांगोपांग विचार केलेला आढळून वाचकास भक्तिप्रेमोदधिं सांपडल्याचा आनंद होणार आहे कि ०८

**१४ नवविधाभक्ति**—यात नवविधाभक्तींचें नऊ प्रबंधात सविस्तर स्पष्टीकरण केले आहे कि ०६

**१५ पारिजातकाची फुलें** ( तिसरी आवृत्ति )—परमार्थविचाराची संगति उत्पन्न करणारे सूत्रप्राय अर्थगंभीर स्वतंत्र व स्फुट विचार विषयवारीनें दिले असून पुस्तक विवेचक भाविकास प्रिय झालें आहे कि ०८.

**१६ भक्तिमणिमाला**—मूळ भागवतातील उत्तमोत्तम अशा ५५० श्लोकांची निवड करून श्लोक व त्याचा कथासंदर्भ देऊन साधुसंताच्या वचनाधारे त्याचे सविस्तर विवरण केले आहे. कि. १।८

## पांगारकरांचीं पुस्तकें.

**१७ मारुतिउपासना**—प्रथम मारुतिरायाचे समग्र सुदर चरित्र दिले असून पुढे भीमरूपी स्तोत्रे, अभग, पदे, श्लोक, आरत्या वगैरे सर्व दिल्या आहेत. सुधारलेली आवृत्ति चौथी किं ०४

**१८ मुमुक्षूंतील निवडक निबंधः**—( भाग १ व २ ) प्रत्येक भाग किं. रु १।८ मुमुक्षु साप्ताहिकात पहिल्या १०–१२ वर्षांत जे सपादकीय लेख आले त्यातील निवडक लेख दोन भागात प्रसिद्ध केले आहेत हे दोन भाग जवळ असले म्हणजे १२ वर्षांच्या ' मुमुक्षू ' चा समागम केल्याचा लाभ होणार आहे. दोन्ही भागात मिळून ६० वर निबध आहेत घटा, होळी व शिवलिंग याचे रहस्य, मूर्तिपूजा, राष्ट्रीय प्रार्थना, रामजन्मोत्सव, कृष्णावताराची माधुरी, पढरीची यात्रा व पालख्याचे समारभ, भारतीवीर, निंदकाचे उपकार, वेदाताची चार मते, हिंदुधर्म, आमुचे पुढारी सतच, डिप्रेस्ड क्लासेस मिशन उर्फ पढरीचा भागवतधर्म, भागवधर्माचे मदिर, मातृभाषेचे प्रेम, धर्माकडे केव्हा वळणार, वाङ्मयतप, प्रेमामृतमाधुरी, आगरकर, गीतारहस्य इ० महत्वाचे सुदर निबध यात असून प्रत्यक्ष घडलेल्या सात उत्कृष्ट गोष्टी दिल्या आहेत

**१९ सार्थ दासबोध**—वर शुद्ध केलेल्या मूळ ओव्या व खाली सरळ भाषातर. कल्याण स्वामींच्या मूळ प्रतीवरून धुळेकरानी सटीप ग्रथराज प्रसिद्ध केलाच आहे कल्याणस्वामींचे बधु शिरगावमठाचे अधिकारी दत्तात्रयस्वामी याच्या हातची शके १६०६ च्या भाद्रपदमासात लिहून तयार झालेली प्रत ग्वाल्हेरीस आहे तेथे जाऊन अक्षरश तपासून घेऊन रा पागारकर यानी ही प्रत तयार केली आहे ग्रथाच्या प्रस्तावनेत त्यानी दोनही प्रतींचा मेळा घातला आहे, व १५० ठळक पाठभेद व ५० लेखनभेद दिले आहेत

**२० निबंधमाला–तिचें स्वरूप आणि कार्य**—विष्णुशास्त्र्याच्या निबधमालेचे मूळ अक मोठ्या प्रयासाने मिळवून मालेवर टीकापर हा निबध लिहिला आहे. निबधमालेची पुरी ओळख या निबधाने होईल. प्रथम शास्त्रीबोवाचे सक्षिप्त चरित्र दिले आहे, मालेतील मुख्य व अवातर विषय, गुणदोष इ० विवेचन यात आहे किं ०१०

**२१ निरंजनमाधवाची कविता**—भाग १ किं रु. १ व भाग २।३ एकत्र किं. रु १।८ पहिले बाजीराव पेशवे याच्या वेळचा हा कवि याची स्तोत्रें, सांप्रदायपरिमळ उर्फ आत्मचरित्र, ज्ञानेश्वरविजय, चिद्बोध रामायण, स्फुट प्रकरणे ही सशोधन करून त्याचा जीर्णोद्धार केला आहे.

# पांगारकरांचीं पुस्तकें.

**२२ तुकारामचरितामृत** —तुकोबाचे प्रेमळ चरित्र अभंगात गाइले असून नित्यपाठास उपयुक्त आहे किं ८५

**२३ सार्थ हरिपाठ व चांगदेवपासष्टी** —वारकरीमंडळाचे प्रसिद्ध पुढारी के विष्णुबोवा जोग यानी केलेल्या अर्थासह किं ८५

**२४ श्रीसमर्थग्रंथभांडार** —समर्थांची एकदर कविता एकत्र सटीप छापलेली आहे किं ४८८

**२५ समर्थग्रंथभांडार** ( भाग २ रा ) यात दासबोधाशिवाय बाकीची समर्थांची सर्व कविता प्रकरणे पाटन व्यवस्थित दिली आहे कि रु २८८

**२६ श्रीएकनाथीभागवत** —( सटीप ) किं रु ६ निर्णयसागर प्रेसमध्यें छापलेले

पत्ता —**व्यवस्थापक ' मुमुक्षु ' पुणे शहर.**



॥ रामकृष्णहरी ॥

# ज्ञानेश्वरांची प्रभावळ.

## प्रस्तावना.

### १ श्रीज्ञानेश्वर व त्यांची प्रभावळ.

१ श्रीज्ञानेश्वरमहाराजाच्या व श्रीनामदेवादि तत्कालीन सकल सताच्या चरणाना भक्तिप्रेमपुरस्सर वदन करून चार प्रास्ताविक शब्द सागतो.

२ प्रस्तुत ग्रथास ‘ ज्ञानेश्वराची प्रभावळ ’ असे नाव का दिले आहे हे हा ग्रथ समग्र पाहिल्यावर वाचकाचे लक्षात येईलच, तथापि येथे थोडेसे दिग्दर्शन करितो ज्ञानेश्वराशी ज्याचा शिष्यप्रशिष्यरूपाने साक्षात् सबध आला, जे त्याच्या सहवासात होते, ज्याच्यावर त्याच्या दिव्य चारित्र्याचा व उज्ज्वल बोधाचा सस्कार घडला, ज्याना त्याच्या अद्वैतभक्तीचे रहस्य आवडले व पटले, ज्याचा त्याचा उपासनापथ एक झाला, ज्या समकालीन, समशील व समप्रेमी भगवद्भक्तानी त्याच्या अवतारकार्यास हातभार लावला, त्या सर्व सताच्या निवडक वचनाचा सग्रह प्रस्तुत ग्रथात केला आहे ज्ञानेश्वरमहाराज हे अर्थात् ह्या प्रभावळीतले प्रभु आहेत, अध्यक्ष आहेत, आचार्य आहेत, सर्वांनी त्याना तसे मानले आहे सर्व सत त्याना विष्णूचे अवतार मानीत शिवाय इतराचे अभग वगैरे स्फुट कवने असली तथापि ह्या मेळ्यातले ते प्रमुख ग्रथकार आहेत त्याचे गीताभाष्य म्हणजे ज्ञानेश्वरी हा ग्रथ सर्वांनी ‘ आई ’ म्हणून मानला आहे त्याचा ‘ अमृतानुभव ’ अध्यात्मग्रथाचे शिरोरत्न आहे त्याचा ‘ हरिपाठ ’ त्याच्या वेळी व आजही सर्व वारकऱ्याची सध्या आहे स्वानुभवी लोकासाठी ‘ अमृतानुभव,’ मुमुक्षुसाधकासाठी ‘ ज्ञानेश्वरी ’, सर्वांच्या नित्यपाठासाठी ‘ हरिपाठ ’ व ‘ अभग ’ अशी ज्ञानेश्वरमाउलीने सर्वाची सोय केली आहे. ज्ञानभक्ति किंवा अद्वैतभक्ति विठ्ठलोपास-

नेच्या योगे अगी अनुभवणे व तत्सिद्ध्यर्थ सत्सगी नामसकीर्तन करणे हा भक्तिमार्ग माउलींने जगास दाखवन दिला आहे. ज्ञानेश्वराचा अवतार सर्व जीवास अद्वयानद देण्यासाठी आहे त्याचे अध्यात्मज्ञान, त्याची सगुणभक्ति, त्याचे योगैश्वर्य सर्व काही अत्यद्भुत आहे हे सर्व लोकोत्तर गुण अगी असून त्यानी आबालवृद्ध, जाणते नेणते, या सर्वाना समजेल व उमजेल अशा मधुरवाणीने आपला बोध सर्वाच्या गळी उतरवला आहे व आपल्या वेळच्या सर्व सताना एकवटून म्ह० त्याचे सघटन करून महाराष्ट्रीय भागवतधर्माची उभारणी केली आहे ' जयाने घातली मुक्तीची गवादी । मेळविली मादी वैष्णवाची' म्ह० त्यानी मुक्तीचे अन्नसत्र घातले असून वैष्णवाचा समुदाय जमविला—सघ बनविला असे तुकोबारायानी जे म्हटले आहे त्यात त्याचे अवतारकार्य उत्कृष्ट प्रकारे वर्णिले गेले आहे त्यानी विष्णुभक्ताचा, विठ्ठलोपासकाचा, सघ बनविला व आज सहाशे वर्षेपर्यंत अनेक वैष्णवाना स्फूर्ति देऊन सर्व वैष्णवाचे ते आराध्यदैवतच बनले आहेत ' श्रीएकनाथतुकारामादि ' अनेक सद्भक्ताना ते स्फूर्तिप्रद झाले आहेत ज्ञानेश्वरी ग्रथ वयाच्या सोळाव्या वर्षी त्याच्या मुखाने प्रगटला व बाविसाव्या वर्षी त्यानी समाधि घेतली यातच त्याच्या अवतारीपणाचे प्रमाण मिळतें आदिनाथ शकरापासून त्याची परपरा आली आहे आदिनाथ—मच्छेद्रनाथ--गोरक्षनाथ--गैनीनाथ—निवृत्तिनाथ व त्याचे शिष्य ज्ञाननाथ—उर्फ ज्ञानेश्वर ही परपरा त्यानी ज्ञानेश्वरीत दिली आहे [ पृ २२९ ] व त्याच्या व इतराच्या अभगातही आली आहे ही परपरा मळ योगमार्गाची गोरक्षनाथाचे योगशास्त्रावर अनेक ग्रथ आहेत गोरक्षनाथ हे ' योगाब्जिनीसरोवर । विषयविध्वसैकवीर ' होते, त्यानी आपले 'अद्वयानदवैभव' गैनीनाथास दिले, गैनीनाथानी कलिग्रस्त जीवाच्या उद्धारार्थ निवृत्तिनाथास दिले, व त्या दयामेघाने 'पुढा मी बापिया। माउला आपुलिया। की यासाठी येवढिया। आणिलो यशा' म्ह० मला चातकाला देऊन एवढ्या यशाला आणिले असे ज्ञानेश्वरानीच स्वत म्हटलें आहे तेव्हा ज्ञानेश्वराना गुरुपासून जें ' अद्वयानदवैभव ' मिळालें तेंच त्यानी पुढें जगाला दिलें —

तैसा वाग्विलास विस्तारु । गीतार्थेसी विश्व भरू ।
आनदाचे आवारू । माडू जगा ॥
दिसो परतत्व डोळा । पाहो सुखाचा सोहळा ।
रिघो महाबोधसुकाळा— । माजी विश्व ( पृ० ४५ )

३ त्याची अगाध गुरुभक्ति 'सद्गुरुस्तवनादि' प्रकरणात पहावी (पृ० ३ ते १४). त्याच्या स्फूर्तिपौर्णिमेचा चद्र श्रीगुरु आहेत, त्याची सारी बैठक गुरुभक्तीची आहे, अद्वयानदाची प्रत्यक्ष मूर्ति श्रीगुरु आहे ' श्रीगुरु निवृत्तिराजे मार्ग दाविला सोज्ज्वळ ' ( पृ० २८८ ) मी वेदमार्गानें जात असून धर्ममार्गाच्या शुद्धपथानें जावे यासाठी सद्गुरूनी माझ्या हाती काठी दिली आहे ( पृ २९३ ) —तोच शुद्धमार्ग त्यानी सर्व वैष्णवास उपदेशिला आहे ज्ञानेश्वरानी सोपानदेव व मुक्ताबाई यास प्रथम उपदेश केला श्रीगुरुसमोर त्यानी ज्ञानेश्वरी ग्रथ शके १२१२ मध्ये नेवासे येथें सागितला नतर ते पढरपुरास गेले तेथें भक्तशिरोमणि नामदेवराय आपल्या सगुणभक्तिप्रेमानें गाजून राहिले होते ज्ञानेश्वराची व नामदेवाची गाठभेट होऊन ते नामदेवाच्या अत्युत्कट भक्तिभावाला भुलले त्याला घेऊन ते उत्तरेकडील तीर्थयात्रा करून आले, व आपला शिष्य विसोबा खेचर याजकडून त्यास अद्वैतज्ञानाचा उपदेश करविला चागावटेश्वर हे आपल्या योगप्रभावानें त्यास दिपवण्यास आले, पण त्याच्या अध्यात्मप्रेमरगापुढे नमले आणि हतबुद्ध व निरहकार होऊन मुक्ताईचें शिष्य झाले विसोबा खेचर हे ज्ञानेश्वराचे शिष्य व त्याचे शिष्य नामदेव, अर्थात् ज्ञानेश्वर हे नामदेवाचे परमगुरु म्हणजे आजेगुरु होत चोखामेळादि भक्त हे नामदेवाचे शिष्य ज्ञानदेव व नामदेव एक झाल्यामुळें म्हणजे विठ्ठलचरणी ज्ञानाचें नामाशी तादात्म्य झाल्यामुळे या अद्वयानदवैभवाची अठरापगड जातीच्या सर्व लोकास लूट करावयास मिळाली व भक्तिमार्गाचा जयजयकार झाला हा पढरीचा भक्तिपथ म्हणजे महाराष्ट्रधर्म होय ज्ञानदेवनामदेवानी महाराष्ट्रात धर्ममदिर उभारले याचा पाया ज्ञानेश्वरानी घातला व देवालय उभारलें, विस्तार नामदेवानी केला, पुढे ध्वज एकनाथानी लावला व कळस तुकोबाराय झाले, असें तुकोबाची शिष्यीण बहिणाबाई यानी एका अभगात म्हटले आहे शके १२०० पासून १२७५ पर्यंतच्या पाऊणशतकात ज्ञानेश्वरनामदेवादि सतानी हें जे धर्मोद्धाराचें महत्कार्य केलें त्यात सर्व जातीच्या सतानी भाग घेतला, सर्वांनी सनातनवेदधर्माची महत्सेवा केली निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई ही चार भावडें, विसोबा खेचर, कान्हो पाठक, ज्ञानेश्वरीचे लेखक सच्चिदानद बाबा, परिसा भागवत, बहिरा पिसा इ ब्राह्मण, नामदेव शिंपी व त्याच्या घरची सर्व मडळी, नामदेवाची दासी जनाबाई, सावता माळी, नरहरी सोनार, गोरोबा कुभार ( याना सर्व काका

म्हणत ) जनमित्र नागा, जोगा परमानद ( हे तेली होते असे म्हणतात ), चोखामेळा, त्याची स्त्री व मेहुणा बका महार इ सर्व विठ्ठलभक्त मडळी या पाऊण शतकात झाली सर्व सताचें हे ज्ञानेश्वरमडळ झाले ज्ञानेश्वर सर्व सतास अत्यत पूज्य व प्रिय. नामदेवाचा त्याच्याविषयीचा उत्कट प्रेमादर ( पृ ३२० ) होता. त्यानी ' तिन्ही देव जैसे परब्रह्मीचे ठसे । जगी सूर्य जैसे प्रगटले ' असे ज्ञानेश्वरादि भावाबद्दल म्हटलें आहे व हे ' उपजत ज्ञानी ' होते व ज्ञानेश्वर ' विष्णूचा अवतार ' होत असें स्पष्ट सागितलें आहे, आणि ग्रथश्रेष्ठ ज्ञानदेवीला ' ब्रह्मानदलहरी ' ' अध्यात्मविद्येचे रूप ' ' चैतन्याचा दीप इ. गोड विशेषणे दिली आहेत ' विवेकसागर । सखा माझा ज्ञानेश्वर ' असे जनाबाई प्रेमाचे गाणे गात आहे ' आह्मा लेकुराची चिंता । वागवावी कृपावता ' असे सेनान्हावी ' ज्ञानाबाई मायबहिणी'ला प्रेमाने आळवीत आहे. 'कृपेच्या सागरा । मायबापा ज्ञानेश्वरा ' असें प्रेमाने आळवीत भागु महारीण 'माझें ध्यान धरा ' म्ह० मला दीनाला विसरू नका असें विनवीत आहे. ' आवडीनें नाम गाईन उल्हासें । सताच्या सहवासें खेळीमेळी ' असें म्हणत चोखामेळा या मेळ्यात आनदानें गात नाचत डोलत आहेत ' जन्म हो का भलते याती । परि मी न चुके तुझी भक्ती ' असें म्हणत एकनिष्ठ नामदेवराय कीर्तनरगी रगून सर्वास तन्मय करीत आहेत ' परमानदु आजी मानसी । भेटी झाली या सतासी' याप्रमाणें ज्ञानोबाराय हा भक्तमेळ्याचा आनद व्यक्त करीत सर्वांना गौरवीत आहेत. असा हा विठ्ठलोपासक सताचा मेळा चित्ती विठ्ठलाला ध्यात, विठ्ठलरूप सतमूर्तीत पाहत, उच्चनीचभेदभाव सर्व विसरून एकमेकाच्या पाया पडत व एकमेकाला प्रेमाने कवटाळीत, चद्रभागेच्या, इद्रायणीच्या किंवा तापीच्या वाळवटात ' भावाच्या आळुका भुलला भक्तिपुखा । सापडला फुका नामासाठी ' या नामरगात समरस होऊन गेले आहेत—ससार विसरले आहेत, किंबहुना या अद्वयानदात ससारही विठ्ठलमय झाला आहे—हा सुखसोहळा स्वर्गात देवाच्याही कपाळीं नसेल ' सत्सगात मिळणाऱ्या या भक्तिप्रेमसुखापुढें वैकुठ किंवा मोक्ष हेंही निष्प्रभ झाले असतील.

४ हा भक्तिप्रेमानद सर्व सतानी भोगला. ही सतमडळी स्वानुभवानें एकमय झाली. श्रीकृष्ण ( विठ्ठल ) सर्वाचें उपास्य, पढरपूर सर्वाचें महाक्षेत्र, गीता-भागवत सर्वांचें उपासनाग्रथ, ज्ञानेश्वरी सर्वाची आई, एकादशी सर्वाचें महाव्रत,

सत्संगी नामसंकीर्तन हा सर्वांचा मुख्य आचार, असे होऊन ही संतमंडळी एक झाली. वेदशास्त्र प्रमाण मानणाऱ्या सनातनधर्माचाच भागवतधर्म हा नवा व लोकप्रिय अवतार होय. हा धर्म आचांडाल सर्व जीवांस प्रेमभक्तिभाग्य देणारा आहे. आमच्या आजकालच्या सामाजिक प्रश्नांना व चळवळींनाही या भागवतधर्माने चोख उत्तर देऊन ठेवलें आहे. यांत गोंधळ नाहीं, वाद नाहीं, मी तू नाहीं, पक्षभेद नाहीं. निर्मळ मनानें व निरहंकाराने याजकडे पहावें, यांत मिसळावें व मिथ्या भेदभाव विसरून जावें. व्यवहारांतले भेदभाव व्यवहारांतच ठेवावेत, परमार्थांत आणू नयेत. व्यवहार भेदरूप आहे, त्यांत अभेदबुद्धीनें पहावें. वर्णाश्रम मोडूं नयेत, जातींचा काला अगर गोलकार करूं नये, वेदशास्त्रप्रामाण्य तोडूं नये, स्वेच्छाचाराने वागूं नये, अत्याचार करूं नये, भूतद्वेष करूं नये व अहंकार ठेवूं नये, सर्वांनी हरिप्रेमसुख लुटावें व संसारांत असतांच उद्धरून जावें, सर्वांभूतीं भगवद्भाव ठेवावा, सर्व प्राणिमात्रांशी आपलेपणाच्या प्रेमानें वागावें—असा या भागवतधर्मीय संतांचा उपदेश आहे. येथें ज्ञानेश्वरमहाराजांचें गौरव नामदेवराय —

संसारीं आसक्त मायामोहें रत । तापत्रयसंतप्त जाले जीव ॥
ऐसिया पतितांचा करावा उद्धार । यालागीं अवतार तुमचा जगीं ॥

याप्रमाणे करितात व उलट ज्ञानोबाराय नामदेवांना —

प्रेमसुखगोडी तुजाचि फावली । वासना मावळली समूळ तुझी ॥
धन्य तूं संसारीं भक्तिभावशीळ । साधिलें त्वां केवळ प्रेमसुख ॥

असें म्हणत प्रेमानें कवटाळतात. या प्रेमगुणगौरवांत सर्वांना या उभय विभूतींनी गोड उदाहरण घालून दिलें आहे. भक्तिप्रेमाचा महामंत्र त्यांनी सकाळिकांस सांगितला आहे. हे लोण पुढें पोंचवणें हें त्यांचे सेवक म्हणविणाऱ्यांचें कर्तव्य आहे.

## २ सत्संगीं अद्वयानंद.

१ भक्तीचा आनंद सत्संगाशिवाय होत नाहीं, व त्याशिवाय त्याच्या उक्तींचे रहस्यही नीट कळत नाहीं. खरोखर सत्संगाशिवाय परमार्थलाभच नाहीं. पूर्वपुण्यबळानें परमार्थमार्गांत सत्संग मिळणें, सत्संगीं सच्छास्त्रश्रवण होऊन त्याचें रहस्य उकलणें, श्रवणमनननिदिध्यासबळानें भववार्ता जाऊन गुरुकृपानंद प्राप्त होणें व अखेर माउली आत्मा भेटून संसाराचा गळफांस मोडणें हा परमार्थाचा क्रम ज्ञानोबारायांनी (पृ ९३) स्पष्ट सांगितला आहे. दुसऱ्या एका ठिकाणीं ‘संतांसवें वसता।

योगज्ञानी पैसता । गुरुचरण उपासिता । वैराग्येसी ॥४२२॥ येणेचि सत्कर्मे अशेषही अज्ञान विरमे । जयाचे अह विश्रमे । आत्मरूपी ॥ ४२३ ॥ ( अ० १५ ) असे त्यानी अन्यत्रही म्हटले आहे तात्पर्य सत्सगावाचून परमार्थ नाही सत्सगाबाहेर राहून ग्रथ वाचले तर शब्द उकलतील पण शब्दगर्भ हस्तगत होणार नाही. शाश्वतस्वरूपी ज्याची बैठक दृढ झाली त्याला सत म्हणतात सत म्हणजे शाश्वत परब्रह्म व त्याचा अनुभव झालेले महात्मे सत ते देव, किंवा प्रत्यक्ष परब्रह्म परमात्मा सतात आविर्भूत असतो व म्हणून सत्सगात रमणारा जीवही सद्रूप होतो सर्व नद्या व सागर महाप्रळयाबुमध्ये एकवटतात त्याप्रमाणे सर्व साधने स्वानुभवमहासागरात एकमय होतात व ‘ आपणाचि खेळे आपणाशी ’ असे होते. मग जीवब्रह्मैक्य, उपास्यउपासकाचे ऐक्य, गुरुशिष्याचे ऐक्य, साध्यसाधनाचे ऐक्य, निर्गुणसगुणाचे ऐक्य–सर्वत्र एकरगाचा अनुभव होऊन अशा सताच्या वाणीतून अमृतझरी स्रवते निर्गुण ब्रह्म तेच सगुण महाविष्णुस्वरूप, तेच रामकृष्णादि अवतार, तेच मर्तीत प्रगटलेले, तेच गुरुरूप व तेच आपण हा सायुज्याचा अखड आनद अपार आहे हा या सतानी परस्परसगतीत भोगला

## ३ ज्ञानेश्वरीचा संतवचनांशीं पूर्ण मेळ आहे.

६ ज्ञानेश्वरीत ‘ विठ्ठल ’ हे नाव नाही व अभगात आहे यावरून ज्ञानेश्वरीकर्ते ज्ञानदेव वेगळे व अभगकर्ते ज्ञानदेव वेगळे असा एक तर्क मागे निघाला होता, व त्या तर्काची पुस्ती म्हणून अभगकर्ते ज्ञानदेव व इतर सत याचा ज्ञानेश्वरीशी व ज्ञानेश्वरीकर्त्या ज्ञानदेवाशी काही सबध नाही असा एक दुसराही तर्क निघाला होता ह्या दोन्ही तर्काचे उत्कृष्ट खडण श्रीपतिबोवा भिंगारकर यानी ‘ केसरी ’ पत्रातून मागेच केले होते, पण हे तर्क अद्याप कोठे कोठे डोकावतात म्हणून त्याना कायमचे बसवण्यासाठी येथे चार शब्द लिहीत आहे —

( १ ) ज्ञानेश्वरी ग्रथ नेवाश्यात श्रीगुरु निवृत्तिनाथ याच्या सन्मुख झाला, व ‘ गुरु साक्षात् परब्रह्म ’ असा सर्व गुरुभक्ताप्रमाणे ज्ञानेश्वरमहाराजाचा अनुभव असल्यामुळे समोरच्या प्रत्यक्ष सगुण गुरुमूर्तीला सोडून दुसऱ्या कोणाचेंही त्यानी मगलाचरण केले नाही यात नवल नाही. ज्ञानेश्वरभर त्याची कृष्णभक्ति उत्कट दिसून ‘ कृष्णाचे ’ ही मगलाचरण नाही वस्तुत' कृष्ण, विठ्ठल, सद्गुरु याच्या स्वरूपात अणुमात्र भेद नाही

( २ ) ज्ञानेश्वरी नेवासे येथे गुरुमन्मुख झाल्यानंतर ज्ञानेश्वर आपली मंडळी घेऊन पंढरपुरास गेले व तेथे नामदेवाची व त्यांची गांठभेट होऊन एकरूपता झाली. दोघेही उत्तरेकडच्या यात्रा करून आले. ज्ञानेश्वरांनी विसोबा खेचराकडून नामदेवास ब्रह्मबोध करविला. ज्ञानेश्वरांचा अधिकार व नामदेवाची अत्युत्कट सगुण-भक्ति यांची परस्परांस ओळख पटून दोघांची उपासना अगदी एकमय झाली. नामदेवांनी ज्ञानेश्वरींत आपलें स्वरूप पाहिलें व ज्ञानदेवांनी नामदेवाच्या ठायीं उत्कट भक्त पाहिला. ज्ञान–देव व नाम–देव सर्वस्वी एकमय झाले व त्यामुळें उभयतांचे अनुयायी, मित्र व सांगाती अगदीं एकरूप झाले व सर्वांचा मिळून प्रबल वारकरी पंथ संघटित झाला. पंढरीच्या वैष्णवांस ज्ञानेश्वरीसारखा मूर्तिमंत वेदग्रंथ मराठींत मिळाला व ज्ञानेश्वरांना अत्यंत प्रिय असा भक्तमेळा भेटला. ज्ञानेश्वरनामदेवांचा सांगात हा गंगा–यमुनांच्या संगमासारखा झाला व पंढरीक्षेत्रीं हा तीर्थराज प्रयाग सिद्ध झाला. सर्वांचा ज्ञानभक्तिवैराग्यानुभव मूळचा एकच पण एकपणाची सर्वत्रांस पूर्ण ओळख पटून ही प्रभावळ प्रगट झाली. ज्ञानेश्वरांची उपासना कृष्णाची व या पंढरीच्या भक्तमेळ्यांत कृष्ण आणि विठ्ठल एकच आहेत हा पूर्ण अनुभव होऊन त्यांनी व त्यांच्या भावंडांनी विठ्ठलपर अभंग केले. ज्ञानेश्वरींत ' विठ्ठल ' हें नांव नसलें तरी कृष्णभक्ति उचंबळलेली–उवळलेली सर्वत्र प्रगट आहे. आपल्याच 'श्रीकृष्णाची' उपासना पंढरीस भक्तभाविकांनी चालविलेली पाहून ते अत्यानंदानें त्या मेळ्यांत मिसळले व इतरांबरोबर विठ्ठलपर अभंग त्यांच्याही मुखांतून आले.

( ३ ) ज्ञानेश्वरींत ' विठ्ठल ' हें नांव नाहीं याचा उगाच बाऊ कित्येकांनी केला आहे. उपास्यदेवतेचें नांव ग्रंथांत आलेंच पाहिजे असें कांहीं नाहीं. भाष्यकार आचार्य शिवभक्त होते पण गीताभाष्यांत किंवा ब्रह्मसूत्रांत त्यांनी आपली शिव-भक्ति कोठें प्रगट केली आहे? नाथांच्या भावार्थरामायणांत किंवा भागवतांत विठ्ठलाची स्तुति नाहीं म्हणून या ग्रंथाचे कर्ते नाथ व अभंगाचे कर्ते नाथ दोन होते असें कांहीं कोणी म्हणत नाहीं. आचार्य, ज्ञानोबाराय किंवा एकनाथ हे शास्त्रीयदृष्ट्या ग्रंथ लिहीत असतांना शास्त्रीय पद्धतीनेंच लिहीत असतात, तेथें ते आपली उपासना ढकलीत नाहीत.

( ४ ) विठ्ठल ही विष्णुमूर्ति आहे, व या विष्णूच्या मस्तकावर शिवाची पिंडी अर्थात् हरिहरांची एकात्मता व्यक्त होत आहे. विठ्ठलशिरीं शिवलिंग आहे,

आहे, हें निवृत्तिनाथानी एका अभगात सूचित केलें आहे 'शिव मस्तकी धरिला। भेद भक्ताचा काढिला' (पृ ३८४) असे जनमित्र नागानींही म्हटलें आहे ज्ञानोबारायानाही हें ज्ञानेश्वरी सागत असताना माहीत होतें बाराव्या अध्यायात याचा उल्लेख आहे (ज्ञाने० अ० १२ ओंवी २१३ ते २१८ पहा) तेथें भगवान् म्हणतात " हें अखिल विश्वच माझें घर आहे असा ज्याचा निश्चय दृढ झाला आहे, किंबहुना चराचर सृष्टि जो अगानें आपणच बनला आहे—आणि अर्जुना ' एवढा अधिकार असूनही ज्याला भजनचिंतनाचें प्रेम आहे त्याला मी आपल्या मस्तकावरचा मुकुट करितो उत्तमापुढे मस्तक लववणें यात नवल काय ? त्याच्या चरणतीर्थालाही त्रैलोक्य मान देतें (शकरानी माझ्या चरणापासून निघालेली गगा आपल्या मस्तकी धारण केली यावरून) श्रद्धेय वस्तूचा आदर कसा करावा हें शकरापासून जगानें शिकले पाहिजे पण हे वर्णन आता पुरें झालें का की शकराच्या वर्णनाच्या ओघात आत्मस्तुतीच होऊन गेली म्हणून हे आता नको तात्पर्य मी आपल्या भक्ताला—रमापति भगवान् म्हणाले—आदरानें आपल्या शिरी धारण करितों " ह्या ओव्यात भगवतानी शकराला स्वशिरी धारण केल्याचा स्पष्ट उल्लेख आहे महाविष्णूच्या शिरी शकर असा प्रकार फक्त पढरीसच आहे म्हणून येथे पढरीच्या विठ्ठलाचाच सदर्भ स्पष्ट आहे भक्त देवाला उराउरी भेटतात असा ' जे निजबोधे उराउरी। भेटती आत्मया श्रीहरी ' (ज्ञाने० १८-४७) असे जे वर्णन आहे ते पढरीच्या विठ्ठलाचाच लागू पडते भक्त देवाला उराउरी ह्म० उराला ऊर लावून भेटतात असे साऱ्या भरतखडात पढरीशिवाय कोठेंही दिसत नाही आणखी ' लोकी तरी आथी ऐसे। जे दुरूनि कळस दिसे। आणि भेटीचि हातवसे। देवतेचि तिये [ज्ञाने० १८—३१] म्ह० दुरून कळसाचे दर्शन झाले की प्रत्यक्ष देवतेचेच दर्शन झाले असा लोकाचार आहे म्हणून जे ज्ञानोबारायानी म्हटलें आहे ते पढरीस आजतागाईत प्रत्यक्ष दिसतें

(५) पढरपूरच्या सप्रदायात रूढ असलेली कीर्तनपद्धति, नामघोष किंवा नामसकीर्तन, एकमेकाच्या पाया पडण्याचा किंवा नमनभक्तीचा प्रकार, सत्सगाची अपार प्रीति किंवा सताचे व हरिभक्ताचे गौरव हे सर्व प्रकार ज्ञानेश्वरीत प्रेमभराने जसें वर्णन केलेले आहेत तसेच पढरपूर सप्रदायातील सर्व सतानी वर्णन केले आहेत (पृ० २०८ वरील कीर्तनभक्तीचे गौरव पहा.) ' कीर्तनाचा नटनाच ' 'नामघोष,' 'अवघें जगचि महासुखे। दुमदुमित भरले' 'जयाचे वाचेपुढे। अखड

नाम नाचत असे माझे' ' कैसे माझ्या गुणी धाले । देशकालाते विसरले ' 'कृष्ण विष्णु हरि गोविंद । या नामाचे निखिल प्रबंध । माजी आत्मचर्चा विशद । उदंड गाती ' हे ज्ञानेश्वरीतील कीर्तनाचे वर्णन तेव्हा आणि आताही पंढरपूरच्या संप्रदायाशिवाय अन्यत्र कोठेही पूर्णत्वाने दिसत नाही पंढरपूरच्या कीर्तनाचा सुखसोहळा साऱ्या भरतखंडात अन्यत्र कोठेही आढळत नाही

नामजपयज्ञ तो परम । बाधू न सके स्नानादिकर्म ।
नामे पावन धर्माधर्म । नाम परब्रह्म वेदार्था ॥ १०–२३३ ॥

यज्ञात नामस्मरण हा श्रेष्ठ यज्ञ आहे, याला स्नानादिकाचा अडथळा नाही, नामाने धर्म व अधर्म दोन्ही पावन होतात, वेदार्थ पाहता नाम प्रत्यक्ष पर-ब्रह्म आहे

तुझे नामचि आम्हा आवडे । वरी भेटी होय आणि जवळिक जोडे ।
पाठी गोठी सांगसी सुरवाडे । आनंदाचेनि ॥ १०–२०० ॥
आता हे सुख कायिसयासारिखे ? । ...

अर्जुन म्हणतो देवा ' ' तुझे नामच आम्हा आम्हाला आवडते, त्यात तुझी भेट आणि सान्निध्य-शिवाय आनंदभराने गोष्टी सांगत आहेस ' आता हे सुख कशासारखे म्हणू ? या सुखाला काय तुलना आहे ? '

तुझे नामचि एक कोण्ही वेळे । जयाचिया मुखासी का काना मिळे ।
तयाचिया हृदयाते साडूनि पळे । भेद जो साच ॥ १०–३२१ ॥

कोणत्याही वेळी तुझे नाम ज्याच्या मुखात येईल किंवा कानावर पडेल त्याच्या हृदयातला भेदभाव खरोखर गळून जाईल

(६) तसेच पंढरीच्या संप्रदायात 'पाया पडती जन एकमेका' असा गोड प्रघात आहे. ज्ञानेश्वरीतही ही नमनभक्ति सांगितलेली आहे ( पृ० २०९ पहा ) ' वाड वाकुटे न म्हणता व्यक्तिमात्राचेनि नावे नमचि आवडे ' ' नमिजे भूतजात देखिले । हा स्वभावचि तयाचा. '

( ७ ) या संप्रदायात नामस्मरणाबरोबरच संतांचें माहात्म्य आहे, व तें तसेंच ज्ञानेश्वरीत आहे सत्संग, संतसेवा, हे या संप्रदायाचें प्रधान अंग आहे व ते तसेंच ज्ञानेश्वरीत आहे हे ह्या ग्रंथातील ' सारस्वताचें झाड ' [ पृ० ४६ ] ' सर्वांचा [ कुळजातिवर्णादि भेदविचार न करिता ] उद्धार भक्तीनेंच होतो [ पृ० ८५ ] ' संतापाशी ज्ञान [ पृ० १२८ ] ' प्रेमळ सगुणभक्त हेच खरे योगी [ पृ० २०४ ] ' देवाचें भक्तप्रेम ' [ पृ० २१३ ] 'भक्ताच्या मेळ्यातलें संवादसुख ' [ पृ० २१४ ]

'सत' [२३५] 'सत ते देव' [पृ० २४०] इ० प्रकरणें पाहिली म्हणजे कळून येणार आहे 'आत्मज्ञानें चोखडी। सत ही माझी रूपडी' म्हणून 'सतातें भजावें सर्वस्वेसी' ही ज्ञानेश्वरीची शिकवण आहे सत हे आनदाचे अनुकार, सुखाचे अकुर, महाबोधाचे विहार, विवेकाचे गाव, परब्रह्मीचे स्वभाव, ब्रह्मविद्येचे अवयव, असे आहेत म्हणून, 'तनुमनजीवें। चरणासी लागावें। आणि अवर्गता करावें। दास्य सकळ' असें त्याचें सागणें आहे सतमडळाच्या अभगातही विठ्ठलभक्ति, नामस्मरण व सत्सगप्रीति याच गोष्टी पुन पुन्हा अत्यत आवडीनें सागितल्या आहेत, हें या ग्रथातील अभगावरूनही स्पष्ट होणार आहे ज्ञानेश्वरीचा ज्ञानेश्वराच्या व इतर सताच्या अभगाशी कसा पूर्ण मेळ आहे हें या ग्रथातील अभगावरील टीपा पाहूनही कळणार आहे [पहा टीपा पृ० २९२।२९५।२९८।३०४ ते ३०८।३१७ ते ३१९।३२५।३२७।३३० ३४०।३४२।३७२ ते ३७५]

(८) तात्पर्य, सदाशिवाला, मी माथा मुकुट करी 'मी वाहे शिरी तयातें' असें जें भगवतानी म्हटलें आहे तें पढरपूरच्या विठ्ठलालाच लागू पडणारें आहे का की, तेथें विठ्ठलाच्या शिरी शकराची पिंडी आहे, उराउरी भक्त पढरीच्या विठ्ठलास्च भेटतात, मदिराच्या कळसाचें दर्शन झालें की देवाचेंच झाल्यासारखें पढरीच्या वारकऱ्यास समाधान वाटतें, पढरीच्या सप्रदायातील कीर्तनपद्धति, नामघोष, पाया पडण्याची चाल व सताचें माहात्म्य हें ज्ञानेश्वरीत पूर्ण तसेंच वर्णिलेलें आहे, यावरून ज्ञानेश्वरीत विठ्ठलाचें नाव नाही व ज्ञानेश्वरीकर्ते विठ्ठलभक्त ज्ञानदेवाहून भिन्न आहेत असें मानण्याचें बिलकूल कारण उरत नाही, आणि मुद्द्याची गोष्ट ही की पढरीच्या सप्रदायाशी सर्वथैव जुळणारा जर ज्ञानेश्वरीग्रथ नसता तर त्या ग्रथाची त्या सप्रदायानें पर्वा केली नसती' पण ज्ञानेश्वरीग्रथ या सप्रदायाचा प्राण आहे, आत्मा आहे. ज्ञानोबाच्या वेळेपासून आजतागाईत सर्व वारकऱ्यानी व त्याच्या नेत्यानी ज्ञानेश्वरीला आपली 'आई' मानलेली आहे तिच्या आधारावर त्याचें पारमार्थिक जीवन सर्वस्वी अवलबून आहे तिचे सिद्धात हा त्याचा मलाधार आहे ज्ञानेश्वरीला व ज्ञानोबारायाना त्याच्या समकालीन सतानी डोक्यावर घेतलें आहे, व त्याच्याच शिकवणी स्वत पचवन हजारो लोकास सागितल्या आहेत ज्ञानेश्वरी व इतर सत याच्या विचारातले ऐकात्म्य प्रस्तुत ग्रथ नीट वाचणाराच्या लक्ष्यात येईल यात तिळमात्र शका नाही. विठ्ठल, कीर्तनसुख, नामस्मरण,

व सत्संग यावर सर्वांची विचारसरणी व अनुभव अगदी एक आहेत. या सर्व प्रकारावरून ज्ञानेश्वरीचा संतवचनाशी पूर्ण मेळ आहे हें अगदी सिद्ध आहे

## ४. प्रस्तुत ग्रंथ.

७ आतां प्रस्तुत ग्रंथासंबंधानें दोन शब्द सांगतो ज्ञानेश्वरी ग्रंथ शके १२१२ त निर्माण झाला त्यानंतर बरोबर तीनशे वर्षांनी एकनाथांनी 'पाठांतरीं शुद्ध अबद्ध पाहून व शोध करून' ज्ञानेश्वरीची शुद्ध प्रत तयार केली [ पृ० २३१ पहा ] त्या प्रतीच्या अनेक प्रती महाराष्ट्रांत पसरल्या नाथांच्या प्रतीचे पाठ लोकांच्या तोंडी बसले आहेत साखरेबोवा, कुटे, बंकटस्वामी यांच्या प्रती थोड्या फार फरकानें एकसारख्याच आहेत तेव्हां मी या ग्रंथांत जे ज्ञानेश्वरीचे उतारे घेतले आहेत ते या लोकप्रिय प्रतीवरूनच घेतले आहेत राजवाडे प्रत पाठकांत रूढ झाली नाहीं व होण्याचा संभवहीं नाहीं, शिवाय तिच्यांत बऱ्याच मुद्द्याच्या व महत्वाच्या ओंव्याही नाहींत आतां या ग्रंथांत अभंग पदें वगैरे घेतले आहेत ते प्रसिद्धाप्रसिद्ध गाथ्यावरून घेतले आहेत बहिणाबाईच्या मूळ गाथ्याचा थोडासा उपयोग केला आहे शिवाय नगर जिल्ह्यांतील सरदार श्री ना. य. मिरीकर यांनीं मोठ्या प्रयासानें पुणें व नगर जिल्ह्यांत फिरून निवृत्तिनाथ, ज्ञानेश्वर, सोपानदेव, मुक्ताबाई, चांगावटेश्वर, विसोबाखेचर वगैरे संतांचे अजून अप्रसिद्ध असे चारपांचशे अभंग गुदस्ता मजकडे पाठविले व इ स. १९२७ सालीं त्यांपैकीं सुमारें ४००।४५० अभंग मी क्रमानें आपल्या 'मुमुक्षु' मासिकांतून प्रसिद्धही केले आहेत. अजून २५० अभंग त्यांनीं मिळविलेले अद्याप माझे हातीं आले नाहींत या छापलेल्या अभंगांचा व जगनाडे यांच्या वहीतील अभंगांचाही मी थोडासा उपयोग केला आहे ज्ञानेश्वरी, ज्ञानेश्वरमंडळाचे अभंग इतर समकालीन संतांचे अभंग यांतील विचारसरणी व शब्दरचना अगदी एकसारखी आहे यांत शंका नाहीं, किंबहुना ज्ञानेश्वरीसाहितेचे हे अभंग म्हणजे स्फुट उद्गार आहेत असेंही म्हणण्यास हरकतही नाहीं. अभंग, पदें वगैरे हजारों लोकांच्या नित्यपाठांत येत असल्यामुळे त्यांचें अर्वाचीकरण जसें जलद होत असतें तसें ज्ञानेश्वरीसारख्या ग्रंथाचें होत नाहीं म्हणून ग्रंथाच्या व अभंगाच्या भाषेत थोडा फरक भासमान होतो. आतां ह्या संतमंडळाच्या वेळचा राजकीय, सामाजिक व धार्मिक इतिहास लिहिणें अवश्य आहे, पण तसा प्रयत्न करायला ह्या ग्रंथांत सवड नाहीं. तें काम मला पुढें एका ग्रंथांत सावकाशीनें करावयाचे

नाहे. अनेक वादविषयक प्रश्नही उपस्थित झाले आहेत पण त्याचा साकल्येकरून ी पुढे विचार करणार आहे, ह्या सतवाणीचा आस्वाद वाचकानी नि सदेहपणे यावा एवढाच येथे हेतु आहे ज्ञानेश्वरमहाराजापासून तो भागु महारणीपर्यंत र्व सताचा तत्वज्ञानविषयक अधिकार सारखाच होता असे कोणी म्हणणार ाही, तथापि सर्वांची उपासना व परमार्थविषयक विचार एक होते, सत्सग व ामस्मरण यावर सर्वांचाच भर होता, एका उपासनेच्या प्रेमरज्जूने सर्वांची दये परस्पराशी निगडित झाली होती यात शका नाही त्यानी हृदयाच्या एक-टपणात भोगलेला आनद आज तुम्हाआम्हासही भोगता यावा व भागवतधर्माचा यजयकार व्हावा याच हेतूने प्रस्तुत ग्रथ तयार केला आहे. ज्ञानेश्वरमहाराजानी ा ग्रथाचा तीनचतुर्थांश भाग व्यापला आहे यात नवल नाही ते सर्वांचे ग्रेसर असून त्याची ग्रथसपत्तिही मोठी आहे ज्ञानेश्वरीचे वर्म सर्वांस सुलभ-ीत्या समजावे म्हणून त्यातील विषयाचे वर्गीकरण करून ज्ञानेश्वरीची भूमिका उपसहार याच्यामध्ये ज्ञानेश्वरीत प्रतिपादिलेले कर्मयोग, ज्ञानयोग व भक्तियोग ावरील उतारे विषयानुक्रमाने घेतले आहेत गीता आणि ज्ञानेश्वरी या ग्रथाचे पूर्ण वर्म वाचकास हे उतारे वाचता वाचता कळेल अशी उमेद आहे यापुढे यातील विषयाची सगति सागणार असून त्यानतर तीन योगावरील प्रकरणाचा सपूर्ण ोषवारा देणार आहे नुसता गोषवारा वाचूनही गीताज्ञानेश्वरीचे तात्पर्य मनावर बेल. स्फुट विषय व ज्ञानेश्वरी सुभाषितेही जाता येता गुणगुणत रहावयाला पयोगी पडतील या ग्रथात ज्ञानेश्वराच्या सुमारे २५०० ओव्या आहेत, सर्व सताचे मिळून ४०० निवडक अभग आहेत. हा ग्रथ सर्वसामान्य वाचका-ा ज्ञानेश्वराची व तत्कालीन सतकवीची ओळख करून देईलच, पण ज्ञानेश्वरीच्या भ्यासकाना व माझ्या वारकरीबधूनाही उपयोगी पडेल अशी मला उमेद आहे. वेषयानुक्रम पहावा व त्याप्रमाणे पृष्ठ उघडून त्या त्या विषयावरील ज्ञानेश्वराच्या ोव्या गुणगुणत रहावे व मननसुख भोगावे

## ५ प्रस्तुत ग्रथांतील विषयांची संगति.

**१ ज्ञानेश्वरीची भूमिका** —( १ ) गणेश, शारदा व सद्गुरु याना नमन मज हृदयी सद्गुरु । जेणे तारिलो हा ससारपूरु ' व ' म्हणोनि जाणतेने गुरु जिजे । तेणे कृतकार्य होइजे ' ही गुरुभक्तीची बैठक ज्ञानेश्वरीला असल्यामुळे २ ) श्रीसद्गुरुस्तवनादि प्रकरणे प्रथम घेतली आहेत गुरुस्वरूप, गुरुवदन,

गुरुकृपादृष्टि, गुरुचरणपूजा, चित्सूर्य श्रीनिवृत्तिनाथ, गुरुरूपी मौन हेच भले, माझे बोल गुरुकृपेचे आहेत, ही सतपदी चढून गेल्यावर ( ३ ) कृष्णार्जुनाची अन्योन्य-प्रीति अगाध आहे, गुरुशिष्याची एकरूपता–शिष्याची अनन्यता व गुरुचा शिष्योद्धाराचा कळवळा–ही ज्ञानाची भूमिका समजून येते ( ४ ) गीताशास्त्रविषयक ज्ञानेश्वराचे विचार येथे सकलित केले आहेत महाभारत आणि व्यास, भगवद्गीतार्थ व सतश्रोत्यास प्रार्थना, नऊ अध्यायाचे पूर्वखड, अठराही अध्यायाचे विषय, गीता-प्रासादाची उभारणी, गीतारहस्य, वेदाचें मूळ गीता, गीतेची सर्वसेव्यता गीता ही प्रभूची वाङ्मयमूर्ति, गीतेचा सप्रदाय इ मथळ्याखाली गीताशास्त्राविषयी ज्ञानोबानी जागोजाग काढलेले उद्गार एकत्रित केले आहेत ( ५ ) प्रस्तुत ग्रथाचे व मराठी भाषेचे गौरव केलेले येथे आढळेल ग्रथाची योग्यता, तो ऐकणाऱ्याची मनोभूमि, ज्या भाषेत तो प्रकट झाला त्या मराठी भाषेचे वैभव, ‘ आनदाचे आवारु माडू जगा ’ हा आत्मविश्वास, हे सारस्वताचे झाड अवधानामृताच्या सिंचनाने वाढवा ही श्रोत्यावाचकाची प्रार्थना इतके सुरस विषय येथे आढळतील ( ६ ) ज्ञानेश्वराच्या काही कृष्णप्रेमलहरी येथे दिल्या आहेत ( ७ ) कृष्णार्जुनाचा प्रास्ताविक सवाद देऊन ही ज्ञानेश्वरीची भूमिका सपविली आहे ह्या भूमिकेने ५१ पृष्ठे घेतली आहेत

**२ कर्मयोगः**—कर्मयोग दोन भागात सागितला आहे एक स्वधर्माचरण व दुसरा सदाचार उर्फ सामान्य नीति पहिल्यात प्रत्येकाने वर्णाश्रमधर्माप्रमाणे ह्म० जातिधर्माप्रमाणे वागावे, वेदशास्त्र प्रमाण मानून ओघाला आलेले स्वकर्म सग व फलाशा सोडून करावे व ते ईश्वरार्पणबुद्धीने करावे असे निरनिराळ्या १९ प्रकरणातून सागितले आहे व सामान्य धर्माचे ह्म० नीतीचे वर्तन कसे असावे, कोणते दोष टाकावेत व कोणते गुण घ्यावेत हे दुसऱ्या भागातील १७ वें प्रकरणात दाखविले आहे कर्मयोगाचे स्पष्टीकरणात ह्याप्रमाणे दोन्ही भागाच्या ३६ प्रकरणात सविस्तर आले असून त्याने पृ० ५३ ते ११८ इतकी पृष्ठे घेतली आहेत. ( १ ) कर्मयोगाचें रहस्य निष्काम स्वधर्माचरण हेच आहे, परधर्मापेक्षा स्वधर्म आचरायला कठिण असला तरी तोच आचरावा, कार्याकार्यविवेकी श्रुति-शास्त्रप्रामाण्य मानावे, चातुर्वर्ण्य गुणकर्मविभागाप्रमाणे भगवतानी स्वत. केले असल्यामुळे ब्राह्मणादि वर्णानी श्रुत्याज्ञेनुसार वागून ईश्वरप्रसाद जोडावा, कर्मे करिताना काम्य व निषिद्ध कर्मे टाकून नित्यनैमित्तिक कर्मेच यथाविधि करावीत,

विहितकर्मे केल्यावाचून गत्यतर नाही, फलाशा व देहसग किंवा अभिमान सोडून ईश्वरार्पणबुद्धीने कर्मे केल्याने जीव कर्मबधापासून मुक्त होतो, विहितकर्मत्याग म्हणजे नैष्कर्म्य नव्हे, हे सर्व पहिल्या तेरा प्रकरणात सागितले आहे ज्ञानयोग व कर्मयोग दोन्ही तुल्यबल आहेत, दोहींचे फल एकच आहे, ‘ तरी जाणानेणा सकळा । हा कर्मयोग कीर प्राजळा । जैसी नाव स्त्रियाबाळा । तोयतरणी ’ याप्रमाणे हा कर्मयोग सर्वमान्य व सुलभ आहे, मी व माझे हे दोहोतही सारखेच विसरायचे असल्यामुळें ‘ हे गृहादिक आघवे । ते काहीं नलगे त्यजावे,’ खरा निष्कामकर्मयोगी व सन्यासी या दोहोंची लक्षणें एकच आहेत, म्हणून ज्ञात्यानी लोकसग्रहासाठी कर्म करावें व आपला अकर्तात्मबोध राखावा असें प्र० १४ ते १८ पर्यंत सागितलें आहे ही पाच प्रकरणें पाहिली ’ म्हणजे ह्यात लोकमान्याचे गीतारहस्य सक्षेपरूपाने ज्ञानेश्वरमहाराजानी सागितले आहे असें स्पष्ट दिसते दोघानीही कर्मयोगच सागितला आहे पण स्वधर्माचरणावर ज्ञानोबारायाचा जोर अधिक आहे विहितकर्माने मोक्षसिद्धी होत असल्यामुळे वेदविहितकर्मे निष्कामबुद्धीने करावीत, हीच सर्वात्मकाची पूजा आहे, मनबुद्धि सर्वात्मकाच्या प्रेमाने भरली तरच सर्वकर्माची सफलता आहे, जो सर्वेंद्रियानी ईशसेवा करित आहे तो कोणत्याही कुळाचा जातीचा असो तो उद्धरतो असे शेवटच्या तीन प्रकरणात सागितले असून स्वधर्माचरणाच्या ह्या पहिल्या भागाची समाप्ति केली आहे [ २ ] आता सदाचार उर्फ सामान्यनीति ह्या दुसऱ्या भागाच्या १७ प्रकरणात सार्वलौकिक नीतिनियम सागितले आहेत. सदाचार सुखासाठीच असतो म्हणून विषयसुखाची भ्राति त्रिविधसुखाच्या व्याख्या सागून प्रथम दूर केली आहे, कामक्रोधलोभापासून सुखार्थी यानें दूर रहावे व आपले आत्यतिक कल्याण शोधावे, जीवाने कर्म केलेच पाहिजे असे आहे म्हणून विहितकर्माने भगवत्प्रेम व आत्मसमाधान राखावे व सत्सग, सच्छास्त्रश्रवण, गुरुकृपा व आत्मानद या क्रमाने चढत जावे, मन चचल असले तरी वैराग्य व अभ्यास याच्या बळाने ते जिंकावें, असे पहिल्या सहा प्रकरणात सागितले असून पुढे राजस व तामस आहार टाकून सात्विक आहार व तोही परिमित ठेवावा, सात्विक दान, सात्विक याग, कायावाचामनाचें सात्विक तप, व सात्विकपणा मुरलेपणाची चिन्हे इतका विषय प्रकरणे ७ ते १३ पर्यंत सागितला आहे. सदाचाराचा हा मार्ग चोखाळल्यानें मनोजय होतो. पुढे

अज्ञानाची काही लक्षणे, आसुरीसपत्तीचे सहा दोष, व असुराची वागणूक या तीन प्रकरणात अनाचार व दुराचार कसा असतो हें केवळ त्यागार्थ सागितले आहे आसुरीसपत्ती बळावली म्हणजे व्यक्तीत किंवा राष्ट्रात कोणते दोष अगी मुरतात व असुरप्राणी वेदशास्त्रसदाचार सर्व झुगारून कसे थैमान घालतात हे १४।१५।१६ या तीन प्रकरणात स्पष्ट सागितले आहे यानतर याच्या अगदी उलट असे अभयादि दैवीसपत्तीचे सव्वीस गुण अभ्यासार्थ स्पष्ट करून दाखविले असून हा दुसरा भाग सपविला आहे

३ **ज्ञानयोग** —येथे ज्ञानयोगाचा २९ प्रकरणात सागोपाग विचार केलेला आढळेल ज्ञानयोग, ज्ञानाची पवित्रता व सामर्थ्य, त्रिविधज्ञान, ज्ञेय, जितेंद्रिय श्रद्धावनालाच ज्ञान होते, आत्मज्ञानापुढे इतर ज्ञाने तृणवत् होत, सशयात्मा विनश्यति, व सतापाशी ज्ञान ह्या पहिल्या आठ प्रकरणात आत्मज्ञानाचे स्वरूप व साधन दर्शविलें आहे अभ्यासयोगाला एकातस्थान कसे पाहिजे हे ९ व्या प्रकरणात उत्कृष्ट प्रकारे वर्णिले आहे. सुदर स्थलवर्णनाचा हा एक नमुना आहे १० व्यात अश्वत्थवृक्षाचे रूपक उलगडून दाखविले आहे वैराग्यावाचून ज्ञान नाही व ससाराची अनित्यता पटल्यावाचून वैराग्य नाही, म्हणून अश्वत्याच्या सुदर रूपकाने ससाराचें अनित्यत्व दाखविले आहे ससारवृक्ष, हा ऊर्ध्वमूल कसा, अध शाख कसा, अश्वत्थ असून अव्यय कसा, याचे छेदन म्हणजे काय, भवपार झालेल्या महात्म्याचे स्वरूप कसे हे सर्व यावरून समजते ११ व्यात 'आबुली जोडी आबुली खाय' ह्यात प्रकृतिपुरुषाचे स्वरूप म्हातारा नवरा व कर्तृत्वाची बायको याच्या ससाराच्या विनोदी भाषेत फार बहारीने वर्णिले आहे भाषा श्रुतीची, गभीर, विषय गहन, पण वर्णन काव्यपूर्ण व्यवहाराचे—असे हे प्रकरण फार मोजेचे आहे १२।१३ व्यात विश्वविस्ताराचें मूळ जी मूळमाया तिचे वर्णन अमेंच गमतीचे असून ती पुरुषसत्तासभोगे कशी गुर्विणी झाली व क्रमाने सृष्टयुत्पत्ति होऊन हे जगडबर बाळ तिच्या पोटी कसे आले व बाळसेदार कसे झाले हे सागितले आहे सृष्टिकर्तृत्व देवाकडे नाही, कर्तृत्व प्रकृतीचे असे पुढील दोन प्रकरणात सागितलें आहे. १६ व्यात ब्रह्मी माया कशी झाली हे सुदर दृष्टातानी —'ती झालीच नाही' याप्रमाणें दाखविले आहे. १७।१८ ह्या दोन प्रकरणात क्षरअक्षरावेगळा पुरुषोत्तम कसा आहे तें वर्णिले आहे. ब्रह्मसुख सुलभ पण अश्रद्धेला दुर्लभ हे पुढील दोन प्रकरणात सागितलें आहे. आदिदेवाला कोण जाणेल,

'अवयव तरी आनआन । परी एकाच देहीचे' हे शुद्ध ज्ञान जाणीव राखून कसे पाहायचे हा गोड भाग पुढील तीन प्रकरणात ( २१ ते २३ ) पहावा जग, आपण ( जीव ) व ब्रह्म या तिहींची एकमयता पुढील तीन प्रकरणात ( २४ते२६ ) पहावी, यात 'तत्वमसि' ह्या महावाक्याचाच उलगडा आहे ज्ञात्याची साम्यबुद्धि, ज्ञान उमटल्याची अमानित्वादि १८ लक्षणे व स्थितप्रज्ञाची लक्षणे या तीन प्रकरणात ज्ञानीपुरुष ओळखावा हा ज्ञात्याचा आरसा आहे यात साधकाने आपले तोंड पहावे व समजावे ह्या सर्व प्रकरणात अध्यात्म्याचें स्वरूप सुलभ-रीतीने दर्शविले आहे ते तन्मय होऊन भोगावे ( पृ ११९ ते १७७ )

**४ भक्तियोग**—साधकाला दुस्तर मायानदीचे भय वाटत असते म्हणून प्रथम तिचें वर्णन करून व ती तरून जायला माणसे जो जो उपाय करितात तो तो अपाय कसा होतो हे सांगून 'येथ एकचि लीला तरले । जे सर्वभावे मज भजले' असा तरणोपाय पहिल्या प्रकरणात सांगितला आहे, व ईश्वरभजनावाचून उपायच नाही हे दुसऱ्यात स्पष्ट बिंबवले आहे भक्त चतुर्विध असले तरी ज्ञानीभक्तच अनन्य कसा हे ३ ऱ्या प्रकरणात सांगून ४ थ्यात मला व्यापकाला न ओळखता अज्ञानातील भक्ती करणे वेडेपणाचे आहे असें म्हटले आहे. भक्ताचा अभ्यासयोग कोणता, अभ्यासाला दुष्कर कसे काही नाही—' अगा उपायबळे पंगु । पहाड ठाकी' हे पाचव्यासहाव्यात ओजस्वी वाणीनें सांगितले आहे सातव्यात ' मी गोसावी समस्ता त्रैलोक्याचा ' याप्रमाणे भगवतानी आपल्या सामर्थ्याची व व्यापकत्वाची ओळख स्वत:च करून दिली आहे देवाचे रूप देवावाचून कोण दाखविणार म्हणून माझा विस्तार, यंत्रारूढ भूताचा चाळक मी ईश्वर, असे ८।९ ह्या दोन प्रकरणात सांगितल्यावर अर्जुनाला सहज ' विश्वरूपदर्शनाची उत्कंठा ' लागली तें १० वे प्रकरण आले, व विश्वरूपदर्शन, विश्वरूपस्तुति, अर्जुनाचे अपराधक्षमापन, ही तीन प्रकरणे क्रमानेच आली. विश्वरूप व चतुर्भुज यापैकी आपल्याला कोणते पाहिजे हे अर्जुनाने १४ व्यात सांगितले तरी १५ व्यात देव त्याला विश्वरूपी चित्त ठेव असेच सांगत आहेत. येथे विश्वरूप का चतुर्भुज, निर्गुण का सगुण हा प्रश्न आला असून १६ व्यात निर्गुणोपासना मोक्षदायक पण कष्टप्रद आहे असे म्हणून प्रेमळ सगुणभक्तच खरे योगी असे १७ व्यात व सगुण निर्गुण दोनी एक खरे पण सगुणाची गोडी और आहे असा निर्णय १८ व्यात केला आहे. पुढे ओघानेच अवताराचे प्रयोजन १९ व्यात सांगावे लागले. सगुण

भक्तीची दोन उत्कृष्ट साधने नामस्मरण व नमन ही २०।२१ मध्ये सागितलीं आहेत. देवाला उपचार नकोत, सर्वस्व हवे हे २२व्यात आहे अतरगभक्ताची १२ व्या अध्यायातली ' अद्वेष्टा सर्व भूताना ' इ० अत्यत बहारीची लक्षणे २३ व्या प्रकरणात सागितली आहेत. २४ व्यात अशा भक्तावर देवाचें प्रेम किती अगाध असते हे ज्ञानोबारायानी वर्णिलें असून २५ व्यात भक्ताच्या मेळ्यातले सवाद-सुख सुदर वर्णिलें आहे यापुढच्या सात प्रकरणात भक्तियोगाचे सारसर्वस्वच साठवले आहे असे दिसून येईल. ' हे समस्तही श्रीवासुदेव' ही ज्याची प्रचीति ' तो भक्तामाजी राव । आणि ज्ञानिया तोचि'. ज्ञानभक्ति म्हणजेच अद्वैतभक्ति कशी असते व ज्ञानीभक्ताचे स्वरूप कसें हे २७।२८ ह्या अतीव मधुर प्रकरणात पहावें. अशा अनन्यभक्ताचा योगक्षेम व त्याच्या उद्धाराची सर्व काळजी देवाला हें स्वमुखानें प्र. २९।३० मध्यें सागून ' सपूर्ण प्रसादाचें ' दान ३१ व्यात देवच देत आहेत शेवटचा गोड घास–' ईश्वरशरणता ' हा तर ' गुह्यात्-गुह्यतम ' असें देवानीच ज्याला म्हटलें तो होय. ह्यात सागावयाचें तें सर्व अर्जुनाला ( ह्म० आपणा सर्वाना ) देवानी अत्यत मधुरवाणीनें सागितलें आहे. व ' बोलाबुद्धीसी अटक । ऐसें जें काही एक' देवाच्या हृदयात राहिले होतें तें द्यावया मिष । खेवाचे केलें ' ' परम दुर्लभ असें आपलें गाढालिंगन त्यास दिलें. त्याबरोबर ' हृदया हृदय येक जाहलें । ये हृदयींचें तें हृदयीं घातलें ' तो गुरुशिष्याचा एकात आहे '–

अर्जुनाचें सेवकपण राहिले, येर सर्व सेव्य जाहलें '
' अर्जुनपण न मोडिता । केला आपणपे पार्थ ! '

'५ **ज्ञानेश्वरीचा उपसंहारः**–श्रीगुरु, व्यास व भाष्यकार याच्या उपकाराचें स्मरण, गुरुपरपरा, ग्रथरचनेचें समाधान, स्थलकालनिर्देश, नाथाच्या अखेरच्या ओव्या व प्रसाददान हे विषय उपसहारात आले आहेत

६ **स्फुटविषयसंग्रहः**—ज्ञानेश्वरीतील मुख्य विषय जे कर्मज्ञानभक्तियोग त्यातील विषय सगतवार पूर्वी येऊन गेलेच आहेत, पण त्याशिवाय जे स्फुट विषयावर स्फुट विचार ज्ञानेश्वरीत ओघाने आले आहेत ते येथें सकलित केले आहेत स्नेहाचें काठिण्य, व्यवसायात्मिकाबुद्धि, शुकनलिकेचा दृष्टात, योग्यतेची काय खाण आहे ? सत ते देव, मनुष्याणा सहस्रेषु, पुनरुक्तीही गोडच, विषयातरदोषाचा परिहार, भाषणात कोणते दोष टाळावेत, डोळस कोण, आला आणि

गेला, अनुभव मुरायला हवा इ. २८ मनोरजक स्फुट विषय येथे घेतले आहेत.

**७ ज्ञानेश्वरी सुभाषितें:**—विविध प्रकारची एकदर १८५ सुभाषिते येथे दिली असून त्यापैकी कित्येक चटकदार व्याख्या नेहमी तोंडांत राहतील अशा आहेत. एकेक सुभाषित एकेका वेळच्या मननाला पुरेल दान, तप, दया, ज्ञान, सौजन्य, शौर्य, परोपकार इ. विषयावरील सुभाषिते सुदर आहेत.

**८ अमृतानुभव:**—ह्या उत्कृष्ट ग्रथातील पाचच उतारे घेतले आहेत, पण ते सर्वोत्कृष्ट आहेत शिवशक्तीची एकरूपता, शब्दमडण व शब्दखडण, अविद्येचा निरास, जग चिद्विलास, आम्ही ज्ञानाज्ञानातीत आहोत—हे विषय अध्यात्मगिरि-शिखरावर आरूढ झालेल्याना सुखास्वाद देऊन तन्मय करितील यात शका नाही

**९ संतमंडळाचे अभंग**—ह्यात प्रभावळीतील एकदर २९ भक्तभाविकाची सुरस पद्ये दिली आहेत प्रथम ज्ञानेश्वराचा हरिपाठ स्वतत्रपणे दिला आहे हा नित्यपाठातला आहे नतर गोरक्षनाथाची ३ पदे व गैननिाथाचे ३ अभग दिले आहेत, त्यावरून पूर्वपरपरेची थोडी ओळख होते. यात एकदर अभग, पदे वगैरे पद्ये ३९१ दिली असून स्फुट कविता १६ आहेत यात निवृत्तिनाथाचे १५ अभग, ज्ञानेश्वराचे ५१, मुक्ताबाईचे १८, नामदेवाचे १०७, जनाबाईचे ३७, जोगा परमानदाचे ८ चोखामेळाचे २१ इतके तरी प्रत्येकाने अवश्य पहावेत. सर्वच पहावेत पण निदान इतके तरी पहावेत, म्हणजे या सताच्या विचाराची, भक्ति-प्रेमाची, अद्वैतानदाची चटक लागेल ज्ञानेश्वराची गौळण व घोगडी, मुक्ताबाईच्या झोक्यावरील ओव्या, जनाबाईचे दळण व लिहिणे, व नामदेवाची स्वप्न, बोबड्याचा रुसवा, खेळिया वगैरे प्रकरणे कमालीची सुदर आहेत. स्वात्मानदाच्या लहरीशी खेळत असता त्याच्या मुखातून अमृताची गगा वाहिली आहे. सोपानदेवानी म्हट-ल्याप्रमाणे ‘ असो खेळीमेळी इये जनी ’ याप्रमाणे ही सतमडळी लोकात हासत खेळत नाचत बागडत भूतमाली हरिदृष्टि ठेवून वागत व सहज लीलानी व कव-नानी हरिप्रेमसुख जाणानेणा सकळाना पाजीत. मुक्ताबाईचा पाळणा ( अभग ७ ) व ताटीचे अभग खोल व मधुर आहेत. नामदेव, जनाबाई व चोखामेळा याच्या अभगाची गोडी अनिर्वचनीय आहे त्याचे उत्कट व कोमल भक्तिप्रेम, प्रेमभराने सुचलेल्या सुदर कल्पना व दृष्टात, व गोड रुसवा व लाडिकपणा सर्व काही वाचकानाही वेड लावल्यावांचून राहणार नाही. कोणी प्राचीन व समकालीन संताच्या आरत्या केल्या आहेत. विसोबा खेचरांच्या अभगात मुळु, अगुळु, पोकु,

सेलु, इ० जे आकड्याचे सांकेतिक शब्द आले आहेत ते आजही सराफ व शिंपी लोकाच्या परिपाठात आहेत जोगा परमानदाचे 'गुरगुडी'वरील पद मौजेचे पण गुरुगोडी भोगणाऱ्या गुरुभक्ताचे आहे. नामदेवाच्या अभगापैकी १४ ते २२ व २६।३३।३५।४६।४९।५३ इ० अभगातील प्रार्थना अत्यत मधुर आहेत 'मुक्तीवरील भक्ति' ज्यास पाहिजे त्यानी त्याचे ३४।३७।४२।६३।६५ हे अभग अतरात घोटावेत व लाडिकपणा ४०।५३।५४।५५ या अभगात पहावा देवाचे रूप, नाम, पाय, सत याचे वर्णन गोडच गोड आहे. निवड काय करावी ? स्वानुभवी भक्ताची ही वाणी अमृताची सुरसरी आहे तोड लावाल तेथे अमृतच आहे

पुणे 'मुमुक्षुकचेरी'
माघ शुद्ध १० शके १८४९

सतचरणरज
**लक्ष्मण रामचंद्र पांगारकर.**

---

## कालानुक्रम.

शके ११८९ गोरा कुभार याचा जन्म तेरढोकी येथे.

शके ११९२ नामदेवाचा जन्म. प्रमोद कार्तिक शुद्ध ११ रविवार.

शके ११९३—१२३१ महाराष्ट्रीय भूपति रामदेवराव जाधव याची कारकीर्द.

शके ११९५—११९९ पढरपूच्या चौऱ्यार्शीच्या शिलालेख 'श्रीविठ्ठलदेवराया'च्या मदिराच्या जीर्णोद्धारकार्याची सार्वजनिक चळवळ.

शके ११९५ श्रीमुखसवत्सर माघ वद्य १ प्रात काळ —
निवृत्तिनाथाचा जन्म.

शके ११९७ युवा सव० श्रावण कृष्ण ८ मध्यरात्र.—
ज्ञानेश्वराचा जन्म.

शके ११९९ ईश्वर सव० कार्तिक शुद्ध १५ प्रहरराल —
सोपानदेवाचा जन्म.

शके १२०१ प्रमाथि सव० अश्विन शुद्ध १ माध्यान्हः—
मुक्ताबाईचा जन्म.

शके १२०९ ज्ञानेश्वरानी रेड्याकडून वेद बोलविले,भिंत चालविली. बोपदेव पंडितानी शुद्धिपत्र दिले ( सर्वजित् , माघ शुद्ध ५ )

शके १२१२ ज्ञानेश्वरीग्रंथाचा उद्भव—नेवासे येथे

शके १२१७ सच्चिदानंदबावाचा ग्रंथ ' ज्ञानेश्वरविजय '

शके १२१८ मन्मथ सव० आषाढ कृष्ण १४ —
मोउलिंबजवळ अरण येथे सावतामाळी याची समाधि.

शके १२१८ दुर्मुख सव० कार्तिक वद्य १३ गुरुवार
ज्ञानेश्वरमहाराजाची समाधि आळंदी येथे
,, मार्गशीर्ष वद्य १३ सोपानदेवाची समाधि सासवड येथे.

शके १२१९ वैशाख वद्य १२ एदलाबादेहून ३ कोसावर व चांगदेव गावापासून २ मैलावर महद्ग्राम उर्फ मेहूण येथे मुक्ताबाईची समाधि.
,, ज्येष्ठ वद्य १२ निवृत्तिनाथाची समाधि

शके १२२० तापीतीरी चांगदेव येथे चांगदेवाची समाधि.

शके १२३१ विसोबा खेचराची समाधि सौम्य. सव श्रावण शु. ११

शके १२३५ प्रमादी सव० माघ कृष्ण १ नरहरी सोनाराची समाधि पंढरपूर येथे.

शके १२४० कालयुक्त सव० माघ शु १५ बंकामहाराची समाधि

शके १२५२ प्रमोद कार्तिक शुद्ध ११ जनामित्र नागा याची समाधि जोगाईच्या आंब्याजवळ परळी येथे.

शके १२६० बहुधान्य सव० वैशाख कृष्ण ५ पंढरपुरास चोखामेळा याची समाधि.
मार्गशीर्ष वद्य १४ बारशी येथे जोगा परमानंद याची समाधि.
मार्गशीर्ष वद्य ११ कान्हो पाठक याची समाधि केंदूर येथे दरसाल उत्सव होतो. ( शक सापडत नाही )

शके १२७२ विकृत सव० आषाढ कृष्ण १३ पंढरपूर येथे पायरीजवळ नामदेवाची समाधि

शके १४५०—१५२० एकनाथाचे अवतारकार्य.

शके १५३०—१५७१ तुकोबाचे अवतारकार्य.

## कर्मयोग, ज्ञानयोग व भक्तियोग यांवरील प्रकरणांचा गोषवारा.

# १ कर्मयोग-( १ ) स्वधर्माचरण.



**१ निष्काम स्वधर्माचरण हेंच कर्मयोगाचें रहस्य आहे —**

युद्धात यश मिळो वा न मिळो, स्वधर्म हा ' सर्वथा त्याज्य नोहे ' हे विसरू नये युद्धसमयी चित्त स्नेहवश होऊ देणे हें अनुचित आहे गाईचें दूध नवज्वराच्या रोग्याला दिलें तर ते विष होतें, त्याप्रमाणे स्नेह हा एरव्ही चागला असला तरी सग्रामसमयी शत्रु समोर ठाकला असताना मारक आहे, अधर्म्य आहे ' निष्कपट होआवे । उसिणा घाई झुजावे ' म्ह० सरळ बुद्धीने, वीरश्रीनें लढावे यातच क्षत्रियाना कीर्ति आहे स्वधर्मावाचून जीवित प्रेततुल्य होय. स्वधर्म सोडल्यास अपकीर्ति व पाप मात्र निश्चित स्वधर्माने यश मिळाल्यास इहलोकी ऐश्वर्य व कीर्ति आणि मरण आल्यास स्वर्गप्राप्ति आहे. क्षत्रियाचा युद्धकर्म हा स्वधर्म असल्यामुळे त्यात हत्या झाल्याचे त्याला पाप नाही, हेतु म्ह० फलाशा ठेवल्यास मात्र पाप आहे

> म्हणोनिया पार्था । हेतु साडूनि सर्वथा ।
> तुज क्षात्रवृत्ती झुजता । पाप नाही ॥ २–२२५ ॥

लाभालाभ, जयाजय याचा विचार न करिता स्वधर्म म्हणून क्षत्रियाने युद्ध करावे कोणीही आपले विहित कर्म सोडू नये.

> आपणया उचिता । स्वधर्मे राहाटता ।
> जे पावे ते निवाता । साहोनि जावे ॥ २–२२८ ॥

कर्मत्याग उचित नाही, मात्र सग व फलाशा सोडून कर्म म्ह० विहितकर्म करावे युद्धाचा शेवट काय होईल याचा विचार करू नये यश आले तरी वाहवा–न आले तरी वाहवा मनाची समता ठेवून घडेल तें कर्म आदिपुरुषाला समर्पावें ही योगस्थिति ठेवून कर्म केल्यानें ते बधक होत नाही 'अर्जुना समत्व चित्ताचें । तोचि सार जाण योगाचें.' तात्पर्य सग व फलाशा सोडून परमात्म्याच्या सतोषार्थ स्वकर्म करणें हेच कर्मयोगाचे रहस्य आहे

**२ ब्रह्मदेवाची प्रजांना हीच शिकवण आहे** —अहेतुक चित्तानें

तुम्हीं स्ववर्णाश्रमधर्माला उचित ते स्वकर्म करा म्हणजे तराल स्वधर्मयज्ञानें देवता सतुष्ट होतील ' तुम्ही देवाते भजाल । देव तुम्हातें तुष्टतील ' व तुमचा योगक्षेम चालून सर्व मनोरथ पूर्ण होतील केवळ भोगासक्त होऊन स्वधर्मक्रिया सोडाल तर मात्र देवता असतुष्ट होतील. ' स्वधर्म जरी लोपला । तरी सर्व सुखाचा थारा मोडला ' असें निश्चित समजा जो स्वधर्म सांडील त्याला पातकें, दु:खें व दैन्य गिंवसित येतील,म्हणून निजवृत्ति सोडून कोणीही इद्रियरत होऊ नये.

**३ श्रीकृष्णाची अर्जुनास हीच शिकवण** —स्वधर्मरूप यज्ञ कसा करावा हें येथें उत्तम प्रकार सागितलें आहे. शरीर आले तेथें कर्तव्य ओघानेंच आलें, मग आपलें उचित कर्म का करू नये? गुरु, गोत्र, अग्नि, पितर, भूतमात्र याविषयींचे आपलें कर्तव्य (पच महायज्ञ) यथाशास्त्र करावे,इद्रियरुचीसाठीं पाक करून भोगतील त्याना ते पाक पापरूप होतील, पण स्वधर्माचरणानें वागून पचमहायज्ञ करून सर्वांचा सतोष ठेवून जे भोगतील त्याना पाक निष्पाप करतील. स्वधर्मानें मिळवावें व स्वधर्मानेंच विनियोग करावा —

हें सपत्तिजात आघवें । हवनद्रव्य मानावे ।
मग स्वधर्मयज्ञे अर्पावें । आदिपुरुषीं ॥ ३–१३० ॥

जे स्वधर्मे निष्कामता । अनुसरलें गा पार्था ।
ते कैवल्यपद तत्वता । पावले जगीं ॥ ३–१५१ ॥

' हें कर्म मी कर्ता ' अशा अभिमानाने कर्म करू नये तर निष्काम व निरहकार होऊन स्वकर्म करावे अर्जुना ' सहजप्राप्त सग्रामकर्म तुला स्वधर्म म्हणून केलेच पाहिजे

जगीं कीर्ति रूढवी । स्वधर्माचा मान वाढवी ।
इया भारापासोनि सोडवी । मेदिनी हे ॥ ३–१९० ॥

**४ स्वधर्मे निधनं श्रेय:**— आपल्या भागाला आलेलें स्वकर्म कठिण असलें तरी तेंच करण्यात श्रेय आहे. ज्याचा धर्म त्याला तारक. दुसऱ्याचे वाडे पाहून आपली झोपडी मोडणें किंवा परस्त्री पाहून कुरूपही धर्मपत्नी त्यागणें जसें अनुचित तसा स्वधर्म आचरायला कितीही कठिण व सकटग्रस्त असला तरी तो आचरण्यातच जीवाला सद्गति आहे. दूधसाखर विशिष्ट रोग्याला विरुद्ध असताना आवडली तरी त्यानें ती सेवन करू नये. तात्पर्य, दुसऱ्याला विहित पण स्वत ला

अनुचित असें कर्म श्रेयस्कर नव्हे स्वधर्माचरणात मरणही श्रेयस्कर आहे. क्षत्रियानें वीरवृत्तीनेंच स्वकर्म केलें पाहिजे.

५ **श्रुतिशास्त्रप्रामाण्य**—धर्मात आवडीनिवडीला जागा नाही ( ज्यानें त्यानें लहरीप्रमाणे वागणें योग्य नव्हे ) श्रुतिशास्त्रानें ज्याला जें कर्म स्वधर्म म्हणून सागितलें आहे तेंच त्याने केलें पाहिजे श्रुति जगाची माउली आहे 'शास्त्र म्हणेल जें सांडावें । तें राज्यही तृण मानावें । जें घेववी तें न म्हणावें । विषही विरु.' कार्याकार्याचा निर्णय वेदशास्त्रानें केलेलाच आहे, म्हणून श्रुतीच्या आज्ञा व तदनुसार शास्त्रानें केलेले कायदे मोडणें स्वहिताचें व लोककल्याणाचेंही नाही. अर्जुना ' तू क्षत्रिय आहेस म्हणून क्षात्रकर्मातच तुझें कल्याण आहे व विश्वप्रामाण्याचा शिक्का आज तुझ्या हाती आहे. तू जें करशील तें जगात प्रमाण मानलें जाईल. लोकसग्रहाचीही दृष्टि सोडू नकोस.

६ **चातुर्वर्ण्य** – चार वर्ण गुणकर्मविभागाप्रमाणें भगवतानीच उत्पन्न केले आहेत. श्रुतिशास्त्रानें चातुर्वर्ण्यसस्था सघटित केली असून ज्यानें त्यानें आपलें स्ववर्णोचित व स्वाश्रमोचित कर्म केलें पाहिजे यातच त्याचें कल्याण आहे. शम, दम, तप, शौच, क्षाति, आर्जव ( सरळपणा ), ज्ञान, विज्ञान व आस्तिक्य हे नऊ गुण ब्राह्मणाचे, शौर्य, तेज, धृति, दक्षता, अपलायन, दान, ईश्वरभाव हे सात गुण क्षत्रियाचे, कृषि, गोरक्ष्य व वाणिज्य हे गुण वैश्याचे व त्रिवर्णाना त्याच्या स्वधर्माचारात सेवेचे साह्य करणें हा गुण शूद्राचा. चौघानाही आपापल्या स्वधर्मकर्मानेंच गति मिळते.

७ **नित्य आणि नैमित्तिक कर्में** —हेतु किंवा फलाशा ठेऊन कर्में करू नयेत अर्थात् निष्काम कर्में करावीत असें सागितलें, तेव्हा कर्में किती प्रकारची आहेत व त्यातील कोणती करावीत हा प्रश्न पुढें येतो व त्याचा विचार केला पाहिजे. कर्में चार प्रकारची आहेत. काम्य, निषिद्ध, नित्य आणि नैमित्तिक. काम्यनिषिद्धांचा त्याग व नित्यनैमित्तिकाचा निष्कामबुद्धीनें अगीकार—हा वेदशास्त्राचा निर्णय आहे. स्नानसध्यादि प्रतिदिनी करणीय ती नित्य कर्में, व पर्वमहोत्सव, श्राद्धपक्ष, अतिथिसत्कार इ० नैमित्तिक कर्में. ही दोन्ही फलाशा सोडून करावीत भोजनानें जसा 'तृप्ति लाभे भूक जाये' हा लाभ होतो तसें या कर्मांना सर्वांगीं फळ आहे.

प्रत्यवाय तव गळे । स्वाधिकार वहुवे उजळे ।<br>
तेथ हातोफळिया मिळे । सद्गतीसी ॥ १८–१२२ ॥

**८ यज्ञदानतपादि कर्में केलीच पाहिजेतः**—हरवलेली वस्तु सापडेतो माग सोडू नये, पायिकाने पाऊलवाट सोडू नये, पोट भरले नाही तोवर ताट सारू नये, त्याप्रमाणे मी आत्मा आहे हा निश्चय दृढ होऊन देहभाव गेला नाही तोवर यज्ञदानादि कर्में टाकू नयेत टाकू नयेत इतकेच काय पण अधिक आस्थेने आचरावीत अत्यंत वेगाची चालही बसण्यासाठी असते, औषधसेवन हे रोगनिरसनार्थ असते, त्याप्रमाणे यज्ञदानतपादि कर्मे अत्यंत आस्थेने केल्यानेच कर्मापासून मुटका होते ' तीर्थे बाह्यमळ क्षाळे । कर्में अभ्यंतर उजळे ' कर्माने चित्तशुद्धि होऊन ज्ञानाधिकार प्राप्त होतो

**९. कर्में बंधमोचक केव्हां होतात**[१]—कर्तेपणाचा अहंकार गाळल्यानेच कर्में बंधक होतात सोमलविष मारक खरे, पण रसायनपद्धतीने तेच औषध होते, तसे कर्म बंधक खरे पण अहंकार सोडून केले तर कर्मच कर्मबंधापासून सोडविते नित्यनैमित्तिक कर्में किंवा यज्ञदानतपादि कर्में निष्ठापूर्वक अचूक ह्म० यथाविधि करावीत पण ' कर्तेपणाचे न ठाके । फुजणे अंगी ' ह्म० कर्तृत्वाहंकार सोडावा मोलाने यात्रा करणाराला, दुसऱ्याच्या कासेला लागून नदीपार जाणाराला, किंवा यजमानकृत्य करणाऱ्या उपाध्यायाला जसा त्या त्या कर्माचा ताठा नसतो, त्याप्रमाणे श्रुतिशास्त्राची आज्ञा म्हणून स्वकर्म करणाराला कर्तेपणाचा फुज नसतो. तो स्वबुद्धीने काही करीतच नाही कर्तृत्वाहंकार व फलाशा याचा त्याग करून शास्त्राज्ञापरिपालन करणारास कर्मबंध नाही.

म्हणोनि फळी लाग । साडोनि देहसंग ।
कर्में करावी—हा चांग । निरोप माझा ॥ १८–१७६ ॥

**१० कर्मत्याग नव्हे-फलत्याग !**—देहात असून ' कर्माची खर्ती करिती ते गावढे गा ' ( अडाणी ) होत. देह आहे तो कर्म त्याला चिकटलेच आहे कर्मत्याग म्हणजे फळाशेचा त्याग. आत्मबोधाने अविद्येचा नाश व अविद्येबरोबरच कर्माचा नाश हा कर्मत्यागाचा खरा अर्थ आहे, म्हणून प्रत्येकाने आपल्या वाट्याला आलेले कर्म विधिपूर्वक केलेच पाहिजे.

कर्तृत्वाचा मद । आणि कर्मफळाचा आस्वाद ।
या दोहींचे नाव बंध । कर्माचा की ॥ १८–२०५ ॥

**११ कर्में ईश्वरार्पण कर**—कर्मत्यागाचा सुलभ उपाय म्हणजे कर्में करून ती भगवताला अर्पण करणे हा होय. जेथे आहेस तेथे तसाच रहा, करा-

यची ती सर्व कर्मे करीत जा, इंद्रिये कोंडू नकोस, भोग त्यागू नकोस, स्वजातींचा अभिमान सोडू नकोस, कुळधर्म टाकू नकोस, विधिनिषेध पाळ—सर्व सुखे या मार्गाने जात असताना तुला मिळतील—एक लक्ष्यात ठेव—

परी मने वाचा देहे । जैसा जो व्यापार होये ।
तो मी करीत आहे । ऐसे न म्हणे ॥ १२—११७ ॥

करणे न करणे विश्वचालक परमात्म्याकडे लावून दे व उणेपुरे न म्हणता त्याच्याशी एकरस होऊन कर्मे करीत जा माळी नेईल तिकडे पाणी जाते तसा निराग्रह होऊन वाग प्रवृत्तिनिवृत्तींचें भार आपल्या शिरावर घेऊ नकोस कर्म थोडेबहुत न म्हणता मला अर्पीत जा म्हणजे माझ्या सायुज्यसदनाला येशील

**१२ विहितकर्मत्याग म्हणजे नैष्कर्म्य नव्हे**—प्राप्त कर्माचा त्याग म्हणजे नैष्कर्म्य नव्हे निरातता (वासनारहितता) झाली नाही तोवर देहाचे व्यापार चालायचेच, तृप्ति नाही तोवर पाकसिद्धीचा खटाटोप होणारच—'मग सतुष्टीच्या ठायी । कुटे सहजे ' म्हणन नैष्कर्म्य पाहिजे तर उचित कर्मत्याग करू नये कर्म करणे किंवा टाकणे हे काय आपल्या इच्छेवर आहे ? प्रकृती काय स्वस्थ बसेल ? प्रकृतिसग आहे तोवर ती गुणकर्मे करविणारच ' विहितकर्म सोडले तरी इंद्रिये काय आपापले व्यवहार सोडणार आहेत ? कान ऐकणार, डोळे पाहणार, नाक वास घेणार, प्राणापानगति चालणार, क्षुधातृषा हे धर्म प्राण चालविणार, हातापायाच्या क्रिया होणार, स्वप्न, जागृति फार काय जन्ममृत्यू—हे काय टाकता येतात ? मग सोडले तें काय ? प्रकृतीचा सग आहे तोवर कर्मत्याग होत नाही चालत्या रथात निश्चळ बसले तरी चालणे होतच असते प्रकृतीच्या योगाने कर्म होत असते म्हणन मी कर्म करीन किंवा कर्म टाकीन हे म्हणणे वृथा आहे. प्रकृतीचा सग आहे तोवर कर्मत्याग नाही.

**१३ आशापाश सोडून क्रमप्राप्त स्वकर्म कर**—कर्मत्याग जर सभवत नाही व कर्म करणेंच जर प्राप्त तर मग विहितकर्मच का न करावें ? कर्मात फलाशेनें गुंतून पडू नकोस म्हणजे झाले कर्मात असून ज्ञानी पुरुष अलिप्त कसा असतो तें पहा अतरी परतत्वचिंतनात निमग्न असून तो लौकिकात चारचौघासारखाच वागतो. तो इंद्रियाचा गुलाम नसतो पण इंद्रियाना अगर विषयाना भीतही नाही पद्मपत्राप्रमाणें तो सर्वत्र असून अलिप्त असतो. त्याच्यासारखा आशापाश-

रहित हो. अतरी निश्चल हो, मग कर्मेंद्रियें कर्मात खुशाल राबू दे अवसरोचित कर्मे हेतुरहित कर हेंच सागण्याचें तात्पर्य

देखें अनुक्रमाधारे । स्वधर्म जो आचरे ॥
तो मोक्ष तेणे व्यापारें । निश्चित पावे ॥ ३–८० ॥

निष्कामबुद्धीने स्वधर्माचरण करणे हाच नित्ययज्ञ आहे व हा करीत असणारा मनुष्य कर्मबधात न पडता मोक्षागाराला निश्चयाने पोचतो

**१४ ज्ञानयोग व कर्मयोग** --कर्मयोग व ज्ञानयोग हे दोन्ही मार्ग अनादि आहेत कर्मयोगाने साधक सावकाशीनें पण गतीला निश्चित पोचतो हा मार्ग सर्वमान्य व सुलभ आहे ज्ञानी विहगममार्गाने लौकर मोक्षपद पावतात, तर कर्मयोगी विहितकर्मानुष्ठाने ‘ हळुहळु ढाळेढाळे ’ चालून पूर्णतेला पावतात.

**१५ संन्यास व कर्मयोग दोन्ही तुल्यबळ**—दोन्ही मार्ग मोक्षकर, पण ‘ जाणानेगा सकळा ’ कर्मयोग प्राजळ व सोपा आहे. स्त्रियाबाळा सर्वांना तारून नेणारी जशी नौका तसा हा आहे सन्यासाचे वर्म कर्मयोग्याने ध्यानात ठेवले तर गृहादिकाचा त्याग न करिता त्याला मोक्षपद मिळेल ‘ मी माझे ऐसी आठवण । विसरले जयाचे अत करण ’ तो खरा सन्यासी व हे चिन्ह जर ससारिकाच्या अगी असले, तो अतरी सुनिश्चळ व नि सग राहू शकला, तर मग सन्यास तो वेगळा कोणता ?

**१६ संन्यासी व कर्मयोगी दोघांचीं लक्षणें एकच** —गुरूपदेशाने मन आत्मस्वरूपी स्थिर केले, सकलत्यागाने चित्त चैतन्यरूप केलें की, ‘ कर्म कर्ता करावे ’ ही त्रिपुटी मावळून सर्व कर्मे करूनही जीव अकर्ता होतो शरीर, इद्रिये व मन आपापल्या कर्मी वर्तत असून त्याचा अकर्तात्मबोध जर अढळ राहिला तर त्याला कर्मलेप नाही. हें चिन्ह जर कर्मयोग आचरताना राहिले तर मग सन्यासात तरी अधिक काय आहे ?

**१७ लोकसंग्रहासाठी ज्ञात्यानीं कर्म करावें** --जनकादिक सर्व कर्मे करीत असताना मोक्षसुख पावते झाले ज्ञाता कर्म आचरीत असला म्हणजे इतरानाही त्याचें उदाहरण होते.

देखे प्राप्तार्थ जाहले । जे निष्कामता पावले ।
तयाही कर्तव्य असे उरले । लोकालागी ॥ अ० ३–१५५ ॥
एथ वडील जे करिती । तया नाव धर्म ठेविती ।

तेंचि येर अनुष्ठिती । सामान्य सकळ ॥ ३–१५८ ॥

देखणाही अंधाबरोबर चालतो तसा जाणत्यानीं धर्म आचरून दाखवावा जाणत्यांनींच जर मार्ग सोडला तर अज्ञान्यानीं कसे चालावे ? म्हणून त्यानीं तो सोडू नये, इतकेंच काय पण ह्या लोकसंग्रहासाठीं ‘ विशेषें आचरावें लागे सर्ती.’ लोकस्थिती मोडू नये, लोकसंस्था सर्वथा रक्षणीय आहे, म्हणून निष्काम पुरुषानीही सकामासारखेंच सर्व धर्मकर्म करावें समर्थ असून जाणता असेल तर ‘ तेणें विशेषें कर्मातें । त्यजावें ना ’ ’

मार्गाधारें वर्तावें । विश्व हे मोहरें लावावें ।
अलौकिक नोहावें । लोकाप्रती ॥ ३–१७१ ॥
तेणें सत्क्रियाचि लावावी । तेचि एकी प्रशंसावी ।
निष्कर्मींही दावावी । आचरोनी ॥ ३–१७४ ॥

कर्म करण्याची अवश्यकता नसताही निष्काम व समर्थ पुरुषानें लोकांना मार्ग लावावा म्हणून स्वकर्माचरण करणें याला व लोकसंग्रह म्हणतात.

**१८ कर्म करून अकर्ता**—सूर्य न चालताही उदयास्तामुळे चालतोसा दिसतो किंवा वाबत्या नावेंतून जात असताना तीरावरचे वृक्ष अचळ असून पळतानसे दिसतात त्याप्रमाणें अहंकार व फळाशा सोडून निष्काम पुरुषही सकळ कर्में करीत असतात तथापि त्याच्या अकर्तात्मबोधाला बाध येत नाहीं. ‘ हे कर्म मी कर्ता ’ असा संकल्पच त्याचे ठायीं नसतो जो हे विश्वच आपण जाहला त्याला कोणतें कर्म बाधू शकेल ? तो सत्कर्म असून कर्मरहित, सगुण परी गुणातीत. कर्मयोगरहस्य त्याच्यापासून शिकावें. त्याच्या कर्माला लोकसंग्रह म्हणतात.

**१९. विहितकर्मानें मोक्षसिद्धीः**—वर्णाश्रमधर्माप्रमाणें जें कर्तव्य म्हणून ठरतें तें स्वभावविहित कर्म शास्त्राप्रमाणें करण्याची बुद्धि ठेवावी. आपलेंच रत्न पण रत्नपारख्याला दाखवून त्याच्या पसंतीनें आपण घेतो त्याप्रमाणें ज्ञातिवशें आलेल्या अधिकाराप्रमाणें शास्त्रमुखानें आलेलें स्वकर्मच करावें. ओघांत पडलेल्या पाण्याला वेगवेगळे प्रवाह माहीत नसतात, त्याप्रमाणें काम्यनिषिद्ध कर्मांच्या वाटेस न जाता नित्यनैमित्तिक म्हणजे विहितकर्मेंच करावीत, व विहितकर्मेंही संग व फळाशा सोडून केल्यानें सहज वैराग्यलाभ होतो व वैराग्यानें ज्ञान व ज्ञानानें मोक्ष मिळतो. कर्मयोगाचें सर्व रहस्य हें आहे विहितकर्म ह्म० स्वधर्माचरण ‘हेंचि परमसेवा । मज सर्वात्मकाची ’ ‘जयाचें जें विहित तें ईश्वराचें मनो-

गत' असा दृढविश्वास ठेवावा. देव हा आपला स्वामी व 'स्वामीचिया मनोभावा। न चुकिजे हेचि परमसेवा' तात्पर्य, त्रिगुणाच्या अहंकाररज्जूने जीवमात्राला नाचविणारा जो परमेश्वर —

तया सर्वात्मका ईश्वरा। स्वकर्मकुसुमाची वीरा।
पूजा केली—होय अपारा। तोषालागीं॥ अ० १८–९१७॥

**२० जातिधर्मच तारकः**—स्वधर्म आचरायला जरी कठिण असला तरी, निंबाचा कडुपणा मनात न आणता आपण ओषध म्हणून घेतों त्याचप्रमाणे, स्वधर्मच आचरिला पाहिजे आपली आई कुब्जा असली तरी ज्या तिच्या प्रेमावर आपण वाढतो ते प्रेम काही वाकडे नाही, परनारी रंभेहून सुंदर असल्या तरी त्या बाळकाला काय करायच्या आहेत? पाण्याहून तूप श्रेष्ठ म्हणून मासा काय तुपात वाढेल? विषातल्या किड्याला त्याचे विषच अन्न होय, त्याला गुळ दिला तर गुळ खाऊन तो मरेल' म्हणून विहितकर्माचरणच तारक आहे. दुसऱ्याचे आचार आपल्याला काय करायचेत? ज्याने त्याने आपले आचार पाळावेत तरच 'संसाराचें धरणें' फिटेल पायाचें चालणें डोक्याला काय होय' पायाने चालावें, डोळ्यानी पहावें, अशी कामाची वाटणी झाली आहे आपलें काम आपण करावें खेर, परधर्म घेतले तरी कष्ट चुकत नाहीतच! सरळ रस्त्याने चालण्यातही पायाला शीण आहे, आड मार्गाने चालण्यातही आहे, मग आडमार्ग का धरावा? डोक्यावर शिळा घेतली तरी ओझें, शिदोरी घेतली तरी ओझें, मग जे घेतल्याने विसावा मिळेल अशी शिदोरीच का न घ्यावी? कण आणि भूस याना काढण्यात श्रम एकच, हवी आणि श्वानमास हे पकविण्याचे श्रम एकच, शत्रूशी लढताना पाठीवर घाव बसला तरी मरण चुकत नाहीच, मग समोरासमोर दोन हात का न खेळावे? परपुरुषाच्या इ० जाराच्या हातूनही जर मारखाणे चुकत नाही तरी मग नवऱ्याचे घर सोडण्यात लाभ काय? त्याप्रमाणे स्वधर्म व परधर्म दोहीतही श्रम जर निश्चित आहेत तर मग स्वधर्म का सोडावा? म्हणून विहितकर्माचेच आचरण करावे तेणेकरून मोक्ष निश्चित मिळतो स्वकर्माची नौका टाकू नये स्वधर्माचरण ही दिव्यौषधी घेऊन भवरोगमुक्त व्हावे. तेणेकरून वैराग्यलाभ होईल, सद्गुरु भेटतील, ज्ञान होईल व क्रमाने मोक्षही मिळेल.

यालागी कर्म आपुलें। जे जातिस्वभावे असे आले।
ते करी—तेणे जिंतिले। कर्मबंधातें॥ अ० १८–९३३॥

**२१ सर्व जीवांचा उद्धार भक्तीनेंच होतोः**—कुळजातिवर्ण हे देहाचे आहेत, मुख्य धर्म स्वकर्माने हरिप्रसाद जोडणे हे आहे कोणत्याही कुळात, वर्णात अगर जातीत कोठेही जन्म मिळो, प्रत्येकाने स्वधर्माने वागून नारायणाची प्रसन्नता जोडावी यातच नरदेहाचे सार्थक आहे कर्मयोगाचे परमसाध्य हे आहे उत्तम कुळी जन्म, रूप, वय, विद्या, संपत्ति असूनही ' एक भाव नाही माझा । तरी पाल्हाळ ते ' ऐहिक वैभव किंवा कुळजातिगौरव हे असून भक्ति नसेल तर तो सारा प्रेताचा शृंगार होय ' कुळ अंत्यजाचे असले, फार काय जन्म पशूचाही मिळाला, पापयोनीत जन्म झाला किंवा पाषाणासारखी बुद्धीत जडता असली तरी जर हरिभक्तिप्रेम चित्तात असेल तर तो निश्चयाने उद्धरल्याशिवाय राहणार नाही ज्याच्या वाणीत हरीचे नाम, दृष्टीत हरीचे रूप, कानात हरीचे गुणानुवाद व चित्तात हरिविषयक संकल्प आहेत, जे सर्वांगानी हरिसेवेत तन्मय आहेत, ते पापयोनी असोत किंवा वेदशास्त्र पढलेले नसोत, ते हरिस्वरूपच आहेत हरीत व त्याच्यात अणुमात्र भिन्नता नाही मन आणि बुद्धि माझ्या ( हरीच्या ) प्रेमाने भरेल तरच इतर गुणांची किंमत

म्हणोनि कुळजातिवर्ण । हे आघवेंचि गा अकारण ।
एथ अर्जुना माझेपण । सार्थक एक ॥ अ० ९–४५६ ॥

कोणत्याही भावाने मन मत्स्वरूपी लागले की मागील सर्व व्यर्थ होते. पूर्वीचा दुराचरणी असून अनुतापतीर्थी न्हाऊन शुद्ध झाला व सर्वभावे मद्रूपी मिसळला की त्याचे कुळ पवित्र होते तोच कुलीनत्व पावतो व त्याचेच जन्मसाफल्य होते. ओहोळ गंगेला मिळताक्षणी गंगारूप होतो क्षत्रिय, वैश्य, शूद्र, अंत्यज इ० जाति मजशी समरस झाल्या नाहीत तोवरच त्याच्यात भेद आहे पाण्याचे लोट समुद्रास मिळाले नाहीत तोवरच त्याना भिन्नभिन्न नावे असतात हा नद ही नदी, हा पूर्वेकडचा प्रवाह हा पश्चिमेकडचा प्रवाह, इ० भेद समुद्राला जळ मिळेतोपर्यंतच मानले जातात. आणखी एक मौज आहे मी सर्वांच्या निर्वाणीचें स्थान असल्यामुळे मला कोणत्याही भावाने मिळता येतें. कोणत्याही मिषाने चित्त मजकडे वळले की मद्रूपता सहजच प्राप्त होते. परिसाचे तुकडे करण्यासाठी लोखंडाचा घण त्यावर घातला तरी स्पर्शाबरोबर लोखंडाचे सोनेच होते गोपी मजकडे वल्लभाच्या मिषानें पाहू लागल्या तरी मत्स्वरूपच झाल्या. गोपी कामबुद्धीनें, कंस भयाने, शिशुपालादि वैरभावाने, पांडव सोयरेपणाच्या नात्यानें, वसुदेवादि ममतेनें, सर्वच

उद्धरले कीं नाही ? नारदध्रुवादिकाना भक्तीच्या योगे मी पावलो तसाच या सर्वांना मी पावलो ना ? ' भलतिया जाति जन्मावें । मग भाजिजे का विरोधावे ' पण भक्त किंवा वैरी माझेच व्हावे. रागद्वेष मलाच अर्पावे.

यालागी पापयोनीही अर्जुना । का वैश्य शूद्र अगना ।
माते भजता सदना । माझिया येती ॥ अ० ९-४७४ ॥

## १ कर्मयोग--२ सदाचार अथवा नीति.

**१ विषयसुखाची भ्रांति**.—ज्याना स्वरूपानद मिळाला नाहीं ते विषयाकडे धाव घेतात. रक कोंड्यावर तुष्ट असतात ' मृग मृगजळाकडे धावतात ' ज्यानी निजरूप पाहिले नाही, ज्याना स्वसुखाचे दारिद्र्य आहे, तेच विषयावर लुब्ध होतात विषयात सुख आहे हे बोलणेच अयोग्य आहे. विषयसुख म्हणजे नुस्ती विद्युल्लतेची क्षणिक चमक ' वारा, वृष्टि व ऊन याचा ताप जर मेघाच्या छायेने दूर होता, तर तीनमजली चुनेगची वाडे कोणी बाधले असते ? विषकदाला मधुर ह्मणणे, मगळग्रहाला (हा पापग्रह आहे) मगळ म्हणणे, सर्पफणीच्या साउलीत मूषकाने शीतलता मानणें, माशाने (जाळे न पाहता) आमिषाला भुलणे, तसेच विषयी सुख मानणें होय ' विषयसुख ही पाडुरोगाची सूज आहे ' विषयभोग हे आद्यत दु खप्रद आहेत, पण जीव तेथेच लोभतात 'सागे पुयपकीचे किडे । काय चिळसी घेती ' ' असो. ज्ञानी पुरुष देहभाव स्वाधीन ठेवतात म्हणून त्याच्यावर विषयाची छाप पडत नाही.

**२ त्रिविधसुख** —सुख म्हणजे काय ? ' जे आत्म्याचिये भेटी । जीवासि होय ' तें सुख. हे आत्मसुख तीन प्रकारचे आहे सात्विक, राजस व तामस. आरभी कठिण पण परिणामी अमृतोपम असे वैराग्यजन्य जे सुख ते सात्विक धैर्याने विषयलहरीचा वेग सहन केल्यानेच ज्ञानामृताचा सोहळा भोगायला मिळतो.

सागरी गगा जेसी । आत्मी मिनल्या बुद्धि तैसी ।
अद्वयानदाची अपैसी । खाणी उघडे ॥ अ. १८-७९२ ॥

विषयेंद्रियसयोगात होणारें जे सुख ते राजस. ते आरभी गोड पण परिणामी कडू असते रोग्याच्या जिभेला साखरकेळें खायला गोड लागते पण परिणामी जाचक होतें. बचनागाची पहिली गोडी, चोराच्या सभावितपणाच्या गोष्टी, वेश्येचे लाघव,

ाहुरूप्याचे विनोद यासारखेच तामस सुख होय त्याला नाव मात्र सुख पण तें ; खच खरे ‘ आदि गोडिरे । अती कडु ’ असे हे रासजसुख. तामस सुख भायती कडूच

आणि अपेयाचेनि पाने । अखाद्याचेनि भोजने ॥
स्वैरस्त्रीसनिधाने । होय जे सुख (ते तामस) ॥ अ १८–८०६ ॥

**३ कामक्रोध ४ कामक्रोध लोभ** हे सर्वथैव त्याज्य जाणून **५ कामादेकांच्या त्यागें कल्याणाचा मार्ग** जीवानें शोधावा हें हितप्रद आहे ामादि बालिष्ठ, दुर्धर, दु खकारक, व नरकप्रद आहेत. याचा ठाव पुसून टाकावा ारच सुखाची गोष्ट हे ज्यानें जिंकिलें तो प्रथम ‘ सग लाहे मोक्षमार्गी । सज्जाचा ’ सत्सग व सत्सगी सच्छास्त्रश्रवण घडलें की जन्ममृत्यूची रानें ओलाडून ात्मानदभरित अशा गुरुकृपेच्या निर्भय नगरात तो प्रविष्ट होतो तेथें त्याला रमप्रिय आत्मारामाची भेट होते व तत्क्षणी ससाराचा गलबला बद होतो ामक्रोधलोभादिकाना झाडून जो दूर झटक्तो तो या महल्लाभाचा धनी होतो

**६ मनाची चंचलता व मनोजयाचा उपायः**—– कामक्रोधादिकाना जंकणें म्हणजे मनोजय करणें मन हे वायुरूप असून चचल आहे. बुद्धीचें दार ाकणारा तो अडसर आहे. मन सापडणें कठिण, ‘ येऱ्हवी राहाटावया थोडें । लोक्य यया ’ ’ पण या मनाला वैराग्याच्या आधारानें अभ्यासाच्या मार्गाला ावलें तर तें केव्हा तरी निश्चयानें स्थिरावतें

यया मनाचें एक निकें । जें देखिले गोडीचिया ठाया सोके ।
ह्मणोनि अनुभवसुखचि कवतिकें । दावीत जाइजे ॥ अ. ६-४२० ॥

मन म्हणजे कल्पना, त्या कल्पनेच्या सगानें परमात्मवस्तूला जीवपणाचें दारिद्य दु ख भोगावें लागतें मन, कल्पना, वासना—वायूरूप आहे व तिचा गगनात य केला म्हणजे आनद घरचाच आहे. मनोरूप पटावर ससारचित्र उमटते, पण टच फाटल्यावर ससारचित्र कोठें आहे ? सरोवर आटल्यावर प्रतिबिंब कोठलें ? ळात मनच गेलें मग अहभाव, काम, क्रोध, याना आधार कोठें आहे ?

ह्मणोनि शरीरेंचि ब्रह्म होये । अनुभवी तो ॥ अ० ५–१५७ ॥

**७ त्रिविध आहार** — कामक्रोधादि विकार जिंकण्याचे कामी आहारयमनाची अवश्यकता आहे काय ? धर्म खाण्यापिण्यात आहे काय ? जरूर आहे. चभाववृद्धीच्या ठायी । आहारावाचूनि नाही । बळी हेतु’ (ह्म. बलवत्तर कारण).

मदिरापानानें मनुष्य माजिरा इ० उन्मत्त होतो हें प्रत्यक्षच दिसतें अन्नरसानें कफवात वाढतात किंवा हटतात तापात दूध बाधक होतें. अमृतसेवनानें मृत्यूचें निवारण होतें, व विषभक्षणानें मरण येतें भाडें तापले की आतलें पाणीही तापतें तात्पर्य ––

जैसा घेपे आहार । धातु तैसाचि होय आकार ।
आणि धातुऐसा आतर–। भाव पोखे ॥ अ० १७–११६ ॥

आहार त्रिविध आहे. भोक्ता सत्वगुणी असला तर त्याला मधुर रसाची आवड असते जे पदार्थ अगचेच सुरस, गोड, व सुपक्क तेच त्याला आवडतात. आकारानें फार मोठी नाहीत, व स्पर्शाला मृदु, जिव्हेला स्वादिष्ट, रसाने भरपूर व पातळ सालीची अशी नानाविध स्वादिष्ट फळें ही सात्विक होत अशा अल्पाहारात अपार तृप्ति असते. सात्विक आहाराने बळ वाढतें, रोग होत नाहीत, आनद वाढतो, व आयुष्य वृद्धिगत होतें राजस मनुष्याला राजस पदार्थ आवडतात विषापेक्षा कडु, चुन्यापेक्षा चटका देणारे, आबट, खारट, अति कढत, ( चिवडा किंवा थालपिट ) यासारखे कोरडे रखरखित पदार्थ, झणझणीत चटण्या, रायती वगैरे हे राजस पदार्थ होत मनुष्यदेहात निजलेले व्याधिरूप सर्प जागृत करणारे उत्तेजक पदार्थ हे राजस आहारात येतात ( चहा, चिवडा, भजी हे वरील वर्णनाप्रमाणे राजस होत ) तामस आहाराची कल्पना येताच चिळस येईल झाशीपुढचे आबोण तसें कुजलेलें, सडलेलें, उष्टें, शिळे, फुगलेलें, असे तामस अन्न तामसी प्रकृतीच्या लोकाना प्रिय असतें ‘ अपेयाच्या पानी अखाद्याच्या भोजनी ’ तामस जीवाची आवड असतें.

**८ आहारविहारांत परिमितता पाहिजे**—‘ जो रसनेंद्रियाचा अकिला । का निद्रेसी जीवे विकिला ’ तो परमार्थाचा अधिकारीच नव्हे किंवा हट्टानें क्षुधा, तृषा, निद्रा याना पिळवटून काढतो तोही नव्हे. विषय ‘ अतिशय सेवावा ’ हें नको, किंवा ‘ सर्वथा निरोधावा ’ हेही नको ' आहार, विहार, बोलणे, चालणें, खाणे, निजणें, जागणें हे सारें परिमित पाहिजे म्हणजे धातुसाम्य ( कफवातपित्ताची समस्थिति ) राहतें व ध्यानादि अभ्यासयोग नीट रीतीने घडतो.

**९ सात्विक दान**:—आहारप्रमाणेंच यज्ञ, दान, तप, त्याग सर्व त्रिविध आहेत, त्यात सात्विक तेवढे श्रेयस्कर आहेत. स्वधर्मानें वागत असताना जें

मिळेल तें देशकालपात्र पाहून सन्मानपूर्वक निष्कामबुद्धीने व विनयानें देणे हें सात्विक दान होय

**१० सात्विक यज्ञ** —सग आणि फलाशा सोडून निरहकारपूर्वक स्वधर्माचरण यथासाग करणें तो सात्विक यज्ञ होय.

**११ त्रिविध त्याग**—'स्वभावें आलें विभागा' तें स्वकर्म आळसाने टाकणें हा तामसत्याग, कायक्लेशभयाने टाकणे हा राजसत्याग, व विधिपूर्वक कर्म करीत असताना ' कर्तृत्वाचा मद आणि कर्मफळाचा आस्वाद ' दोन्ही सोडून देणें हा सात्विकत्याग. हा तेवढा बधमोचक होय.

**१२ त्रिविध तप**.—शारीरतप, वाङ्मयतप व मानसतप असे तपाचे तीन प्रकार आहेत. कायावाचामन या तिहींकडून घडणारें हें तप आचरिलें पाहिजे. प्रथम शारीरतप सागतों. हरि किंवा हर यापैकी ज्याचा जो उपासक असेल त्यानें आपल्या प्रिय उपास्याच्या मदिरास जाणे, तत्प्रीत्यर्थ यात्रा करणे, त्याची मूर्ति किंवा लिंग कोठेंही दिसताच साष्टाग नमस्कार घालणें, हें शारीर तप होय. विद्याविनयादि गुणानी श्रेष्ठ अशा ब्राह्मणाची सेवा करणें, ससार-दुखानी किंवा प्रवासानी दगदगलेल्याची शुश्रूषा करून त्याच्या सुखार्थ झटणें, सर्व तीर्थांचें तीर्थ असे जे मातापितर त्याच्या सेवेंत शरीर कष्टविणें आणि ससाराचें ओझें ज्ञानदान करून उतरविण्याऱ्या श्रीगुरूची सेवा करणें हें शारीरतप होय.

वस्तु भूतमात्री नमिजे । परोपकारी भजिजे ।
स्त्रीविषयीं नियमिजे । नावेनाव ॥ अ० १७–२०९ ॥

भूतमात्रीं हरी पाहून भूती नम्र होणें, परोपकारात रत असणें, स्त्रीविषयी नीतीचे नियम पाळणें हेंही शारीरतपातच येतें. आता वाङ्मयतप सागतों दुसऱ्याचें मन न दुखविता त्याला सुख होईल असेंच बोलणें—तो बोलही गगौघाप्रमाणें पापताप निवारणारा, अविवेक दूर करून आपल्या स्वरूपाची ओळख पटविणारा, ऐकताच अमृताप्रमाणें मधुर लागणारा, व अवीट—हें वाचेचें तप होय. कोणी विचारल्यासच वरीलप्रमाणें बोलणें, नाही तर वेदाभ्यसनात किंवा हरिहराच्या नामस्मरणात तन्मय असणें हें वाङ्मयतप होय. आता मानसतप ऐका. मनातून सर्व विकल्पजाळ सोडून गेल्यावर मन स्वरूपाकार होणें तें मानसतप. पौर्णिमेचें चद्रबिंब जसें निश्चळ व निष्कलक असतें तसें मन स्थिर व निष्पाप असणें याचें नाव

मानासिकतप. अशा त्रिविधतापानें शुद्ध होऊन ईश्वरी दृढभाव राखतो तोच सात्विक पुरुष होय

**१३ सत्ववृद्धीचीं चिन्हें** -आता सत्वगुणाची परिपूर्णता पावलेल्या पुरुषाची लक्षणें ऐका वसतागमी पद्मखडातून सुवास बाहेर फाकतो त्याप्रमाणें प्रज्ञेचें तेज आत न सामावून बाहेर पसरू लागलें की सत्वाचा परिपाक झाला असें समजावें सर्वेंद्रियाच्या अगणातच त्याचा विवेक पाहरा करीत असतो ' त्याच्या हातापायाला डोळे असतात. राजहसाप्रमाणें दोषादोषविवेक त्याची इद्रियेंच करीत असतात यमनियमादि हे तर सेवा मिळावी म्हणून वाट पाहत राहतात. ऐकू नये ते त्याचे कान ऐकत नाहीत, पाहू नये ते डोळे पाहत नाहीत, बोलू नये ते जिभेतून बाहेर येतच नाही. दिव्यापुढें अधार पळतो तसे निषिद्ध इद्रियासमोर टाकतच नाही महावृष्टि झाली की महानदीला पूर येउन पाणी सर्वत्र पसरते तशी त्याची बुद्धि सकलशास्त्रार्थ ग्रहण करीत जाते. पौर्णिमेच्या चद्रिकेप्रमाणे त्याची वृत्ति विद्वज्जनी पसरते त्याच्या वासना ब्रह्मी एकवटतात, बाह्यप्रवृत्ति ओहोटते, मन विषयावर विटते ही चिन्हे जेथे दिसतील तेथे सत्वगुणाची पूर्णता झाली आहे असे समज

**१४ अज्ञानाचीं कांहीं लक्षणें. १५. आसुरी संपत्तीचे सहा दोष व १६ असुरांची वागणूक**-- ह्या तीनही प्रकरणात जी लक्षणे सागितली आहेत ती सर्व त्यागार्थ आहेत हे ध्यानी धरावे गृहणार्थ दैवीसपत्तीचे गुण शेवटी सागावयाचे आहेत काय टाकावे व काय धरावे हे दोन्ही साधकास बरोबर समजले पाहिजे जेथे ज्ञान नाही ते अज्ञान ( १ ) अज्ञान्याची लक्षणे प्रथम पहा: आपल्याच मिथ्या महत्वाच्या कल्पनेतून जो बाहेर पडत नाही तो अज्ञानी विद्येचा पसारा, पुण्यकर्माचा डांगोरा, प्रतिष्ठेसाठी कर्मठपण हे सारे अज्ञानच, तो सयोगवियोगाने चढतो व रडतो, निंदा ऐकून थिजतो व स्तुती ऐकून फुगतो, मानापमानाच्या ऊर्मी साहत नाही, गुरुशीच उन्मत्त होतो, पैशापुढे आपले परावे पाहात नाही, स्वधर्मकर्माविषयी उदासीन असतो, भोपळ्यासारखा मनोरथाच्या पुराबरोबर वाहत असतो, कुळधर्म, वेदाज्ञा, स्वधर्माचार काही पाहत नाही, वाऱ्यासारखे चित्त विषयी मोकाट सोडतो. ' सद्गुणी मत्सर । व्युत्पत्ती अहकार । तपोज्ञाने अपार । ताठा चढे,' ' लाटण्या ऐसा न लवे । पाथर ( फत्तर ) तेविं न द्रवे,' विषयसुखप्रौढीतच दग-हानि, लज्जा, परापवाद हें कांही एक न पाहता द्रव्य

व स्त्री याच्या भोगात गर्क—अध्यात्मज्ञानाची बाजूच ठाऊक नाही—अज्ञान्याची लक्षणे काय काय म्हणून सागावी ? आता आसुरीसपत्तीचे सहा दोष कोणते ते सागतो ( २ ) दभ, दर्प, अभिमान, क्रोध, पारुष्य म्ह० कठोरता व अज्ञान हे ते दोष होत वाचेच्या चव्हाट्यावर धर्म आणणे, ह्म० त्याचा पुकारा करणे तो दभ. 'दृष्टादृष्टाचा (इहपरलोकाचा) सखा' जो धर्म तो लोकापुढे पुकारणें हा दभ. विद्या, स्त्री, धन, इ० असल्यामुळे चढेलपणा येणे तो दर्प. पतगाने अग्नीवर उडी घालावी, खद्योतानें सूर्याचा मत्सर करावा किंवा टिटवीनें समुद्राशी वैर बाधावें त्याप्रमाणें अभिमानी पुरुष 'ईश्वराचें नामही न साहे' असा मान्यतेचा ताठा असणें हा देहाभिमान—' रौरवाचा रूढ मार्गाचि हा ' आता क्रोध 'चद्र देखोनि जळे पोटी । कोल्हा जैसा ' त्याप्रमाणें दुसऱ्याचें विद्यावैभव पाहून चरफडणें हा क्रोध पारुष्य म्ह० कठोरता मन—सापाचें वारूळ, डोळे—बाणाची वृष्टि, बोल म्ह० निखारा—तें पारुष्य ' कृत्याकृत्यविवेकी अधपण तें अज्ञान. पापपुण्याची खिचडी करणे तें अज्ञान हे सहा दोष ज्याच्या अगी आहेत ते असुर. ( ३ ) त्या असुराची वागणूक दोषानुरूपच असते. त्याना प्रवृत्ति व निवृत्ति दोन्ही कळत नाहीत ' काळिमा साडील कोळसा । राक्षसही मासा । विटों शके ' पण हे आसुरी प्रकृतीचे लोक शुचित्व स्वप्नातही जाणत नाहीत. मद्याची भाडीच ती ' ' जैसे चरणें शेळियेचें । का वावणें वारियाचें ' तसें विषयी स्वैर वागणें हा त्याचा स्वभाव विश्व अनादि असून त्याचा नियता ईश्वर आहे व न्यायान्यायाचा निवाडा वेद करितात ही अनादि विश्वव्यवस्था अमान्य करून स्वैराचारानें वागणारे ते असुर स्वर्गनरक, पापपुण्य, झट मानून ' कामावाचूनि काही । जगा मूळाचि आन नाही' असें हे असुर म्हणतात परपीडा हा याचा आचार.

आपुलें केलें फोकारिती । आणि जगातें धिक्कारिती ।
दाही दिशा पसरती । स्पृहाजाळ ॥ अ० १६—३२८ ॥
एकातें साधोनि मारिती । एकाची सर्वस्वें हारिती ।
एकालागी उभारिती । अपाययत्रें ॥ ३४४ ॥

असे हे असुर स्वैर विषयभोग भोगण्यात व तत्प्रीत्यर्थ साधनें उभारण्यातच अहोरात्र दग असतात. ' स्त्रिया गाइलें आइकावें । स्त्रीरूप डोळा पहावें ' असें हे स्त्रैण असतात व स्त्रीपरतें सुख नाही असें मानतात. 'देवाब्राह्मणाचेनि नावें । आडवारेनही नोहावे' असें याचें मत. लोहस्तभासारखे ताठ असे गर्वाचे पुतळे हे ! असो.

याचें वर्णन आता पुरे अज्ञानाचे व आसुरी प्रकृतीचे दोष टाकावेत, असुराची चालरीत नाशकारक अतएव त्याज्य आहे असें निश्चित बाणावें म्हणून ही लक्षणें सांगितली आहेत. आता सदाचाराचे पुतळे असे जे संतसज्जन त्याची लक्षणें ऐका.

**१७ दैवी संपत्तीचे सव्वीस गुण** —सर्व दैवीगुणाना आधार व सुखदायक अशी ही दैवीसंपत्ति आहे एकमेकाला पोषक अशा अनेक पदार्थसमूहाला संपत्ति म्हणतात. हे सव्वीस गुण एकमेकाचे पोषक आहेत या दैवगुणात पहिला गुण **अभय** हा आहे ऐक्यभावाच्या किंवा अद्वैतानुभवाच्या विकासानें जें जें दुजें म्हणून पुढें येईल तें तें आत्मा असेंच मानून निर्भय होणें तें अभय मिठाला बुडवायला पाणी आलें तों मीठच पाणी झालें मग मिठाला बुडण्याचें भय कोठें राहिलें ? रजतम गाळून आत्मस्वरूपाशी तन्मय होऊन राहणें ही **सत्वसंशुद्धि**. योग किंवा ज्ञान याच्या ठिकाणी स्थिरावणें याला **ज्ञानयोगव्यवस्थिति** म्हणतात आता दान मूळ, पत्र, पुष्प, फळ, छाया जें असेल तें देऊन वाटसरूच्या उपयोगाला जसा वृक्ष येतो त्याप्रमाणें कायावाचामनानें, चित्तानें व वित्तानें, आर्ताच्या ( तो वैरी असला तरी ) अवचकपणें उपयोगी पडणें व त्याच्या मनोदयाप्रमाणें त्याला साह्य करणें याला **दान** म्हणतात. विषयाचा वारा इंद्रियाच्या द्वारात वाहू न देता त्याचें संयमन करणें याला **दम** म्हणतात स्वधर्मानें वागून यथाविधि देवताधर्म पाळणें, फलाशा व अहंता सोडून स्वधर्माचरण करणें हा **यज्ञ** अध्ययन अध्यापन, यज्ञ, याजन, दान व प्रतिग्रह ही आपली षट्कर्मे द्विजानें करणें व शूद्रानें त्याची सेवा करून त्यास वंदन करणें यात दोघानाही यज्ञफळ मिळतें. ईश्वरसाक्षात्कारासाठी श्रुतीचा निरंतर अभ्यास करणें हा द्विजाचा स्वाध्याय व स्तोत्रपाठ नामस्मरण करणें हा स्त्रीशूद्रादिकाचा **स्वाध्याय**. स्वाध्यायफळ दोघासही आहे आत्मलाभासाठी देहेंद्रियप्राणाची आटणी करणें म्हणजे त्याना झिजविणें याला **तप** म्हणतात. प्राणिमात्री सौजन्य तें **आर्जव** ( ऋजुत्व, सरळपणा ) जगाच्या सुखोद्देशानें शरीरवाचामानसें राहाटणें तें **अहिंसेचें** रूप जाणावें आता सत्य म्हणजे काय तें पहा. संशयच्छेद करण्याचें कामी तलवारीचें धारेसारखें कठिण पण श्रवणाला मधुर, यथार्थ पण न खुपणारें, असें जें बोलणें त्याचें नाव **सत्य** क्रोध उत्पन्न करावयाचा कोणी प्रयास केला तरी क्रोधाची ऊर्मी न उठणें हा **अक्रोध** निद्रात्यागें स्वप्नजाळ टाकणें, तसें अहंतात्यागें संसारजात त्यागणें याचें नाव त्याग. अहंकार दवडणें हा मुख्य **त्याग**. ज्ञेयाला

गिळूनें नतर ज्ञान व ज्ञाता हे लीन होणें–त्रिपुटी मोडणें–याला **शांति** म्हणतात. आता अपैशुन म्ह० सुजनत्व. सदोष प्राक्तनामुळें, अज्ञानामुळें किंवा प्रमादामुळे होऊ नये त्या गोष्टी हातून घडल्यामुळें जे लोकात निंद्य झाले आहेत त्याना आपलें साह्य देऊन मनातली शल्ये विसरायला लावणें याला सौजन्य म्हणतात दुसऱ्याचे दोष आपल्या दृष्टीनें चोख करून मग त्याकडे पहाणें हे **सौजन्य** पुजून देव पहावा, धान्य पेरून शेत भरभरल्यानर शेतास जावे, तसें आपल्या भलेपणाने दुसऱ्याचें उणें दूर करून त्याकडे पाहणे हें सौजन्य होय. आता दया पूर्णचंद्रिका लहानथोर न म्हणता सर्वाना निववितें त्याप्रमाणें पर-दु खानें दु खित होऊन त्याची पीडा निवारण्यासाठी आपले सर्वस्व दिले तरी ते न्यून मानणे हें दयेचे लक्षण होय ‘ दु खिताचे सेलभागी ( अग्रभागी ) जिणें जयाचें ’ तो पुरुष मूर्तिमत **दया** होय पायाला काटा मोडला तर जसें जीवाला दु ख होते किंवा पायाला शीतळता आली की डोळे सुखावतात, तसा दयावत असतो इहपरलोकीचे भोग पायाशी आले तरी भोगावें असें मनातही न येणें याला **अलोलुप्त्व** म्हणतात माशाना जसें मोहळ, बाळाना जसें मातृस्नेह, पिल्याना जशी कूर्मीची दृष्टि तैसी भूतमात्री मवाळ (सौम्य) राहटी त्याला **मार्दव** म्हणतात. औट हाताचा देह होऊन राहणें, वारवार जन्मणें मरणे, देहपणें नामरूपाला येणे ही **ऱ्हीं** किंवा लज्जा मन व प्राण याच्या नियमनानें दशेंद्रियें स्थिर करणें हें **अचापल** आत्मप्राप्तीच्या चिंतनामुळें ईश्वराकडे अतराची मोहोर असणें हें **तेज** सर्व साहत असून आपण सहन करितो अशी कल्पनाही न येणें ही **क्षमा** त्रिविधताप सहन करणें, इंद्रियवेग किंवा दैहिक रोग सोसणें, चित्तक्षोभ आवरणें–याचें नाव **धृति** सोन्याचा ताब्या गगोदकानें भरलेला–तसा बाहेर निष्काम स्वधर्माचार व आत आत्मविवेक याचें नाव **शौच** आता अद्रोह जगाचे पापताप दूर करीत व तीरींचे वृक्ष पोसीत गगा जशी समुद्राकडे धावते, किंवा विश्वाचा अधकार घालवीत व लक्ष्मीची निवासस्थानें जी कमळें त्याना प्रफुल्ल करीत सूर्य जसा प्रदक्षिणेला निघतो—

तेसी बाधली सोडित । बुडाली काढीत ।
साकडी फेडित । आर्ताचिया ॥ अ. १६–२०१ ॥

किंबहुना दिवसराती । पुढिलाचें सुख उन्नती ।
आणीत आणीत स्वार्थी । प्रवेशिजे ॥ २०२ ॥

याला **अद्रोह** म्हणतात, आणि जसा शंभूच्या माथ्यावर बसून जसा संकोचली तसें विश्ववंद्य होऊनही लाजणें हा **नातिमानिता**. ही सव्वीस गुणांची ब्रह्म-संपदा मोक्षचक्रवर्तीचें अग्रहार होय '

# २ ज्ञानयोग.

**१ ज्ञानयोग अथवा सांख्यस्थिति**—भगवान् अर्जुनास आरंभीच सांगतात की हे विश्वरचना अनादि आहे, जन्ममृत्यु जीवाधीन नाहीत, मी मरता किंवा मारता ही अहंकृति व्यर्थ आहे, म्हणून शोकमोह आत्मनिश्चयानें तरून जाणें हेंच उचित आहे ' अनादिसिद्ध हें आघवें । होत जात स्वभावें ' ' हें उपजे आणि नाशे । तें मायावशें दिसे ' वायुलहरींनी तरंग दिसले की ते जन्माला आले व वारा थांबताच पाणी सपाट झाले की ते मृत्यु पावले असें मानणें चुकीचें आहे. चैतन्याच्या ठायीं अनेक शरीरें किंवा शरीराचे वयोभेद दिसतात, पण चैतन्य एक आहे व अविनाशी आहे इंद्रियाधीन झाल्यामुळें शीतोष्णादि, सुखदुःखादि, जन्ममरणादि भासले तरी आत्मा अविनाश आहे हें जो जाणतो तोच व्यामोहदुःखापासून सुटतो आत्मा सर्वदा सर्वगत जन्मक्षयातीत आहे. उपाधि निरसून चैतन्य तेवढें ज्ञानी पुरुष स्वीकारतात ' शरीराच्या लोपीं । सर्वथा नाश नाहीं स्वरूपीं' हें जाणून प्रवाहपतित कर्म तूं सोडूं नकोस जुन्या वस्त्राप्रमाणें नाना देह चैतन्यनाथ टाकीत असतो तो नित्यसिद्ध, निरुपाधि आहे त्याला शस्त्रें छेदीत नाहीत, पाणी बुडवीत नाहीं, अग्नि जाळीत नाहीं हा अचळ, अव्यय, शाश्वत, सदोदित, परिपूर्ण आहे हेंच ज्ञान—यालाच सांख्य म्हणतात

जें सर्वत्र सर्वही देहीं । जया करिताही घात नाहीं ।
तें विश्वात्मक तूं पाहीं । चैतन्य एक ॥ अ. २–१७७ ॥

**२ ज्ञानाची पवित्रता व सामर्थ्य**—पातकाची खाण, भ्रांतीचा सागर किंवा व्यामोहाचा डोंगर असाही जीव ज्ञानशक्तीच्या सामर्थ्यानें उद्धरून जातो. ज्ञानाचें सामर्थ्य अपार आहे ज्ञानतेजापुढें दृश्याभास उडून जातो मग मनाचे दोष हे काय जिन्नस आहे ' ' हे ज्ञानाची पवित्रता । ज्ञानीच आथी.' ज्ञानाला उपमा नाहीं ज्ञान हा महायज्ञ आहे. नक्षत्रताराचा प्रकाश सूर्यापुढें काय होय ? द्रव्यादि यज्ञ ज्ञानयज्ञाच्या उपमेलाही आणता येत नाहीत. ज्ञानाच्या नेत्रानें परमात्मसुख-निधान प्रत्यक्ष दिसतें. कर्माच्या समाप्तीचें स्थान, नैष्कर्म्यबोधाची खाण, साध-नाची तृप्ति, असें हे ज्ञान आहे. येथें प्रवृत्ति पांगुळते, तर्क आंधळा होतो, इंद्रियें

विषयसग विसरतात, मनवाचा खुटतात, प्रत्यक्ष परब्रह्माचा लाभ होतो. विवेक-वैराग्याचा येथें पांग फिटतो, ' येथ न पाहता सहज भेटे । आपणपे '

**३ त्रिविधज्ञान व ४ ज्ञेय** --ज्ञान तीन प्रकारचे आहे. तामस, राजस व सात्विक लोक व्यवहारात भलत्यालाच ज्ञान म्हणतात, म्हणून वर वर्णन केलेल्या शुद्धज्ञानाची ओळख होण्यापूर्वी ज्ञानाची सोंगे घेणाऱ्या अज्ञानाचा निरास करणे अवश्य आहे ' विषयज्ञान हे ज्ञान न हे ' विधीचे वस्त्र टाकून ' नागवे झालेले ते ज्ञान नव्हे-श्रुतिमाउलीही त्याजकडे पाठ फिरवते ज्याला विधिनिषेध नाही, तीर्थातीर्थ ठाऊक नाही, 'न म्हणे खाद्याखाद्य, न म्हणे निंद्या-निंद्य,'-असा गोलकार करून जे जे दिसेल ते ते ' स्त्रीद्रव्य वाटी शिश्नोदरा ' असले ज्ञान हे ज्ञान नव्हे ' अशा तामसाला ' आडनाव ज्ञान ' आहे. जग भोग्य व मी भोक्ता, विषयभोग हेच परम, देहभरण हेच साध्य-असे देहात्मवाद्याचे ज्ञान हे मुळी ज्ञानच नव्हे. दुसरे राजसज्ञान हे भेदाची कास धरून चालते. अलंकाराला आल्यामुळे बाळाला सोने दिसत नाही, गाडग्याघडाकडे पाहून मढ पृथ्वीची ओळख विसरतो, किंवा वस्त्राकडे पाहता वेडा ततू स्मरत नाही, त्या-प्रमाणे ' नामी रूपी दुरावले । अद्वैत जया ' ते राजसज्ञान होय ' तैसी जया ज्ञाना । जाणोनि भूतव्यक्ति भिन्ना । ऐक्यबोधाची भावना । निमोनि गेली ' ते ज्ञान राजस होय राजस व तामस ही दोनी ज्ञाने शुद्ध ज्ञान नव्हे. देहात्मवादी देहालाच आत्मा मानून जग भोग्य व आपण भोक्ता असे मानून यथेच्छाचरण करितो, व द्वैतवादी देह व आत्मा भिन्न असे जाणतो पण भूतव्यक्ति व आत्मा याचे ऐक्य ओळखत नाही आता सात्विक ज्ञान ज्यापासी आहे तो मुळी नाम-रूपात्मक दृश्यच पाहत नाही, शिवापासून तृणापर्यंत सर्व ब्रह्मरूपच पाहतो व ज्ञेय-ज्ञाताज्ञान ही त्रिपुटी नाहीशी होऊन तो ज्ञेयस्वरूप होतो ज्ञेय ह्म० परमात्मवस्तु. ती शुद्धज्ञानावाचून अन्य उपायानी साध्य नाही. ज्ञेयाला जाणणे म्हणजेच तन्मय होणे ममार तीरावर ठेवून नित्यानंदाच्या पोटी जिरून जावे. ज्ञेयाच्या ठिकाणी ' रूपवर्णव्यक्ती । नाही दृश्यद्रष्टास्थिती. ' तेथे नामरूपसंबंध किंवा जातिक्रियाभेद नाही. ' सर्व होवोनिया सर्वी । असे जे वस्तु ' ते वस्तु अनादि, अखंड आहे. श्रुतीच्या भाषेने बोलायचें म्हणजे ती मनाचें मन, बुद्धीची बुद्धि, नयनाचे नयन, कानाचे कान, प्राणाचे प्राण अशी आहे.

**५ जितेंद्रिय श्रद्धावंतालाच हें ज्ञान होतें**—आत्मसुखाच्या गोडीमुळे

जो तुच्छ विषयाना विटतो, मन ज्याच्या स्वाधीन आहे, ज्याची इद्रिये बाहेर धाव घेत नाहीत, तोच श्रद्धाबळाने ज्ञानाला झोबतो व शातिसुख पावतो. ह्या ज्ञानाची काही चाड असली तरी ते मिळण्याचा सभव आहे.

६ **आत्मज्ञानापुढें इतर ज्ञानें** —हे ज्ञान आपले असून जीवाने भव-स्वर्गादि आवडून घेतल्यामुळें दुरावले आहे. हे आत्मज्ञान वन्हि व इतर ज्ञाने तृणे होत ' आत्मज्ञानाने ती स्वप्नवत् मिथ्या केली आहेत वायुलहरी गगनात, चद्रादि तेजे सूर्यप्रकाशात, नदीनद प्रळयाबुधीत तशी इतर ज्ञाने या शुद्ध-ज्ञानाचा उदय झाला की लय पावतात, म्हणून हे जान सर्वात उत्तम होय.

७ **संशयात्मा विनश्यति** —-आत्मज्ञानाची ज्याला आवड नाही त्याचे जिणें मरणाहून हीन विषयसुखात दग होऊन जो आत्मज्ञानाची हेळणा करितो तो सशयात्मा होय

साच आणि लटिके । विरुद्ध आणि निके ।
सशयी तो नोळखे । हिताहित ॥ अ० ४–२०१ ॥
म्हणऊनि सशयाहूनि थोर । आणीक नाही पाप घोर ।
हा विनाशाची वागुर । प्राणियासी ॥ अ० ४–२०३ ॥

चित्तात अज्ञानतम दाटले की सशय वाढतो व विश्वासाचा मार्गच मोडून जातो

८ **संतांपाशीं ज्ञान**—विश्वासाला सत्सग मिळतो व सत्सगात ज्ञानलाभ होतो ते ज्ञान पाहिजे तर ‘ सताते भजावे । सर्वस्वेसी. ’ सतसेवा हा ज्ञानमदि-राचा दारवटा आहे, तो स्वाधीन करावा

तरी तनुमन जीवे । चरणासी लागावे ।
आणि अगर्वता करावे । दास्य सकळ ॥ अ० ४–१६७ ॥

मग प्रसन्न होऊन सत विचारावे ते सागतात व साधक सशयातीत, नि.सकल्प होतो गुरुसेवेने अह आत्मरूपी विश्राम पावतो.

९ **अभ्यासयोगाचें एकान्तस्थान** —सतश्रीगुरुपायी ज्ञान झाले पण द्रढीकरणासाठी अभ्यास झाला पाहिजे अभ्यासाला एकातस्थान पाहिजे एकात-स्थानाचे वर्णन मूळातच पहावे, फार बहारीचे आहे. एकाती आसनावर बसावे, एकाग्र अत करण करून सद्गुरुस्मरण करावे व ध्यान करावे.

१० **अश्वत्थवृक्षाचें रूपक** —ज्ञानाने मोक्ष मिळेल, पण ज्ञान स्थिर होण्यासाठी चित्त शुद्ध झाले पाहिजे वैराग्यावाचून ज्ञान तगत नाही, आणि

ससार अनित्य आहे हे जाणले की ‘ वैराग्य दवडिता । पाठी लागे ’ ससार अनित्य ओळखून नित्य अशा आत्मस्वरूपी अहता लीन करावी हे शिकवण्यासाठी १५ व्या अध्यायात अश्वत्थवृक्षाचे रूपक सागितले आहे हा जगडबर ससार नव्हे तर हा महावृक्ष आहे हा इतर वृक्षाहून विलक्षण आहे हा ऊर्ध्वमल व अध -शाख आहे याचे मळ वर आहे व शाखादि विस्तार खाली आहे सूर्य वर आणि त्याची किरणे खाली तसे याचे आहे. सृष्टीत आहे नाही ते सगळे हा वृक्षच आहे हा ऊर्ध्वमळ आहे पण हा उन्मूळिला जात नाही म्हणून निरतर टवटवीत आहे आता हा ऊर्ध्वमूल कसा ? ह्या विश्वरूपवृक्षामुळें ज्याला ऊर्ध्व म्हणता येतें तें ब्रह्म याचे मळ आहे. वस्तुत ब्रह्माला अध ऊर्ध्व, मध्य काही नाही ते अद्वय एकीएक आहे कानावाचन नाद, सुरतावाचून आनद असे हे स्वयमेव आहे. केवळ ज्ञप्तिमात्र सुखमय आहे तेथें कार्यकारणभाव नाही. एकपण वा दुजेपण नाही ‘आपणया जे जाण । आपणाचि ’ असें ब्रह्म या वृक्षाचें मूळ आहे जेथून अश्वत्थवृक्षाचा अकुर फुटला तें मूळ असे आहे ' या वृक्षाचा बीजाकुरभाव ह्मणजे माया किंवा मळ अज्ञान तिचा विस्तार सागणें ह्मणजे वाझेची सतती सागण्या-सारखेंच आहे. ती सत् ना असत्—पण अनादि ह्मटली जाते. ती नानातत्वाची पेटी, जगदभ्राचें आकाश, विश्वाकारवस्त्राची घडी आहे. ती भववृक्षाचें बीज, प्रपचचित्राची मागील भित, विपरीतज्ञानाची दीपिका आहे

स्वरूपी जाली माया । आणि स्वरूप नेणणें जें धनजया ।
तेंचि तरु यया । मूळ पहिलें ॥ अ० १५–८७ ॥

आत्मविस्मृति हा या वृक्षाचा बीजभाव, सुषुप्ति किंवा अज्ञान हा अकुरभाव व जागृतिस्वप्न हा फळभाव होय आता हा वृक्ष अध शाख कसा तें पहा. अकुर खाली फैलावतात चिद्वृत्ति हा पहिला अकुर. त्याला महत्तत्त्व हे कोंवळें पान फुटतें. मग सत्वरजतमात्मक अहकार हा तीन पानाचा अधोमुख शेंडा फुटतो. तो बुद्धीचें अग्रावरून भेद वाढवीत असतो, तेथें मनाची टवटवीत डाहळी फुटते मग पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश हे पचभूताचे पाच सरळ जोरदार असे फोक फुटतात याप्रमाणे महत्तत्वापासून अहकार, बुद्धि, मन व पचभूताचा समूह अशी अष्टधाप्रकृति निर्माण होऊन पुढें सृष्टीची वाढ होत राहते हा प्रपचवृक्ष अश्वत्थ असून अव्यय आहे ' ‘ न श्व.तिष्ठति ’ ह्म० उद्या किंवा पुढच्या क्षणाला टिकत नाही ह्मणून अश्वत्थ, क्षणभगुर. तो अव्ययही आहे ' मेघाच्या मुखानी समुद्र

एकीकडे उपसला जातो व एकीकडे नदनदीच्या मुखानी भरतच असतो–असा तो परिपूर्ण असतो, तसें या वृक्षाचें होणेंजाणें अत्यंत जलद होतें, इतकें की तें कळनही नाही, ह्मणून याला अव्यय ह्मणतात. दाता दानधर्मात पैसा खर्चीत असून दुसऱ्या बाजूनें संचय करीत असतो त्याप्रमाणें व्ययामुळेंच हा वृक्ष अव्यय वाटतो. अनेक मन्वतरें होतात, वंशामागें वंश येतात जातात, युग, वर्ष दिन एका मागें एक येतात जातात, देहही येतात जातात–पण या सततपणामुळें हा नित्य मोडत मोडत असल्यामुळें वेडे लोक याला अव्यय मानतात आता या भववृक्षाचें छेदन कसें करावयाचें ? याला उपटण्याचे श्रमच कोणते आहेत ? बाळाची बागुलाची भीति दवडण्यासाठी काय बागुलाला देशोधडी करावे लागते ? गंधर्वदुर्ग ( आकाशातील ढगाचे आकार ) काय पाडावे लागतात ? 'होआवे–मग तोडावें खपुष्प की ' ' तसा हा वृक्षच मुळी सत्य नाही मग याच्या उन्मळणाची भीति कसची ? याचे मूळ खरोखरीच अचळ असते व वर्णिला तसा हा वास्तविक असता तर कोणता मायेचा पूत याला उन्मळू शकता ? काय नुसत्या फुकाऱ्यानें गगन उडून जाईल ? जागृती आली नाही तोवर निद्रेला काय अंत आहे ? म्हणून जोंवर विवेकजागृति झाली नाही तोवर या भववृक्षाला अंत नाही ' मूळमायेलाच खाऊन टाकणारें विमल ज्ञान प्रगट झाले तरच याला अंत आहे, नाहीतर नाही ' ज्ञानावाचून केलेले सर्व उपाय अधिक गुंतविणारेच आहेत या वृक्षाच्या खादोखादी कोठें हिंडत राहणार ? 'ह्मणोनि मूळाचि अज्ञान छेदी । सम्यक् ज्ञानें '

> ह्मणोनि स्वप्नींचिया घाया । ओषध चेवोचि धनंजया ।
> तेवी अज्ञानमूळा यया । ज्ञानाचि खड्ग ॥ अ० १५–२५४ ॥

मग आत्मज्ञानानें देहादि प्रपंचाचा समूळ छेद करून 'अहंइद'विरहित असें स्वस्वरूप आपणच पहावे महात्मे याच मार्गानें भवपार झाले आहेत ज्यांचे मोहमान गेले आहेत, प्रबळ आत्मज्ञानानें जे मगरहित झाले आहेत,–

> आत्मप्रातीसाठी । वस्तु विखुरली बारा वाटी ।
> ते एकवटती ज्ञानदृष्टी । अखंड जे ॥ अ० १५–२९८ ॥
> मजसी एकवट । जे जाले ज्ञानें चोखट ।
> तया पुनरावृत्तीची वाट । मोडली गा ॥ अ० १५–३२० ॥

११ **आंबुली जोडी, आंबुला खाय !:**— प्रकृति ही आबुली ह्म० स्त्री व पुरुष हा आबुला ह्म० पति पुरुषसत्तेवर प्रकृतीचे सर्व खेळ चालले आहेत. पुरुष

ह्म० चैतन्य. त्याच्या सत्तेवर प्रकृति अनत ब्रम्हाडाच्या घडामोडीचा ससार करितें. बुद्धि, इद्रियें, अन:करण व सत्वादि तीन गुण हा प्रकृतीचा मेळा असून याच्यापासून सर्व कर्माची उत्पत्ति आहे. प्रकृतिपुरुषाच्या ससार मोठा विलक्षण आहे. तेथें स्त्री मिळविते व नवरा खातो ह्म० भोगतो पुरुष हा अगहीन ( निराकार ), पागळा ( उदासीन ), दरिद्री ( दिगबर, असग ), ह्मातान्यात अति ह्मातारा ( पुरातन ) असा आहे. त्याला पुरुष हें आडनाव आहे. एरव्ही तो स्त्री ना नपुसक, त्याच्याबद्दल निश्चयानें काहीच कोणाला सागता येत नाही. त्याला डोळे, कान, हातपाय, रगरूप, नाव काही नाही. तो अकर्ता, उदास, अभोक्ता आहे ' परी इया पतिव्रता । भोगविजे ' ' आता ही प्रकृति प्रतिक्षणी नित्य नवे रूप धरणारी व नाना गुणाची पुतळी असून हिचा उन्माद जडालाही सचेतन करितो. नामे इच्यामुळे प्रसिद्धीला आली, स्नेह इच्यामुळे, इद्रियाची तरतरी इच्यामुळे. मन हे नपुसक असूनही त्यालाही त्रैलोक्यात हिंडवते, ही भ्रमाचे महाद्वीप आहे काममोहादि विकार इच्यापासून, कला, विद्या, इच्छा, क्रिया, ज्ञान सर्व इचे उत्पत्तिप्रळय हे इचे सायप्रात हिचें सौभाग्य एवढे थोर आहे की अनावर अशा पुरुषालाही ही आवरते त्याच्या ठिकाणी काहीच नाहीं पण ही त्याचे सर्व काही होते पुरुष स्वयभु आहे पण त्याचा जन्म, आकार, स्थान, इच्छा, त्याचा व्यापार, त्याचा अहकार सर्व काही आपण होते त्या निर्विकारा-ला ही विकारवान् बनविते. याप्रमाणे तो 'पुरुष प्रकृति आला । स्वतेजा मुके ' ' निद्रा पाडन स्वप्नात ढकलावें असा इचा व्याप आहे हा अजन्मा–पण गुणसभ्रमें जन्मे ' निर्गुण पण गुण भोगे ' प्रकृति याच्या सत्तेवर नादते म्हणन याला तिचा पति म्हणायचे, बाकी सारा ससार हिचाच हा प्रकृतिचा धणी व ब्रह्माडाचा सूत्रधार. देहात परमात्मा ज्याला म्हणतात तो हाच हा प्रकृतिपुरुषविचार ज्याला नीट कळला--

तो शरीराचेनि मेळें । करू का कर्में सकळें ।
परी आकाश धुई न मैळे । तैसा असे ॥ अ० १३-१०३३ ॥

तो शरीराच्या सगतीने सर्व कर्में करीना का, पण आकाश जसे धुळीने मळत नाहीं तसा असग असतो.

**१२ परा व अपरा प्रकृति आणि भूतसृष्टीची टांकसाळः**—परमेश्व-राच्या सत्तेने प्रकृति कार्य करिते पण कसें तें आता सागतात महत्तत्वादि सर्व

माझी माया आहे मी अंग आणि ती छाया. तिला अष्टधाप्रकृति म्हणतात व ती त्रैलोक्याला प्रसवते पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश ही पंचभूतें व मन, बुद्धि, अहंकार ( रज, सत्व, तम ) हे तीन गुण मिळून अष्टधा. या आठाची साम्यावस्था ती माझी परा प्रकृति, तिलाच जीव म्हणतात. हा परा प्रकृति ' जडातें जीववी । चेतनेतें चेववी । मनाकरवी मानवी । शोकमोहो. ' ती जेव्हां स्थूळाशी ह्म० अपरा प्रकृतीशी संयुक्त होते तेव्हा ' भूतसृष्टीची पडे टांकसाळ ' ' जारज, स्वेदज, अंडज व उद्भिज या चार प्राणिकोटी सारख्या कनाच्या पण भिन्नभिन्न जातीच्या निर्माण होतात याप्रमाणें ८४ लक्ष योनीच्या आकृति होऊन आदिशून्याचा ह्म० अव्यक्ताच्या गाभारा व्यक्त अशा या नाण्यानी भरून जातो. त्याचा जमाखर्च मग प्रकृतीच करिते ' नाणी पाडायची व मग ती आटायची हा तिचा धंदा ' मध्ये ( स्थितिकाली ) ती प्राण्याकडून कर्माकर्माचा व्यवहार करून दाखविते प्रकृति माझ्या ठिकाणी भासते म्हणून जगाला आदिमध्यावसानी मीच आहे, म्हणून जगाचा उत्पत्तिस्थितिलय माझ्यातच आहे. ' मियां विश्व धारिजे । जैसे सूत्रें मणि ' '

सुवर्णाचे मणी केले । ते सुवर्णाचे सुती वोविले ।
तैसे मियां जग धरिलें । सबाह्याभ्यंतरी ॥ अ० ७-३२ ॥

**१३ मूळमाया-विश्वविस्ताराचें मूळः**—महत्तत्वादिकाची विश्रामशाला म्हणून, विकाराची वाढ करणारी म्हणून, मायेला महद्ब्रह्म म्हणतात तिलाच अव्यवादी अव्यक्त, सांख्य प्रकृति व वेदांती माया म्हणतात वस्तुत हे अज्ञानच खरें. ' आपला आपणपयां । विसर जो कां धनंजया । तेंचि रूप इया अज्ञानासी ' आत्मस्वरूपाची विस्मृति म्हणजे माया, विचारापुढे ती टिकत नाही ही अनिर्वाच्य गुणाची माया माझी गृहिणी होय मी निजलो की ही जागते व माझ्या सत्तासंभोगानें गरोदर होते. मायेच्या उदरात प्रकृति अष्टविकारानी जगद्रूप गर्भाची वाढ करिते आम्हा उभयताच्या संगात प्रथम बुद्धितत्व जन्मतें, तेंच रजोगुणानी युक्त झालें की त्याला मन म्हणतात मनाची तरुण स्त्री ममता ही अहंकार प्रसवते व त्यापासून पंचभूतें होतात. भूताबरोबरच विषयेंद्रियें आकाराला येतात अष्टविकाराच्या क्षोभानें त्रिगुणाचा गर्भपिंड तयार होतो व त्याच्या पाठोपाठ वासना व्यक्तीस येतें. त्या गर्भगोळाला जारजादि चार अवयव उमटतात. हे चार अवयव हे ज्याचे हातपाय, स्थूळ प्रकृति हे ज्याचें शिर, प्रवृत्ति

हे ज्याचे पुढे आलेलें पोट व निवृत्ति ज्याची पाठ, अष्ट देवयोनि ह्या ज्याच्या कमरेवरचा भाग, आनदरूप कठ हा ज्याचा स्वर्ग व मृत्युलोक ही ज्याची कबर, पाताळ ज्याच्या कबरेमागचा पृष्ठभाग—असें हें जगडबररूप बाळसेदार लेकरू या मूळमायेच्या पोटी निर्माण झालें ' तिन्ही लोक हे त्याचें बाळसे चौऱ्यायशी लक्ष योनि हे त्याच्या काउपेऱ्याचे साधे या बाळकाच्या अगावर नामाचे अलकार घालून माया ही त्या बाळाला मोहरूप दुग्ध पाजून वाढवीत असते ' ब्रह्मा त्याचा प्रात काळ, विष्णु मध्यान्हकाळ व रुद्र सायकाळ मी बाप, माया आई व जगडबर लेंकरू '

हा गा एकाचि देही । काय अनारिसे अवयव नाही ? ।
तेंवी विचित्र विश्व पाही । एकचि हे ॥ अ० १४-११९ ॥

**१४ सृष्टिकर्तृत्व देवाकडे नाही–' स्वभावस्तु प्रवर्तते '.—**
कोणत्याही कर्मात लिंपत नसल्यामुळे देव अकर्ता आहे, तो देहेंद्रियाच्या मचातात मग्न होऊन खेळतो पण असग आहे तो ' सृजी पाळी सहारी ' असे बोलतात पण हे बोलणे अज्ञानाचे आहे

**१५ कर्तृत्व प्रकृतीचें-साक्षित्व आत्म्याचें.**—रायाने नगर बावले ही भाषा खरी आहे, पण खरोखर काय त्याचे हात शिणले ? तसे कर्तेपण सारे प्रकृतीचे, पण श्रेय देवाला ( मला विश्वात्म्याला ) ' स्वप्नातून जागृतीत किंवा जागृतीतून स्वप्नात येताजाता काय पाय दुखतात ? तसे 'भूतसृष्टीचे काही । मज एकही करणे नाही. ' राजाच्या सत्तेखालवी प्रजा आपापले व्यापार करिते, पण त्या व्यापाराचे कर्तृत्व राजाकडे नाही, तसी प्रकृति सर्व करिते, मजकडे त्याचा सबध नाही पूर्णचद्रोदयी सागराला भरती येते पण यात चद्राला काही श्रम नाहीत लोहचबुकाच्या सान्निध्यात लोह चळते पण चुबकाकडे त्याचे काही नाही

दीप जैसा का साक्षिभूतु । गृहव्यापारप्रवृत्तिहेतु ।
तैसा भूतकर्मी अनासक्तु । मी भूती असे ॥ अ० ९–१२९ ॥

**१६ ब्रम्हीं माया कशी झाली ?** उदकावर शेवाळ उगवते व तें उदकाला झाकते, किंवा आकाशात उगाच ढग येऊन ते आकाशाला झाकतात, निद्रावशतेमुळे स्वप्न होते व तें आपल्याला आपले विस्मरण पाडते, डोळ्यावर डोळ्यात त्याच पाण्याचा गोठून पडदा येतो व तो डोळ्याला झांकतो, तशी ही त्रिगुणात्मक माया माझी छाया असून जणु माझ्या आड आली आहे, तिनें मला

झाकलें आहे, म्हणून भूतें माझीच आहेत पण मला जाणत नाहीत ' भूतमात्र माझे अवयव आहेत पण मायेमुळें जीवत्व भोगीत आहेत.

**१७ क्षर आणि अक्षरः**—आकाशात जसे दिवस आणि रात्र तसे या समारपाटणात दोनच पुरुष नादतात, एक क्षर आणि एक अक्षर महदहकारापासून तृणाग्रापर्यंत जी चराचर सृष्टि दिसते ती सत्य मानून अहकाराने वावरणारा व मी माझें करीत भवस्वर्गाच्या रानात भटकणारा जो जीव त्याला क्षरपुरुष म्हणतात जीवचैतन्य म्हणजे क्षर पुरुष दृश्यभास एकीकडे व शुद्ध आत्म-चैतन्य दुसरीकडे, या दोहोंच्या सधीत घनसुषुप्ति किंवा अज्ञानरूपाने नादणारा जो मायासगी शिव तो अक्षरपुरुष परमात्मा दोहोंहून निराळा आहे

**१८. क्षराक्षरातीत उत्तमपुरुष ( पुरुषोत्तम )**:—' देह मी ' हे अज्ञान, व ' ब्रह्म मी ' हे ज्ञान व दोन्ही, जाऊन उरते ते शुद्ध ज्ञान ' वह्नि काष्ठ जाळनिया । स्वये जळे ' तसे ज्ञान अज्ञान घालविते, पण वृत्तिसहित ज्ञानही गेले म्हणजे वृत्तिसाक्षित्वरहित जे उरते ते शुद्धचैतन्य

अज्ञान ज्ञाने नेले । आपणही वस्तु देऊनि गेले ।
ऐसे जाणणेंविण उरले । जाणते जे ॥ अ १५–५२८ ॥

तोच पुरुषोत्तम, त्यालाच परमात्मा म्हणतात काष्ठात असून काष्ठाहून वन्हि जसा वेगळा तसा क्षराक्षरात असून पुरुषोत्तम दोहींहून वेगळा आहे घ्राणा-फुलात परिमळ आहे, तो दिसला नाही तरी नाही असे नाही, तसे दृश्यद्रष्ट्याहून पुरुषोत्तम वेगळा आहे तो प्रकाश्येंविण प्रकाश, ईशितव्येंविण ईश आहे नादाचा नाद, विश्रांतीचा विश्राम तो प्रकाश्यप्रकाशक, अलकारसुवर्ण, जल-तरग या दृष्टातावरून तोच दोन्ही असून दोन्हींहून वेगळा आहे

जो आपणपेंचि आपणपया । प्रकाशितसे धनजया ।
काय बहु बोलों जया । नाही दुजे ॥ अ. १५–५५७ ॥

**१९ ब्रह्मसुख सुलभ आहे. २० पण अश्रद्धेला दुर्लभः**—गुरुमुखाने ऐकायची वस्तु ( तत्वमसि ) आहे थोडी आणि तरिही हृदयात स्वयभुच आहे, पण ती श्रद्धेने अनुभवाला येते. अलीकडच्या तीरारून पाहताही ( परोक्षज्ञानानेंही ) चित्त सुखभरित होते, अशी ती वस्तु सुखमय, सोपी व सुलभ आहे. प्राप्त झाली की केव्हाही जात नाही, भोगता कमी होत नाही व तिचा केव्हाही वीट येत नाही.

तरी पवित्र आणि रम्य । तेवींचि सुखोपाय सुगम ।
आणि सुसुख परमधर्म्य । वरी आपणपा जोडे ॥ अ. ९–५५ ॥

असे हे ब्रह्मसुख सर्वतोपरी उत्तम व सुलभ असताना जीव त्याचा आनद का घेत नाहीत ? यावर उत्तर एक जीव तशी श्रद्धा ठेवीत नाहीत म्हणून ' दूध पवित्र, गोड व पदराआड असून गाईच्या स्तनाजवळ असणारा गोचीड रक्तच पितो की नाही ? बेडूक कमलकदाजवळ राहतो पण दुरून येणारे भ्रमर त्याचा पराग घेऊन जातात आणि हा चिखल खातो ' करट्याच्या ढुगणाखाली मोहरा पुरल्या असून तो उपास काढीत फुकट मरतो '

तेसा हृदयामध्ये मी राम । असता सर्वसुखाचा आराम ।
का भ्रातासी काम । विषयावरी ॥ अ० ९–६० ॥

अमृताचा घोट थुकून मृगाने मृगजळामागे धावावे, परीस टाकून शिप घ्यावी, तसा अश्रद्धेमुळे जीव आत्मघात करीत आहेत !

**२१ आदिदेवाला कोण जाणेल ?**–सर्वांचा आदि मी, मला कोण जाणेल ? येथें वेद मुके व मनपवन पागळे आहेत सारे देव माझ्या मागूनचे, ते मला काय जाणणार ? पोटच्या गर्भाला काय आपल्या आईचे वय कळेल ? जळचराना समुद्राची खोली अजमावता येणें शक्य नाही, त्याप्रमाणें महर्षींना माझ्या स्वरूपाचा था । लागला नाही.

मी कवण पा केतुला । कवणाचा के जाहला ।
या निरुती करिता बोला । कल्प गेले ॥ अ० १०–६७ ॥

मजपासून जग झाले ते मला कसे जाणील ? अकुरात काय वटवृक्ष सापडेल ? तरगात समुद्र साठेल ? परमाणूत भूगोल सामावेल ? असेही असून जो एखादा बहिर्मुखता टाकून इद्रियाकडे पाठ फिरवून अतर्मुख होईल, देह मागे टाकून पचभूताच्या माथ्यावर चढेल व उगमाचा शोध घेत माझे अजत्व ओळखील, मी 'आदीसी पर । सकललोकमहेश्वर' । आहे असे जाणेल तर पाषाणात परीस किंवा सर्वरसात सुधारस याप्रमाणे मनुष्यात तो माझाच अश आहे असे जाण.

**२२ ज्ञानयज्ञ** — भूते, विषय व इद्रियें ही वेगळाली न म्हणता आत्मबुद्धीने सर्व एकच असे जाणेल व

जैसा चेइला तो अर्जुना । म्हणे स्वप्नींची हे विचित्रसेना ।
मीचि जाहलो होतो ना । निद्रावशें ॥ अ० ९–२४६ ॥

मग तो जीव हे भाष सरे । आब्रह्म परमात्मबोधें भरे ।

अवयव भिन्नभिन्न भासले तरी एकाच देहाचे आहेत तसे विश्व भिन्नभिन्न दिसेल 'परी न भेदे तयाचे ज्ञान ' लहानमोठया शाखा जशा एकाच वृक्षाच्या, अनत किरणे जशी एकाच सूर्याची, तसे हे सर्व मज एकाचे–सर्व मिळून मीच एक-असे ज्याच्या अनुभवास आले तो व मी भिन्न नाहीत.

अखड सकळ हे मकळामुखीं । सहज अर्पत असे मज एकीं
कीं नेणणेयासाठीं मर्खी । न पविजेचि माते ॥ अ० ९–२६४ ॥

**२३ जाणीव सांडावीः**—' एथ जाणीव करी तोचि नेणे ' मी पूर्ण झालो असे म्हणेल त्याला काहीच कळलें नाही. वेदापेक्षा कोणाची जाणीव अधिक आहे ? शेषाहून अधिक चागला बोलका कोण आहे ? पण वेद 'नेतिनेति' म्हणून मागे सरतो व शेष परमात्म्याच्या अगाखाली दडतो ' सनकादिक वेडेपिसे होतात शकराहून अधिक तापसी कोण आहे, पण ' तोही अभिमान साडूनि पायवणी । माथा वाहे'– माझे चरणतीर्थ गगा ती मस्तकावर घेतो. परमसपन्न अशी लक्ष्मी ' पाय ' धुवावयाचिया दैवा । पात्र जाहली'– माझ्या चरणसेवेत धन्यता मानून राहिली.—

म्हणोनि थोरपण पऱ्हा साडिजे । एथ व्युत्पत्ति आघवी विसरिजे ।
जै जगा धाकुटे होइजे । तै जवळिक माझी ॥ अ० ९–३७८ ॥

**२४ ब्रह्म आणि जग यांचे ऐक्य**.—भगवान् सागतात. एकाच देहाचे जसे नाना अवयव तसे एकाचेच हे विविध विश्व आहे. विश्वाहून ब्रह्म वेगळे नाही.

नाना कल्लोळपरपरा । सतती जैसी सागरा ।
आम्हा आणि चराचरा । सबध तैसा ॥ १४–१२२ ॥
जालनि जग मी झाके । तरी जगत्वे कोण फाके ? ।
किळेवरी माणिके । लोपिजे काई ' ॥ १२४ ॥

सागर आणि तरग किंवा माणिक व प्रभा याचा जो सबध तोच माझा आणि जगाचा आहे जग झाल्याने जर मी झाकला जातो तर जगत्वाने कोण फाकलें आहे ? अलकारास आल्याने काय सोन्याचे सोनेपण जाते ? कमळ विकसले की काय कमळपण सपले ? अवयव अवयवीला आच्छादितात का ते त्याचेच रूप आहे ? कणीसपणाने दृश्य झाल्यावर काय कणसाचा मूळ दाणा लोपला की अधिकपणे प्रत्ययास आला ?

म्हणौनि जग परौते । सारूनि पाहिजे माते ।
तैसा नोहे—उखिते । आघवे मीचि ॥ अ० १४–१२८ ॥

वन्हि तेचि ज्वाळ, दळ तेच कमळ चद्रबिंब व चद्रिका काय दोन आहेत ? बिंब सोडून का प्रकाश वेगळा पाहता येतो ? सुवर्ण—अलकार, पट—ततु, मृत्तिका—घट, याचे जें नाते तेच माझे (ब्रह्माचे) व जगाचे नाते आहे. विश्वपण काढून टाकून मला पाहावयाचे नसते, विश्व व मी एकच. असे मला जाणणे याला एकातभक्ति म्हणतात माझा विस्तार म्हणजेच काय जग नाही ? दूध मुराले की तेच दही, बीजाचाच वृक्ष अथवा भागारच अलकार. अव्यक्तपणे थिजलेलेच तूप विश्वाकारपणानें पातळ होते. तुपात काय भेद आहे ? भानु आणि प्रभा तसा मी सर्व भूतासी अभिन्न आहें, म्हणून भूते मजहून वेगळी नव्हत. भूतावेगळा मी आहे असे मनातच आणू नकोस

**२५ आपली विश्वात्मकता**—मी सकळ देहात व सकळ भूते माझ्यात अशी भावना एकवटून जो मला जाणतो व सर्वभूती मला एकाला भजतो तो मजसी एकरूप आहे असे जाण माझें व्यापकपण ज्याला गवसले तो व्यापक–मत्स्वरूपच झाला तो सुखदुःख, शुभाशुभ इ० समविषमभावापासून सुटला. सर्व मग त्याचे अवयव व तो अवयवी लोक त्याला सुखी किंवा दु.खी समजोत, पण त्रैलोक्यच ज्याला मत्स्वरूप झाले त्याला आम्ही परब्रह्मच मानतो. म्हणून आपणात विश्व पहावे व विश्वच आपण व्हावे ह्या साम्याचा अभ्यास करावा. ‘ जे साम्यापरौती जगी । प्राप्ति नाही. ’

**२६ जीवो ब्रह्मैव नापरः**’—यासाठी सकळ भेदभाव टाकून ‘ आपणयासगट मातें । जाणावे गा. ’ विश्व मत्स्वरूप आहे असें जाणावें हें वर सागितले, आता जाणता तूही वेगळेपणाने राहू नकोस असे सागतात. किरण व सूर्य असा तुझामाझा सबध आहे म्हणजे आपण एकच आहोत

परमाणू भूतळी । हिमकण हिमाचळी ।
मजमाजी न्याहाळी । अहं तैसें ॥ १४–३८६ ॥

तरग लहान असला तरी सागराहून भिन्न नाही असे मजसी समरस होणें यालाच आम्ही भक्ति म्हणतो. ज्ञान, योग—सर्वांचें सार हेंच

सिंधू आणि जलधरा—। माजी लागली अखड धारा ।

अशी वृत्ति ब्रह्मी लीन होणे हीच भक्ति, हेंच ज्ञान व हाच योग. बिंब—प्रति-

बिंबात प्रभेचा एकच उत्कर्ष असतो, तसे सोहवृत्तीने ब्रह्माशी तन्मय होणे ही भक्ति. सैधवाचा खडा सिंधूत टाकून मग विरवावा हेही उरत नाही. मी व भक्त याच्यात मग अलीकडे पलीकडे असें अतर न राहता ' अनादि ऐक्य जे आहे । तेचि निवडे ' समुद्रावर वायुवेगानें तरग उठतो व त्याला तो लहान म्हणून समुद्राश म्हणावा, पण समुद्रच तो जडातें जीवविता व देहाहता उपजविता म्हणून त्याला पाहिजे तर जीव म्हणा उपजणे मरणे याला सत्य मानणे हेच जीवपणाचें लक्षण आहे. पण जीव ही काय स्वतत्र चीज आहे ? चद्र उदकात प्रतिबिंबित झाला तरी तो खरोखर उदकातीत आहे स्फटिकाचा खडा कुकवावर ठेवला तर तावडा दिसतो, पण वस्तुत तो तावडा नाही माझे अनादिपण किंवा अक्रियत्व याला बाध येत नाही जीवाला कर्ता भोक्ता असे म्हणणे ही भ्राति आहे ज्ञानदृष्टीने तो मजशी अभिन्न आहे म्हणून ' जीवो ब्रह्मैव नापर. ' हेंच खरे आहे

**२७ ज्ञात्याची साम्यबुद्धिः**—जो आत्मसगतीने सुखरूप झाला त्याच्या घरात शाति आपण होऊन घुसते तो पाहेल तिकडे सुख व ह्मणेल तेथे महाबोध सन्मुख असतो. देहात असून तो कामनारहित असतो

जगाच्या जीवीं आहे । परी कवणाचा कही नोहे ।
जगचि हें होय जाये । तो शुद्धीही नेणे ॥ अ० ५–७९ ॥

व्यवहारात लौकिककर्मे करीत असताही फळाशा सोडल्यामुळें शातिमुळें त्याचे अभेदबुद्धीनें वागणे असते मग हा मशक हा गज, हा श्वपच हा द्विज, हा गुरु हा हीन, असा भेद्रभाव त्याचे ठायी नसतो भेद नेहमी अहकारापाशी असतो, ' म्हणोनि सर्वत्र सदा सम । ते आपणचि अद्वय ब्रह्म' असे समदृष्टीचें वर्म त्याला माहित असते विषयसग न सोडिता, इद्रियाते न दडिता, लौकिक व्यापार करीत असून कामना व फलाशा सोडल्यामुळे तो नि सगत्वाचे सुख भोगीत असतो 'शुभाशुभ पातलिया' त्याची समता ढळत नाही असला समदृष्टि पुरुष नामरूपाला आलेला असला तरी मूर्तिमत परब्रह्म आहे असे समज.

**२८ ज्ञान उमटल्याची चिन्हेंः**—ही एकदर अठरा सागितली आहेत आधी ज्ञान ह्मणजे काय ते पाहू ज्याच्या योगाने जीव व आत्मा याचे ऐक्य होते, इद्रियाची कपाटे बद होतात व विषयप्रवृत्ति पागुळते, मनाचे दारिद्र्य फिटते, ससाराचे व तद्विषयक वासनेचेही उन्मूलन होते, ज्ञेय गिंवसते, बुद्धीचे डोळे उघडतात व जीव आनदाच्या दोदावर लोळतो—असे पवित्रैकनिधान एक

ज्ञानच आहे ' ते ज्ञान शरीरी प्रकट झाले की आपला प्रभाव दाखविल्याशिवाय कसे राहील ? ते इंद्रियाच्या व्यापारात दिसते–डोळ्यात दिसते वृक्षवेलीचा टवटवितपणाच वसंताचा प्रवेश झाला आहे असे सांगतो, त्याप्रमाणें देहेंद्रियावरच ज्ञान झळकते वृक्षाला पाताळात मुळाशी पाण्याचा झरा लागला की शाखा-पल्लवावर तो दिसतो, केळीत कापूर आला हे बाहेर परिमळ सुटला की समजून येते, भिंगातल्या दिव्याचा प्रकाश बाहेर फाकतो, त्याप्रमाणे हृदयात ज्ञान प्रकट झाले की त्याची चिन्हे बाहेर प्रगट दिसतात तीच आता लक्ष देऊन ऐक.–

( १ **अमानित्व** ):—कोणाही थोराची बरोबरी करणे ज्याला आवडत नाही, मोठेपणाचे ज्याला ओझे वाटते, असलेल्याच गुणाची वाखाणणी केली तर व्याघ्राने अडवलेल्या मृगासारखी ज्याच्या मनी गजबज होते, सन्मान केला तर जो घाबरतो, ' पुज्यता डोळा न देखावी । स्वकीर्ति कानी नायकावी ' असे ज्याला वाटते—

वाचस्पतीचेनि पाडे । सर्वज्ञता जरी जोडे ।
परी वेडिवेमाजि दडे । महिमेभेणे ॥ अ० १३–१९१ ॥
चातुर्य लपवी । महत्व हरवी ।
पिसेपण मिरवी । आवडोनि ॥ १९२ ॥
जगी अवज्ञाचि करावी । सबधी सोयाचि न धरावी ।
ऐसी ऐसी जीवी । चाड बहु ॥ १९४ ॥

किंबहुना ' माझे असतेपण लोपो । नामरूप हारपो ' असेच ज्याला अंत-र्यामापासून आवडते त्याच्या ठिकाणी अमानित्व हा पहिला गुण पुरा आहे व ज्ञानाशी त्याचे ऐक्य झाले आहे असे समजावे

( २ **अंदांभित्व** ) —कृपण जसा जीव गेला तरी आपला ठेवा सांगत नाही, त्याप्रमाणे प्राणसंकट पडले तरी जो ' सुकृत ना प्रगटी । ना आंगे बोले ' म्हणजे पुण्यकर्म, दानधर्म, आपला स्वधर्म, चव्हाट्यावर मांडीत नाही तो अदंभी जाणावा. लाथाळ गाय पान्हा चोरते, पण्यांगना वय चोरते, कुळवधू अंग चोरते, शेतकरी पेरलेले धान्य झाकतो, त्याप्रमाणें अदंभी पुरुष आपले सुकृत प्रगट करीत नाही.

वरिवरी देह न पूजी । लोकांते न रंजी ।
स्वधर्म वाग्ध्वजी । बांधो नेणे ॥ १३–२०८ ॥
परोपकार न बोले । न मिरवी अभ्यासिले ।

न शके विकू जोडलें । स्फीतीसाठी ॥ २०९ ॥

( **३ अहिंसा** ) —अहिंसा कायिक वाचिक व मानसिक त्रिप्रकारक आहे. ततु चुरडेल या भीतीनें कमळावर जसा भ्रमर हळुवार पाय ठेवतो त्याप्रमाणे परमाणूतल्या सूक्ष्म जीवानाही त्रास होऊ नये म्हणून तो कारुण्यात पावले लपवून ' जीवातळी आथरित आपुला जीव ' असा चालतो, कोणाही जीवाचा अतिक्रम करीत नाही, ज्याचें बोलणे ' मुख मोहाचें माहेर' असे मधुर असते, ' पुढा स्नेह पाझरे । माघा चालती अक्षरे ' आपले बोलणें कोणासही खुपेल अशा भीतीने तो सहसा बोलत नाही, आग्रहानें बोलविलाच तर ' परिसत्या होये मायबाप ' '

साच आणि मवाळ । मितले आणि रसाळ ।
शब्द जैसे कल्लोळ । अमृताचे ॥ १३–२७० ॥

त्याच्या दृष्टीत कूर्मीचे प्रेम असते, मनात भूतमात्री दयाप्रेम ओतप्रोत भरलेले असते आणि तें करचरणादि इंद्रियद्वारा प्रगट होते

( **४ क्षांति** ) —अद्भुत सहनशीलता हा ज्ञात्याचा चौथा गुण तो त्रिविध तापाचे उपद्रव एकदम येऊन कोसळले तरी गडबडत नाही अपेक्षित–अनपेक्षित, मान–अपमान, सुख–दुःख, स्तुति–निंदा काहीही प्राप्त झाले तरी समुद्रासारखे मोठे पोट करून सर्व शातपणे सोसतो, फार काय पण ' साहतसे ऐसेंही । स्मरण नुरे ' ही खरी क्षाति

( **५ आर्जव** ) —ऋजुत्व, सरळपणा, माणसामाणसाशी वेगवेगळी वर्तणूक हे त्यापाशी नसते तो सर्वांशी अतर्बाह्य सारखा असतो, त्याला आपपर नसते. जगाशी जुनीच ओळख ' वारियाची वाव । तैसे सरळ भाव । शका आणि हाव । नाही तया ' ' कोनाकोपरा ठाऊकच नाही. दृष्टीत ओशाळपण नाही, बोलण्यात सदिग्धता नाही, कोणाशीही हीनबुद्धीनें वागणे नाही. इंद्रिये निष्प्रपच व निर्मळ पचप्राण अष्टौप्रहर मोकळे 'अमृताची धार। तैसे उजू अतर' हे आर्जव.

( **६ आचार्योपासना** ) —ज्यानें आपले सर्वस्व गुरुकुळी वाहिलें, गुरु प्रत्यक्ष परब्रह्म अशी ज्याची निष्ठा, ज्याचे सर्व सकल्प गुरुसेवेचे, गुरुगृह ज्या देशात तिकडच्या वाऱ्यालाही जो सामोरा धावतो, 'कै हें बिरडे फिटेल । कै तो स्वामी भेटेल ' अशी ज्याची विरहोत्कठा—त्या गुरुभक्ताचे सकल्पही किती गोड असतात ! गुरुमाउलीच्या अकावर स्तन्यसुखार्थ लोळणारे मी बाल आहे, चैतन्यवृक्षाखाली उभी ठाकलेल्या गुरुधेनूचें मी वत्स आहें, गुरुकृपास्नेहसलिलातली मी

मासोळी आहें, गुरुपाक्षिणीच्या तोंडातला चारा मी आपल्या चचूने घेत आहे, गुरूतारूची मी कास धरिली आहे, गुरूच्या दयावलोकनात येणारी सर्वरूपे मीच आहे, गुरूचरणरज ज्या भूमीला लागले तेथली सर्व माती मीच आहें, अशा अशा प्रकारचे त्याचे सकल्प असतात मुखाने गुरुनामाचे मत्र सर्वकाळ तो जपत असतो. गुरुसप्रदायधर्म हाच ज्याचा स्वधर्म, गुरुसेवा हेच ज्याचें नित्यकर्म, क्षेत्र, तीर्थ, देवता, मायबाप, सर्व काही ज्याचे श्रीगुरुचरण, गुरुचरणोदक हें ज्याचे तीर्थ, गुरुचरणरजाला जो कैवल्यसुखाच्या बदलीत घेतो—तो निस्सीम गुरुभक्त धन्य होय, ज्ञान त्याच्याजवळ लोळते

( ७ शौच )—‘ बाहेरी कर्मे क्षाळिला । भीतरी ज्ञानें उजळला ’ तोच शुचि स्वधर्मकर्माने बाह्यशरीर व ज्ञानाने अतर शुद्ध होणे याचे नाव शुचित्व.

( ८ स्थैर्य )—प्रारब्धवशात् ससारचक्री फिरत असताना ध्रुवाप्रमाणे किंवा मदराचळाप्रमाणे ज्याची अतरीची बैठक ढळत नाही त्याच्या ठिकाणी हे ज्ञानलक्षण पूर्ण आहे असे जाणावे

( ९ आत्मविनिग्रह ):—आई एकुलत्या एक बाळकाला जपते तसे अत -करणाला इंद्रियद्वारी जाऊ न देता तो जतन करितो

( १० वैराग्य )—विषयवार्ता वमनप्राय मानणे व इंद्रियवृत्तींवर न येणे याचें नाव वैराग्य ‘ नाराचाची आथरुणे । पूयपकी लोळणे ’ तसे विषयसुख मानणे हे वैराग्य हे आत्मलाभाचे भाग्य आहे

( ११ अनहंकार )—‘ हे कर्म मिया केले । की माझेनि आदरिले सिद्धी गेले ’ असे अवष्टभरहित वागणे, कसलाही कुज नसणे.

( १२ जन्मजरादिस्मरण ):—जन्मजरा, व्याधि, वार्धक्य, मृत्यु इ० दु खे ‘ अगा न येता दुरूनच सावध राहणे ’

( १३ अनासक्ति ):—मृत्युलोकींचे आपण पाहुणे आहोंत हे ओळखून दारागृहपुत्री उदास असणें.

( १४ समचित्तता ):—उन्हाळा व पावसाळा सागराला सारखाच, सायप्रातर्मध्यान्ह सूर्याला सारखेच, तसे सर्वदा चित्तसाम्य राहणे

( १५ एकानिष्ठभक्ति )—शरीर, वाचा, व मन माझ्या ठिकाणी स्थिर असणे –

मिळोनि मिळतचि असे । समुद्री गगाजळ जैसें ।
मी होऊनि मज तैसे । उपासिती ॥ अ १३–६०८ ॥

( **१६ एकांतवासाची आवड** ):--तीर्थे, तपोवने, गुहा, शैलकक्षाची कुहरें, व जळाशयपरिसरे याची आवड, गजबजलेल्या नगराची नव्हे! ' बहु एकांतावरी प्रीति। जया जनपदाची खंती ' तो ज्ञानमूर्ति जाण

( **१७ अध्यात्मज्ञान** ):--ज्या ज्ञानास्तव परमात्मा दिसतो तें ज्ञान व भवस्वर्गादि ज्ञाने ते अज्ञान असा निश्चय करून 'मनबुद्धि मोहरी। अध्यात्मज्ञानी '

( **१८ तत्वज्ञानार्थदर्शन** ):--ज्ञानप्रमेबरोबर मति ज्ञेयवस्तूला झोंबणे, ज्ञान दाखवील ते ते परमात्मस्वरूप पाहणे

ही ज्ञानाची अठरा लक्षणे सांगितली हे प्रत्यक्ष ज्ञानदर्शन होय

**२९ स्थितप्रज्ञाची लक्षणे**:--ज्याची प्रज्ञा स्वरूपी स्थिर झाली, ज्याची बैठक बसली, त्याची ही लक्षणे आहेत स्वसुखाला अंतराय जो काम तो जाऊन जो आत्मसंतुष्ट झाला तोच स्थितप्रज्ञ होय दुःख येऊन कोसळली असता ज्याला चित्ती उद्वेग नाही व जो विषयसुखाच्या कामनेला वश होत नाही, जो अभयपद पावला आहे, निरसूनि उपाधि भेदरहित झाला आहे, पूर्ण चंद्राप्रमाणे जो शीतल व उच्चनीचावर समचित्त आहे --

ऐसी अनवच्छिन्न समता। भूतमात्री सदयता।
आणि पालट नाही चित्ता। कवणे वेळे॥ अ. २-२९८॥
तैसा इंद्रियार्थी उदासीन। आत्मरसेंचि निर्भिन्न।
जो कामक्रोधविहीन। होऊनि असे॥ ३३४॥
जैसा निर्वातीचा दीप। सर्वथा नेणे कंप।
तैसा स्थिरबुद्धि स्वस्वरूप। योगयुक्त॥ ३४१॥

प्राणिमात्र आत्मरूपी निद्रित आहे तेथे हा जागा व ते जेथे ( विषयात ) चेइले आहेत तेथे हा निद्रित ' वर्षाकाळी नद्याना भरती व ग्रीष्मकाळी ओहटी येते, पण समुद्राला चढउतार नाही--त्या समुद्रासारखी अखंड अक्षोभता त्याचे ठिकाणी असते. रिद्धिसिद्धी त्याला भुलवू शकत नाहीत.

ऐसा आत्मतोषें तोषला। जो परमानंदे पोखला।
तोचि स्थिरप्रज्ञ भला। वोळख तू॥ ३६६॥
तो अहंकारातें दवडूनी। सकळ काम साडूनी।
विचरे विश्व होऊनी। विश्वामाजी॥ अ. २-३६७॥

---

# ३ भक्तियोग.



**१ दुस्तर मायानदी**—महत् उर्फ मूळमाया हे सृष्टीचे मूळ तेथपासून मायानदीचा प्रवाह अखंड चालू आहे ही मायानदी उतरून 'मी होइजे' हे कसे व्हावे, ब्रह्मरूपता कशी प्राप्त व्हावी? मायानदी तर दुस्तर आहे तिचे रूपकाने सुंदर वर्णन या प्रकरणात केलें आहे कालगतीच्या वेगाने प्रवृत्तिनिवृत्तीच्या दोन्ही तटामधून ही 'दुवाड मायानदी' वाहत आहे त्रिगुणाच्या मेघवृष्टीमुळे मोहाचे महापूर येत आहेत, द्वेषाचे आवर्त, मत्सराचे वळसे, अहंकाराच्या लाटा, मदत्रयाच्या उसळ्या, जन्ममरणाचे खळगे, यानी ही गजबजली आहे 'ऐसा हा महापूर कवणें। तरिजेल गा?' आणि मौज ही की तरून जाण्यासाठी 'जो जो कीजे तरणोपावो। तो तो होय अपावो' कोणी स्वयबुद्धीच्या बाहुबळावर पोहत निघाले ते कोठे गडप झाले त्याचा पत्ताच नाही. कोणी जाणीवेच्या डोहात बुडाले कोणी वेदत्रयाच्या सागडी घेऊन निघाले ते 'मदमीनाच्या तोंडी। सगळेचि गेले!' कोणी शरीरबळ व दीर्घायुष्य घेऊन निघाले ते विषयमगरींनी चघळून टाकून दिले कोणी यज्ञक्रियेची पेटी घेऊन निघाले ते स्वर्गसुखाच्या कपाटी अडकून राहिले कर्ममार्गी विधिनिषेधाच्या वळशात सापडले. शोकाचे कडे, क्रोधाचे आवर्त, आपत्तिरूप गिधाडाच्या उड्या, काही बोलू नका! वैराग्याची नाव व विवेकाचा दोर—काहीसे उपयोगी पडतात, पण प्रसग कठिणच! जीव आगबळानें काय ही मायानदी तरून जाणार?

येथ एकचि लीला तरले। जे सर्वभावे मज भजले।
तया ऐलीच थडी सरले। मायाजळ॥ ७-९७॥

सद्गुरु तारू, आत्मनिवेदनाचा ताफा, हे मिळून जे अभेदभक्तीनें निवृत्तितटाला लागले ते तरले, पण 'ऐसे भक्त विपाइले (विरळ)। बहुवस नाही'

**२ ईश्वरभजनावांचून उपायच नाही**:—देह ही एक शतजर्जर नौका आहे तिची निश्चिती काय मानायची आहे? दु.खशोकाच्या वर्षावात, मृत्यूचा वणवा पेटला असताना, अनित्य व असुख अशा ह्या मृत्युलोकीच्या

जीवानी कशाचा आधार धरावा ? कोणाच्या बळावर निश्चिंत असावें ? विद्या, वय, याचा काही भरवसा आहे ? ' मज न भजता भरवसा सुखाचा कोण ? ' विषयसुख ह्म० ते इगळाच्या आथरुणावरची निद्रा ! तेथे सुख कसचे ? पण लोक निश्चितपणे ससार दुखात दंग दिसतात, याचे नवल वाटते ! हे विषय भोगीत आणि तृष्णा वाढवीत आहेत ! बेडूक सापाच्या तोंडात चालला आहे तरी वर माशी दिसली की, जीभ वर करून चाटायला धडपडतच आहे ! येथे दैवयोगानें जन्म लाभला.—

तरी झडझडोनि वाइला निघ। इये भक्तीचिये वाटा लाग।
जिया पावसी अव्यग। निजधाम माझे ॥ ९-५१६ ॥

**३ चतुर्विध भक्त** —आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी व ज्ञानी असे भक्ताचे चार प्रकार आहेत, अर्थात् चार प्रकारानी देवाला भजणारे लोक आहेत. या चौघात खरा निरपेक्ष भक्त ज्ञानी हाच होय. ज्याचा कर्तृत्वाहकार लीन झाला असता भेदभाव मावळून जो हरीरूपी समरस झालेला असतो व देवासाठीच जो देवाला भजतो तो ज्ञानीभक्त होय

शरीरी हन कर्मे। तो भक्त ऐसा गमे।
परी अतरप्रतीतिधर्मे। मीच जाहला ॥ ७-११६ ॥

त्याच्या शरीराकडून घडणारी कर्मे पाहता तो भक्त असा वाटतो पण त्याचा स्वानुभव पाहता तो व देव एकरूप आहेत असेच दिसेल दुभत्याच्या आशेनें जग धेनूच्या गळ्याला दावे बाधते, पण दाव्यावाचून ज्याच्यासाठीं ती पान्हावते तो वत्स वेगळाच आहे ! वत्सही गाईकडे तनुमनप्राणे धावतो अशी अनन्यता ज्ञानीभक्ताच्याच ठायी असते. देहभाव विसरूनच देवाच्या चाडेने देवाला अनन्यप्रेमाने भजणारा तो ज्ञानीभक्त. तो आणि देव एकच, फार काय पण तो ' चैतन्याचि केवळ माझें ' असें भगवान् सागतात

**४ वेडे माझा व्यापकपणा न ओळखतां मला भजतात**.—सर्व वासुदेवात्मक आहे या प्रतीतीशिवाय देवाला भजणे म्हणजे ती अज्ञानातलीच भक्ति ! देव ओळखून देवाला भजले पाहिजे. अमृताच्या सागरात बुडुन तोंड घट्ट मिटायचे व मनात डबक्यांतले पाणी आणायचें त्यातलाच तो प्रकार. अमृतात बुडून मरणे ते हें ! अमृत होऊन अमृताल का न नादावें ? फळहेतूचा पिंजरा ह्म० हें शरीर किंवा शारीरभाव बाळगून देवाला भजायलाच का जावें ? प्रती-

ोच्या पखानी चिद्बरात व्यापकपणानें का न उडावें ? तेणेंकरून प्रशस्त सुखाचा अनुभव येईल. मी देव अपरपार तसें होऊन मला भजावे–तें सोडून अव्यक्ताला अ० सर्वात्मकाला व्यक्त मानून–लहान करून वेडे भजत असतात.

५ **भक्तांचा अभ्यासयोगः**—डोळे, कान, मन, माझ्याकडे लाव ' आत ाहेरी आघवे । मीचि करूनि घालावें ' तू तूपणाला विसरून मद्रूप हो मन, ुद्धि मला दे, बुद्धीनें माझा निश्चय कर, मनाने माझें चिंतन करीत जा अशक्य ाय आहे ? ' अगा ' उपायबळें पगु । पहाड टाकी ' चित्ताला परमपुरुषाची ोहोर लाव, मग देह राहो अथवा जावो नदी सागराला मिळते तसे चित्तच वनन्य होईल मी होऊन माझी उपासना कर अशा नित्ययुक्ताना मी सतत ाभाळायला आहे ना ?

६ **अभ्यासास दुष्कर कांही नाही** —मला मन बुद्धि अर्पण करून मोकळा ा अरे ' तू मळचा मुक्तच आहेस भिऊ नकोस आठ प्रहरात मला एक निमिष ्त जा जो जो क्षण माझे मुख पाहील तेवढ्यापुरता तरी तू सुटशील, विष- ाना ओहटी लागेल, प्रपचातून मन निघेल कृष्णपक्षातलें शशिबिंब कमी होत ोत अवसेला नाहीसें हातें तसें भोगातून चित्त काढता काढता वासनाक्षय होईल । माझें अपार सुख भोगशील यालाच अभ्यासयोग म्हणतात अभ्यासाने काय ाध्य होत नाही ? अतराळात राहता येते, सर्पव्याघ्र निर्वैर करिता येतात —

म्हणोनि अभ्यासासी काही । सर्वथा दुष्कर नाही ।
यालार्गा माझिया ठायीं । अभ्यासें मिळे ॥ १२-११३ ॥

७ **'समस्त त्रैलोक्याचा गोसावी'** मी आहें हे भगवान् स्वमुखाने पटवून ्तात हें चराचर ज्या प्रकृतीच्या पोटीं सामावले आहे ती प्रकृतिच जेथें विसा- ते ती परमगती मीच आहें, ज्याच्या आधारावर प्रकृति नादते व विश्वाचे स्थितिलय करिते त्या ' विश्वश्री'चा भर्ता मीच आहे आकाश, वायु, अग्नि, र्वत, समुद्र, पृथ्वी, हे सर्व माझ्या आज्ञेनें वर्ततात वेद, प्राण, काल याचा नेयामक मी जलकल्लोळाप्रमाणे या जगाचा व माझा एकात्मतेचा सबध आहे. क्ताना मीच उद्धर्ता आहें जगाचे बीजरूप जो सकल्प त्याचा निक्षेप मीच ाहें सकल्पवासनासस्कार जेथून उठतात व जेथे आटतात तें निधान मीच ाहे साराश सतासत् सर्व माझेंच स्वरूप आहे.

८ **विश्वविस्तार** हा माझाच आहे. बीजापासून कोंभ, खाद्या, शाखा, पाने,

फुलें, फळे हा सर्व बीजाचाच विस्तार त्याप्रमाणें माझ्याच संकल्पापासून हा विश्व-विस्तार आहे मी सर्वत्र आहें माझ्या विभूती असंख्य आहेत शरीरावरचे रोम किंवा पृथ्वीचे परमाणू जसे मोजता येत नाहीत, तशा माझ्या विभूती मोजता येणार नाहीत. माझ्या एका अंशानें हे विश्व व्यापले आहे म्हणून 'भेद सोडून साम्यानें मला भजणें' हीच माझी भक्ति होय

सानें थोर न म्हणावें। उत्तमनीचभाव सांडावे।
एक मीचि ऐसें जाणावें। वस्तुजातातें ॥ १०-३०५ ॥

**९ यंत्रारूढ भूतांचा चालक ईश्वर** — भक्तियोगाचें रहस्य वरप्रमाणे सांगितल्यावर मळपदावर येऊन भगवान् अर्जुनास सांगतात अर्जुना 'कर्म, ज्ञान, भक्ति या तिहींची रहस्यें तुला सांगितली तात्पर्य हे आहे की सृष्टीचा चालक ईश्वर असून भूतें निमित्तमात्र आहेत अहंकार सोडून, व ईश्वरी चित्त ठेऊन भागा आलेली कर्मे सांग व फलाशा सोडून करावीत एवढेंच जीवाकडे राहतें. मग तू क्षात्रधर्माप्रमाणे वागण्यास तयार आहेस ना ?

पूर्वेकडे वाहणाऱ्या गंगेच्या ओघात सापडलेल्या जीवानें पश्चिमेकडे पोहत जाण्याचा हट्ट धरणे व्यर्थ आहे, त्याचा तो आग्रह टिकायचा नाही त्याला ओघ खेचून नेईलच नेईल मी साळीपणानें उगवणार नाही असा साळीच्या कणाचा आग्रह चालेल काय ? नाही चालणार तसा तू क्षत्रियाच्या कुळात जन्मला असून शौर्य, तेज, दक्षता इ. क्षात्रगुणाचा बनलेला आहेस, तू आता युद्ध करणार नाही म्हणतोस पण तुझें क्षत्रियत्व तुला गप्प बसू देणार नाही तुझी प्रकृति क्षत्रियाची, संस्कार क्षत्रियाचे, आजवर वेळोवेळी तुझ्या क्षात्रतेजानें प्रतिकूल परिस्थितीतही उचल खाल्ली नाही काय ? सांग, सांग-विराट देशाचा राजा उत्तर लढाईतून पळून जात असताना, तुम्ही पांडव अज्ञातवासात असून पुढें होऊन शत्रूवर का चालून गेलात ' 'हा क्षात्रस्वभाव तुझा। झुंजवील तूतें' ' रोग्याला काय रोग आवडतो ? दरिद्र्याला दारिद्र्य आवडते ? पण अदृष्ट बलवत्तर आहे ते भोगविल्याशिवाय राहत नाही ते अदृष्ट ईश्वराधीन असल्यामुळे वेगळे काही करणार नाही व ईश्वर तुझ्या हृदयात आहे सर्व भूताच्या हृदयाकाशात चैतन्य-वृत्तीच्या सहस्र किरणांनी तो उगवला आहे सर्वभूताच्या हृदयी स्फुरणारा सम-ष्टिरूप अहंकार पांघरून व आपल्या मायेचा पडदा पुढे लावून तो एकाकी समर्थ असा ईश्वर ८४ लक्ष योनीरूप छायाचित्रें नाचवीत असतो, ब्रह्मदेवापासून कीटका-

पर्यंत सर्वांना त्याची त्याची योग्यता पाहून ते ते देहाकार देत असतो जो देहाकार ज्या प्राण्यापुढे त्याच्या कर्मानुरूप उभा राहतो त्या देहाकारावर तो प्राणी ' हा देहच मी' अशा अभिमानाने आरूढ होतो आपल्या प्रतिबिंबाला ' मीच तें' अशा भ्रमाने अजजीव पाहतो तसे देहालाच मी म्हणून हा म्हणतो देहाकाररूपी यंत्रावर चढवून ईश्वर प्रारब्धकर्मांचे सूत्र हालवीत असतो तेव्हा ज्या प्राण्याला जे स्वतंत्र प्रारब्धकर्मरूप सूत्र माउन ठेवले असते त्या गतीला तो पात्र होत असतो. लोहचुंबकाच्या योगाने लोखंडाचे खिळे अगर सुया फिरू लागतात त्याप्रमाणे ईश्वरसत्तेच्या योगाने प्राणी आपापले व्यापार करितात बीजरूप बनलेल्या प्रकृतीच्या अनुरोधाने एकटा ईश्वर अनेक भूतांना चेष्टवितो, आणि तो तुझ्या हृदयात आहे अर्जुनपण सोडून ' मी ' असें जे तुझ्या हृदयात स्फुरण आहे तेच ईश्वराचें रूप होय तो प्रकृतीला प्रवृत्त करील व ती तुला युद्ध करायला लावील, म्हणून करणे आणि न करणे दोन्ही प्रकृतीच्या माथी मारून ती प्रकृतिही ज्याच्या स्वाधीन आहे त्या ईश्वराला ( गंगा सागराला मिळते तसी ) अहंकार, वाचा, चित्त व देह ही सर्व अर्पण कर. मग त्याच्या प्रसादाने सर्वांचा जिच्यात लय होतो अशा शांतिरूप स्त्रीचा स्वामी होऊन तू स्वानंदाने स्वस्वरूपी रमशील

**१० विश्वरूपदर्शनाची उत्कंठा** –अर्जुनाला देवाच्या व्यापकस्वरूपदर्शनाची उत्सुकता वाटून तो ह्मणाला ' देवा ' हे विश्व ज्याच्या संकल्पानें होते व ज्याला तू आपलें निजरूप किंवा परधाम ह्मणतोस, जेथून ही द्विभुज चतुर्भुज रूपे घेऊन येतोस, ज्याला उपनिषद् गातात, जे योगी हृदयात पाहतात, ज्याला सनकादिक बिलगून आहेत, ते तुझें अगाध विश्वरूप–जे मी कानांनी मात्र ऐकून आहे तें पाहण्यासाठी माझे चित्त उतावीळ झालें आहे '

**११ विश्वरूपदर्शनः**–मग देवाने अर्जुनाला दिव्यचक्षु दिला, त्याने ज्ञानदृष्टी पसरून त्याने देवाचें संपूर्ण ऐश्वर्य पाहिलें अवतार ज्या महासमुद्रावरचे केवळ तरंग आहेत, ज्याच्या कडवशामुळे हें विश्व मृगजळ दिसते, ज्या अनादिभूमिकेवर हें चराचर चित्र उमटलें आहे, तें आपले निजरूप देवानें पार्थाला दाखविलें. सूर्यप्रकाशामुळें तारागण लोपून जाते, तशी ही विश्वरचना लुप्त झाली. मन, बुद्धि, इंद्रियें सर्व माघारली पुढचे चतुर्भुजच नानारूप झाले ' त्या विश्वरूपात त्यानें नानाविध वदनें, हात, पाय, डोळे पाहिले 'आपण हात आपण हतियार । आपण जीव आपण शरीर ' असें पाहिले. अर्जुनाचें पाहणें आणि न पाहणें दोनी

हरपले. बारा सूर्याएवढें ते देवाचे दिव्यलावण्य विश्वतोमुख पाहिले तेव्हा आपण विश्वासगट आटून गेला देहावर अष्टसात्विकभाव उभे राहिले, त्याचा ब्रह्मानंदाचें राज्य मिळाले. "देवा ! नानाभूती मी तुझा विस्तार पाहिला. तुझ्या वदनात अनत ब्रह्माडे साठविली आहेत तू उभा ना बैठा, उच ना खुजटा—या तुझ्या रूपात आदिमध्यअत तिन्ही नाहीत. विश्वाची तू साठवण आहेस दशदिशा, सप्तलोक, चवदाभुवनें सर्व तूच आहेस. देव तुझीच स्तुति करीत आहेत. अनत वदनें, अनत नेत्र, अनत हस्त, अनत भुज व अनत शस्त्रे, अनत चरण, सर्व तूच आहेस. ' भुललो मी दिशा न देखे । आपणपे नेणें ' ही सैंव सैन्ये तुझ्या तोंडात गडप झाली —

वेगी प्रसन्न होई देवराया । सहरी सहरी आपुली माया ।
काढी माते महाभया—। पासूनिया ॥ ११–३८५ ॥

" अर्जुना ! अरे ! कोणी कोणाला मारीत नाही मीच कालरूप होऊन सर्वांचा सहार करितो " ज्ञानोबा म्हणतात —

मी मारिता हे मरते । ऐसेनि वेटाळिला होता मोहे बहुते ।
तो फेडावयालागी अनते । हे दाखविले निज ॥ ११–४०८ ॥

१२ **विश्वरूपस्तुति**—विश्वरूप पाहता पाहता अर्जुनाने देवाची स्तुति केली व त्या सर्वात्मकाला सर्वत्र नमन केले.

१३ **अपराधक्षमापनः**—आपल्या अपराधाची क्षमा मागितली ही दोन्ही प्रकरणें गोड व सुलभ आहेत.

१४ **चतुर्भुज पाहिजे !**—विश्वरूप पाहून अर्जुन हृष्ट झालाच, पण मनुष्यस्वभावाला सहज अशी रोजची बोलतीचालती सगुणमुर्ति पाहण्याची त्याला परत उत्कठा लागली देवाच्या इतक्या तोंडाशी कसे बोलावे, इतक्या शरीराना कसे आलिंगावे ? वाऱ्याबरोबर धावता येत नाही, गगनाला आलिंगन देता येत नाही, समुद्रात जलक्रीडा होत नाही चराचर विनोदाने पहावे, पण सुखाने राहता येते आपल्या घरीच ' ' देवा ! चतुर्भुज रूप तुझे । तो विसावा आह्मा ' योगायोग, दानपुण्य, भजनपूजन या सर्वांचे फळ तुझें सगुण चतुर्भुज रूप. विश्वरूपाचे सोहळे पाहून डोळे निवाले पण आता कृष्णमूर्तीसाठी हे उतावीळ झाले आहेत.

आह्मा भोगमोक्षाचिया ठायी । श्रीमूर्तीवाचूनि नाही ।

तसाचि साकार होई । हे उपसहरी आता ॥ ११–६०८ ॥

**१५ विश्वरूपी चित्त ठेव** –देव म्हणतात, ' तुझ्या धसाळपणाला व हेकटपणाला काय म्हणावे ' अरे ' विश्वरूपदर्शनाचा महल्लाभ झाल्यावरही तुला पुन्हा सगुणाची भूक आहे ' कृष्णादि अवतारांची ही मूळ खाण आहे हे सकलाद्य आहे. ' आग सोडून छाया आलिंगितोस ' तुला काय म्हणावें ? हे व्यापक निर्गुणस्वरूप चित्तात स्थिर ठेव पक्षिणी घरट्यातल्या पिलाजवळ जीव ठेवून जशी अतराळात सचार करिते, किंवा गाय चित्त घरी वत्साजवळ ठेवून डोंगरी चरायला जाते, तसें चित्त या निर्गुणाच्या ठिकाणी वतनदार करून ठेव आणि बाह्यसुखापुरतें सगुणसगतीचे सुख भोग ' विश्वरूपाचें तेज चतुर्भुज कृष्णमूर्तीत सामावलें पहिल्यासारखें भगवान् चतुर्भुज झालें ' ते पाहताच अर्जुनाला आनद झाला. त्याने विश्वरूप व कृष्णमूर्ति या दोन्हींचा चित्तात विचार केला आणि विश्वरूपाहून कृष्णमूर्तीतच अधिक लाभ आहे असा निश्चय केला

येथें एक **रहस्य** आहे श्रीकृष्ण अर्जुनाला निर्गुणस्वरूपाकडे ओढतात तरी अर्जुन कृष्णाच्या सगुणरूपावरच लुब्ध आहे. कृष्ण गुरु व अर्जुन शिष्य हे लक्षात आणता दोघाचेही झगणे यथार्थ आहे गुरूला निर्गुणब्रह्मश्रेष्ठ वाटावें व शिष्याला श्रीगुरुमूर्तीपरते ब्रह्मच न दिसावें हें दोघाचे समुचित आहे. **निर्गुणाचें ज्ञानविज्ञान होऊनही गुरूच्या सगुणमूर्तीपरतें त्रैलोक्यात कांही श्रेष्ठ न दिसावें यांत शिष्याची कृतार्थता आहे, व आपल्या सगुणाच्या मोहांतून शिष्याला सोडवून त्याला निर्गुणपदी स्थिर करावें यात गुरूची पूर्णता आहे** आता विश्वरूप आणि चतुर्भुज, अव्यक्त आणि व्यक्त, निर्गुण आणि सगुण, याबद्दलचा निश्चय पुढील २।३ प्रकरणात दिसेल.

**१६ अव्यक्तोपासना मोक्षदायक पण कष्टप्रद आहेः—**
सोहभावाच्या जपाने जे निराकाराला झोंबतात व त्यासाठी योगाभ्यासबलानें मनबुद्धिइंद्रियातीत निर्गुणी स्थिर होऊ पाहतात त्याना ' अधिक काहीं मिळे–ऐसें नाही । कष्टचि तया '' सोहसिद्धीचा मार्ग बिकट आहे. रिद्धिसिद्धीची द्वंद्वें व कामक्रोधाचे उपद्रव त्याच्या मागें हात धुवून लागतात शीत वेढावे, उष्ण पाघुरावे, ताहानें ताहानाचि पियावी, भुकेलिया भूकचि खावी–असा हा नित्यनवा अग्निप्रवेश आहे योगमार्गानें निघनात ' त्याच्या दु:खाचाचि वाटा । भागा आला ! ' दात पडलेल्या मनुष्यानें लोखडाचे चणे खाल्ले तर त्याचें पोट

भरेल का दात पडतील ? बाहूनी समुद्र तरण्याचा किंवा पायी आकाशात चालून जाण्याचा प्रयत्न करणारे ' क्लेशा पात्र होती ' –

म्हणोनि येर ते पार्था । नेणतीचि हें व्यथा ।
जे का भक्तिपथा । वोठगले ॥ १२–७५ ॥

**१७ प्रेमळ सगुणभक्त हेच खरे योगी**:—वर्षाकाळी नदीचे पाणी चढत असते त्याप्रमाणे ज्याची भजनी श्रद्धा वाढत असते, समुद्राला पोचल्यावरही गंगेला मागूनही जलाचे लोट येऊन मिळत असतात त्याप्रमाणे सर्वेंद्रियासह जे मजमध्ये चित्त ठेवून अहोरात्र माझी उपासना करितात, व याप्रमाणे जे आपलें सर्वस्व मला वाहतात ' तेचि मी योगयुक्त । परम मानी '

**१८ सगुण निर्गुण दोनी एक**:—हा सिद्धात ज्ञानेश्वरीत जागोजाग कसा माडला आहे हे या प्रकरणात दाखविलें आहे कष्ट कमी व सुख अपार असा हा सगुणोपासनेचा मार्ग आहे. **अर्जुन** म्हणतोः– व्यक्त आणि अव्यक्त दोन्ही देवाचीच रूपे भक्तीने व्यक्ताला मिळतात, योगानें अव्यक्ताला पावतात व्यक्ताची ( सगुणाची ) उपासना सुलभही आहे. सोन्याच्या लगडीला जो कस तोच एका वालाला, ' म्हणोनी एकदेशीया व्यापका । सरिसा पाड' म्हणोन एकदेशीय व व्यापक दोहोंची योग्यता सारखीच. अमृताच्या सागरात जे सामर्थ्य तेंच चूळभर अमृतात आहे **देव** म्हणतात – जेथून शब्द मागे सरतो, जेथ सकल्प निमतो, विचाराचा मार्ग खुटतो, जें उन्मनींचे लावण्य व तुर्येचे तारुण्य, जें विश्वाचें मूळ व आनदाचें स्थळ, जो नामरूपाचा शेवट असे जे अनाद्यनत परमतत्व–माझे निजस्वरूपः–

ते हे चतुर्भुज कोंभेली । जयाची शोभा रूपासि आली
देखोनि नास्तिकी नोकिली । भक्तवृंदें ॥ ६–३२४ ॥

नास्तिकानी भक्तछल केला म्हणून तेंच निजस्वरूप चतुर्भुजरूपाने व्यक्तीला आलेले होय ' निर्गुण तेंच सगुण यात भेद नाही ब्रह्मत्वालाच सायुज्य ( मोक्ष ) म्हणतात, पण माझी ( श्रीकृष्णाची, सगुणाची ) भक्ति ही ब्रह्मत्वाला पोंचविणारी पायरी आहे म्हणून मी ( सगुण ) साधन व ब्रह्मत्व साध्य असे मानू नकोस का की ' ब्रह्मज्ञान नसे । मीवाचूनी ' म्ह० माझ्यावाचून ब्रह्म दुसरें नाही.

पै मडळ आणि चद्रमा । दोनी नव्हती सुवर्मा ।
तैसा मज आणि ब्रह्मा । भेद नाही ॥ १४–४०६ ॥

भगवानाचे अमूर्तपण न मोडता ' तो मूर्तीचेनि मेळे । अमूर्तोचि होऊनि खेळे ' ( ५-८१ ) **ज्ञानोबाराय** ४ थ्या अध्यायात ( ११ ते १५ ) अर्जुनाच्या भाग्याचे कौतुक करिताना म्हणतातः—या जगदीश्वराचें याच्या ठिकाणी केवढे प्रेम आहे ' तो हा निजस्वरूप । अनादि निष्कप, ' 'हा त्रैलोक्यपटाची घडी व आकाराची पैलथडी,' असा निराकार निर्गुण परमात्मा—' जयाचिया प्रीती । अमूर्त हा आला व्यक्ती । ' तात्पर्य अव्यक्त तेच व्यक्त, निर्गुण तेच सगुण. सगुण निर्गुण एक परमात्मा, भिन्न नाहीत, हा सिद्धात खरा आहे पण तोच निर्गुण परमात्मा भक्तप्रेमवश होऊन सगुणसाकार होतो तेव्हाच्या त्याच्या भजनाची गोडी अनिर्वाच्य आहे

**१९ अवताराचे प्रयोजन.**—माझा अवतारच मुळी भक्ताच्या उद्धारासाठी, साधूच्या रक्षणासाठी-दुष्टाच्या नाशासाठी व धर्मपरित्राणासाठी मी वेळोवेळी अवतार घेतो असे भगवान् सागतात मी अमूर्त आहे, अज आहे, अव्यक्त आहे, पण प्रकृतीच्या आश्रयाने मी मूर्त होतो अधर्माचे प्राबल्य झाले ह्मणजे ' आपुल्याचेनि कैवारे । मी साकार होऊनि अवतरे ' दुष्टाना शासन करून मी सज्जनाकरवी सुखाची गुढी उभवतो, पातकाचा नाश करून धर्म व नीति याचे लग्न लावतो तेणे करून ' स्वसुखे विश्व कोंदे । धर्मचि जगी नादे ' पण अवताराचेंही वर्म सागतों ते साधुमुखाने समजून उमज

माझे अजत्वे जन्मणे । अक्रियताचि कर्म करणे ।
हे अविकार जो जाणे । तोचि परममुक्त ॥ ४—५८ ॥

भाव तसा देव भावाप्रमाणे फळ मिळते ' जे जैसे माझ्या ठायी भजती, मीही तया तैसाचि भजे ' हे विसरू नकोस डोगराच्या कड्याखाली प्रतिध्वनि निघतो तो आपुल्याच बोलाचा असतो तुमच्या भजनाला मी केवळ साक्षिभूत आहे, ' येथ प्रतिफळे भावना । आपुलाली ' म्हणून माझ्याठायी विमलभाव ठेव व माझे सगुणनिर्गुणरूप जाण.

सगुणाचे प्रेम व निर्गुणाचा बोध दोन्ही भक्ताच्याठायी एकरूप असतात. **ज्ञान व भक्ति एकरूप अनुभवणें हें साराचेंही सार आहे.**

**२० नामघोषगौरवें धवळलें विश्व**—नामसकीर्तनभक्तीचें सुख अपार आहे. कीर्तनप्रसगी नाचण्याबागडण्यानें चित्ताचे अन्य व्यवसाय सुटून पापाचे नावही राहत नाही यमदमादि व तीर्थयात्रादि यापासून होणारे लाभ तर

कीर्तनानें होतातच, पण ‘ विश्वाची दुःखें ’ नाहीशीं होतात व ‘ अवघे जगाचें महासुखे । दुमदुमित भरले ’ असा अनुभव येतो. कीर्तनभक्ति ही ‘ योगेवीण दावीत कैवल्य उोळा ’ इ० योगाच्या खटाटोपात न पडता कीर्तनरंगीच ब्रह्म प्रत्यक्ष होते, ब्रह्मसाक्षात्कार होतो. माझ्या भक्ताना चंद्रसूर्यमेघाच्या उपमा अपुऱ्या पडतात. समुदायाच्या उद्धाराचा हा मार्ग असून यात राव व रंक, साना व थोर असा भेद राहत नाही. कीर्तनसुखानें वैकुंठच पृथ्वीवर येते. कीर्तनात ‘ कृष्ण, विष्णु, हरि, गोविंद ’ या नामाचे घोष चालतात व मथून मथून विशद आत्मचर्चा होते. भगवान् म्हणतात मी वेळेला वैकुंठात सापडणार नाही, सूर्यबिंबातही दिसणार नाही, योग्याच्या ध्यानातही आढळणार नाही,

परी तयापासी पांडवा । मी हारपला गिंवसावा ।
जेथ नामघोष बरवा । करिती माझा ॥ ९–२०८ ॥

**२१ नमनभक्ति** —ब्रह्मदेवापासून मशकापर्यंत हे सर्व विश्व भगवत्स्वरूप जाणून लहानमोठे, सजीवनिर्जीव, आपला मोठेपणा किंवा दुसऱ्याची योग्यायोग्यता, इ० भेद विसरून उंचीहून खाली वाहणाऱ्या उदकाप्रमाणें व्यक्तिमात्राला लोटांगण घालणे ही नमनभक्ति होय. फळानी बहरलेल्या वृक्षाची छाया जशी जमीनीपर्यंत लवते त्याप्रमाणे निरहंकार होऊन लीनतेने भूतमात्री नम्र होणे व मजमध्ये मिळून मला भजणे ही नमनभक्ति होय.

**२२ देवाला सर्वस्व हवें, उपचार नकोत.**—डोळ्यात, कानात, मनात, वाणीत—सर्वांगी सर्वाठायी—जे भगवतालाच भजतात, ज्याचा अहंकार, लोभ, काम, प्रेम, सर्व चेष्टा भगवत्पर असतात, ते जिवतपणीच माझ्या स्वरूपी मिळून जातात, मग मरणावसरी दुसऱ्या कोठे जातील ? जे सर्वस्व मला वाहतात ते सायुज्यपदी चढतात'—

अर्जुना माझे ठायीं । आपणपेवीण सौरसु नाही ।
मी उपचारे कवणाही । नाकळे गा ॥ ९–३६७ ॥

**२३ भक्तांची लक्षणें**— बाराव्या अध्यायात ‘ अद्वेष्टा सर्व भूताना ’ येथपासून तो ‘ भक्तास्ते तीव मे प्रिया’ ’ येथपर्यंतच्या ८ श्लोकात भक्तलक्षणे सांगितली असून ह्या अष्टकाला भगवतानीच गीतेंत ‘धर्म्यामृत’ असे गोड नाव दिलें आहे. आधींच तें ‘ अमृत, ’ त्यात ज्ञानोबारायानी आपल्या ‘ सुवर्णचषकातून ’ तें दिल्यामुळें अतिशयच गोड लागतें. ह्या शभर अमृतबिंदुपैकी एक बिंदु

जरी पचविता आला तरी तो अमृतत्व दिल्याशिवाय राहणार नाही. ह्या सर्व परममधुर ओव्यांचा ओघ गंगाप्रवाहाप्रमाणें सहजसुंदर असा असून त्यांत मनासह निमज्जन करणाऱ्या भाविकास स्वोद्धारासाठीं दुसरें तीर्थ पाहायलाच नको ! भक्तलक्षणें भक्ताच्याच तोंडून ऐकण्यात बहार असते, कां की त्यांत तो स्वानुभवच बोलत असतो, मग येथें तर देवभक्तपणाचें उभयविधसुख जाणणारे ज्ञानेश्वर महाराज ती सांगत आहेत, तेव्हां त्यांची गोडी अनिर्वचनीय आहे हें सांगायलाच नको. ही वाचकांनीं मुळातूनच पाहून जिव्हाग्रीं नाचवावींत म्हणजे त्यांचा अमृतरस त्यांच्या हृदयांत उतरेल. अंतरंगभक्ताला ती डोलवतील, साधकाला पथदर्शक होतील व रसिकाला उज्ज्वल व उन्नत उपमादृष्टांतांनीं रमवितील. नेहमींचेच दृष्टांत--चैतन्य, वसुधा, सूर्य, समुद्र, आकाश, विहंगम, प्राण, दीप, इक्षुदंड, मेरु, चंडिका, उदक, इ०—या दृष्टांतांनीं व यथोचित व सहजमनोहर शब्दांनीं ज्ञानेश्वरांनीं भक्ताच्या अंतरंगाचें दिव्य चित्र उभें केलें आहे. ही काय द्राक्षांची बाग आहे की कमलवन आहे की तारागण आहे की हिऱ्यांची खाण आहे ? याला उपमा तरी कसली द्यावी ? ज्ञानेश्वरांच्या मुखांतून टपटप गळलेले हे सुधाबिंदु चातक होऊन सगळेच्या सगळे गिळावेत आणि कृतार्थ होऊन जावें. भक्तलक्षणरूपी भक्तिमार्गाचा इतका उज्वल वाटा साधकांना अन्यत्र कोठें मिळेल ?

**२४ देवाचें भक्तप्रेम** —अशा भक्ताला मी डोक्यावर घेऊन नाचतो. त्याच्यासाठीं अचक्षूला मला डोळस व चतुर्भुज व्हावें लागतें !

देव म्हणतात अशा भक्ताचें चरित्र गातात तेही मज प्राणापरोते प्रिय आहेत.

**२५ भक्तांच्या मेळ्यांतलें संवादसुख**:—मच्चित्त व मत्प्राण झालेले भक्त ज्ञानभक्तिभाग्य भोगीत असतांना ' जीवों मरों विसरले । बोधाचिया भुली ' अशा अवस्थेत संवादसुखाच्या आनंदोल्हासांत ते ज्ञानभक्तीचीच देवघेव करितात. जवळची सरोवरें पाण्यानें तुडुंब भरून वाहू लागलीं कीं एकमेकांत मिसळतात व सारें जळमय होतें तसेंच भक्तांच्या मेळ्यांत आनंदकल्लोळ उठून दिवसरात्र हरिप्रेमसुख सारेच पूर्णपणें भोगतात.

जैसी कमळकळिका जालेपणे । हृदयींचिया मकरंदा राखों नेणे ।
दे रायां रंका पारणें । आमोदाचें ॥ १२७ ॥
तैसेंचि मातें विश्वीं कथित । कथिलेनि तोषें कथूं विसरत ।
मग तया विसरामाजीं विरत । आंगें मनें ॥ अ० १०-१२८ ॥

**२६ हे समस्तही श्रीवासुदेवः**--गुरुकृपेची प्रभात होऊन ज्ञानाचें कोवळें ऊन पडलें म्हणजे साम्याचें सकल ऐश्वर्य प्रगट होते व जिकडे पहावें तिकडे देवच–आंतही देव व बाहेरही देव. असा अतर्बाह्य हरिरूप होऊन हरीचे परमसुख भोगणारा तो खरा ज्ञानीभक्त

हे समस्तही श्रीवासुदेव । ऐसा प्रतीतिरसाचा वोतला भाव ।
म्हणोनि भक्तामाजी राव । आणि ज्ञानिया तोचि ॥ ७-१३६ ॥

**२७ ज्ञानभक्ति म्हणजेच अद्वैतभक्तिः**--भोजनसमयी ग्रासोग्रासी क्षुधा जिरत जिरत तृप्ति झाली की, ती नाहीशी होते, किंवा चालताना वाट सरत सरत मुक्कामाच्या जागी पोंचल्यावर चालणे खुटून विश्राति मिळते, किंवा जाग आल्यावर निद्रा सपते, अथवा पूर्णिमेला पूर्णचद्र झाल्यावर चद्राची वाढ खुटून शुक्लपक्ष सपतो, त्याप्रमाणे आत्मज्ञान होऊन हा आत्मस्वरूप झाला की, अज्ञान व ज्ञान दोन्ही मावळतात कल्पातकाळी नदी व समुद्र या दोघाच्या मर्यादा आटून आब्रह्म जसें उदकच उदक होतें किंवा अलकार आटविल्यावर जसे सोनेच सोने-पणाने राहते त्याप्रमाणें जीवत्व व शिवत्व किंवा अज्ञान व ज्ञान दोन्ही नाहीशी होऊन ज्ञप्तिमात्र चैतन्य उरतें–' मी एक वाचूनि कहीं । तया तयाही सकट नाहीं ' यालाच चौथी भक्ति किंवा ज्ञानभक्ति म्हणतात आर्तादि अपेक्षेनें ' चौथी ' म्हणायची,

येऱ्हवी तिजी ना चौथी । हे पहिली ना सरती ।
पै माझिये सहजस्थिती । भक्तिनाम ॥ १८-१११३ ॥
आणि ज्ञानभक्ती सहज । भक्त एकवटला मज ।
तो मीचि केवळ–हें तुज । श्रुतही आहे ॥ ११३० ॥
ज्ञानी इये स्वमावित्ति । शैव म्हणती शक्ति ।
आम्ही परमभक्ति । आपुली म्हणों ॥ १८–११३३ ॥

ज्ञानी तिला आत्मज्ञान म्हणतात, आम्ही तिलाच ज्ञानभक्ति किंवा परा-भक्ती म्हणतो. ' भक्त एकवटला मज ' या सहजस्थितीला भक्ति म्हणतात. भक्तीत विवेक, वैराग्य, बधमोक्ष, प्रवृत्ति, निवृत्ति, सर्व भेद लयाला जातात. ज्याला मी होणें बाकी राहिलें नाही त्याला क्रियेने मला भजणे उरलें नाही हे उघड आहे. ' तरग सर्वांगी तोय चुबी प्रभा सर्वत्र विलसे बिंबी ' याप्रमाणें

'रूप होऊनि माझें । मातें क्रियावीण भजे' तो ज्ञानीभक्त होय. चंदन व द्रुती, चंद्र व चंद्रिका एकमय असतात --

तैसी क्रिया कीर न साहे । तऱ्ही अद्वैती भक्ति आहे ।
हें अनुभवाचिजोगें, नव्हे । बोलाऐसें ॥ १८-११५१ ॥

'मी वाचूनि नाही विश्वीं इये'.--

ऐसिया व्यापका मातें । मानूनि जे भजती भलतेथें ।
परि साचोकारें उदितें । प्रेमभावें ॥ ११५ ॥
ऐसेनि जे निजज्ञानी । खेळत सुखें त्रिभुवनी ।
जगद्रूपा मनी । साठवूनि मातें ॥ ११७ ॥
जें जें भेटे भूत । तें तें मानिजे भगवंत ।
हा भक्तियोग निश्चित । जाण माझा ॥ १०-११८ ॥

ज्ञानेश्वरीत हा ज्ञानभक्तियोग सांगितला आहे व हाच नामदेवादि सकल मताच्या अभंगातही सुव्यक्त आहे '**ज्ञानभक्ति**,' '**अद्वैतभक्ति**,' '**पराभक्ति**,' अशी या भक्तीला ज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरींत नांवें दिली आहेत व पुढें नाथांनी हिलाच '**मुक्तीवरील भक्ति**' म्हटलें आहे, व तुकोबांनी 'मुक्तीवरील भक्ति जाण । अखंड मुखीं नारायण' या चरणात नाथांचाच शब्दप्रयोग उचलला आहे **गीता ज्ञानभक्तिप्रधान आहे, असा ज्ञानेश्वरमहाराजांचा सिद्धांत ज्ञानेश्वरीभर पसरला आहे.**

**२८ ज्ञानीभक्तः**--ज्ञानीभक्त हा परमात्म्यासारखाच 'अनिर्वचनीय' आहे, तथापि ओळखीसाठीं त्याची काही लक्षणें सांगतात ज्ञानभक्ति क्रियारहित आहे असें वर सांगितलें, आता त्याच्या सहजावस्थेचें वर्णन करितात त्याचें देवदर्शन कसें असतें? 'रवि अंधाराला प्रकाशूं लागला तर प्रकाश्य जो अंधार तो तर उरतच नाहीं, पण अंधकारसापेक्ष असें जें रवीचें प्रकाशकत्व तेंही उरत नाहीं, त्याप्रमाणें दृश्यद्रष्टृत्वातीत व ज्ञानाज्ञानातीत अशा अवस्थेचा भोग हेंच त्याचें दर्शन होय' मी झाल्यामुळे त्याचें येणेंजाणे खुटलें हीच त्याची यात्रा. तरंग कितीही धावले तरी ते जळ सोडून जात नाहीत त्याप्रमाणें त्याची कर्मत्रिपुटी मावळल्यामुळें त्याच्या सर्व क्रिया हेंच त्याचें पूजन.

एवं तो बोलें ते स्तवन । तो देखे ते दर्शन ।
अद्वया मज गमन । तो चाले तेंचि ॥ ११८० ॥

तो करी तेतुली पूजा । तो कल्पी तो जप माझा ।
तो निजे तेचि कपिध्वजा । समाधि माझी ॥ १८–११८१ ॥

कनक–काकण, कापूरपरिमळ, रत्न–प्रभा, ततु–पट, मृत्तिका–घट याप्रमाणे ज्ञानीभक्त मजसी अनन्य असतो तिन्ही अवस्थातून क्षेत्रक्षेत्रज्ञरूपाने जे भावाभाव दृश्य आहे ते सर्व मीच द्रष्टा ( दृश्यद्रष्टृभेदशून्य ) अशा बोधाच्या आनदभरात तो असतो. रज्जुदर्शनानतर सर्पाभास जातो व रज्जु रज्जुपणानेच असतो तसा आहे नाही हे दृश्य द्रष्टृरूपाने तो पाहतो किंवा तोच होऊन जातो मी अज, अव्यय, अक्षर, अपार एकीएक ब्रह्म आहे, या अनुभवावर आरूढ होतो, ईश्य ( नियम्य सृष्टि ) व ईश्वर (नियामक) एक मीच आहे आणि हेही जाणता मीच '

मी तो हे जे असे । ते स्वानुभवसमरसे ।
कालवूनिया प्रवेशे । मजचिमाजी ॥ १२०९ ॥

आणि ' तो ' हे भाष जेथ जाये । तेथ ' मी ' हे कोण्हासी आहे ' ।
ऐसा ' मी ' ना ' तो '–सामाये । माझ्याच रूपी ॥ १८–१२१० ॥

**२९ अनन्यांचा योगक्षेम** –जे सर्व भावाने सर्वतोपरी मला शरण येतात, ज्याचे जिणेच मत्पर असते, जे अनन्यभक्तीने मला उपासितात, ' तयाते मीचि सेवी. ' मच्चिंतनपराची चिंता मीच वाहतो पिलाचे सगोपन पक्षिणी करिते किंवा तान्हुल्याच्या तहानभुकेची काळजी माउलीला, ' तैसे जे अनुसरले मज प्राणे । तयाचे सर्व मी करी ' ' त्याना मोक्ष पाहिजे असेल तर तो देतो, माझ्या सेवेची आवड असेल तर प्रेम देतो, तात्पर्य जो जो भाव धरितील तो तो मी पुरवितो, ' आणि दिधलियाचा निर्वाहो ( रक्षण ) मीचि करी ' याप्रमाणे त्याचा योगक्षेम मीच वाहतो

**३० अनन्यभक्ताच्या उद्धाराची सर्व काळजी देवाला** —वर्णविशेषाने भागाला आलेली सर्व कर्मे निष्कामबुद्धीने करीत असताना ज्याचे कायिक, वाचिक व मानसिक भाव भगवत्पर असतात, भोगमोक्षाविषयी जो उदास राहून माझी उपासना करितात, त्याचा सर्व भार मी शिरावर घेतो. माझ्या भक्ताना ससाराची चिंता वहावी लागत नाही. प्रपचाला सर्वजीव भितात, पण माझ्या भक्तानी भिऊ नये यासाठी मी मूर्त होऊन त्याचे रक्षण करितो. माझी सहस्रनामे ही त्याच्यासाठी उभारलेली तारवे आहेत. सडे जे आहेत त्याना ध्यानाच्या कासेला लावतो व परिवार असलेल्या ससारिकाना नामाच्या नौकेवर

घालून उद्धरून नेतों—मी त्याना प्रेमाची पेटी देऊन सायुज्याच्या तटावर आणतों.

म्हणोनि गा पार्था । नाही एकही चिंता ।
तयाते समुद्धर्ता । आथी मी सदा ॥ १२–९४ ॥

**३१ संपूर्ण प्रसाद**—यासाठी आपल्या सर्वकर्माचा सन्यास माझ्या ठिकाणी करून मोकळा हो नित्यनैमित्तिककर्माचा मात्र त्याग करू नकोस चित्तवृत्ति आत्मविचार करून तेथे स्थीर ठेव मग आत्मविवेकबळाने तू आपल्याला सर्व कर्माहून निराळा अशा माझ्या विमलस्वरूपी पाहशील येणेकरून बुद्धि अनन्य होऊन मजमध्ये प्रवेशेल व चित्त विषय सोडून मलाच भजेल. या अभेदसेवेत चित्त मदाकार होईल तेव्हा माझा प्रसाद संपूर्ण झाला असे जाण

**३२ ईश्वरशरणता–शेवटचा गोड घांसः**—भगवताच्याच वचनाप्रमाणे 'मन्मना भव' व 'सर्वधर्मान् परित्यज्य' ह्या श्लोकाचें रहस्य 'सर्वगुह्यतम' आहे हे रहस्यातले रहस्य त्यानी वरील दोन श्लोकात सांगितले आहे. 'इष्ट आणि सखा' अशा अर्जुनाच्या तोंडात देवानी हा शेवटचा गोड घास घातला आहे ज्ञानोबारायाचे यावरील भाष्यही केवळ अनुपम आहे अर्जुना ' अवधान पघळ (विशाळ) करून हे ऐक द्वैताची येरझार नाहीशी करून ऐक्याच्या घरात हे परमगुह्य भोगायचे आहे प्रियोत्तमा अर्जुना ' निरुपचार प्रेमाचा जो विषय तो दुसरा कोणी नसून आत्माच होय, म्हणून माझ्या जिव्हारींची गोष्ट माझ्या जीवाला ( तुला ) मी सांगत आहे अनन्यभक्ताचे मला वेड आहे अर्जुना ' तू आपल्या अतर्बाह्य सर्व व्यापाराचा मला म्ह० माझ्या व्यापक स्वरूपाला एकच विषय कर तू आपले मन माझे एकायतन कर व कान माझ्या गुणश्रवणाने भरून घे आत्मज्ञानाने पावन झालेले सत ही माझीच रूपे आहेत व सताकडे—कामुकाची सुदरीवर असते तशी—एकातिक प्रेमाची दृष्टि ठेव सर्व जगाचे निवासस्थान जो मी त्या माझी मधुरनामे गायचे वाचेला व्यसन लाव हस्तपादादि इद्रियाची कामे माझ्यासाठीच होऊ दे आपल्या ठिकाणी सेवकपण तेवढे ठेवून सर्वजग मद्रूप पहा, मग मत्स्वरूपाने भरलेल्या जगात तिसऱ्याची गोष्ट न राहता तुझामाझा पुरा एकात होईल, मग प्रतिबधक अशी जगत्कल्पना जाऊन तू म्हणजे मीच आहेस असे जाणून तू मला पावशील तू आणि मी हे द्वैत देहोपाधिमुळे भासते म्हणून देहाचा निरास झाल्यावर तू मत्स्वरूपच होशील तुझ्या प्रेमवशतेने मी देवपणाची बिरुदे साडली असून मी अर्धा म्ह० जवळजबळ जीव झालो आहे व

तुझ्यासगट मात्र परिपूर्ण आहे. वस्तुमात्राच्या ठिकाणी मला भजले असता व सर्व मत्स्वरूप होता देहाहता नि शेष जाऊन मग तू खरोखर मीच होशील. तुझी सर्व कायिक, वाचिक, मानसिक कर्मे मदर्पण झाली की तुला सर्वत्र माझी प्रसन्नता मिळेल आणि माझा प्रसाद झाला म्हणजे माझ्या विषयींचें तुझे ज्ञान सिद्धीला जाईल व त्यायोगे तू खरोखर मत्स्वरूपी मिळशील. ज्या ज्ञानाच्या योगाने सप्रपच अज्ञान जाऊन जो मी एकीएक तो गोचर होतो—तें गीतारूप ज्ञान विविध-उपपत्तीच्या उपायानी मी तुला सागितलें या ज्ञानाच्या योगानें धर्माधर्माच्या कल्पनाना प्रसविणारे मळ अज्ञान टाकून दे. आशा जशी दु.खाना प्रसवते, किंवा निंदा जशी पापाला प्रसवते, अथवा दुर्भाग्य दैन्याला प्रसवते, त्याप्रमाणे स्वर्ग-नरकादि कल्पनाना प्रसविणारे जे धर्माधर्मादिक त्या धर्माधर्मांचे मळ जे अज्ञान तें ह्या ज्ञानाने नाहीसें करून टाक. हाती दोर घेऊन त्या दोरावर भासलेली जशी सर्पकल्पना टाकून द्यावी किंवा निद्रात्यागानें स्वप्नीचा प्रपच टाकून द्यावा, त्या-प्रमाणें मिथ्या धर्माधर्मांचे बड उभे करणारे जें मूळ अज्ञान त्या अज्ञानाचा त्याग करून धर्मजात (धर्माधर्म) सोडून दे मग निद्रेसगट स्वप्न गेले असता जसे आपले आपणच उरतो, त्याप्रमाणें मूळ अज्ञान गेल्यावर ‘ मीच एक असे अपैसया ’

तैसा मी एकवाचून काही । मग भिन्नाभिन्न आन नाही ।
सोहबोधें तयाच्या ठायी । अनन्य होय ॥ १८–१३९७ ॥
पै आपुलेनि भेदेंवीण । माझें जाणणे जें एकपण ।
तयाचि नाव शरण । मज येणे गा ॥ १८–१३९८ ॥
सुवर्णमणि सोनया । ये कल्लोळ जेसा पाणिया ।
तैसा मज धनजया । शरण ये तू ॥ १८–१४०० ॥

मज एकावांचून दुसरे काहीच नाही अशा माझ्या ‘ एकजिनसी ’ स्वरूपी सोह-भावानें अनन्य हो. आपल्याला माझ्याहून भिन्न न पाहता जें माझें एकपण जाणणें त्यालाच शरण येणे म्हणतात. सुवर्णमणि सोन्याला किंवा तरग पाण्याला शरण येतो म्ह० ऐक्याला पावतो तसा तू मला शरण ये म्ह० मजशी समरस हो. मला शरण यायचे आणि पुन्हा वेगळेपणानें रहायचे ह्या भेदाची बुद्धीला लाजच वाटली पाहिजे. एखादा सामान्य राजाही जिचा अगीकार करितो असी बटकूर सुद्धा राजाची साम्यता पावते म्ह० समसत्ताक होते, मग विश्वनाथ जो मी तो भेटल्यावर जीवग्रथि सुटत नाही असे अमगळ शब्द सुद्धा तोंडावाटे काढू नकोस.

म्हणून मी होऊन माझी सेवाभक्ति करणें ( शिवो भूत्वा शिव यजेत् ) ही सहज-भक्ति या ज्ञानाने हस्तगत होईल तें कर. मग ताकातून काढलेले लोणी पुन्हा ताकात घातले तरी लोणी ताकात मिसळत नाही. त्याप्रमाणें अभेदभावानें मला शरण आल्यावर धर्माधर्म हे राहणारच नाहीत. सर्व बधरूप द्वैतपणाचें पाप मग उरणार नाही मिठाचा खडा पाण्यात पडताच विरून जातो म्ह० वेगळेपणाने न राहता जळरूप होतो, तसा मला अनन्यशरण होणाऱ्या तुला सर्व मीच होईन.

* * * *

हें सर्व सौंदर्याचें सौंदर्य, सर्व डोळ्याचा डोळा, असे सर्वदेशनिवासी भगवान् श्रीकृष्ण बोलले. त्या श्यामसुदर श्रीकृष्णानें आपला ककणयुक्त उजवा बाहू पसरून अनन्यशरण अशा भक्तराज अर्जुनाला आलिंगन दिलें. ( गीतेंत वाचेने बोलता येण्याजोगे होतें ते देव बोलले व भक्ताच्या बुद्धीला आकळिता आलें ते त्याने आकळले पण ) बोलाबुद्धीला अगम्य असें जे काहीएक उरले होते ते देण्यासाठी भगवतांनी आलिंगनाचे मिष केले ' हृदयाला हृदय मिळालें, देवानें आपल्या हृदयातले ( ऐक्यप्रेम ) अर्जुनाच्या हृदयात घातलें, द्वैत न मोडता ( देवभक्त हें नातें कायम ठेवून, अर्जुनाचें अर्जुनपण कायम ठेवून) देवानें त्याला आपल्यासारखे केलें. दिव्याने दिवा लावावा तशा प्रकारची ती मिठी होती. अर्जुनपण ठेवून देवाने आपल्या स्वरूपी अर्जुनाला मिळवून घेतलें, तेव्हा अर्जुनाला जो महासुखाचा पूर आला त्यात एवढे मोठे देव तेही बुडून गेले ' त्या दोघाचें अनन्यप्रेम दोघानाही आवरेना, पण हेंही कोणी जाणावे ? नारायणस्वरूपाने हे ब्रह्माड भरून गेले '

## तात्पर्यः—

एव कायेलियारम्य । जें हें सर्व शास्त्रैकलभ्य ।
उपनिषदा सोरम्य । कमळदळा जेवी ॥ ५७१ ॥
हें शब्दब्रह्माचे मथिते । श्रीव्यासप्रजेचेनि हाते ।
मथूनि काढिलें आइते । सार आम्ही ॥ ५७२ ॥
जे ज्ञानामृताची जान्हवी । जे आनदचद्रीची सतरावी ।
विचारक्षीरार्णवीची नवी । लक्ष्मी जे हे ॥ ५७३ ॥
म्हणोनि जगी गीता । मिया आत्मेनि पतिव्रता ।
जे हे प्रस्तुत तुवा आता । आकर्णिली ॥ ५७६ ॥
सावाचे बोलाचे नव्हे हे शास्त्र । पै ससाराजिणते शस्त्र ।
आत्मा अवतरावेते मत्र । अक्षरें इय ॥ ५७७ ॥
हे गोठी काय गीता । जे हे माझी उन्मेषलता ।
जाणे तो समस्ता । मोहा मुके ॥ ५८३ ॥
सेविली अमृतसरिता । रोग दवडूनि पाडुसुता ।
अमरपण उचिता । देऊनि घाली ॥ ५८४ ॥
तैसी गीता हे जाणितलिया । काय विस्मय मोह जावया ।
परी आत्मज्ञाने आपणपया । मिळिजे येथ ॥ ५८५ ॥

———

त श्रीकृष्णवदनामृत । पार्था भरोनि असे वोसडत ।
मग व्यासकृपापात्र । सजयासी ॥ ५८९ ॥
तेचि मऱ्हाठेनि विन्यासें । मिया उन्मेषें ठसेंठोबसे ।
र्जी जाणे नेणे तेसें । निरोपिले ॥ ५९४ ॥
आता विश्वात्मक माझा । स्वामी श्रीनिवृत्तिराजा ।
तो अवधारू वाक्यपुजा । ज्ञानदेवो म्हणे ॥ ५९९ ॥ ( अ० १५ )



# ज्ञानेश्वरांची प्रभावळ.

## विषयानुक्रमणिका

### १ ज्ञानेश्वरीची भूमिका (पृ. १–५१)



### २ कर्मयोग (५३–११८)

## ३ ज्ञानयोग ( ११९–१७७ )



012

## ४ भक्तियोग ( १७९–२२६ )

## ५ ज्ञानेश्वरीचा उपसंहार ( २२७-२३२ )



## ६ स्फुटविषयसंग्रह २३१-२४७

## ७ ज्ञानेश्वरी सुभाषितें ( २४८–२६१ )



## ८ अमृतानुभव ( २६२–२७० )



---

## ९ संतमंडळाचे अभंग. ( २७१–२९२ ).

# ज्ञानेश्वरांची प्रभावळ.

## १ ज्ञानेश्वरीची भूमिका

### १ ज्ञानेश्वरीचें मंगलाचरण.

#### १ गणेश, शारदा व सद्गुरु.

ॐ नमोजी आद्या । वेदप्रतिपाद्या ।
जय जय स्वसंवेद्या[1] । आत्मरूपा ॥ १ ॥
देवा तूंचि गणेश । सकळार्थमतिप्रकाश ।
ह्मणे निवृत्तिदास । अवधारिजो[2] जी ॥ २ ॥
हे शब्दब्रह्म[3] अशेष । तेचि मूर्ति सुवेष ।
तेथ वर्णवपु[4] निर्दोष । मिरवत असे ॥ ३ ॥
अकार चरणयुगुल । उकार उदर विशाल ।
मकार महामंडल । मस्तकाकारें ॥ १९ ॥
हे तिन्ही एकवटले । तेथ शब्दब्रह्म कवळलें ।
तें मिया श्रीगुरुकृपा नमिलें । आदिबीज[5] ॥ २० ॥
आता अभिनववाग्विलासिनी[6] । जे चातुर्यार्थकलाकामिनी ।

---

१ तूंच आपणास यथार्थ जाणणारा आहेस. ‘ स्वयमेवात्मनात्मानं वेत्थ त्वं पुरुषोत्तम ’ ह्या गीताश्लोकावरील ज्ञानेश्वरीभाष्य पहावें. ‘ आपुलिये सर्वशक्ति । तूंच जाणसी लक्ष्मीपति. ’ २ ऐकावें महाराज. ३ वेद, पवित्र वाङ्मय. ४ अकारापासून क्षकारापर्यंत वर्णरूप शरीर. ५ अ, उ, म, अर्ध मात्रा व बिंदु मिळून प्रणवाचें रूप आहे. ६ शारदा.

ते श्रीशारदा विश्वमोहिनी । नमिली मिया ॥ २१ ॥
मज हृदयीं सद्[१]गुरू । जेणें तारिलों हा संसारपूरू ।
म्हणऊनि विशेषें अत्यादरू । विवेकावरी ॥ २२ ॥
जैसें डोळ्यां अंजन भेटे । ते वेळी दृष्टीसी फाटा फुटे ॥
मग वास पाहिजे तेथ प्रगटे । महानिधी ॥ २३ ॥
का चिंतामणी आलिया हातीं । सदा विजयवृत्ति मनोरथीं ।
तैसा मी पूर्णकाम श्रीनिवृत्ति । ज्ञानदेव म्हणे ॥ २४ ॥
म्हणोनि जाणतेनें गुरु भाजिजे । तेणें कृतकार्य होइजे ।
जैसें मूळें[२]सिंचनें सहजें । शाखापल्लव संतोषती ॥ २५ ॥
का तीर्थें जियें त्रिभुवनी । तिये घडती समुद्रावगाहनीं ।
ना तरी अमृतरसस्वादनी । रस सकळ ॥ २६ ॥
तैसा पुढतपुढती तोचि । मिया अभिवंदिला श्रीगुरुचि ।
अभिलषित मनोरुचि । पुरविता तो ॥ २७ ॥ ( अ. १ )

———

१ श्रीनिवृत्तिनाथ. २ ' यथाहि स्कंधशाखानां तरोर्मूलावसेचनम् ' ( भागवत ८-५-४९ ) तुकोबाही ह्मणतात:– ' सिंचन करितां मूळ । वृक्ष ओलावे सकळ. '

# २ श्रीसद्गुरुस्तवनादि.

## १ गुरुस्वरूप.

जयजय आचार्या । समस्तसुरवर्या ।
प्रज्ञाप्रभातसूर्या[1] । सुखोदया ॥ १ ॥
जयजय सर्वविसांवया । सोहंभावसुहावया[2] ।
नानालोक हेलावया । समुद्रा तू ॥ २ ॥[3]
आइकें गा आर्तबंधू । निरंतर कारुण्यसिंधू ।
विशदविद्यावधू-। वल्लभा[4] जी ॥ ३ ॥
तू जयांप्रती लपसी । तया विश्व हें दाविसी ।
प्रकट तैं करिसी । आघवेंचि तू ॥ ४ ॥[5]
जाणों जगीं आप बोलें । तें तुझिया बोला सुरस जालें ।
तुझेनि क्षमत्व आलें । पृथ्वीयेसीं ॥ ७ ॥
रविचंद्रादिशुक्ती । उदय करिती त्रिजगती ।
ते तुझिया दीप्ती । तेज तेजां ॥ ८ ॥
जे चळवळिजे अनिळें । तें दैविकेनि[6] जी निजबळें ।
नभ तुजमाजीं खेळे । लपिथंपि[7] ॥ ९ ॥
किंबहुना माया अशेष । ज्ञान जी तुझेनि डोळस ।
असो वानणें सायास । श्रुतीसि हे ॥ १० ॥
वेद वानूनि तवचि चांग[8] । जंव न देखे तुझें अंग ।

---

१ बुद्धिरूप उषेचा उदय करणाऱ्या. २ मी ब्रह्म हा भाव शोभविणाऱ्या. ३ चौदा भुवनें हीं समुद्ररूप जो तू त्या तुझ्या लहरी होत. ४ ब्रह्मविद्यावधूच्या प्राणेश्वरा. ५ ज्यांना तू दिसत नाहींस त्याना विश्वाभास दिसतो, व ज्यांना प्रगट आहेस त्याना सर्वच त्वद्रूप दिसतें. ६ श्रीगुरूच्या, आपल्या. ७ लपंडाव. ८ चांगला, शाहणा.

मग आह्मा तया मूगें । एके पांती ! ॥ ११ ॥
जी एकार्णवाचे ठायीं । पाहतां प्रळयमेघाचा पाड नाहीं ।
मा महानदी काई । निवडू येती ? ॥ १२ ॥
आणि दुजया थाँव मोडे । तेथ परेसी वैखरी बुडे ।
तो तू मा कोणें तोडें । वानावासी ? ॥ १४ ॥
यालागी आता । स्तुति साडूनि निवाता ।
चरणी ठेविजे माथा । हेंचि भलें ॥ १५ ॥
तरी तू जैसा आहासि तैसिया । नमोजी श्रीगुरुराया ।
मज ग्रथोद्यम फळावया । वेव्हारा होई ॥ १६ ॥
अगा विश्वैकधामा । तुझा प्रसादचद्रमा ।
करू मज पूर्णिमा । स्फूर्तीची जी ॥ २३ ॥
जी अवलोकिलिया मातें । उन्मेषसागरीं भरतें ।
वोसँडेल स्फूर्तीते । रसवृत्तीचें ॥ २४ ॥ (अ० १४)

## २ गुरुवंदन.

नमो विशदबोधविदग्धा । विद्यारविंदप्रबोधा ।
पराप्रमेयप्रमदा- । विलासियाँ ॥ १ ॥
नमो ससारतमसूर्या । अपरिमित परमवीर्या ।
तरुणतरतूर्या- । लालनलीला ॥ २ ॥
नमो जगदखिलपालना । मगलमणिनिधाना ।
सज्जनवनचदना । आराध्यलिंगा ॥ ३ ॥
हे असो दिठी जयावरी झळके । कीं हा पद्मकर माथा पारुंखे ।

---

१ एकाच पक्तीस बसून मूग खाणें, मौन धरणें २ द्वैतपणाचें बळ. ३ परा-वाणीसह. ४ ग्रथाचा उदीम. ५ भाडवल पुरवणारा, सावकार. ६ ज्ञानाच्या. ७ भरून वाहील. ८ विमल बोध करण्याविषयीं कुशल. ९ विद्यारूप कमलाला विकासविणारा. १० परेच्या अर्थाशीं रमणारा. ११ पडतो, ठेविला जातो.

तो जीवचि परि तुके । महेशेसी[1] ॥ ९ ॥
श्रीगुरूचें महिमान । आकाळितें कें असे साधन ।
हे जाणोनिया नमन । निवात केलें ॥ १३ ॥
जरी प्रज्ञेचेनि आथिलेपणे । श्रीगुरुसामर्थ्या रूप करूं म्हणे ।
तरि तें मोतिया भिंग देणें । तैसें होईल ॥ १४ ॥
का साडेपंधरेयां[3] रजतवणी[4] । तैसी स्तुतीची बोलणीं ।
उगियाची माथा ठेविजे चरणीं । होचि भलें ॥ १५ ॥ (अ-१०)

## ३ गुरुकृपादृष्टि.

जयजय वो शुद्धे । उदारे प्रसिद्धे ।
अनवरत आनंदें । वर्षतिये ॥ १ ॥
विषयव्याळें मिठी । दिधलिया नुठी ताटी ।
ते तुझिये कृपादृष्टी । निर्विष होय ॥ २ ॥
तरि कवणातें ताप पोळी । कैसेनि वो शोक जाळी ।
जरि प्रसादरसकल्लोळीं । पूरे येसी तूं ॥ ३ ॥
योगसुखाचे सोहळे । सेवका तुझेनि स्नेहाळे ।
सोहसिद्धीचे लळे । पाळिसी तूं ॥ ४ ॥
आधारशक्तीचिया[6] अकी । वाढविसी कौतुकी ।
हृदयाकाशपालखी । परियें[7] देसी निजें ॥ ५ ॥
प्रत्यग्ज्योतीची ओवाळणी । करिसी मनपवनाचीं खेळणी ।
आत्मसुखाचीं बाळलेणी । लेवविसी ॥ ६ ॥
सतेरावियेचें स्तन्य देसी । अनाहताचा हल्लरुं गासी ।

---

१ शकरासीं साम्यता पावतो. २ तर तें अभ्रकाचें पूट देऊन मोत्याला पाणी चढवण्यासारखें होईल. ३ उत्तम सोन्याला ४ रुप्याचा मुलामा देणें. ५ मूर्छा–झाज उडत नाहीं. ६ मुलाधार चक्रावर असलेल्या कुंडलिनीच्या मांडीवर. ७ झोके. ८ जीवभाव ओवाळून टाकतेस. ९ सतरावी अमृतकला, व्योमचक्रातील चंद्रामृत १० सोहध्वनीचें मंजुळ गाणें.

समाधिबोधें निजविसी । बुझाउनी ॥ ७ ॥
ह्मणोनि साधका तू माउली । पिके सारस्वत तुझिये पाउलीं ।
याकारणें मी साउली । न संडीं तुझीं ॥ ८ ॥
अहो सद्गुरुचिये कृपादृष्टी । तुझें कारुण्य जयातें अधिष्ठी ।
तो सकल विद्यांचिये सृष्टी । धात्रा होय ॥ ९ ॥
ह्मणोनि अंबे श्रीमते । निजजनकल्पलते ।
आज्ञापीं मातें । ग्रंथनिरूपणीं ॥ १० ॥
नवरसीं भरवी सागर । करवी उचितरत्नाचे आगर ।
भावार्थाचे गिरिवर । निफजवी माये ॥ ११ ॥
साहित्यसोनियाचिया खाणी । उघडवी देशियेचिये क्षोणी ।
विवेकवल्लीची लावणी । हो देई सैंघ[6] ॥ १२ ॥
संवादफळनिधानें । प्रमेयांचीं उद्यानें ।
लावीं ह्मणे गहनें । निरंतर ॥ १३ ॥
पाखाडाचे दरकुटे । मोडी वाग्वाद अव्हाटे[10] ।
कुतर्कांची दुष्टे । सावजें फेडी[11] ॥ १४ ॥
श्रीकृष्णगुणी मातें । सर्वत्र करीं वो सरतें ।
राणिवे बैसवी श्रोतयातें । श्रवणाचिये ॥ १५ ॥
ये मऱ्हाठियेचिया नगरी । ब्रह्मविद्येचा सुकाळ करीं ।
घेणें देणें सुखचिवरी । हों देई या जगा ॥ १६ ॥
तू आपलेनि स्नेहपल्लवें[12] । मातें पाघुरविशील सदैवें ।
तरि आताचि हें आघवें । निर्मीन माये ॥ १७॥
इये विनवणीयेसाठीं । अवलोकिले गुरुकृपादृष्टी ।

---

१ समजावून २ ज्ञान, वाङ्मय ३ आधार हातें ४ ब्रह्मदेव ५ खाण. ६ पुष्कळ ७ सभाषणरूप फळाचें बहार. ८ सिद्धांताचीं उपवनें. ९ गुहा, दऱ्या. १० आडवाट घेणारे वितंडवाद. ११ जनावरे हाकून दे. १२ प्रेमरूप पदरानें.

म्हणे गीतार्थेसी उठी । न बोलें बहु ॥ १८ ॥
तेथ जी जी महाप्रसाद । ह्मणोनि सावियां जाहला आनंद ।
आतां निरोपीन प्रबंध । अवधान दीजे ॥ १९ ॥ ( अ० १२ )

## ४ श्रीगुरुचरणपूजा.

आतां हृदय हें आपुलें । चौफाळूनिया भलें ।
वरी बैसऊं पाउलें । श्रीगुरुचीं ॥ १ ॥
ऐक्यभावाची अंजुळी । सर्वेंद्रियकुड्मळीं ।
भरूनिया पुष्पांजुळी । अर्घ्य देवों ॥ २ ॥
अनन्योदकें धुवट । वासना जे तन्निष्ठ ।
तें लाविलेसें बोट । चंदनाचें ॥ ३ ॥
प्रेमाचेनि भांगारें । निर्वाळूनि नेपुरें ।
लेववूं सुकुमारें । पदें तियें ॥ ४ ॥
घणावली आवडी । अव्यभिचारें चोखडी ।
तियें घालूं जोडी । आंगुळियां ॥ ५ ॥
आनंदामोदबहुळ । सात्त्विकाचें मुकुळ ।
तें उमललें अष्टदळ । ठेऊं वरी ॥ ६ ॥
तेथें ' अहं ' हा धूप जाळूं । ' नाहं 'तेजें वोवाळूं ।
सामरस्यें पोटाळूं । निरंतर ॥ ७ ॥
माझी तनु आणि प्राण । इयां दोन्ही पाउवां लेववूं श्रीचरण ।
करूं भोगमोक्षनिंबलोण । पायां तयां ॥ ८ ॥

---

१ तात्काळ. २ ग्रंथ. ३ चौफळा—चौरंग करून. ४ ऐक्यबोधाच्या ओंजळींत सर्वेंद्रियांच्या कमळकळ्या भरून त्या पुष्पांजळीचें अर्घ्य श्रीगुरुचरणावर देऊं. ५ अनन्यभावरूप जलानें शुद्ध केलेली. ६ सोन्यानें. ७ गाळून घेतलेली पादभूषणें. ८ घट्ट रणजोडवी (जोडी) पायाच्या आंगठ्यांत घालूं. ९ आनंदरूप परिमळानें दरवळलेलें व अष्टसात्विकभावांनी विकसललें अष्टदळ. १० निरभिमानरूप बोधाच्या तेजानें. ११ ऐक्यभावानें आलिंगूं. १२ पादुका, खडावा.

इया श्रीगुरुचरणसेवा । हों पात्र तया दैवा ।
जें[1] सकळार्थमेळावा । पाट बांधे ॥ ९ ॥
जें ज्ञानासी न चोजवे । ध्यानासीही जे नागवे[2] ।
तें अगोचर[3] फावे । गोठीमाजी ॥ १६ ॥
एवढें एक सौभाग[4] । वळघे वाचेचें अंग ।
श्रीगुरुपादपद्मराग । लाहे जै कां ॥ १७ ॥
तरि बहु बोलू काई । आजि तें आन ठाई ॥
मातेवांचूनि नाही । ज्ञानदेव म्हणे ॥ १८ ॥
जे तान्हेनि मिया अपत्यें । आणि माझे गुरूसी एकौलतें ।
म्हणोनि कृपेसी एकहातें । जालें तिये ॥ १९ ॥
पाहा पा भरोवरी[5] आघवी । मेघ चातकासी रिचवी[6] ।
मजलागी गोसावीं । तैसें केलें ॥ २० ॥
म्हणोनि रिकामें तोंड । करू गेलें बडबड ।
की गीतेऐसें गोड । आतुडलें ! ॥ २१ ॥
होय अदृष्ट[7] आपैतें । तै वाळूचि रत्नें परतें[8] ।
उजू आयुष्य तै मारितें[9] । लोभ करी ॥ २२ ॥
आधणी घातलिया हरळ[10] । होती अमृताचे तांदुळ ।
जरी भुकेची राखे वेळ । श्रीजगन्नाथ ॥ २३ ॥
तयापरी श्रीगुरु । करिती जै अंगिकारू ।
तै होऊनि ठाके संसारु । मोक्षमय आघवा ॥ २४ ॥
पाहा पा काई श्रीनारायणें । तया पाडवांचें उणें ।
कीजेचि[11] ना पुराणें । विश्वद्यें ? ॥ २५ ॥

---

१ जें चारी पुरुषार्थांच्या सिंहासनावर चढवितें. २ सापडत नाही. ३ इंद्रियातीत ब्रह्म. ४ थोर भाग्य वाचेच्या ठिकाणीं येतें. ५ जलसामुग्री. ६ रिचवतो. ७ दैव अनुकूल. ८ पालटे, होते. ९ मारायला आलेलें. १० खडे. ११ पुराण पुरुष व विश्वद्य हरीनें पाडवाचे उणें ठेवलें काय ?

तैसें श्रीनिवृत्तिराजें । अज्ञानपण हें माझें ।
आणिलें वोजें[1] । ज्ञानाचिये ॥ २६ ॥
परि हें असो आता । प्रेम रुळेतसे[2] बोलता ।
कें[3] गुरुगौरव वर्णिता । उन्मेष[4] असे ? ॥ २७ ॥ ( अ० १५ )

## ५ चित्सूर्य श्रीनिवृत्तिनाथ.

मावळवीत विश्वाभास । नवल[5] उदयला चडाश ।
अद्वयाब्जिनीविकास । वदू आता ॥ १ ॥
जो अविद्या[6]राती रुसोनिया । गिळी ज्ञानाज्ञानचादणिया ।
जो सुदिन करी ज्ञानिया । स्वबोधाचा ॥ २ ॥
जेणें विवळतिये[7] सवळे[8] । लाहोनि आत्मज्ञानाचे डोळे ।
सांडिती देहाहंतेची अविसांळें[10] । जीवपक्षी ॥ ३ ॥
लिंगदेहकमळाचा । पोटीं वेंचतया[11] चिद्भ्रमराचा ।
बंदिमोक्ष[12] जयाचा । उदैलां[13] होय ॥ ४ ॥
शब्दाचिया आसकडी[14] । भेदनदीच्या दोहीं थडी[15] ।
आरडत विरहवेडीं । बुद्धिबोध ॥ ५ ॥
तया चक्रवाकाचें मिथुन । सामरस्याचें समाधान ।
भोगवी जो चिद्गगन[16]-। भुवनदिवा ॥ ६ ॥
जेणें पाहालिये पाहाटें । भेदाची चोरवेळी[17] फिटे ।
रिगती आत्मानुभववाटे । पाथिक योगी ॥ ७ ॥

---

१ योग्यतेला. २ प्रेम वाचेत आलें की मलिन होतें. ३ कोठें. ४ बुद्धि. ५ लौकिक सूर्याहून वेगळा–जगदाभास नाहींसा करणारा व अद्वैतभावाचा विकास करणारा–म्हणून नवल. ६ मायारूप रात्र मावळवितो. ७ प्रकाशित होणाऱ्या. ८ प्रभातकाळीं. ९ मिळून. १० घरटीं. ११ क्षीण होणाऱ्या जीवचैतन्याचा १२ बधापासून सुटका. १३ जो सूर्य उगवला असता. १४ अडचणीची जागा, दुर्गम स्थान. १५ तीरावर. १६ चिदाकाशांतील. १७ चोरवेळ.

जयाचेनि विवेककिरणसर्गें । उन्मेखसूर्यकांतफुणगे[1] ।
दीपले[2] जाळिती दागें[3] । ससाराची ॥ ८ ॥

जयाचा रश्मिपुज निर्बर[4] । होतां स्वरूपउखरीं[5] स्थिर ।
ये महासिद्धींचा पूर । मृगजळ तें ॥ ९ ॥

जो प्रत्यग्बोधाचिया[6] माथया । सोहतेचा मध्यान्ही आलिया ।
लपे आत्मभ्रातिछाँया[7] । आपणपां तळी ॥ १० ॥

ते वेळी विश्वस्वप्नासहितें । कोण अन्यथामती निद्रेतें ।
सांभाळी ? नुरेचि जेथें । मायाराती ! ॥ ११ ॥

म्हणौनि अद्वयबोधपाटणीं । तेथ महानदाची दाटणी ।
मग मुखानुभूतीचीं घेणीदेणी । मदावों लागती ॥ १२ ॥

किंबहुना ऐसैसें । मुक्तकैवल्यसुदिवसें ।
सदा लाहिजे का प्रकाशें । जयाचेनि ॥ १३ ॥

जो निजधामव्योमींचा[8] रावो । उदैलाचि उपजतखेंवो[9] ।
फेडी पूर्वादिदिशासि ठावो । उदयास्ताचा ॥ १४ ॥

न दिसणें[10] दिसणेंनेंसी मावळवी । दोहीं झांकिलें तें सैघ पालैंवी ।
काय बहु बोलों ते आघवी । उखाचि[11] आनी ! ॥ १५ ॥

तो अहोरात्राचा पैलकडें[12] । कवणें देखावा ज्ञानमार्तंड ।
जो प्रकाश्येंवीण[13] सुरवाड[14] । प्रकाशाचा ॥ १६ ॥

तया चित्सूर्या श्रीनिवृत्ती । आता नमोचि म्हणों पुढतपुढती ।

---

१ आत्मस्फूर्तिरूप सूर्यकातमण्यांतून निघणाऱ्या ठिणग्या. २ पेटल्या असतां. ३ वनें, अरण्यें. ४ प्रखर ५ माळजमीनीवर. ६ आत्मज्ञानाच्या. ७ आत्मस्वरूपाचा विसर किंवा माया ही स्वरूपानुभवाच्या पायाखालीं दडते. ८ निजरूप किंवा चिदाकाशाचा राजा ( प्रकाशक ). ९ ज्ञानासगट अज्ञानही मावळते. १० ज्ञानाज्ञानानीं आच्छादिलेले स्वरूप सर्वत्र प्रगट करितो. ११ निराळी १२ परतीर. १३ प्रकाशित होणाऱ्या पदार्थाशिवाय, दृश्याशिवाय. १४ सुकाळ.

जे बा[1]चका येइजतसे स्तुती । बोलाचिया ॥ १७ ॥
जो स[2]र्वनेणिवा जाणिजे । मौनाचिया मिठियॉ[3] वानिजे ।
काहीच न होनि आणिजे । आपणपया जो ॥ १९ ॥
तया तूतें मी सेवकपणें । लेववी बालकेया स्तोत्राचें लेणें ।
हें उपसाहावेंही म्हणता उणें । अद्वयानदा ॥ २१ ॥ (अ०१६)

## ६ गुरुरूपीं मौन हेंच भलें.

जयजय देव निर्मळ । निजजनॉ[4]खिलमंगळ ।
जन्मजरॉ[5]जलदजाळ–। प्रभजन ॥ १ ॥
जयजय देव प्रबळ । विदळित[6]ॉमगळकुळ ।
निगमागम[7]द्रुमफळ–। फळप्रद ॥ २ ॥
जयजय देव विशुद्ध[8] । अविद्योद्यानद्विरद[9] ।
शमद[10]ॅमदनमदभेद । दयार्णव ॥ ७ ॥
जिही विशेषणी विशेपिजे[11] । तें दृश्य नव्हें रूप तुझें ।
हें जाणे मी म्हणोनि लाजे । वानॅ[12]णा इही ॥ १२ ॥
परी मर्यादेचा सागर । हा तवचि तया डॅगॅ[13]र ।
जव न देखे सुधाकर । उदया आला ॥ १३ ॥
सोमकांत निजनिर्झरीं । चद्रा अर्घ्यादिक न करी ।
तें तोचि अवधारी । करवी कीं जी ॥ १४ ॥

---

१ शब्दानी केलेली स्तुति बाधकतेला येते. २ सर्व नेणून, विसरून. ३ स्वीकार, अगीकार. ४ स्वभक्ताचे सर्व कल्याण करणारें. ५ जन्मजरारूपी मेघजालाचा नाश करणारा वायु. ६ दूर केले आहेत अमगळाचे समुदाय ज्यानें. ७ वेद व शास्त्रें ( निगम व आगम )–तद्रूप वृक्षाचें फळ देणारा. ८ उपाधिरहित. ९ अविद्यारूप उपवनाचा नाश करणारा हत्ती. १० शम व दम याच्या योगानें मदन ह्म० काम व मद ( अहकार ) याचा नाश करणारा. ११ स्तुति करावी. १२ वर्णावयास १३ प्रसिद्धि.

नेणों कैसी वसतसगें । अवचितिया वृक्षाची अंगें ।
फुटती तै तयाहीजोगें । धरणें नोहे ॥ १५ ॥

तैसा तूतें जेथ मी स्मरे । तेथ मीपण मी विसरे ।
मग जाकोळिला[1] ढेंकरें । तृप्त जैसा ॥ १७ ॥

मज तुवा जी केलें तैसें । माझें मीपण दवडूनि देशें ।
स्तुतिमिषें पाचोंपिसें[2] । बाधलें वाचे ॥ १८ ॥

तू जी एकरसाचें[3] लिंग । केवी करू गुणागुणी विभाग ।
मोती फोडोनि सांधिता चाग । की तैसेचि भलें ? ॥ २० ॥

आणि बाप तू माये । इहीं बोलीं ना स्तुति होये ।
डिंभोपाधिक आहे । विटाळ तेथें ॥ २१ ॥

जी जालेनि[5] पाइकें आलें । तें गोसावीपण केवि बोलें ।
ऐसें उपाधी उँशिटलें । काय वर्णूं ? ॥ २२ ॥

म्हणोनि सत्यचि तुजलागी । स्तुती न देखों जी जगी ।
मौनावांचूनि लेणें आगी । सुसीना मा ॥ २४ ॥
स्तुती काहीं न बोलणें । पूजा काही न करणें ।
सन्निधी कांहीं न होणें । तुझ्या ठायी ॥ २५ ॥
आतां गीतार्थाची मुक्तमुदी । लेववी[10] माझिये वाग्वृद्धी ।
जेणें माने हें सभासदी । सज्जनाऱ्या ॥ २७ ॥
तेथ म्हणितले श्रीनिवृत्ती । नको हें पुढतपुढती ।...(अ० १८)

---

१ भरून आलेला २ वेड. ३ अखडैकरसमूर्ती ४ बालाच्या उपाधी-चा. ५ सेवकाच्या योगानें. ६ स्वामीपण. ७ उष्टे झालेले. ८ घालीत नाहीस ९ मोत्याची आगठी. १० समतीचा निदर्शक असा आपल्या मुक्तमुदीचा शिक्का माझ्या वाग्विस्तारावर करा.

## ७ माझे बोल गुरुकृपेचे आहेत.

१

जयाचे केलियां स्मरण । होय सकळ विद्याचें अधिकरण[1] ।
तेचि वदू श्रीचरण । श्रीगुरूचे ॥ १ ॥
जयाचेनि आठवें । शब्द[2]सृष्टि आगवे ।
सारस्वत आघवें । जिव्हेसी ये ॥ २ ॥
वक्तृत्व गोडपणे । अमृतातें पारुष[3] म्हणे ।
रस होती बोळगणें[4] । अक्षरासी ॥ ३ ॥
श्रीगुरूचे पाय । जै हृदय गवमूनि ठाय ।
तै एवढें भाग्य होय । उन्मेषासी ॥ ४ ॥ ( अ० १३ )

२

जें बुद्धीही आकळिता साकडे[5] । म्हणऊनि बोलीं त्रिपायें[6] सापडे ।
परी श्रीनिवृत्तिकृपादीपउजियेडें । देखेन मी ॥ ३२ ॥
जें दिठीही न पविजे । तें दिठीवीण देखिजे ।
जरी अतींद्रिय लाहिजे[9] । ज्ञानबळ ॥ ३३ ॥
नातरी जें धातुवादाही[7] न जोडे । तें लोहींचि पधरें[8] सांपडे ।
जरी दैवयोगें चढे । परिस हाता ॥ ३४ ॥
तैसी सद्‌गुरुकृपा होये । तरी करिता काय आपुं नोहे ।
म्हणऊनि ते अपार मातें आहे । ज्ञानदेव म्हणे ॥ ३५ ॥
तेणें कारणें[10] मी बोलेन । बोलीं अरूपाचें रूप दावीन ।
अतींद्रिय परी भोगवीन । इंद्रियाकरवीं ॥ ३६ ॥ ( अ० ६ )

* * *

---

१ अश्रयस्थान. २ वाचाशक्ति प्राप्त होते. ३ कठोर, फिकें. ४ सेवक. ५ कठिण. ६ कदाचित्, बहुधा नाहींच. ७ किमयागारालाही. ८ पधरा किंवा साडेपधरा दराचें सोनें म्हणजे उत्तम सोनें. ज्ञानेश्वरांच्या वेळीं शभरनवरी सोन्याचा हा भाव होता. ९ प्राप्त. १० त्याच्या कृपाबळानें.

ज्ञानदेव म्हणे मी चांडें । सद्गुरूनीं केलें कोडें ।
माथा हात ठेविला तें फुडें । बीजचि वाइलें ॥ ४९२ ॥
म्हणऊनि येणें मुखें जें जें निगे । तें सताच्या हृदयीं साचचि लागे ।
हें असो सांगों श्रीरंगें । बोलिलें तें ॥ ४९३ ॥ (अ० ६ ).

---

## ३ कृष्णार्जुनांची अन्योन्यप्रीति.

१

जेथ अश्ववाहक आपण । वैकुंठीचा राणा जाण ।
तया रथाचे गुण । काय वर्णूं ॥ १४० ॥
ध्वजस्तंभावरी वानरें । तो मूर्तिमंत शंकर ।
सारथी शार्ङ्गधर । अर्जुनेंसीं ॥ १४१ ॥
देखा ! नवल तया प्रभूचें । अद्भुत प्रेम भक्ताचें ।
जे सारथ्यपण पार्थाचें । करीत असे ॥ १४२ ॥
पाइक पाठीसीं घातला । आपण पुढा राहिला ।...(अ० १)

२

'देवा हे येतुलेवरी । बोलावें नलगे अवधारी ।
आधीं तूंचि विचारीं । संग्राम हा ॥ ३० ॥
जयालागीं मनें विरूं । आम्हीं स्वप्नींही न शकों धरूं ।
तया प्रत्यक्ष केवीं करूं । घात देवा ॥ ३५ ॥

---

१ बी पेरण्याकरिता पाभरीवर जें लाकडाचें पात्र असतें तें. २ घातलें श्रीगुरूनीं तें बीजपेरण्यासाठीं माझी चाड्याच्या जागीं योजना केली व शिरीं बरदहस्त ठेविला तें बीजच चाड्यांत घातलें. ३ सारथी. ४ हनुमत. ५ सेवक. ६ वैर.

आम्हा काय उचित । तें पाहता न स्फुरे येथ ।
जे मोहें येणें चित्त । व्याकुळ माझें ॥ ५५ ॥
तरी श्रीकृष्णा तुवा जाणावें । निकें[1] तें आम्हां सागावें ।
जे सखा सर्वस्व आघवें । आम्हासि तू ॥ ५८ ॥
तू गुरु बधु पिता । तू आमुची इष्टदेवता ।
तूचि सदा रक्षिता । आपदी आमुतें ' ॥ ५९ ॥
मग देखा तेथ फाल्गुनु[2] । घेतला असे भ्रातिकवळुनु[3] ।
जैसा घनपडळीं भानु । आच्छादिजे ॥ ७५ ॥
तयापरी तो धनुर्धर । जाहलासे दुःखें जर्जर ।
जैसा ग्रीष्मकाळी गिरिवर । वणवला का ॥ ७६ ॥
म्हणोनि सहजें सुनीळें[4] । कृपामृतें सजळ ।
तो बोळला[5] श्रीगोपाळ । महामेघ ॥ ७७ ॥
तेथ सुदर्शनाची द्युती[6] । तेचि विद्युल्लता झळकती ।
गभीर वाचा ते आयँती[7] । गर्जनेची ॥ ७८ ॥
आता तो उदार कैसा वर्षेल । तेणें अर्जुनाचळ निवेल ।
मग नवी विरुढी फुटेल । उन्मेषाची[8] ॥ ७९ ॥ ( अ० २ )

३

मग आइका अर्जुनें म्हणितलें । देवा ' तुम्ही जें वाक्य बोलिलें ।
तें म्या निकें[9] परिसिलें । कृपानिधी ॥ १ ॥
हा गा कर्म तूंचि अशेष । निरांकरिसी[10] निःशेष ।
तरी मजकरवीं हें हिंसकें[11] । का करविसी ? ॥ ४ ॥

---

१ खरें. २ येथें फाल्गुन हें नाव किती यथार्थत्वानें योजिलें आहे ' ३ वेढून घेतला. ४ श्यामवर्ण, सावळा. ५ वळला. ६ दतांची प्रभा. ७ प्रकार, परी. ८ उत्कृष्ट रूपक' अर्जुन= पर्वत, मोह = वणवा, सावळा कृष्ण = श्याम मेघ, दया = जळ, वृष्टि = गीतामृत, नवा अकुर = ज्ञानोदय. ९ चांगलें. १० निषेधिसी, निराकरण करितोस. ११ ज्यात हिंसा आहे असें युद्धकर्म.

मी आधींचि काहीं नेणे । वरी कवळिलों मोहें येणें ।
श्रीकृष्णा ! विवेक याकारणें । पुसिला तुज ॥ १० ॥
आम्ही तनुमनजीवें । तुझिया बोला वोठंगावें ।
आणि तुवाचि ऐसें करावें । तरी सरलें म्हणे ! ॥ १२ ॥
देखें रोगातें जिणावें । औषध तरी देयावें ।
परी तें अतिरुच्य व्हावें । मधुर जैसें ॥ १९ ॥
तैसें सकळार्थभरित । तत्त्व सागावें उचित ।
परी बोधें माझें चित्त । जयापरी ॥ २० ॥
देवा ! तुजऐसा निजगुरु । आजि आर्तीधणी का न करूं ? ।
येथ भीड कवणाची धरूं ? । तूं माय आमुची ! ॥ २१ ॥
हा गा कामधेनूचें दुभतें । दैवें जाहलें आपैतें ।
तरी कामनेची का तेथें । वाणि कीजे ? ॥ २२ ॥
देखें अमृतसिंधूतें ठाकावें । मग ताहानाचि जरी फुटावें ।
तरी सायास कां करावे । मागील तें ? ॥ २४ ॥
तैसा जन्मातरीं बहुती । उपासिता श्रीकमळापती ।
तो तूं दैवें आजी हातीं । जाहलासि जरी ॥ २५ ॥
तरी आपुलिया सवेसा । का न मागावासि परेशा ।
देवा ! सुकाळ हा मानसा । पाहला असे ॥ २६ ॥
जी जी परममंगळधामा । सकळदेवदेवोत्तमा ।
तूं स्वाधीन आजि आम्हा । म्हणऊनिया ॥ २८ ॥
जैसें मातेच्या ठायीं । अपत्या अनवसर नाहीं ।
स्तन्यालागूनि पाहीं । जियापरी ॥ २९ ॥

---

१ व्यापलों, ग्रस्त झालों २ आश्रयावें. ३ इच्छेची पूर्तता. ४ प्राप्त. ५ कमतरता. ६ पावावें. ७ इच्छेनें. ८ उजाडला. ९ अवेळ. १० स्तनपान करण्याला.

तैसें देवा ! तूतें । पुसिजतसें आवडें तें ॥
आपुलेनि आतें । कृपानिधी ॥ ३० ॥
तरी पारत्रिकीं हित । आणि आचरिता तरी उचित ।
तें सागें एक निश्चित । पार्थ म्हणे ॥ ३१ ॥ ( अ० ३ ).

४

आवीचि विवेकाची गोठी[1] । वरी प्रतिपादी श्रीकृष्ण जगजेठी ।
आणि भक्तराज किरीटी । परिसत असे ॥ २ ॥
जैसा पचमालाप[2] सुगध । की परिमळ आणि सुस्वाद ।
भला जाहला विनोद । कथेचा इये ॥ ३ ॥
जें न सागेचि पितया वसुदेवासी । जें न सागेचि माते देवकीसी ।
जें न सागेचि बधु बळिभद्रासी । तें गुह्य अर्जुनेसीं बोलत ॥ ८ ॥
हो का जयाचिया प्रीती । अमूर्त हा आला व्यक्ती[3] ।
मज एकवंकी[4] याची स्थिती । आवडत[5] असे ॥ १२ ॥
येऱ्हवीं हा योगिया नाढळे । वेदार्थासीं ना कळे ।
जेथ ध्यानाचेही डोळे । पावतीना ॥ १३ ॥
हा त्रैलोक्यपटाची घडी । आकाराची पैलथडी ।
कैसा याचिये आवडी । आवरला[6] असे ॥ १५ ॥
मग देव म्हणे पाडुसुता । हाचि योग आम्ही विवस्वता[7] ।
कथिला परी ते वार्ता । बहुवा दिवसाची ॥ १६ ॥
हें जीवींचें निजगुज । परी केवी राखों[8] तुज ।
जें पढियेसी[9] तू मज । म्हणऊनियां ॥ २८ ॥
तू प्रेमाचा पुतळा । भक्तीचा जिव्हाळा ।
मैत्रीयेची चित्कळा[10] । धनुर्धरा ॥ २९ ॥

---

१ गोष्ट २ पचम स्वर, कोकिळेचें गायन. ३ आकाराला. ४ एकरूपता पावलेली. ५ वाटतें. ६ याच्या प्रेमात गुरफटला. ७ सूर्याला. ८ तुजपासून लपवून ठेवू. ९ प्रिय. १० जीवप्राण.

तूं अनुषंगाचा ठावो । आतां तुज काय वचों जावों ।
जऱ्ही संग्रामारूढ आहों । जाहलों आम्हीं ॥ ३० ॥
तव अर्जुन म्हणे श्रीहरी । माय आपुलेयाचा स्नेह करी ।
तेथ विस्मय काय अवधारीं । कृपानिधे[1] ॥ ३२ ॥
तूं संसारश्रांताची साउली । अनाथ जीवाची माउली ।
आम्हातें कीर[2] प्रसवली । तुझीच कृपा ॥ ३३ ॥ ( अ० ४ )

५

तव अर्जुन म्हणे देवो । परचित्तलक्षणाचा[3] रावो ।
' भला जाणितला जी भावो । मानस माझा ॥ १६३ ॥
म्यां जें काहीं विवरूनि पुसावें । तें आधींचि जाणितलें देवें ।
तरी बोलिलें तेंचि सांगावें । विवळ[4] करूनी ' ॥ १६४ ॥
तव श्रीकृष्ण म्हणती हो का । ' तुज हा मार्ग गमला निका ।
तरी काय जाहलें आइकींजो का । सुखें बोलों ॥ १६८ ॥
अर्जुना ! तूं परिससी । आणि परिसोनि अनुष्टिसी[5] ।
तरी आम्हांसीचि वाणी कायसी । सांगावयाची ?' ॥ १६९ ॥
ते म्हणों कारुण्यरसाची वृष्टी । कीं नवया स्नेहाची सृष्टी ।
हें असो नेणिजे दृष्टी । हरीची वानू ! ॥ १७१ ॥
जे अमृताची वोतली । की प्रेमचि पिऊनि मातली ।
म्हणोनि अर्जुनमोहें गुतली । निघों नेणे ! ॥ १७२ ॥ (अ० ५)

६

द्वैताचा[6] ठावोचि फेडी । ते ब्रह्मविद्या कीजेल उघडी ।
तरी अर्जुन पढियें हे गोडी । नासेल हन ॥ ११३ ॥

---

१ स्नेहाचें, सख्याचें स्थान २ निश्चयेंकरून. ३ दुसऱ्याचें मनोगत जाणणारा, इंगितज्ञ. ४ स्पष्ट, विशद. ५ त्याप्रमाणें वागशील. ६ द्वैत समूळ पुसून टाकणारी ब्रह्मविद्या उघड करावी तर अर्जुन माझा लाडका या प्रेमाची गोडी जाईल !

म्हणोनि तें तैसें बोलणें । नव्हे, सं[1]पातळ आड लावणें ।
केलें मनचि वेगळवाणें । भोगावया ! ॥ ११४ ॥
वि[2]पायें अहभाव ययाचा जाईल । मी तेंचि हा जरी होईल ।
तर मग काय कीजेल । एकलेया ? ॥ ११६ ॥
दि[3]ठीचि पाहतां निविजे । का तोंड भरोनि बोलिजे ।
नातरी दाटूनि खर्वं[4] दीजे । ऐसें कोण आहे ? ॥ ११७ ॥
आपुलिया मना बरवी । अस[5]माई गोठी जीवी ।
ते कवणेसी चाव[6]ळावी । जरी ऐक्य जाहलें ? ॥ ११८ ॥
इया काकुळती जनार्दनें । अन्योपदेशाचेनि हातासनें ।
बोलामाजी मन मनें । आलिंगूं सरलें ॥ ११९ ॥
हें परिसता जरी कानडें । तरी जाण पा पार्थ उघडें ।
श्रीकृष्णसुखाचेंचि रूपडें । वोतलें गा ॥ १२० ॥
हें असो व[8]यसेचिये सेवटीं । जैसें एकचि विये वांझोटी[9] ।
मग ते मोहाची त्रिपुटी । नाचों लागे ! ॥ १२१ ॥
तैसें जाहलें श्रीअनता । ऐसें तरी मी न म्हणता ।
जरी तयाचा न देखता । अतिशयं[10] येथ ॥ १२२ ॥
पाहा पा नवल कैचें चोजें[11] । के उपदेश केउतें झुंजें[12] ।
परी पुढें वाल[13]भाचें भोज । नाचत असे ! ॥ १२३ ॥
आवडी आणि लाजवी । व्यसन आणि शिणवी ।
पिसें आणि न भुलवी । तरी तें काई ? ॥ १२४ ॥

---

१ वेगळेपणाने अर्जुनाचें मन ह्म० भक्तिसुख भोगता यावें म्हणून द्वैताचा पातळ पडदा ठेवला. २ कदाचित्. ३ पाहताच दृष्टि निवावी. ४ कडकडून मिठी मारावी. ५ न मावणारी ६ सागावी. ७ हातवटीनें, युक्तीनें. ८ आयुष्याच्या शेवटच्या भागात, वृद्धपणीं. ९ वाझ स्त्री. १० अत्युत्कट प्रेम. ११ प्रेम. १२ गीतेचा उपदेश कोठे व रणसग्राम कोठें १३ वल्लभाचें, प्रिय भक्ताचें प्रेम.

म्हणऊनि भावार्थ तो ऐसा । अर्जुन मैत्रियेचा कुवांसा[1] ।
कीं सुखें शृंगारलिया मानसा । दर्पण तो ! ॥ १२५ ॥
हो कां आत्मनिवेदनातळींचीं । जे पीठिका[2] होय सख्याची ।
पार्थ अधिष्ठात्री तेथींची । मातृका[3] गा ॥ १२७ ॥
पाहा पा अनुरागें भजे । जे प्रियोत्तमें मानिजे ।
ते पतीहूनि काय न वानिजे । पतिव्रता ? ॥ १२९ ॥
तैसा अर्जुनचि विशेषें स्तवावा । ऐसें आवडलें मज जीवा ।
जे तो त्रिभुवनीचिया दैवा । एकायतन[4] जाहला ! ॥ १३० ॥
देवकिया उदरीं वाहिला । यशोदा सायासें पाळिला ।
शेखीं उपेगा[5] गेला । पाडवासी ! ॥ १३७ ॥ ( अ० ६ )

७

सहज कृपामदानिळें । श्रीकृष्णद्रुमाचीं वचनफळें ।
अर्जुनश्रवणाचिये खोळे[6] । अवचित पडलीं ॥ १८७ ॥
तियें प्रमेयाचीं हो कां वळलीं । कीं ब्रह्मरसाच्या सागरीं चुबकळिलीं ।
मग तैसींच का घोळिलीं । परमानंदें ॥ १८८ ॥
तेणें बरवेपणें निर्मळें । अर्जुना उन्मेषाचे[7] डोहळे ।
घेताति गळाले[8] । विस्मयामृताचे ॥ १८९ ॥
तिया सुखसंपत्ति जोडलिया । मग स्वर्गा वाये वांकुलिया[9] ।
हृदयाच्या जीवीं गुतकुलिया । होत आहाती ॥ १९० ॥
अहो ! श्रीगुरुतें जैं पुसावें । तैं येणें मानें सावध व्हावें ।
हें येकचि जाणे आघवें । सव्यसाची ॥ २०४ ॥ ( अ० ७ )

८

तरी परियेसीं गा प्राज्ञा । तूं आस्थेचीच संज्ञा[10] ।

---

१ आधार. २ सख्यभक्तीचें आसन. ३ देवता. ४ त्रिभुवनाचें भाग्य जो श्रीकृष्ण त्याच्या प्रेमाचा एकच एक विषय झाला. ५ उपयोगाला. ६ रधांत, पदरात. ७ ज्ञानाचे. ८ घोट. ९ वेडावणें दाखवितो ( वाय ). १० मूर्ति.

बोलिलिये गोष्टीची अवज्ञा । नेणसी करूं ॥ ३९ ॥
यालागीं सुमन आणि शुद्धमती । जो अनिंदक अनन्यगती ।
पै गा गौप्यही तयाप्रती । चावळिजे सुखें ॥ ४० ॥
तरी प्रस्तुत आता गुणी इहीं । तूंवाचून आणिक नाहीं ।
म्हणोनि गुज तरी तुझ्या ठायीं । लपवूं नये ॥ ४१ ॥ (अ० ९)

९

वासरू देखिलियाचिसाठीं । धेनु खडबडोनि मोहें उठी ।
मग स्तनामुखाचिये भेटी । काय पान्हा धरे[1] ? ॥ ४० ॥
तो कृपापीयूषजळ[2] । आणि येरु[3] जवळा आला वर्षाकाळ ।
नातरी[4] श्रीकृष्ण कोकिळ । अर्जुन वसंत ॥ ११३ ॥
अहो ! शेषाचेही डोळे चोरिले । वेद जयालागी झकविले ।
लक्ष्मीयेही राहविलें[5] । जिव्हार जें ॥ ११८ ॥
तें आता प्रगटुनी अनेकधा । करीत विश्वरूपदर्शनाचा धांदा[6] ।
बाप भाग्या अगाधा । पार्थाचिया ॥ ११९ ॥
पढविलें पाखरू ऐसें न बोले । यापरी क्रीडामृगही तैसा न चले ।
कैसें दैव येथ सुरवाडलें । तें जाणों न ये ॥ १७० ॥
हा कोपे—की निवांत साहे । हा रुसे-तरी बुझावीत जाये ।
नवल पिसें लागलें आहे । पार्थाचें देवा ! ॥ १७२ ॥ (अ० ११)

१०

मग ह्मणे[8] ' प्रज्ञाकांता ! । उजवली आजि वक्तृत्वता ।
जे बोलाएवढा श्रोता । जोडलासी ! ' ॥ ६४ ॥ (अ० १४)

११

ऐसें प्रेमरसें सुरफुरें[9] । बोलिलें जंत्र यादववीरें ।

१ चोरता येतो ? २ दयामृताचा मेघ. ३ दुसरा म्हणजे अर्जुन. ४ अथवा. ५ जें गुह्य लक्ष्मीपासूनही राखून ठेवलें. ६ उद्योग. ७ सुखावलें. ८ श्रीकृष्ण. ९ अतिशय, भरपूर.

तंव अवधान अर्जुनाकारें । मूर्त जाहलें ॥ ६८ ॥
श्रीकृष्णोक्तिसागरा । हा अगस्तीचि दुसरा ।
म्हणौनि घोट भरों पाहे एकसरा । आवघेयाचा ॥ ७० ॥
तो आघवाचि बोध सहसा । अर्जुनीं उमटला कैसा ।
व्योमीचा चद्रोदय जैसा । क्षीरार्णवी ॥ ४४३ ॥
का प्रतिभिंती चोखटे । समोरील चित्र उमटे ।
तैसा अर्जुनें आणि वैकुंठें । नांदतसे बोध ॥ ४४४ ॥
म्हणे ' अर्जुना ! आम्हाही वाडेकोडें । अखड बोलों आवडे ।
परी काय कीजे न जोडे । पुसतें ऐसें ॥ ४४८ ॥
आजी मनोरथांसी फळ । जोडलासि तू केवळ ।
जें तोंड भरोनि निखळ । आलासि पुसों ॥ ४४९ ॥
जें अद्वैतावरींही भोगिजे । ते अनुभवीचें तू विरजें ।
पुसोनि मज माझें । देतोसि सुख ॥ ४५० ॥
दोहीं वोठी एक बोलणें । दोहीं चरणीं एक चालणें ।
तैसें पुसणें सागणें । तुझें माझें ॥ ४५४ ॥
एव आम्ही तुम्ही येथें । देखावें एका अर्थातें ।
सागतें पुसतें येथें । दोन्ही एक ' ॥ ४५५ ॥
ऐसें बोलत देव भुलला मोहें । अर्जुनातें आलिंगूनि ठाये ।
मग बिहाला[२] म्हणे नोहे[३] । आवडी हे ! ॥ ४५६ ॥
आधींच आम्हा यया काहीं । नरनारायणा भिन्न नाहीं ।
परी आता जिरो माझ्या ठायी । वेगँ[४] हा माझा !' ॥४५८॥ (अ० १५)

१२

वत्स धालयाँहीवरी[५] । धेनु न वचाँवी[६] दुरी ।
अनन्यप्रीतीची परी । ऐसी आहे ॥ ७८ ॥

१ साध्य, साधन. २ भ्याला. ३ हें ऐक्यत्वाचें प्रेम येथें नको. ४ ऐक्यतेच्या प्रेमाचा आवेग. ५ पोट भरल्यावरही. ६ जाऊ नये.

तेणें काजेवीणही बोलावें । तें देखिलें तरी पाहावें ।
भोगिता चाड दुणावे । पढियंतयाठायीं ॥ ७९ ॥
ऐसी प्रेमाची हे जाती । आणि पार्थ तव तेचि मूर्ती ।
म्हणौनि करूं लागे खती । उगेपणाची ॥ ८० ॥
आणि संवादाचेनि मिषें । जे अव्यवहार वस्तु असे ।
तेंचि भोगिजे की जैसें । दर्पणी रूप ॥ ८१ ॥ ( अ० १८ )

---

# ४ गीताशास्त्रविषयक विचार.

## १ महाभारत आणि व्यास.

आता अवधारा कथा गहन । जे सकळकथा जन्मस्थान ।
कीं अभिनव उद्यान । विवेकतरूचें ॥ २८ ॥
ना तरी सर्व सुखाची आदि । जे प्रमेयमहानिधि ।
नानों नवरससुधाब्धि । परिपूर्ण हे ॥ २९ ॥
कीं परमधाम प्रगट । सर्व विद्याचें मूळपीठ ।
शास्त्रजाता वसौटें । अशेषाचें ॥ ३० ॥
ना तरी सकळ धर्मांचें माहेर । सज्जनाचें जिव्हार ।
लावण्यरत्नभाडार । शारदेचें ॥ ३१ ॥
नाना कथारूपें भारती । प्रगटली असे त्रिजगतीं ।
आविर्ष्करोनि महामती । व्यासाचिये ॥ ३२ ॥
म्हणोनि हा काव्या रावो । ग्रथगुरुत्वतीचा ठावो ।
एथूनि रसां झाला आंवो । रसाळपणाचा ॥ ३३ ॥

---

१ प्रिय माणसाविषयीं. २ व्यवहारातीत, कर्मातीत परमात्मवस्तु. ३ अखिल शास्त्रसिद्धांताचा आगर. ४ अथवा. ५ आश्रय ६ हृदय. ७ सरस्वती. ८ प्रवेशून. ९ ग्रथगौरव, प्रौढी. १० आकार.

एथ चातुर्य शाहणें झालें । प्रमेय रुचीस आलें ।
आणि सौभाग्य पोखलें[1] । सुखाचें एथ ॥ ३५ ॥
एथ कळाविद्पण कळा । पुण्यासि प्रताप आगळा ।
म्हणऊनि जनमेजयाचे अवलीळा । दोष हरले ॥ ३७ ॥
भानुतेजें धवळलें । जैसें त्रैलोक्य दिसे उजळिलें ।
तैसें व्यासमती कवळिलें । मिरवे विश्व ॥ ३९ ॥
का सुक्षेत्रीं बीज घातलें । तें आपुलियापरी विस्तारलें ।
तैसें भारतीं सुरवाडलें[2] । अर्थजात ॥ ४० ॥
नाना पुरतिये प्रतिष्ठेलागी । सौनीव[3] धरूनि आंगीं ।
पुराणें आख्यानरूपें जगी । भारता आलीं ॥ ४६ ॥
म्हणऊनि महाभारती नाही । तें नोहे लोकी तिही ।
येणेंकारणें म्हणिपे पाहीं । व्यासोच्छिष्ट जगत्रय ॥ ४७ ॥

## २ भगवद्गीतार्थ व संतश्रोत्यांस प्रार्थना.

आता भारतकमळपराग । गीताख्य प्रसंग ।
जो संवादला श्रीरग । अर्जुनेंसी ॥ ५०
ना तरी शब्दब्रह्माब्धि । मथियला व्यासबुद्धि ।
निवडिलें निरवधि । नवनीत हें ॥ ५१ ॥
मग ज्ञानाग्निसपर्कें । कढसिलें[4] विवेकें ।
पद आलें परिपाकें । आमोदासी[5] ॥ ५२ ॥
जें अपेक्षिजे विरक्तीं । सदा अनुभविजे सतीं ।
सोहभावें पारगती । रमिजे जेथ ॥ ५३ ॥
जें आकर्णिजे भक्तीं । जें आदिवद्य त्रिजगतीं ।
ते भीष्मपर्वी संगती । सागिजेल ॥ ५४ ॥

---

१ पोसलें. २ सुख पावलें ३ लहानपण, सानेपण. ४ कड येईतों कढविलें. ५ त्याचें हें गीतारूप सुगधमय तूप तयार झालें.

जें भगवद्गीता म्हणिजे । जें ब्रह्मेशांनी[1] प्रशंसिजे ।
जें सनकादिकी सेविजे । आदरेंसी ॥ ५५ ॥

---

जैसे शारदीचिये चंद्रकळे-। माजि अमृतकण कोंवळे ।
ते वेंचिती मनें मवाळें । चकोरतलगें ॥ ५६ ॥
तियापरी श्रोता । अनुभवावी हे कथा ।
अति हळुवारपण[2] चित्ता । आणूनियां ॥ ५७ ॥
हें शब्देंवीण संवादिजे[3] । इंद्रिया नेणतां भोगिजे ।
बोलाआदि झोंबिजे । प्रमेयासी ॥ ५८ ॥
जैसे भ्रमर पराग नेती । परी कमळदळें नेणती ।
तैसी पैरी[4] आहे सेविती । ग्रंथी इये ॥ ५९ ॥
कां आपुला ठाय न सांडिता । आलिंगिजे चंद्र प्रगटता ।
हा अनुराग भोगितां । कुमुदिनी जाणे ॥ ६० ॥
ऐसेनि गंभीरपणें । स्थिरावलेनि अंतःकरणें ।
आथिलें[5]-तोचि जाणे । मानू इये ॥ ६१ ॥

---

अहो अर्जुनाचिये पांती[6] । जे परिसणया योग्य होती ।
तिहीं कृपा करूनि संतीं । अवधान द्यावें ॥ ६२ ॥
हें सलगी म्यां म्हणितलें । चरणा लागोनि विनविलें ।
प्रभू सखोल हृदय आपुलें । म्हणऊनिया ॥ ६३ ॥
जैसा स्वभाव मायबापांचा । अपत्य बोले जरी बोबडी वाचा ।
तरी अधिक तयाचा । संतोष आथी ॥ ६४ ॥
तैसा तुम्हीं मीं अंगीकारिला । सज्जनीं आपुला म्हणितला ।
तरी उणें सहजें उपसांहला[7] । प्रार्थू काई ? ॥ ६५ ॥

---

१ ब्रह्मा व शंकर यानीं. २ मवाळपण, मृदुत्व. ३ बोलावें. ४ सेविती परी ह्म० सेवनाचा प्रकार ५ संपन्न, युक्त. ६ पंक्तीला, बरोबर. ७ क्षमा करायला.

परी अपराध तो आणीक आहे । जें मी गीतार्थ कवळूं पाहें ।
तें अवधारा विनवूं लाहें । म्हणऊनिया ॥ ६६ ॥
हें अनावर न विचारिता । वायाचि [१]धिंवसा उपनला चित्ता ।
येरवीं काय भानुतेजीं खद्योता । शोभा आथी ? ॥ ६७ ॥
कीं टिटिभू चाचुवरी । माप सूये सागरीं ।
मी नेणत त्यापरी । प्रवर्ते एथ ॥ ६८ ॥
तया गीतार्थाची थोरी । स्वयें शंभू विवरी ।
जेथ भवानी प्रश्न करी । चमत्कारोनी ॥ ७० ॥
तेथ हर म्हणे नेणिजे । देवी जैसें का स्वरूप तुझें ।
तैसें हें नित्य नूतन देखिजे । गीतातत्त्व ॥ ७१ ॥
हा वेदार्थसागर । जया निद्रिताचा [२]घोर ।
तो स्वयें श्रीसर्वेश्वर । प्रत्य[३]क्ष अनुवादला ॥ ७२ ॥
ऐसें जें अगाध । जेथ वेडावती वेद ।
तेथ अल्प मी मतिमंद । काय होय ॥ ७३ ॥
हें अपार कैसेनि कवळावें । महातेज कवणें धवळावें ।
गगन मुठी [४]सुवावें । मशकें केवी ॥ ७४ ॥
परी एथ असे एक आधारू । तेणेंचि बोलें मी स[५]धरू ।
जे सानुकूळ श्रीगुरू । ज्ञानदेवो म्हणे ॥ ७५ ॥
का जयातें कामधेनु माये । तयासी अप्राप्य काहीं आहे ? ।
म्हणऊनि मी प्रवर्तो [६]लाहे । ग्रंथीं इये ॥ ७९ ॥
तरी न्यून तें पुरतें । अधिक तें [७]सरतें ।
करूनि घ्यावें हें तुमतें । विनवित असें ॥ ८० ॥ ( अ० १ )

---

१ धैर्य उपजलें. २ योगनिद्रेंतल्या आदिनारायणाचें घोरणें तो हा वेद. 'यस्य निःश्वासित वेदाः' ३ स्वमुखानें. ४ धरावें. ५ धैर्यवंत. ६ इच्छितो. ७ मान्य.

## ३ स्फुट गौरवोद्गार.

१

आजी श्रवणेंद्रियां पाहलें[1] । जे येणें गीतानिधान देखिलें ।
आता स्वप्नचि हें तुकलें[2] । साचासारिखें ॥ १ ॥
आधींच विवेकाची गोठी । वरी प्रतिपादी श्रीकृष्ण जगजेठी[3] ।
आणि भक्तराज किरीटी । परिसत असे ॥ २ ॥
आता इद्रियजात आववें । तिंही श्रवणाचें घर रिघावें ।
मग सवादसुख भोगावें । गीताख्य हें ॥ ५ ॥ ( अ० ४ )

२

ऐसीं श्रीमुखौनि अक्षरें । निघतीना जव एकसरें ।
तव अविद्येचें आंधारें । जावोंचि लागे ॥ १७७ ॥
तीं अक्षरें नव्हती देखा । ब्रह्मसाम्राज्यदीपिका[4] ।
अर्जुनालागी चित्कळिका । उजळलिया श्रीकृष्णें ॥ १७८ ॥
प्राजळ वोवीप्रबधें । गोठी सागिजेल विनोदें ।
ते परिसा आनदें । ज्ञानदेवो म्हणे ॥ ७०७ ॥
भरोनि सद्भावाची[5] अजुळी । मिया वोवियाफुलें मोकळीं ।
अर्पिलीं अंध्रियुगुळीं[6] । विश्वरूपाच्या ॥ ७०८ ॥ ( अ० ११ )

३

बाप बाप ग्रंथ गीता । जो वेदीं प्रतिपाद्य देवता ।
तो श्रीकृष्ण वक्ता । जिये ग्रंथीं ॥ २६ ॥ ( अ० ११ )

४

समर्थाचिया[7] पक्तिभोजनें । तळिल्यावरिल्या एक पक्वान्नें ।

---

१ उजाडलें, प्रकाशलें. २ गोड स्वप्नच खऱ्यासारखें झालें आहे. ३ जगात श्रेष्ठ. ४ ब्रह्मसाम्राज्याला प्रकाशित करणाऱ्या ज्ञानरूप ज्योती. ५ विमलभावाच्या अजुळींत. ६ दोन्ही चरणावर. ७ जातिवत श्रमित जो असतो त्याच्या पक्तींत खालचावरचा हा भेद नसतो, पक्तिप्रपच नसतो.

तेवी श्रवणें अर्थे पठणें । मोक्षचि लाभे ॥ ४८ ॥ (अ० १८)

### ४ नऊ अध्यायांचें पूर्वखंड.

मग ह्मणितलें जी स्वामी[1] । भलेनि ममत्वें देखिला तुम्ही ।
म्हणोनि कृष्णार्जुनसंगमी । प्रयागवट जाहलों ॥ १६ ॥
मागा दूध दे म्हणितलियासाठीं। आघविया क्षीराब्धीची करूनि वाटी।
उपमन्यूपुढें धूर्जटी[2] । ठेविली जैसी ॥ १७ ॥
तैसी जे ब्रह्मविद्यारावो । सकळशास्त्रांचा विसवता[3] ठावो ।
ते भगवद्गीता वोविये गावो । ऐसें केलें ॥ १९ ॥
आता आपुलेनि कृपाप्रसादें । मिया भगवद्गीता वोवीप्रबधें ।
पूर्वखंड[4] विनोदें । वाखाणिलें ॥ २३ ॥

---

प्रथमी अर्जुनाचा विषाद । दुजी बोलिला योग[5] विशद ।
परी सांख्यबुद्धीसी भेद । दावूनियां ॥ २४ ॥
तिजी केवळ कर्म प्रतिष्ठिलें। तेंचि चतुर्थी ज्ञानेंसी[6] प्रगटिलें ।
पंचमी गव्हँरिलें[7] । योगतत्व ॥ २५ ॥
तेंचि षष्ठामाजी प्रगट । आसनालागोनि[8] स्पष्ट ।
जीवात्मभाव एकवट । होती जेणें ॥ २६ ॥
तैसी जे योगस्थिती । आणि योगभ्रष्टां जे गती ।
ते आवघीचि उपपत्ती । सांगितली षष्ठी ॥ २७ ॥
तयावरी सप्तमीं । प्रकृतिपरिहार उपक्रमी[9] ।
भजती जे पुरुषोत्तमी । ते बोलिले चौरी[10] ॥ २८ ॥

---

१ अहो सद्गुरु निवृत्तिनाथ महाराज ! २ शंकराने. ३ विश्रांतिस्थान. ४ पहिले नऊ अध्याय. ५ कर्मयोग, बुद्धियोग ६ ज्ञानासह. ७ गौरवयुक्त किंवा गूढपणें सांगितलें. ८ आसनापासून आरंभ करून जीवात्म्याचें ऐक्य करणारा योग सांगितला. ९ आरंभीं. १० चतुर्विधभक्त.

पाठी सप्तप्रश्नसिद्धी । बोलोनि प्रयाणसमयशुद्धी ।
एव सकळवाक्यावधी । अष्ठमाध्यायी ॥ २९ ॥
आघवाचि जें महाभारतीं । ते लाभे कृष्णार्जुनवचनोक्ती ।
आणि जो अभिप्रावो गीते सातीं शती । तो एकलाचि नवमीं ॥३१॥
ऐसे अध्याय गीतेचे । परी अनिर्वाच्यपण नवमाचें ।
तो अनुवादलों हें तुमचें । सामर्थ्य प्रभू ॥ ३५ ॥
नवमी कृष्णाचें बोलणें । तें नवमीचियाचि ऐसें मी म्हणे ।
या निवाडा तत्वज्ञ जाणे । जया गीतार्थ हाती ॥३०॥ (अ० १०)

## ५ अठराही अध्यायांतले विषय.

तरी पहिला जो अध्याय । तो शास्त्रप्रवृत्तिप्रस्ताव[1] ।
द्वितीयी साख्यसद्भाव । प्रकाशिला ॥ १४३५ ॥
मोक्षदानी स्वतत्र । ज्ञानप्रधान हें शास्त्र[2] ।
येतुलालें दुजी सूत्र । उभारिलें ॥ १४३६ ॥
मग अज्ञानें बाधलेया । मोक्षपदी बैसावया ।
साधनारभ तो तृतीया -। ध्यायीं बोलिला ॥ १४३७ ॥
जे देहाभिमानबधें । साडूनि काम्यनिषिद्धें ।
विहितें[3] परी अप्रमादें । अनुष्ठावें ॥ १४३८ ॥
ऐसेंनि सद्भावें कर्म करावें । हा तिजा अध्यायी देवें ।
निर्णय केला तें जाणावें । **कर्मकांड** येथ ॥ १४३९ ॥

---

आणि तेंचि नित्यादिक । अज्ञानाचें आवश्यक ।
आचरता मोचक[4] । केवि होय पा ॥ १४४० ॥
ऐसी अपेक्षा जालिया । बद्ध मुमुक्षुते आलिया ।
देवें ब्रह्मार्पणत्वें क्रिया । सागितली ॥ १४४१ ॥
जें देहवाचामानसें । विहित निपजे जें जैसें ।

१ गीताशास्त्राच्या आरभींची प्रस्तावना. २ गीताशास्त्र. ३ नित्यनैमित्तिक कर्मेच पण अचूक करावींत. ४ सोडविणारें.

तें एक ईश्वरोद्देशें । कीजे म्हणितलें ॥ १४४२ ॥
हेंचि ईश्वरीं कर्मयोगें । भजनकथनाचें खागें ।
आदरिलें[2] शेषभागें[3] । चतुर्थाचेनि ॥ १४४३ ॥
तें विश्वरूप अकरावा । अध्याय सपे जव आघवा ।
तंव कर्मे ईश भजावा । हें जें बोलिलें ॥ १४४४ ॥
ते अष्टाध्यायी[4] उघड । जाण येथें **देवताकांड** ।
शास्त्र सागतसे आड[5] । मोडूनि[6] बोले ॥ १४४५ ॥

———

आणि तेणेंचि ईशप्रसादें[7] । श्रीगुरुसंप्रदायलब्धें ।
साच ज्ञान उद्बोधे । कोवळें जें ॥ १४४६ ॥
तें अद्वेष्टादिप्रभृतिकी । अथवा अमानित्वादिकी ।
वाढविजे म्हणौनि लेखीं । बारावा गणूं[8] ॥ १४४७ ॥
तो बारावा अध्याय आदी । आणि पधरावा अवधी[9] ।
ज्ञानफळपाकसिद्धी । निरूपणासी ॥ १४४८ ॥
म्हणौनि चहुहीं इहीं । ऊर्ध्वमूळांतीं अध्यायी ।
**ज्ञानकांड** ये ठायी । निरूपिजे ॥ १४४९ ॥
एव काडत्रयरूपिणी । श्रुतीच हे कोडिसवाणी[10] ।
गीतापद्यरत्नांचीं लेणीं । लेयिली आहे ॥ १४५० ॥
हें असो कांडत्रयात्मक । श्रुति मोक्षरूप फळ येक ।
बोभावे[11] जें आवश्यक । ठाकावें म्हणौनि ॥ १४५१ ॥
तयाचेनि साधनें[12] ज्ञानेसी । वैर करी जो प्रतिदिवसी ।

---

१ उपासनेचा विषय किंवा स्थान. २ आरंभिलें. ३ शेवटीं शेवटी. ४ चौथ्याच्या शेवटच्या भागापासून अकराव्याच्या शेवटपर्यंतचे आठ अध्याय. ५ पडदा, प्रतिबंध. ६ दूर करून, निवारून. ७ उपासनेनें प्रसन्न झालेल्या देवाच्या दयेनें. ८ म्हणून ज्ञानकांडात बारावा अध्याय गणू. ९ बारावा ते पधरावा हे चार अध्याय ज्ञानकांडाचे. १० गोजिरवाणी, लहानगी, ११ गर्जना करून सागत आहे. १२ मोक्षाचें साधन जें ज्ञान त्याच्याशीं.

तो अज्ञानवर्ग षोडशी । प्रतिपादिजे ॥ १४५२ ॥
तोचि शास्त्राचा बोळावा । घेवोनि वैरी[2] जिणावा ।
हा निरोप तो सतरावा । अध्याय येथ ॥ १४५३ ॥
तया अर्थजाता अशेखा । केला तात्पर्याचा औवाका ।
तो हा अठरावा देखा । कलशाध्याय ॥ १४५५ ॥
एवं सकळसाख्येंसिधु । श्रीभगवद्गीता प्रबधू ।
हा औदार्यें आगळा वेदु । मूर्त जाण ॥ १४५६ ॥ (अ० १८)

## ६ गीताप्रासाद.

लोकी तरी आथी ऐसें । जे दुरूनि कळस दिसे ।
आणि भेटीचि हातवसे । देवतेची तिये[7] ॥ ३१ ॥
तैसेंचि एथही आहे । जे एकेंचि येणें अध्यायें ।
आघवाचि दृष्ट होये । गीतागम हा ॥ ३२ ॥
मी कळस याचिकारणे । अठरावा अध्याय म्हणे ।
उर्वाइला बादरायणें । गीताप्रासादा ॥ ३३ ॥
जी गीतारत्नप्रासादाचा । कळस अर्थचितामणीचा ।
सर्व गीतादर्शनाचा । पाढाऊ जो ॥ ३४ ॥
व्यास सहजें सूत्री बळी । तेणें निगमरत्नाचळी ।
उपनिषदार्थाची मोळी[12]–। माजी खाडिली[13] ॥ ३५ ॥

---

१ सोबती. २ दभोदर्पोभिमानश्च इ० अज्ञानगुणवर्ग हा शत्रु जिंकावा. ३ विचार, एकीकरण. ४ ज्ञानसमुद्र. ५ गीताग्रथ हा औदार्यगुणानें श्रेष्ठ असा मूर्तिमत वेदच होय ६ हस्तगत होणें ७ कळस दिसला की देवदर्शन झाले. ८ चढविला, बसविला आहे ९ कलशाध्याय, ह्म० अठरावा अध्याय हा अर्थरूप चिंतामणीचा बनविला आहे १० वाटाड्या, मार्गदर्शक ११ कारागीर. १२ पर्वताच्या माथ्यावरच्या पठारावर. १३ वेदरूप रत्नपर्वताच्या उपनिषद्रूप पठारावर खणायला प्रारभ केला.

तेणें त्रिवर्गाचा अणुआरु[1] । आडेऊ[2] निघाला जो अपारु ।
तो महाभारतप्राकारु । भोंवता[3] केला ॥ ३६ ॥
माजी आत्मज्ञानाचें एकवट[4] । दळवाडें झाडूनि चोखट ।
घडिलें पार्थवैकुंठ-। संवादकुसरी ॥ ३७ ॥
निवृत्तिसूत्र सोडवणियां[5] । सर्वशास्त्रार्थ पुरवणियां[6] ।
आंवो साधला मांडणिया[7] । मोक्षरेखेचा ॥ ३८ ॥
ऐसेनि करिता उभारा । पंधरा अध्यायात पंधरा ।
भूमी निर्वाळलियां[8] पुरा । प्रासाद जाहला ॥ ३९ ॥
उपरि सोळावा अध्यावो । तो ग्रीवेघंटेचा[9] आवो ।
सप्तदश तो ठावो । पडघंणिये[10] ॥ ४० ॥
तयाहीवरी अष्टादश । तो अपैसा मांडला कळस ।
उपरि गीतादिकी व्यास-। ध्वज लागला ॥ ४१ ॥
जालया कामा नाही चोरी[11] । तें कळसें होय उजरी[12] ।
तेवीं अष्टादश विवरी । साद्यंत गीता ॥ ४३ ॥
अठरावा अध्याय नोहे । ते एकाध्यायी गीताचि आहे । (अ० १८)

## ७. गीतारहस्य

हें गीतानाम विख्यात । सर्व वाङ्मयाचें मथित ।
आत्मा जेणें हस्तगत । रत्न होय ॥ १३२३ ॥
गीतार्थीचें[13] चांगावें । मोक्षोपायपर आघवें ।

---

१ त्रिविधपुरुषार्थरूप चाराचुरा. २ डबर, गाळ. ३ गीतामंदिराभोंवतीं महाभारताचा कोट केला. ४ एकजीव, अखंड घनवट पाषाण ( दळवाडें ). ५ ओळंबा. ६ भर. ७ त्या चिऱ्याच्या मांडणीनें मोक्षाच्या रूपाचा आकार आणला. ८ जमीन शुद्ध करण्यापासून. ९ कंठ किंवा गळा त्यावरील डेऱ्याचा आकार. १० कळसाच्या बैठकीचा ओटा. ११ कमीपणा. १२ स्पष्ट. १३ गीताशास्त्राचें चांगुलपण हें आहे कीं संपूर्ण गीताशास्त्र मोक्षाचे उपाय सांगणारें आहे, अन्य शास्त्राचे उपाय असे प्रमाणसिद्ध नाहींत.

आन शास्त्रोपाय की नव्हे । प्रमाणासिद्ध ॥ १२३० ॥
वारा आभोळचि फेडी । वांचून सूर्यातें न घडी ।
का हात बाबुळी धाडी । तोय न करी ॥१२३१ ॥
तैसा आत्मदर्शनीं आडेळ । असे अविद्येचा जो मळ ।
तो शास्त्रें नाशी येर निर्मळ । मी प्रकाशे स्वयें ॥ १२३२ ॥
ह्मणोनि आघवींचि शास्त्रें । अविद्याविनाशाचीं पात्रें ।
वाचोनि न होती स्वतंत्रें । आत्मबोधीं ॥ १२३३ ॥
तया अध्यात्मशास्त्रासी । जै साचपणाची ये पुसी ।
तै येइजे जया ठायासी । ते हे गीता ॥ १२३४ ॥
एथ अविद्यानाश हें स्थळ । तेणें मोक्षापादन हें फळ ।
या दोंही केवळ । साधन ज्ञान ॥ १२४३ ॥
मग म्हणे गा सुभटा । तो क्रमयोगि या निष्ठा ।
मी होऊनि होय पैठा । माझ्या रूपीं ॥ १२४६ ॥
स्वकर्मांच्या चोखौळीं । मज पूजा करूनि भली ।
तेणें प्रसादें आकळी । ज्ञाननिष्ठेतें ॥ १२४७ ॥
ते निष्ठा जेथ हातवसे । तेथ भक्ति माझी उल्लासे ।
तियां मजसीं समरसे । सुखिया होय ॥ १२४८ ॥
बुद्धी वाचा कायें । जो मातें आश्रऊनि ठाये ।
तो निषिद्धेंही विपायें । कर्मे करूं ॥ १२५१ ॥
शुभाशुभ ऐसें । हें तंवचिवरी आभासे ।
जव येकें न प्रकाशें । सर्वत्र मी ॥ १२५५ ॥

---

१ सूर्याआड आलेले ढग. २ पाण्यावर जमलेलें गोंडाळ, शेवाळ. ३ प्रतिबंधक. ४ इतर शास्त्रें. ५ प्रश्न ६ विषय. ७ अविद्यानाश व मोक्षप्राप्ति या दोहोंस. ८ प्रविष्ट ९ चांगल्या फुलांनीं. १० हातीं येते, प्राप्त होतें. ११ त्या भक्तीच्या योगानें. १२ क्वचित्, एखादे वेळीं. १३ एक जो मी तो सर्वव्यापिपणानें अनुभवाला आला नाहीं तोंवरच.

म्हणौनि माझिया भेटी । तयाची सर्व कर्मे किरीटी ।
जाऊनि बैसे तो पाटीं । सायुज्याच्या ॥ १२५७ ॥
देशें काळें स्वभावें । वेंच जया न संभवे ।
तें पद माझें पावे । अविनाश तो ॥ १२५८ ॥ ( अ० १८ )

२

नाना वाढली दिवसें । कळा बिंबी पैसे ।
परी[२] सिनाने लेवे जैसे । चद्री नाही ॥ ५३ ॥
तैसीं सिनानी चारीं पदें । श्लोक श्लोकावच्छेदें ।
अध्याय अध्यायभेदें । गमे कीर ॥ ५४ ॥
परी प्रमेयाची उजरी । आनान रूप न धरी ।
नाना रत्नमणी दोरी । एकचि जैसी ॥ ५५ ॥
फुला फुलसरां लेख चढे । द्रुतीं दुती अगुळी न पडे ।
श्लोक अध्याय तेणें पाडें । जाणावे हे ॥ ५७ ॥
सात शतें श्लोक । अध्याया अठराचे लेख ।
परी[६] देव बोलिलें एक । जें दुजें नाहीं ॥ ५८ ॥ ( अ० १८ )

## ८ वेदाचें मूळ गीता.

एव वेदाचें मूळसूत्र । सर्वाधिकारैकपवित्र ।
श्रीकृष्णें गीताशास्त्र । प्रगट केलें ॥ १४२६ ॥
जयाच्या निःश्वासीं । जन्म झालें वेदराशी ।
तो सत्यप्रतिज्ञ पैजेसीं । बोलिला स्वमुखें ॥ १४२८ ॥

---

१ पट्ट, अधिकाराचें आसन पाटीं=पदावर. २ पण जसे त्यावर वेगवेगळे ( सिनाने ) थर ( लेवे ) दिसत नाहीत. ३ सिद्धांताच्या ( ज्ञानाच्या ) प्रकाशात अनेकत्व नाहीं. ४ फुलाचे हार. ५ सुवासात. ६ परब्रह्म एकीएक 'एकमेवाद्वितीय' आहे हें गीतेचें प्रमेय ७ सर्वांना गीतेचा अधिकार असल्यामुळें अतिपवित्र ८ प्रतिज्ञेवर, बुद्धिपुरस्सर.

म्हणोनि वेदां मूळभूत । गीता म्हणों हें होय उचित ।
आणिकही एकी येथ । उपपत्ति[1] असे ॥ १४२९ ॥
जें[2] न नशत स्वरूपें । जयाचा विस्तार जेथ लपे ।
तें तयाचें म्हणिपे । बीज जगीं ॥ १४३० ॥
तरी काडत्रयात्मक । शब्दराशी अशेख ।
गीतेमाजीं असे रुखं[3] । बीजीं जैसा ॥ १४३१ ॥
म्हणोनि वेदाचें बीज । श्रीगीता होय हें मज ।
गमे आणि सहज । दिसतही आहे ॥ १४३२ ॥ (अ० १८)

## ९ गीतेची सर्वसेव्यता.

वेद संपन्न[4] होय ठाई । परी कृपण ऐसा आन[5] नाही ।
जे कानी[6] लागला तिहीं । वर्णांच्याची ॥ १४५७ ॥
येरां भवव्यथा ठेलियां[7] । स्त्रीशूद्रादिका प्राणिया ।
अनवसर[8] माडूनिया । राहिला आहे ॥ १४५८ ॥
तरी मज पाहता तें मागील उणें । फेडावया गीतापणें ।
वेद वेठला[9] भलतेणें[10] । सेव्य होआवया ॥ १४५९ ॥
यालागी मागिली कुंटी[11] । भ्याला वेद गीतेच्या पोटीं ।
रिगाला आता गोमटी[12] । कीर्ति पावला ॥ १४६५ ॥
म्हणौनि वेदाची सुसेव्यता[13] । ते हे मूर्त जाण श्रीगीता ।
श्रीकृष्णें पाडुसुता । उपदेशिली ॥ १४६६ ॥
परी वत्साचेनि वोरसें[14] । दुभतें होय घराउद्देशें ।
जालें पाडवाचेनि मिषें । जगदुद्धरण ॥ १४६७ ॥

---

१ सयुक्तिक कारण २ स्वरूपानें अविनाशी. ३ वृक्ष. ४ वेद मूळचाच समर्थ हे. ५ दुसरा कोणी. ६ तीन वर्णांनींच ऐकला. ७ ससारानें गाजलेल्या रास. ८ अनधिकारी, वर्ज्य ठरवून. ९ आकारला १० वाटेल त्यानें. ११ वाद, निंदा. १२ चांगली. १३ सर्वसेव्य रूप १४ प्रेमानें, पान्हा फुटून.

चातकाचिये कणवें । मेघ पाणियेसीं धावे ।
तेथ चराचर आघवें । निवालें जेवीं ॥ १४६८ ॥
तैसें अर्जुनाचेनि व्याजें । गीता प्रकाशूनि श्रीराजें ।
ससारायेवढें थोर ओझें । फेडिलें जगाचें ॥१४७०॥(अ०१८)

## १० अर्जुनाची पावती.

**श्रीकृष्णः**—तरी साग पा पाडवा । हा शास्त्रसिद्धात आघवा ।
तुज एकचित्तें फावा । गेला आहे [1] ? ॥ १५४० ॥
स्वाज्ञानजनितें । मागिले मोहें तूतें ।
भुलविले तो येथें । असे कीं नाहीं ? ॥ १५४४ ॥

**अर्जुन**—मोह असे कीं नाहीं । हें ऐसें जी पुससी काई ? ।
कृतकृत्य जाहलों पाही । तुझेपणें ॥ १५६२ ॥
गुतलों होतों अर्जुनगुणें । तो मुक्त झालों तुझेपणें ।
आतां पुसणें सांगणें । दोन्ही नाहीं ॥ १५६३ ॥
जी तुमचेनि प्रसादें । लाधलेनि आत्मबोधें ।
मोहाचे तया कांदे । नेदीच उरों ॥ १५६४ ॥
तुझेनि मज मी पावोनि । कर्तव्य गेलें निपटूनी ।
परी आज्ञा तुझीवांचोनी । आन नाहीं प्रभो ! ॥ १५६७ ॥
तू माझा जी निरुपचारू । श्रीकृष्णा ! सेव्य सद्‌गुरु ।
मी ब्रह्मतेचा उपकारू । हाचि मानी ॥ १५७३ ॥
जें मजतुझाआड । होतें भेदाचें कवाड ।
तें फेडोनि केलें गोड । सेवासुख ॥ १५७४ ॥
तरी आता तुझी आज्ञा । सकळ देवाधिदेवराज्ञा ।
करीन देईं अनुज्ञा । भलतियेविषयीं ॥ १५७५ ॥

---

१ समजुतीस आला वा ? २ स्वस्वरूपाच्या अज्ञानामुळें उद्भवलेला मोह. ३ मागें. ४ तुझा झाल्यानें. ५ मुळ्या, बीज. ५ निर्निमित्त, निरपेक्ष. ७ पडदा.

## ११ गीता ही प्रभूची वाङ्मयमूर्ति.

गीता हे सप्तशती–। मंत्र प्रतिपाद्य भगवती ।
मोहमहिषा मुक्ती । आनंदली असे ॥ १६६७ ॥
म्हणौनि मनें कायें वाचा । जो सेवक होईल इयेचा ॥
तो स्वानंदसाम्राज्याचा । चक्रवर्ती करी ॥ १६६८ ॥
शास्त्र वाच्यें अर्थें फळे । मग आपण मावळे ।
तैसें नव्हें हें सगळें । परब्रह्मचि ॥ १६८६ ॥
म्हणौनि मज कांहीं । समर्थनीं आतां विषय नाही ।
गीता जाणा हे वाङ्मयी । मूर्ति श्रीप्रभूची ॥१६८५॥ (अ०१८)

## १२ संजयाचा पूर्णोद्गार.

यया बोला संजयो म्हणे । जी येरयेरांचें मी नेणें ।
परि आयुष्यें तेथें जिणें । हें फुडें कीं गा ॥ १६३२ ॥
चंद्र तेथें चंद्रिका । शंभु तेथें अंबिका ।
संत तेथें विवेका । असणें कीं जी ॥ १६३३ ॥
रावो तेथें कटक । सौजन्य तेथें सोइरीक ।
वान्हि तेथें दाहक । सामर्थ्य कीं ॥ १६३४ ॥
दया तेथें धर्म । धर्म तेथें सुखागम ।
सुखीं पुरुषोत्तम । असे जैसा ॥ १६३५ ॥
वसंत तेथ वनें । वन तेथ सुमनें ।
सुमनीं पालिंगनें । सारंगाचीं ॥ १६३६ ॥
गुरु तेथ ज्ञान । ज्ञानीं आत्मदर्शन ।
दर्शनीं समाधान । आथि जैसें ॥ १६३७ ॥
भाग्य तेथ विलास । सुख तेथ उल्हास ।

---

१ कौरवपांडवांचें पुढें युद्धांत काय होईल. तें २ आयुष्य तेथें जगणें आहेच. ३ समुदाय. ४ भ्रमराचे.

हें असो तेथ प्रकाश । सूर्य जेथें ॥ १६३८ ॥
तैसे सकळ पुरुषार्थ । जेणें स्वामी का सनाथ ।
तो श्रीकृष्णरावो जेथ । तेथ लक्ष्मी ॥ १६३९ ॥
आणि आपलेनि कांतेसीं । ते जगदंबा जयापासी ।
अणिमादिकी काय दासी । नव्हती तयातें ? ॥ १६४० ॥
विजयी नामें अर्जुन विख्यात । विजयस्वरूप श्रीकृष्णनाथ ।
श्रियेसी विजय निश्चित । तयांचि असे ॥ १६४२ ॥
तयाचिये देशींच्या झाडीं । कल्पतरूतें होडी ।
न जिणावें का येवढी । मायबापें असतां ? ॥ १६४३ ॥
ते पाषाणही आघवे । चिंतारत्नें का नोहावे ।
तिये भूमिके का न यावें । सुवर्णत्व ? ॥ १६४४ ॥
तयाचिया गावीचिया । नदी अमृतें वाहाविया ।
नवल काय राया । विचारी पा ॥ १६४५ ॥
तयाचे बिसाट[2] शब्द । सुखें म्हणों येती वेद ।
सदेह सच्चिदानद । कां नोहावे ते ? ॥ १६४६ ॥
म्हणोनि जिया बाहीं[3] उभा । तो लक्ष्मियेचा वल्लभा ।
तेथ सर्व सिद्धि स्वयभा । येर मी नेणे ॥ १६४८ ॥
जेथ तो श्रीवल्लभ । जेथ भक्तकदंब ।
तेथ सुख आणि लाभ । मगळाचा ॥ १६५८ ॥
सातां शताचा । इत्यर्थ हा श्लोक शेषीचा ।
व्यासशिष्य सजयाचा । पूर्णोद्धार जो ॥ १६६३ ॥ ( अ० १८ )

## १३ गीतेचा संप्रदाय.

तरी निधान[4] जोडावया । भाग्य घडे गा धनजया ।
परि जोडिलें भोगावया । विपायें होय ॥ १४७५ ॥

1 पैजेनें. २ भरमसाट, स्वैरालाप. ३ बाजूला, पक्षाला. ४ गुप्तधन. क्वचित्, विरळ.

गाय धड जोडे गोमटी । ते तैंचि पय दे किरीटी ।
जै जाणिजे हातवटी । साजवणीची ॥ १४८३ ॥
तैसा श्रीगुरु प्रसन्न होये । शिष्य विद्याही कीर लाहे ।
परी ते फळे सप्रदायें । उपासिलिया ॥ १४८४ ॥
म्हणोनि शास्त्रीं जो इये । उचित सप्रदाय आहे ।
तो ऐक आतां बहुवें आदरेसीं ॥ १४८५ ॥

---

तरी तुवा हें जें पार्था । गीताशास्त्र लाधलें आस्था ।
तें तपोहीना सर्वथा । सागावेंना हो ॥ १४८६ ॥
अथवा तापसही जाला । परि गुरुभक्तीं जो ढिला ।
तो वेदीं अंत्यज वाळिला । तैसा वाळी ॥ १४८७ ॥
का तपही जोडे देहीं । भजे गुरुदेवान्या ठायी ।
परी आकर्णनीं नाही । चाड जरी ॥ १४८९ ॥
मुक्ताफळ भलतैसें । हो परी मुखं नसे ।
तव गुण प्रवेशे । तेथ कायी ? ॥ १४९१ ॥
म्हणोनि तप भक्ती । पाहावे ते सुभद्रापती ।
परी शास्त्रश्रवणीं अनासक्ती । तरी वाळावेचि ते ॥ १४९६ ॥
नातरी तप भक्ती । होवोनि श्रवणीं आर्ती ।
आथी—ऐसीही आयती । देखसी तरी ॥ १४९७ ॥
तरी गीताशास्त्रानिर्मिता । जो मी सकळलोकशास्ता ।
तया मातें सामान्यता । बोलेल जो ॥ १४९८ ॥
माझिया सज्जनेंसीं मातें । पैशुन्येंाचोनि आव्हाते ।

---

१ दूध काढण्याची, दोहनाची हातोटी. २ कच्चा. ३ टाक. ४ श्रवणाची आस्था. ५ मोतीं. ६ छिद्र, तोंड. ७ सामुग्री. ८ सज्जनाना किंवा भक्ताना आणि मला. ९ निष्ठुरपणाने, निंदा करून. १० बोलणारे.

ऐक आहाती तयांतें । योग्य न म्हणें ॥ १४९९. ॥

---

म्हणोनि तपाचा धनुर्धरा । तळीं दाटोनि गाडोरा।
वरी गुरुभक्तीचा पुरा । प्रासाद जो जाहला ॥ १५०७ ॥
आणि श्रवणेच्छेचा पुढां । दारवंटा सदा उघडा ।
वरी कलश चोखडा । अनिंदारत्नाचा ॥ १५०८ ॥
ऐशा भक्तालयीं चोखटीं । गीतारत्नेश्वर हा प्रतिष्ठीं ।
मग माझिया संवसाटी । तुकसी जगीं ॥ १५०९. ॥
हे मंत्ररहस्य गीता । मेळवी जो माझिया भक्तां ।
अनन्यजीवना माता । बाळका जैसी ॥ १५१२ ॥
सज्जनांच्या मेळापीं । गीतापद्यरत्नीं उमँपीं ।
वर्षे जो माझ्या रूपीं । हेतु ठेऊनी ॥ १५२१ ॥
मग तयाचेनि पाडें । पाढियतें मज फुडें ।
नाहींच गा मागें पुढें । न्याहाळितां ॥ १५२२ ॥
गीतापाठकासी असे । फळ अर्थज्ञाचिसरिसें ।
गीतामाउलिये की नसे । जाणें तान्हें ॥ १५२८ ॥
कानाच्या महाद्वारीं । गीता गजर जेथ करी ।
तेथ सृष्टीचिये आदीवेरी । जायचि पाप ॥ १५३३ ॥
ऐसी गीता धनंजया । ऐकतया आणि पढतया ।
फळे महानंदें मिया । बहु काय बोलों ॥ १५३७ ॥ (अ० १८ )

---

१ कित्येक, कोणी. २ श्रवणायोग्य. ३ दगडी मजबूत पाया. ४ निर्मळ. ५ बरोबरीनें. ६ तुलशील, पात्र होशिल. ७ पुष्कळ. ८ जाणतें व नेणतें हा भेद. ९ आरंभापासूनचें.

# ५ प्रस्तुत ग्रंथाचें व मऱ्हाठी भाषेचें गौरव.

## १ याच्या श्रवणांतच मोक्ष मिळेल.

जो शातचि अभिनैवेल । ते परियसा मऱ्हाटे बोल ।
जे समुद्राहूनि सखोल । अर्थभरित ॥ २१४ ॥
जैसें बिंब तरी बचकेचिएवढें । परी प्रकाशा त्रिभुवन थोकडें ।
शब्दाची व्याप्ति तेणें पाडें । अनुभवावी ॥ २१५ ॥
नातरी कामितयाचिया इच्छा । फळे कल्पवृक्ष जैसा ।
बोल व्यापक होय तैसा । तरी अवधान द्यावें ॥ २१६ ॥
हें असो काय म्हणावें । सर्वज्ञ जाणती स्वभावें ।
तरी निकें चित्त द्यावें । हे विनति माझी ॥ २१७ ॥
जेथ साहित्य आणि शाति । हे रेखा दिसे बोलती ।
जैसी लावण्यगुणकुळवती । आणि पतिव्रता ॥ २१८ ॥
आधींचि साखर आवडे । तेचि जरी ओखदीं जोडे ।
तरी सेवावी ना कोडें । नावांनावा ॥ २१९ ॥
सहजे मलयानिल मद सुगध । तया अमृताचा होय स्वाद ।
आणि तेथेंचि जोडे नादं । जरी दैवगत्या ॥ २२० ॥
तरी स्पर्शें सर्वांग निववी । स्वादें जिव्हेतें नाचवी ।
तेवींचि कानांकरवीं म्हणवी । बाप माझा ॥ २२१ ॥
तैसें कथेचें इये ऐकणें । एक श्रवणांसि होय पारणें ।
आणि ससारदुःख मूळवणें । विकृतीविणें ॥ २२२ ॥
जरी मत्रेंचि वैरी मरे । तरी वायां कां बांधावे कटारे ? ।
रोग जाय दुधेंसाखरें । तरी निंब कां पियावा ? ॥ २२३ ॥

१ प्रगटेल. २ कवित्वरचना. ३ औषधात. ४ आवडीने ५ वारवार. ६ मधुर स्वर. ७ शाबास शाबास. ८ दवडणें. ९ कट्यार.

तैसा मनाचा मार न करितां । आणि इंद्रियां दुःख न देतां ।
एथ मोक्ष असे आयता । श्रवणाचिमाजीं ॥ २२४ ॥ (अ० ४)

## २ निष्कामभक्तासाठीं हा ग्रंथ आहे.

माझा मऱ्हाठचि बोल कौतुकें । परी अमृतातेंहि पैजा जिंके ।
ऐसी अक्षरें रसिकें । मेळवीन ॥ १४ ॥
जिये कोंवळिकेचेनि पाडें । दिसती नादींचे रंग थोडे ।
वेधें परिमळाचे बीक मोडे । जयाचेनि ॥ १५ ॥
ऐका रसाळपणाचिया लोभा । की श्रवणींचि होती जिभा ।
बोलें इंद्रिया लागे कळभा । एकमेका ॥ १६ ॥
सहजें शब्द तरी विषो श्रवणाचा । परी रसना म्हणे रस हा आमुचा ।
घ्राणासि भाव परिमळाचा । हा तोचि होईल ॥ १७ ॥
नवल बोलतीये रेखेची वाहणी । देखता डोळां पुरों लागे धणी ।
ते म्हणती उघडली खाणी । रूपाची हे ॥ १८ ॥
ऐसीं इंद्रियें आपुलालिया भावी । झोंबती परी तो सरिसेपणेंचि
बुझावी । जैसा एकला जग चेववी । सहस्रकर ॥ २० ॥
तैसें शब्दाचें व्यापकपण । देखिजे असाधारण ।
पाहातयां भावज्ञा फावती गुण । चिंतामणीचे ॥ २१ ॥
हें असो तया बोलांची ताटें भली । वरी कैवल्यरसें वाढिली ।
ही प्रतिपत्ति मिया केली । निष्कामासी ॥ २२ ॥
आता आत्मप्रभा नित्य नवी । तेचि करूनि ठाणदिवी ।

१ असे रसाळ व्याख्यान करीन, अशीं रसभरित अक्षरें योजीन. २ सप्तसुराचे. ३ बळ. ४ कलह, प्रत्येक इंद्रिय म्हणेल कीं हा माझा विषय आहे. ५ कवित्वरचनेची पद्धती, ओघ. ६ भेदाभेद न करिता. ७ अलौकिक. ८ अर्थ व रहस्य जाणणारास. ९ वाढलीं. १० ग्रंथरूप मेजवानी. ११ स्थायिक दीप, ठाणवई, नित्यनवी अशी जी आत्मज्योतीची ठाणवई–तिच्या प्रकाशात जो इंद्रियांना विसरून जेवील त्यालाच हा लाभ होईल.

जो इंद्रियातें चोरूनि जेवी । तयासीचि फावे ॥ २३ ॥
तेथ श्रवणाचेनि पांगें— । वीण श्रोतयां व्हावें लागे ।
हे मनाचेनि निजांगें । भोगिजे गा ॥ २४ ॥
ऐसें हळुवारपण जरी येईल । तरीच हें उपेगा जाईल ।
येऱ्हवी आघवी गोठी होईल । मुकयाबहिरयाची ! ॥ २६ ॥
परी तें असो आतां आघवें । न लगे श्रोतयातें कडेसावें ।
जे अधिकारिये एथ स्वभावें । निष्कामकाम ॥ २७ ॥
जिहीं आत्मबोधाचिया आवडी । केली स्वर्गसंसाराची कुरोंडी [3] ।
तेवांचूनि एथींची गोडी । नेणती आणिक ॥ २८ ॥
जैसा वांयसीं चंद्र नोळखिजे । तैसा प्राकृतीं ग्रंथ हा नेणिजे ।
आणि तो हिमांशुचि जेविं खाजें । चकोराचें ॥ २९ ॥
तैसा सज्ञानासी तरी हा ठावो । आणि अज्ञानासी आनं गावो ।
म्हणोनि बोलावया विषय पहाहो । विशेष नाहीं ॥ ३० ॥ (अ० ६)

## ३ मऱ्हाठीचें सौंदर्य.

देशियेचेनि नागरपणें । शांत शृंगारातें जिणे ।
तरी वोविया होती लेणें । साहित्यासी ॥ ४२ ॥
मूळग्रंथीचिया संस्कृता । वरी मऱ्हाठी नीट पाहतां ।
अभिप्राय मानलिया चित्ता । कवण भूमी हें न चोजवे ॥ ४३ ॥
जैसें आंगाचेनि सुंदरपणें । लेणिया आंगचि होय लेणें ।
तेथ अळंकारिलें कवण कवणें । हें निर्वचेना ॥ ४४ ॥
तैसी देशी आणि संस्कृतवाणी । एका भावार्थाच्या सुखासनीं ।
शोभती, आयणी । चोखट आइका ॥ ४५ ॥

---

१ श्रवणाचा पराधीनपणा विसरून. २ जागे करावें. ३ ओवाळणी. ४ कावळयांना. ५ अन्य ग्रंथ. ६ सौंदर्यानें. ७ तेणेंकरून ह्या माझ्या ओंव्याच अलंकारशास्त्राला भूषण होतील. ८मूळ कोणतें हें सांगतां येणार नाहीं. ९ बुद्धी. चोखट ह्म० शुद्ध बुद्धीनें ऐका.

उठावलियां भावा रूप । करितां रसवृत्तीचें लागे वडप[2] ।
चातुर्य म्हणे पडप[3] । जोडलें आम्हा ॥ ४६ ॥
तैसें देशियेचें लावण्य । हिरोनि रसा आणिलें तारुण्य ।
मग रचलें अगण्य । गीतातत्व ॥ ४७ ॥ ( अ० १० )

## ४ आनंदाचें आवारूं मांडूं जगा !

एंव जे महाभारतीं । श्रीव्यासें अप्रांतमतीं[4] ।
भीष्मपर्वसंगती । म्हणितली कथा ॥ ११५५ ॥
तो कृष्णार्जुनसवादु । नागरी[5] बोलीं विशदु ।
सांगोनि दाऊं प्रबंधु[6] । वोवियेचा ॥ ११५६ ॥
नुसधीचि[7] शांतिकथा । आणिजेल कीर वाक्पथा[8] ।
जे शृंगाराच्या माथा[9] । पाय ठेवी ॥ ११५७ ॥
दाऊं वेल्हाळ[10] देशी नवी[11] । जे साहित्यातें वोजावी[12] ।
अमृतातें चुकी ठेवी[13] । गोडसपणें ॥ ११५८ ॥
खेचरांचियें[14] मना । आणी सात्विकाचा पान्हा ।
श्रवणासवें सुमना[15] । समाधि जोडे ॥ ११६० ॥
तैसा वाग्विलास विस्तारू । गीतार्थेसी विश्व भरू ।
आनदाचा आवारूं[16] । मांडू जगा ॥ ११६१ ॥

---

१ पुढें आलेल्या भावाला रूप करीत असतांना ज्ञा० अभिप्राय सागताना २ वर्षाव. ३ प्रतिष्ठा, गौरव. ४ अगाध बुद्धीच्या व्यासानीं. ५ सुदर शब्दांनीं. ६ ओवीबद्ध ग्रथ. ७ सावी, केवळ. ८ वाणीच्या मार्गात, शब्दात. ९ शृगाररसावर मात करणारी, लोकांची शृगारप्रीति नाहींशी करणारी. १० आवडती, लाडकी. ११ देशी किंवा मराठी भाषा अजून नवीनच आहे, हिच्यांत ग्रथनिष्पत्ति अजून फारशी झालेली नाही. १२ सजवील, अलंकारशास्त्राला शोभा आणील. १३ गोडीनें मागें हटविते. १४ पिशाचाच्या, आसुरी प्रकृतीच्या लोकांच्या. १५ शुद्ध मनाच्या सात्विक वाचकाना तर. १६ गावकूस, कोट. आनदाचा कोट साऱ्या जगाला करू.

फिटो विवेकाची वाणी । हो काना मना जिणी[२] ।
देखों आंवडो तो खाणी । ब्रह्मविद्येची ॥ ११६२ ॥
दिसो परतत्व डोळा । पाहो सुखाचा सोहळा ।
रिघो महाबोध सुकाळा-। माजीं विश्व ॥ ११६३ ॥
हें निफजेल आता आघवें । ऐसें बोलिजेल बरवें ।
जे अधिष्ठिला असे परमदेवें । श्रीनिवृत्तीं मी ॥ ११६४ ॥
ह्मणोनि अक्षरीं सुभेदीं । उपमा श्लोक कोंदाकोंदी ।
झाडा[११] देईन प्रतिपदी । ग्रथार्थासी ॥ ११६५ ॥
हा ठावोवरी[१२] मातें । पुरतया सारस्वतें[१३] ।
केलें असे श्रीमतें । श्रीगुरुरायें ॥ ११६६ ॥ ( अ० १३ )

## ५ शांतरसाच्या घरीं अद्भुतरस पाहुणा !

आता यावरी एकादशीं । कथा आहे दोहीं रसीं ।
जेथ पार्था विश्वरूपेसीं । होईल भेटी ॥ १ ॥
जेथ शाताचिया घरा । अद्भुत आला आहे पाहुणेरा[१४] ।
आणि येराही रसा पातिकेरा[१५] । जाहला मान ॥ २ ॥
अहो ! वधुवराचिये मिळणीं । जैसी वराडियांही लुगडींलेणीं[१६] ।
तैसे देशियेन्या सुखासनी । मिरवले रस ॥ ३ ॥
परी शातादभुत बरवे । जे डोळ्यांच्या अजुळीं घ्यावे ।
जैसे हरिहर प्रेमभावें । आले खेवां[१७] ॥ ४ ॥
नातरी अंवसेच्या दिवसीं । भेटलीं बिंबें[१८] दोनीं सरसीं ।

---

१ दैन्य, दारिद्र्य. २ साफल्य. ३ वाटेल तो ४ परब्रह्म. ५ उजाडो, उदय पावो. ६ ब्रह्मज्ञानाच्या अपार सपत्तींत. ७ घडून येईल. ८ अगीकार केला. ९ मर्म स्पष्ट करणाऱ्या शब्दानीं. १० गर्दी, रेलचेल. ११ स्पष्ट करीन. १२ येथपर्यंत. १३ विद्येनें परिपूर्ण. १४ भेजवानीस, पाहुणचार घेण्यास. १५ पक्तीला बसलेल्या इतर रसांसही १६ वस्त्रालकार. १७ भेटीस. १८ सूर्यचद्रबिंबें.

तेवीं एकवेळा रसीं । केला येथ ॥ ५ ॥
मिनले गंगेयमुनेचे ओघ । तैसे रसां जाहले प्रयाग ।
म्हणोनि सुस्नात होत जग । आघवें येथ ॥ ६ ॥ ( अ० ११ )

### ६ सारस्वताचें झाड.

तुम्हा संतांचिये सभे । सलगी कीर करूं न लभे ।
परी मानावे जी तुम्ही लोभें । अपत्या मज ॥ १६ ॥
अहो ! पुसौ आपणाचि पढविजे । मग पढे तरी माथा तुकिजे ।
का करविलेनि चोजें न रिझे । बाळका माय ? ॥ १७ ॥
तेवीं मी जें जें बोले । तें प्रभु तुमचेंचि शिकविलें ।
म्हणोनि अवधारिजो आपुलें । आपण देवा ॥ १८ ॥
हें सारस्वताचें गोड । तुम्हीच लाविलें जी झाड ।
तरी आतां अवधानामृतें वाड । शिंपोनि कीजे ॥ १९ ॥
मग हें रसभावफुलीं फुलेल । नानार्थ फळभारें फळा येईल ।
तुमचेनि धर्में होईल । सुरवाड जना ॥ २० ॥ ( अ० ११ )

---

## ६ ज्ञानेश्वरांच्या श्रीकृष्णप्रेमलहरी.

ऐसें चराचरैक्यभाग्य । जें ब्रह्मेशां आराधने योग्य ।
योगियाचें भोग्य । भोगधन जें ॥ २६८ ॥
जो सकळ कळाची कळा । जो परमानंदपुतळा ।
जो जीवाचा जिव्हाळा । विश्वाचिया ॥ २६९ ॥
जो सर्वज्ञतेचा वोलावा । जो यादवकुळीचा कुळदिवा ।

---

१ ऐक्य, एकमेळा. २ करणें योग्य नाहीं. ३ पोपट. ४ मोटें, विस्तृत. ५ सुख. ६ चराचर सृष्टीचें परमभाग्य. ७ ब्रह्मा व शंकर यांचें उपास्य. ८ जिव्हाळा.

तो श्रीकृष्णजी पाडवा- । प्रती बोलिला ॥ २७० ॥ ( अ० ८ )

* * * *

ऐसें सावळेनि परब्रह्में । तेणें भक्तकामकल्पद्रुमें ।
बोलिलें श्रीआत्मारामें । संजयो म्हणे ॥ ५२१ ॥ ( अ० ९ )

* * * *

जो चराचरपरमगुरू । चतुरचित्तचमत्कारू ।
तो ऐका यादवेश्वरू । बोलता जाहला ॥ ४७ ॥ ( अ० १० )

* * * *

ऐसें निजजनानंदें । तेणें जगदादिकंदें[1] ।
बोलिलें मुकुंदें । संजयो म्हणे ॥ २३९ ॥
राया जो निर्मळू । निष्कळंक लोककृपाळू ।
शरणागता स्नेहाळू । शरण्य जो ॥ २४० ॥
पै सुरसहायशीळ । लोकलालनलीळ ।
प्रणतप्रतिपाळ । खेळ जयाचा ॥ २४१ ॥
जो धर्मकीर्ति धवळ । अगाधदातृत्वें सरळ ।
अतुळ बळें प्रबळ । बळिबंधन ॥ २४२ ॥
जो भक्तजनवत्सळ । प्रेमळजनप्रांजळ ।
सत्यसेतु सकळ- । कळानिधी ॥ २४३ ॥
तो श्रीकृष्ण वैकुंठींचा । चक्रवर्ती निजाचा[2] ।
सांगे येरु दैवाचा । आइकत असे ॥ २४४ ॥ ( अ० १२ )

---

१ जगाचा मूळ कंद. २ भक्तांचा.

# ७ कृष्णार्जुनांचा प्रास्ताविक संवाद.



अर्जुन म्हणे अवधारीं देवा । म्या पाहिला हा मेळावा[1] ।
तव गोत्रवर्ग[2] आघवा । देखिला येथ ॥ १९३ ॥
हे सग्रामीं उदित । जाहले असती कीर[3] समस्त ।
पण आपणया उचित । केविं होय ? ॥ १९४ ॥
जळो हें झुज । प्रत्यया न ये मज ।
येणें काय काज । महापापें ॥२०८ ॥
या सकळांतें वधावें । मग जे भोग भोगावे ।
ते जळोत आघवे । पार्थ म्हणे ॥ २११ ॥
तरी आम्हीं कां जन्मावें । कवणालागी जियावें[4] ।
जरी वडिला या चिंतावें । अहित मनें ॥ २१४ ॥
पुत्रातें इच्छी कुळ । तयाचें कायि हेंचि फळ ।
जे निर्दाळिजे केवळ । गोत्र आपुलें ? ॥ २१५ ॥
हे वरी भलते करितु । आताचि येथें मारितु ।
परी आपण मनें घातु । न चिंतावा ॥ २२५ ॥
जरी वध करीं गोत्रजाचा । तरी वसौटा[5] होऊनि दोषांचा ।
मज जोडिलासि तूं हातीचा । दूर होसी ॥ २२८ ॥
कुलहरणी पातकें । तियें आगीं जडती अशेखें ।
तयेवेळीं तू कवणें कें । देखावासी ? ॥ २२९ ॥
म्हणोनि मी हे न करीं । इयें सग्रामीं शस्त्र न धरीं ।
हें किडाळ[6] बहुतीं परी । दिसतसे ॥ २३३ ॥

१ समुदाय, उभय पक्षाचीं सैन्यें. २ पितृ, पितामह, गुरु, मातुल, कुमार इ० ३ निश्चयानें. ४ जगावें. ५ आधार. ६ सदोष

हे अभिमानमदें भुलले । जरी पा संग्रामा आले ।
तऱ्ही आम्हा हित आपुलें । जाणावें लागे ॥ २३६ ॥
जैमें काष्ठें काष्ठ मंथिजे । तेथ वन्हि एक उपजे ।
तेणें काष्ठजात जाळिजे । प्रज्वळलेनी ॥ २४३ ॥
तैसा गोत्रींचि परस्परें । जरी वध घडे मत्सरें ।
तरी तेणें महादोषें घोरें । कुळचि नाशे ॥ २४४ ॥
कुळीं कुळक्षय होय । तये वेळी तो आद्यधर्म जाय ।
मग आन काहीं आहे । पापावाचुनी ? ॥ २४८ ॥
जै यमनिमय ठाकती । तैथ इंद्रियें सैरा राहाटती ।
म्हणौनि व्यभिचार घडती । कुळस्त्रियां ॥ २४९ ॥
उत्तम अधमीं संचरती । ऐसे वर्णावर्ण मिसळती ।
तेथ समूळ उपडती । जातिधर्म ॥ २५० ॥
जैसी चोहटाँचिये बळीं । पात्रिजे सैरा काउळीं ।
तैसीं महापापें कुळीं । संचरती ॥ २५१ ॥
मग कुळा तया अशेखां । आणि कुळघातका ।
येरयेरा नरका । जाणे आथि ॥ २५२ ॥
जेथ नित्यादि क्रिया ठाके । आणि नैमित्तिक क्रिया पारुखे ।
तेथ कवणा तिळोदकें । कवण अर्पी ? ॥ २५४ ॥
नानादोषें सकळ । आप्लविजे तें म्हणे कुळ ।
मग महाघोर केवळ । निरय भोगी ॥ २६० ॥
ऐसें देखोनि सकळ । अर्जुनें आपुलें कुळ ।
मग म्हणे राज्य तें केवळ । निरयभोग ॥ २६७ ॥ ( अ० १ )

* * *

---

१ घांसावें. २ अनादि, सनातन. ३ अन्य. ४ थांबतात. ५ स्वैर. ६ ब्राह्मण-शूद्रादि ७ चव्हाट्यावरचा. ८ बंद होते. ९ व्यापून जातें.

यापरी कृपा आकळिला । दिसतसे अति कोमाइला ।
जैसा कर्दमीं रुपला । राजहंस ॥ ४ ॥
तयापरी तो पांडुकुमर । महामोहें अतिजर्जर ।
देखोनि श्रीशार्ङ्गधर । काय बोले ॥ ५ ॥
म्हणे अर्जुना आदीं पाहीं । हें उचित काय इये ठायीं ।
तूं कवण हें कायी । करित आहासी ? ॥ ६ ॥
तूं शूरवृत्तीचा ठांवो । क्षत्रियामाजी रावो ।
तुझिया लाठेपणाचा आवो । तिहीं लोकीं ॥ ९ ॥
सांडी हें मूर्खपण । उठीं घे धनुष्यबाण ।
संग्रामीं हें कवण । कारुण्य तुझें ! ॥ १८ ॥
हां गा तूं जाणता । तरी न विचारिसी कां आतां ।
सांगें झुंजावेळे सदयता । उचित कायी ? ॥ १९ ॥
म्हणोनि शोक न करीं । तूं पुरता धीर धरीं ।
हे शोच्यता अव्हेरीं । पांडुकुमारा ॥ २१ ॥
येणें संग्रामाचेनि अवसरें । येथ कृपाळूपण नुपकरे ।
हे आतांचि काय सोयरे । जाहले तुज ? ॥ २३ ॥
आर्जीचें हें झुंज । काय जन्मा नवल तुज ।
हें परस्परें तुम्हां व्यांज । सदांचि आथी ॥ २५ ॥
मोह धरिलिया ऐसें होईल । जे असती प्रतिष्ठा जाईल ।
आणि परलोकही अंतरेल । ऐहिकेंसी ॥ २७ ॥
हृदयाचें ढिलेंपण । येथ निकयासी नव्हे कारण ।
हें संग्रामीं पतन ! जाण क्षत्रियासी ॥ २८ ॥
ऐसेनि तो कृपावंत । नानापरी असे शिकवित ।

* * *

---

१ स्थान. २ शौर्यधैर्यादि गुणाची प्रतिष्ठा. ३ युद्धाचे ऐन वेळी. ४ आश्चर्य. ५ निमित्त, प्रसंग. ६ दुबळेपण. ७ निकेपणा, बरवेपणा

हें ऐकोनि पाडुसुत । काय बोले ॥ २९ ॥
देवा हें झुंज नव्हे प्रमाद । येथ वर्तलियां दिसतसे बाध ।
हा उघड लिंगभेद । वोढवला आम्हां ॥ ३१ ॥
गोत्रगुरु आमुचे । पूजनीय आम्हां नेमाचे ।
मज बहुत भीष्मद्रोणाचे । वर्ततें असे ॥ ३४ ॥
जयालागी मनें विरूं । आम्हीं स्वप्नीही न शकों धरूं ।
तयां प्रत्यक्ष केविं करूं । घात देवा ॥ ३५ ॥
आतां ऐसेयातें वधावे । कीं अव्हेरूनियां निघावे ।
या दोहीमाजी बरवें । तें नेणों आम्ही ॥ ५४ ॥
तरी उचित काय आम्हा । जें व्यभिचरेना धर्मा ।
तें झडकरी पुरुषोत्तमा । साग आता ॥ ६३ ॥ ( अ० २ )



---

१ चूक. २ पूज्यजनाचा उच्छेद. ३ वाटते. ४ वैर. ५ टाकून. ६ धर्मासी विरुद्ध नसेल.

# २ कर्मयोग

## १ स्वधर्माचरण.

### १ निष्काम स्वधर्माचरण हेंच कर्मयोगाचें रहस्य.

तू अझुनी कां न विचारिसी । काय हें चिंतित आहासी ।
स्वधर्म तो विसरलासी । तरावें जेणें ॥ १८० ॥
या कौरवां भलतें जाहालें । अथवा तुजचि कांही पातलें ।
कीं युगाचि हें बुडालें । जऱ्ही एथ ॥ १८१ ॥
तरी स्वधर्म एक आहे । तो सर्वथा त्याज्य नोहे ।
मग तरिजेल काय पाहें । कृपाळूपणें ॥ १८२ ॥
अर्जुना तुझें चित्त । जऱ्ही जाहलें द्रवीभूत[1] ।
तऱ्ही हें अनुचित । संग्रामसमयीं ॥ १८३ ॥
अगा गोक्षीर जरी जाहलें । तरी पथ्यासि नाहीं घेतलें ।
ऐसेनिहि विष होय सुदलें[2] । नवज्वरीं देतां ॥ १८४ ॥
तैसें आनीं आन[3] करिता । नाश होईल स्वाहिता ।
म्हणऊनि तू आतां । सावध होईं ॥ १८५ ॥
वायांचि[4] व्याकुळ कायी । आपुला निजधर्म पाहीं ।
जो आचरिता बाध[5] नाही । कवणें काळीं ॥ १८६ ॥
जैसें मार्गेंचि चालता । अपायो न पवे सर्वथा ।
कां दीपाधारें वर्तता । नाडळिजे[6] ॥ १८७ ॥
तयापरी पार्था । स्वधर्में राहाटतां[7] ।

---

१ स्नेहाला वश. २ घातलें, दिलें ३ भलत्याने भलतेंच ह्म० परधर्माचरण केलें तर. ४ व्यर्थ. ५ हानि. ६ अडखळून पडत नाहीं. ७ वागता.

सकळ काम[1]पूर्णता । सहजें होय ॥ १८८ ॥
ह्मणोनि यालागी पाहीं । तुह्मा क्षत्रियां आणिक कांहीं ।
सग्रामावाचूनि नाहीं । उचित जाणें ॥ १८९ ॥
निष्कपट होआवें । उसिणां[2] घाईं जुझावें ।
हें असो काय सागावें । [3]प्रत्यक्षावरी ॥ १९० ॥
अर्जुना जुझ देख आतांचें । हें हो कां दैव तुमचें ।
की निधान[4] सकळ धर्माचें । प्रकटलें असे ॥ १९१ ॥
हा संग्राम काय म्हणिपे । कीं स्वर्गचि येणें रूपें ।
मूर्त कां प्रतापें । उदय केला ॥ १९२ ॥
नातरी गुणाचेनि पतिकरें[5]। आर्तीचेनि पाडिभरें[6]।
हे कीर्तीचि स्वयंवरें । आली तुज ॥ १९३ ॥
क्षत्रियें बहुत पुण्य कीजे । तै जुझ ऐसें लाहिजे ।
जैसें मार्गें जाता आडाळिजे । चिंतामणीसी ॥ १९४ ॥
जैसी भर्तारेंहीन वनिता । उपहँती[7] पावे सर्वथा ।
मग तैसी दशा जीविता । स्वधर्मेंवीण ॥१९९ ॥
ना तरी रणीं शव सांडिजे । तें चौमेरीं[8] गिधीं[9] विदारिजे ।
तैसें स्वधर्महीना अभिभविजे । महादोषीं ॥ २०० ॥
म्हणोनि स्वधर्म हा सांडशील । तरी पापा वरपडां[10] होसील ।
आणि अपेश तें न वचेल । कल्पातवरी ॥ २०१ ॥
नातरी रणीं एथ । जुंझता वेंचलें जीवित ।
तरी स्वर्गसुख अनकळितें[11] । पावसील ॥ २२० ॥

---

१ मनोरथांची सिद्धि. २ शत्रूनें घाव मारला असता परत घाव मारून मोठ्या वीरश्रीनें, 'घे घे' म्हणत लढावें. ३ तुला माहीत असलेल्या उघड गोष्टींबद्दल. ४ ठेवा, सार. ५ लौकिक अनुभव. ६ प्रेमाच्या आसक्तीनें. ७ निस्तेजता, अपमान. ८ चारी बाजूंनीं. ९ गिधाडांनीं. १० प्राप्त, पावलेला; पापांत पडशील. ११ अनायासें, क्लेशरहित.

म्हणोनि ये गोठी । विचार न करीं किरीटी ।
आता धनुष्य घेऊनि उठीं । झुझ वेगीं ॥ २२१ ॥
देखे स्वधर्म हा आचरता । दोष नाशे असता ।
तुज भ्राति हे कवण चित्ता । पातकाची ? ॥ २१२॥
अमृतें तरींचि मरिजे । जरी विषेसी सेविजे ।
तैसा स्वधर्मी दोष पाविजे । हेतुकेंपणें[1] ॥ २२४ ॥
म्हणोनिया पार्था । हेतु साडूनि सर्वथा ।
तुज क्षात्रवृत्ती झुझता । पाप नाही ॥ २२५ ॥
सुखी सतोषा न यावें । दु:खीं विषादा न भजावें ।
आणि लाभालाभ न धरावे । मनामाजी ॥ २२६ ॥
एथ विजयपण होईल । की सर्वथा देह जाईल ।
हें आधींचि काही पुढील । चिंतावें ना ॥ २२७ ॥
आपणया उचिता । स्वधर्मे राहाटतां ।
जें पावे तें निवांतां[2] । साहोनि जावें ॥ २२८ ॥
ऐसेया मनें होआवें । तरी दोष न घडे स्वभावें ।
म्हणोनि आता झुझावें । निभ्रांत तुवा ॥ २२९ ॥
म्हणोनि आइकें पार्था । याचिपरी पाहता ।
तुज उचित होय आता । स्वकर्म हें ॥ २६४ ॥
आम्ही समस्तही विचारिलें[3] । तव ऐसेंचि हें मना आलें ।
जे न साडिजे तुवा आपुलें । विहित कर्म ॥ २६५ ॥
परी कर्मफळीं आस न करावी । आणि अकर्मी[4] सगती न व्हावी ।
हे सत्क्रियाचि[5] आचरावी । हेतूविण ॥ २६६ ॥
तू योगयुक्त होउनी । फळाचा सग टाकुनि ।

---

१ सकामतेनें, फळाशा ठेवली तर २ निमुटपणें. ३ विचार करून ठरविलें. ४ कर्म न करणें. ५ फलाशा व सग टाकून केलेलें स्वधर्मकर्म.

मग अर्जुना चित्त देउनी । करीं कर्मे ।। २६७ ।।
परी आदरिलें कर्म दैवें । जरी समाप्तीतें पावे ।
तरी विशेषें तेथ तोषावें । हेंही नको । २६८ ।।
कीं निमित्तें कोणे एकें । तें सिद्धी न वचताचि ठाके[1] ।
तरी तेथींचेनि अपरितोखें[2] । क्षोभावेंना ।। २६९ ।।
आचरतां सिद्धी गेलें । तरी काजौंचि कीर आलें[3] ।
परी ठेलयाही सगुण जाहलें[4] । ऐसेंचि मानीं ॥ २७० ॥
देखें जेतुलालें कर्म निपजे । तेतुलें आदिपुरुषीं समर्पिजे ।
तरी परिपूर्ण महजें । जाहलें जाणें ।। २७१ ।।
देखें सतासत कर्मीं । हें जें सरसेपण मनोधर्मी[5] ।
तेचि योगस्थिती उत्तमीं[6] । प्रशसिजे ॥ २७२ ॥
अर्जुना समत्व चित्ताचें । तेंचि सार जाण योगाचें ।
जेथ मन आणि बुद्धीचें । ऐक्य आथि ।। २७३ ।।
म्हणोनि बुद्धियोग सधर । तेथ अर्जुना होईं स्थिर ।
मनें करी अव्हेर । फळहेतूचा ।। २७६ ।।
जे बुद्धियोगा योजिले[7] । तेचि पारगत जाहले ।
इंहीं उभयसंबधी सांडिले । पापपुण्यीं ॥ २७७ ॥
ते कर्मीं तरी वर्तती । परी कर्मफळा नातळती ।
आणि यातायाती[8] लोपती । अर्जुना तयां ॥ २७८ ॥
मग निरामयेंभरित[9] । पावती पद अच्युत[10] ।

---

१ सिद्धी न जाता अपूर्ण राहिलें २ अपरितोषानें, असतोषानें खिन्न होऊ नये. ३ कामास आलें, उपयोगाला आलें. ४ पण तें कर्म ठेलें म्ह० अपुरें राहिलें तरी सगुण जाहलें म्ह० सफळ झालें असेंच मान. ५ भलें बुरें कसलेंही कर्म झालें तरी मन सरसें म्ह० समान ठेवणें हीच योगास्थिति. ६ श्रेष्ठ. ७ जे बुद्धियोगाचा आश्रय करितात तेच भवाच्या पार जातात. ८ जन्ममृत्यूचे फेरे. ९ सुखरूप. १० अविनाशी पद.

ते बुद्धियोगयुक्त। धनुर्धरा ॥ २७९ ॥ ( अ० २ )

## २ ब्रह्मदेवाची प्रजांना शिकवण.

तुम्हा वर्णविशेषवरें । आम्ही हा स्वधर्म विहिला[1] असे ।
यातें उपासा मग आपैसे । पुरती काम ॥ ८८ ॥
अहेतुकें चित्तें । अनुष्ठा पा यातें ।
पतिव्रता पतीतें । जियापरी ॥ ९२ ॥
येणेंकरूनि समस्ता । परितोष होईल देवतां ।
मग ते तुम्हा ईप्सिता[2] । अर्थातें देती ॥ ९५ ॥
या स्वधर्मपूजा पूजितां । देवतागणां समस्तां ।
योगक्षेम निश्चिता । करिती तुमचा ॥ ९६ ॥
तुम्ही देवांतें भजाल । देव तुम्हां तुष्टतील ।
ऐसी परस्परें घडेल । प्रीति जेथ ॥ ९७ ॥
तेथ तुम्ही जें करू म्हणाल । तें आपैसें सिद्धी जाईल ।
वांछितही पुरेल । मानसीचें ॥ ९८ ॥
कीं जालिया सकळ संपदा । जो अनुसरेल इंद्रियमदा ।
लुब्ध होऊनियां स्वादा । विषयांचिया ॥ १०३ ॥
तिहीं यज्ञभाविती[3] सुरीं । जे हे संपत्ति दिधली पुरी ।
तया स्वधर्मी सर्वेश्वरीं । न भजेल जो ॥ १०४ ॥
अग्निमुखीं हवन । न करील देवतापूजन ।
प्राप्तवेळे[4] भोजन । ब्राह्मणाचें ॥ १०५ ॥
विमुख होईल गुरुभक्ती । आदर न करील अतिथी ।
संतोष नेदील ज्ञाती । आपुलिये ॥ १०६ ॥
ऐसा स्वधर्मक्रियारहित । आथिलेपणें[5] गर्वित ।

---

१ विहित केला, सांगितला. २ इच्छित. ३ यज्ञांनें तृप्त झालेल्या. ४ यथा काळ. ५ संपत्तीनें माजलेला.

मग अर्जुना चित्त देऊनी । करीं कर्मे ॥ २६७ ॥
परी आदरिलें कर्म दैवें । जरी समाप्तीतें पावे ।
तरी विशेषें तेथ तोषावें । हेंही नको । २६८ ॥
कीं निमित्तें कोणे एकें । तें सिद्धी न वचताचि ठाके[1] ।
तरी तेथींचेनि अपरितोखें[2] । क्षोभावेंना ॥ २६९ ॥
आचरतां सिद्धी गेलें । तरी काजौंचि कीर आलें[3] ।
परी ठेलयाही सगुण जाहलें[4] । ऐसेंचि मानीं ॥ २७० ॥
देखें जेतुलालें कर्म निपजे । तेतुलें आदिपुरुषीं समर्पिजे ।
तरी परिपूर्ण सहजें । जाहलें जाणें ॥ २७१ ॥
देखें सतासत कर्मीं । हें जें सरसेपण मनोधर्मीं[5] ।
तेचि योगस्थिती उत्तमीं[6] । प्रशंसिजे ॥ २७२ ॥
अर्जुना समत्व चित्ताचें । तेंचि सार जाण योगाचें ।
जेथ मन आणि बुद्धीचें । ऐक्य आथि ॥ २७३ ॥
म्हणोनि बुद्धियोग संधर । तेथ अर्जुना होईं स्थिर ।
मनें करीं अव्हेर । फळहेतूचा ॥ २७६ ॥
जे बुद्धियोगा योजिले[7] । तेचि पारगत जाहले ।
इहीं उभयसंबंधी सांडिले । पापपुण्यीं ॥ २७७ ॥
ते कर्मीं तरी वर्तती । परी कर्मफळा नातळती ।
आणि यातायाती[8] लोपती । अर्जुना तयां ॥ २७८ ॥
मग निरामयेंभरित[9] । पावती पद अच्युत[10] ।

---

१ सिद्धी न जाता अपूर्ण राहिलें २ अपरितोषानें, असतोषानें खिन्न होऊ नये. ३ कामास आलें, उपयोगाला आलें. ४ पण तें कर्म ठेलें म्ह० अपुरें राहिलें तरी सगुण जाहलें म्ह० सफळ झालें असेंच मान. ५ भलें बुरें कसलेंही कर्म झालें तरी मन सरसें म्ह० समान ठेवणें हीच योगास्थिति. ६ श्रेष्ठ. ७ जे बुद्धियोगाचा आश्रय करितात तेच भवाच्या पार जातात. ८ जन्ममृत्यूचे फेरे. ९ सुखरूप. १० अविनाशी पद.

ते बुद्धियोगयुक्त। धनुर्धरा ॥ २७९ ॥ ( अ० २ )

## २ ब्रह्मदेवाची प्रजांना शिकवण.

तुम्हा वर्णविशेषवशें । आम्ही हा स्वधर्म विहिला¹ असे ।
यातें उपासा मग आपैसे । पुरती काम ॥ ८८ ॥
अहेतुकें चित्तें । अनुष्ठा पां यातें ।
पतिव्रता पतीतें । जियापरी ॥ ९२ ॥
येणेंकरूनि समस्तां । परितोष होईल देवतां ।
मग ते तुम्हा ईप्सिता² । अर्थातें देती ॥ ९५ ॥
या स्वधर्मपूजा पूजितां । देवतागणां समस्ता ।
योगक्षेम निश्चिता । करिती तुमचा ॥ ९६ ॥
तुम्ही देवांतें भजाल । देव तुम्हां तुष्टतील ।
ऐसी परस्परें घडेल । प्रीति जैंथ ॥ ९७ ॥
तेथ तुम्ही जें करू म्हणाल । तें आपैसें सिद्धी जाईल ।
वांछितही पुरेल । मानसीचें ॥ ९८ ॥
की जालिया सकळ संपदा । जो अनुसरेल इंद्रियमदा ।
लुब्ध होऊनिया स्वादा । विषयांचिया ॥ १०३ ॥
तिहीं यज्ञभावितीं³ सुरीं । जे हे संपत्ति दिधली पुरी ।
तयां स्वधर्मी सर्वेश्वरीं । न भजेल जो ॥ १०४ ॥
अग्निमुखीं हवन । न करील देवतापूजन ।
प्राप्तवेळे⁴ भोजन । ब्राह्मणाचें ॥ १०५ ॥
विमुख होईल गुरुभक्ती । आदर न करील अतिथी ।
संतोष नेदील ज्ञाती । आपुलिये ॥ १०६ ॥
ऐसा स्वधर्मक्रियारहित । आथिलेपणें गर्वित⁵ ।

---

१ विहित केला, सांगितला. २ इच्छित. ३ यज्ञांनें तृप्त झालेल्या. ४ यथा काळ. ५ सपत्तीनें माजलेला.

केवळ भोगासक्त । होईल जो ॥ १०७ ॥
तया मग अपावो थोर आहे । जेणें तें हातींचें सकळ जाये ।
देखा प्राप्तही न लाहे । भोग भोगूं ॥ १०८ ॥
जैसें गतायु शरीरीं । चैतन्य वास न करी ।
का निर्दैवाच्या घरीं । न राहे लक्ष्मी ॥ १०९ ॥
तैसा स्वधर्म जरी लोपला । तरी सर्व सुखाचा थारा मोडला ।
जैसा दीपासवें हरपला । प्रकाश जाय ॥ ११० ॥
तैसी निजवृत्ति जेथ साडे । तेथ स्वतत्रते वस्ती न घडे ।
आइका प्रजा हो फुडें । विरंचि म्हणे ॥ १११ ॥
म्हणऊनि स्वधर्म जो साडील । तयातें काळ दडील ।
चोर म्हणूनि हरील । सर्वस्व तयाचें ॥ ११२ ॥
मग सकळ दोष भवते । गिंवसोनि घेती तयातें ।
रात्रिसमयीं स्मशानातें । भूतें जैसी ॥ ११३ ॥
तैसी त्रिभुवनीची दुःखें । आणि नानाविधें पातकें ।
दैन्यजात तितुकें । तेथेंचि वसे ॥ ११४ ॥
ऐसें होय तया उन्मत्ता । मग न सुटे बापा रुदतां ।
कल्पातीही सर्वथा । प्राणिगण हो ॥ ११५ ॥
म्हणऊनि निजवृत्ति हे न साडावी । इंद्रियें बरळों नेदावीं ।
ऐसें प्रजातें शिकवी । चतुरानन ॥ ११६ ॥ ( अ० ३)

## ३ श्रीकृष्णाची अर्जुनास शिकवण.

देखा विहित क्रियाविधि । निर्हेतुका बुद्धि ।
जो असतिये समृद्धि । विनियोग करी ॥ ११९ ॥
गुरु गोत्र अग्नि पूजी । अवसरीं भजे द्विजीं ।

१ आश्रय २ वेढून. ३ शास्त्रानें सांगितलेलें स्वधर्माचरण. ४ यथाशक्ति. ५ यथाकाळीं.

निमित्तादिकीं यजीं । पितरोद्देशें ॥ १२० ॥
या यज्ञक्रिया उचिता । यज्ञेशीं हवन करिता ।
हुतशेप स्वभावतां । उरे जें जें ॥ १२१ ॥
तें सुखें आपुले घरीं । कुटुंबेसी भोजन करी ।
की भोग्यचि तें निवारी । कल्मषातें ॥ १२२ ॥
म्हणोनि स्वधर्में जें अर्जे । तें स्वधर्मींचि विनियोगिजे ।
मग उरे तें भोगिजे । संतोषेंसीं ॥ १२५ ॥
इंद्रियरुचीसारिखें । करविती पाक निकें ।
ते पापिये पातकें । सेविती जाण ॥ १२९ ॥
हें संपत्तिजात आघवें । हवनद्रव्य मानावें ।
मग स्वधर्मयज्ञें अर्पावें । आदिपुरुषीं ॥ १३० ॥
हें सांडोनिया मूर्ख । आपणपेयालागीं देख ।
निपजाविती पाक । नानाविध ॥ १३१ ॥
म्हणोनि ऐकें पांडवा । हा स्वधर्म कवणें न संडावा ।
सर्वभावें भजावा । हाचि एक ॥ १४३ ॥
हा गा शरीर जरी जाहलें । तरी कर्तव्य वोधें आलें ।
मग उचित का आपलें । वोसंडावें ॥ १४४ ॥
परिस पां सव्यसाची । मूर्ति लाहोनि देहाची ।
खंती करिती कर्माची । ते गांवढे गा ॥ १४५ ॥
म्हणऊनि तूं नियत । सकळ कामनारहित ।
होऊनियां उचित । स्वधर्में राहाटें ॥ १५० ॥
जे स्वधर्में निष्कामतां । अनुसरले पार्था ।
ते कैवल्यपद तत्त्वतां । पावले जगीं ॥ १५१ ॥

---

१ श्राद्धपक्षादि प्रसंगीं. २ स्वधर्माचरणानें पंचमहायज्ञ करून जें शेष उरेल तें सेविल्यानें पापनाश होतो. ३ उत्तमोत्तम पक्वान्नें. ४ त्यागावें. ५ गांवढळ, अडाणी. ६ मोक्षपद.

तरी उचितें कर्मे आघवीं । तुवां आचरोनि मज अर्पावीं ।
परी चित्तवृत्ति विन्यसावी[1] । आत्मरूपीं ॥ १८६ ॥
आणि हें कर्म मी कर्ता । का आचरेन यांअर्था[2] ।
ऐसा अभिमान झणें चित्ता । रिघों देसी ॥ १८७ ॥
तुवा शरीरपरा नोहावें । कामनाजात सांडावें ।
मग अवसरोचित भोगावे । भोग सकळ ॥ १८८ ॥
आता कोदंड घेऊनि हातीं । आरूढ पां इये रथीं ।
देईं आलिंगन वीरवृत्ती । समाधानें ॥ १८९ ॥
जगीं कीर्ति रूढवीं । स्वधर्माचा मान वाढवी ।
इया भारापासोनि सोडवी । मेदिनी[3] हें ॥ १९० ॥
आता पार्था निःशंक होईं । या संग्रामा चित्त देईं ।
एथ हें[4] वाचूनि कांहीं । बोलों नये ॥ १९१ ॥ ( अ० ३ )

## ४ ' स्वधर्मे निधनं श्रेयः '

अगा स्वधर्म हा आपुला । जरी का कठिण जाहला ।
तरी हाचि अनुष्ठिला । भला देखें ॥ १९ ॥
येरु[5] आचार जो परांवा[6] । तो देखतां कीर बरवा ।
परी आचरतेनि आचरावा । आपुलाचि ॥ २० ॥
सांगें शूद्रघरीं आघवीं । पक्कान्नें आहाति बरवीं ।
ती द्विजें केवीं सेवावीं । दुर्बळ जरी जाहला ॥ २१ ॥
हें अनुचित कैसेनि कीजे । अग्राह्य केवीं इच्छिजे ।
अथवा इच्छिलेंही पाविजे । विचारीं पां ॥ २२ ॥
तरी लोकांचीं धवळारें[7] । देखोनियां मनोहरें ।

---

१ ठेवावी, स्थिर करावी. २ या फलाच्या अपेक्षेनें. ३ पृथ्वी. ४ क्षात्रोचित युद्धावाचून. ५ अन्य. ६ पराचा, दुसऱ्याचा. ७ चुनेगच्ची घरें.

असतीं आपुलीं तणारें[1] । मोडावीं केवीं ? ॥ २३ ॥
हें असो वनिता आपुली । कुरूप जरी जाहाली ।
तऱ्ही भोगिता तेचि भली । जियापरी ॥ २४ ॥
तेवी आवडे तैसों[2] साकड । आचरता जऱ्ही दुर्वाड[3] ।
तऱ्ही स्वधर्मचि सुरवाड[4] । परत्रीचा ॥ २५ ॥
हां गा साकर आणि दूध । हें गौल्यें[5] कीर प्रसिद्ध ।
परी कृमिदोषी[6] विरुद्ध । घेपे केवीं ? ॥ २६ ॥
ह्मणोनि आणिकासी जें विहित । आणि आपणपेया अनुचित ।
तें नाचरावें जरी हित । विचारिजे ॥ २८ ॥
या स्वधर्मातें अनुष्ठिता । वेंचु होईल जीविता ।
तोहि निका वर उभयंता[7] । दिसत असे ॥ २९ ॥ ( अ० ३ )

## ५ श्रुतिशास्त्रप्रामाण्य.

पतीचिया मता । अनुसरोनि पतिव्रता ।
अनायासें[8] आत्महिता । भेटेचि ते ॥ ४५६ ॥
हें असो आपुला ठेवा । हाता आथी जरी यावा ।
तरी आदरें जेवीं दिवा । पुढां कीजे ॥ ४५८ ॥
तैसों अशेषाही पुरुषार्थां[9] । जो गोसावी हों ह्मणे पार्था ।
तेणें श्रुतिस्मृति माथा । बैसणें घापें ॥ ४५९ ॥
शास्त्र ह्मणेल जें साडावें । तें राज्यही तृण मानावें ।
जें घेववी तें न ह्मणावें । विषही विरु[10] ॥ ४६० ॥

---

१ तृण=गवत, गवताची झोपडी. २ हवा तितका कठिण. ३ दुर्घट. ४ सुखकर मित्र. ५ मधुरपणानें, गोडीनें. ६ जताच्या विकारानीं पीडिलेल्या रोग्यांनीं ७ इहपरलोकीं. ८ सहजच. ९ धर्मार्थकाममोक्ष या चतुर्विध पुरुषार्थांचा स्वामी होण्याची ज्याची कामना असेल त्यानें स्मृतिस्मृतींना बसण्यास आपलें शिर द्यावें ह्म० त्याच्या आज्ञा शिरसावंद्य मानाव्या. १० प्रतिकूल.

ऐसिया वेदैकनिष्ठा । जालिया जरी सुभटा ।
तरी कें आहे अनिष्टा । भेटणें गा ! ॥ ४६१ ॥
पै अहितापासूनि काढिती । हित देऊनि वाढविती ।
नाहीं श्रुतीपरौती । माउली जगा ॥ ४६२ ॥
कार्याकार्यविवेकीं । शास्त्रेंचि करावीं पारखीं ।
अकृत्य तें कुडें लोकीं । वाळावें गा ॥ ४६६ ॥
जे विश्वप्रामाण्याची मुदी । आजी तुझ्या हातीं असे सुबुद्धी ।
लोकसग्रहासी त्रिशुद्धी । योग्य होसी ॥ ४६८ ॥ (अ० १६)

## ६ चातुर्वर्ण्य.

आतां याचिपरी जाण । चान्ही हे वर्ण ।
सृजिलें म्यां गुणें-। कर्मविभागें ॥ ७७ ॥
जे प्रकृतीचेनि आधारें । गुणाचेनि व्यभिचारें ।
कर्में तदनुसारें । विवचिली ॥ ७८ ॥ ( अ० ४ )
तेचि चारी वर्ण । पुससी जरी कोण कोण ।
तरी जया मुख्यं । ब्राह्मण धुरेचे का ॥ ८१८ ॥
येर क्षत्रिय वैश्य दोन्ही । तेही ब्राह्मणाच्याचि मानिजे मानीं ।
जे ते वैदिकविधीनीं । योग्य म्हणोनि ॥ ८१९ ॥
जैसा फुलाचेनि सागातें । तांतु तुरबिजे श्रीमतें ।
तैसें द्विजसंगें शूद्रातें । स्वीकारी श्रुती ॥ ८२२ ॥ ( अ० १८)

### १ ब्राह्मणकर्म.

तरी सर्वेंद्रियान्या वृत्ती । घेऊनि आपल्या हाती ।

१ अकल्याण. २ परीक्षक ३ शिक्कामोर्तब ४ तू ज्या आचरणावर प्रामाण्याचा शिक्का मारशील तें लोकांत मान्य होईल. ५ खरोखर. ६ सत्वादि तीन गुण व शमदमादि ब्राह्मणादि चारी वर्णाचीं कर्में यांच्या भेदानें. ७ मिश्रणानें. ८ ठरविलीं, विचारपूर्वक सांगितलीं. ९ अग्रभागीचे १० वैदिक कर्मांचे अधिकारी ११ ततु शिरीं धरावा.

बुद्धि आत्मया मिळे एकांती । प्रिया जैशी ॥ ८३३ ॥
ऐसा बुद्धीचा उपरम । तया नाम म्हणिजे शम ।
तो गुण गा उपक्रम । जया कर्माचा ॥ ८३४ ॥
आणि बाह्येंद्रियाचें धेंडें[3] । पिटूनि विधींचेनि दडें ।
नेदिजे अधर्माकडे । कहीच जावों ॥ ८३५ ॥
तेवीचि सटवीचिये राती । न विसबिजे जेवी वाती ।
तैसा ईश्वरनिर्णय चित्ती । वाहणें सदा ॥ ८३७ ॥
मन भावशुद्धी भरलें । आंग क्रिया अळंकारिलें ।
ऐसें सबाह्य जियालें[6] । साजिरें गा ॥ ८३९ ॥
तया नाम शौच पार्था । तो कर्मी गुण चौथा ।
आणि पृथ्वीचिया परी सर्वथा । साहणें ते क्षमा ॥ ८४० ॥
वांकडेनि वोघेंसी । गंगा उजूचि जैसी ।
कां पृष्ठीं वळला उसी । गोडी जेवी ॥ ८४२ ॥
तैसा विषमांही जीवां- । लागीं उर्जूकार बरवा ।
तें आर्जव गा साहवा । जेथींचा गुण ॥ ८४३ ॥
शास्त्राचारें तेणें । ईश्वरचि एक पावणें ।
तें फुडें[10] जें कां जाणणें । तें तेथ ज्ञान ॥ ८४५ ॥
आणि सत्वशुद्धीचिये वेळे । शास्त्रें कां ध्यानबळें ।
ईश्वरतत्वीच मिळे । निष्टंकें[11] बुद्धी ॥ ८४७ ॥
तें विज्ञानें[12] बरवें । हें गुणरत्न जेथ आठवें ।
आणि आस्तिक्य जाणावें । नववा गुण ॥ ८४८ ॥
पै राजमुद्रा आथिलिया[13] । प्रजा भजे भलतयां ।
तेवीं शास्त्रें स्वीकारिलिया । मार्गमात्रातें ॥ ८४९ ॥

१ शांति. २ आरंभ ३ बंड. ४ जन्मापासून साहाव्या रात्रीं. ५ दिवा. ६ जिणें. ७ वांकड्या–वक्रबुद्धीच्या. ८ सरळपणा. ९ ऋजुता. १० स्पष्ट. ११ निश्चयात्मक बुद्धीनें. १२ साक्षात्कार. १३ राजमुद्रा वागवणाऱ्यांना.

आदरें जें कां मानणें । तें आस्तिक्य मी म्हणे ।
तो नववा गुण जेणें । कर्म तें साच ॥ ८५० ॥

## २ क्षात्रकर्म.

तरी भानु हा तेजें । नापेक्षे जेवी विरंजें[1] ।
का सिंहें न पाहिजे । [2]जावळिया ॥ ८५६ ॥
ऐसा स्वयंभ जो जीवें [3]लाठ । [4]सांवायेंवीण उद्भट ।
तें शौर्य गा जेथ श्रेष्ठ । पहिला गुण ॥ ८५७ ॥
आणि सूर्याचेनि प्रतापें । कोडिही[5] नक्षत्र हारपे ।
ना तो तरी न लोपे । सचंद्री तिहीं ॥ ८५८ ॥
तैसेनि आपुले प्रौढीगुणें । जगासी विस्मय देणें ।
आपण तरी न क्षोभणें । [6]कायसेनही ॥ ८५९ ॥
वरपडलियां आकाश । बुद्धीचे डोळे मानस ।
झाकीना तें परियेंस । धैर्य जेथें ॥ ८६१ ॥
आदित्याची झाडें । सदा सन्मुख सूर्याकडे ।
तैसें समोर शत्रूपुढें । होणें जें का ॥ ८६५ ॥
माहेवणी[9] प्रयत्नेसीं । चुकविजे सेजे जैसी ।
रिपू पाठी नेदिजे तैसी । समरांगणीं ॥ ८६६ ॥
आणि जालेनि फुलें फळें । शाखियां[10] जैसी मोकळे ।
कां उदार परिमळें । पद्माकर[11] ॥ ८६८ ॥
तैसें उमप[12] गा दान । जेथ साहवें गुणरत्न ।
आणि आज्ञे एकायतन[13] । होणें जें का ॥ ८७० ॥

---

१ साह्यकर्ता. २ जवळचा, पाठिराखा. ३ पराक्रमी. ४ साह्याय्यावाचून प्रताप गाजविणारा. ५ कोट्यवधि. ६ कशानेंही. ७ कोसळलें तरी. ८ ऐक. ९ गर्भार स्त्री १० शाखी, वृक्ष. ११ कमळांनीं फुललेलें सरोवर. १२ अमूप, मोप, विपुल १३ ज्याची आज्ञा सर्वांनीं पाळावी असें एकच स्थान.

तया नाम ईश्वरभावो । जो सर्वसामर्थ्याचा ठावो ।
तो गुणामाजी रावो । सातवा गुण ॥ ८७२ ॥
ऐसें सप्तगुणीं विचित्र । कर्म जें जगीं पवित्र ।
तें सहज जाण क्षात्र[1] । क्षत्रियाचें ॥ ८७४ ॥

### ३ वैश्यकर्म.

तरी भूमि बीज नांगरु । यया भांडवलाचा आधारु ।
घेऊनि लाभ अपारु । मेळविणें जें ॥ ८८० ॥
किंबहुना कृषीजिणें[2] । गोधनें राखोनि वर्तणें ।
का समर्घाचीं[3] विकणें । महार्घ वस्तु ॥ ८८१ ॥
येतुलालाचि पांडवा । वैश्यातें कर्माचा मेळावा ।
हा वैश्यजातिस्वभावा- । आंतुला गुण ॥ ८८२ ॥

### ४ शूद्रकर्म.

आणि वैश्यक्षत्रियब्राह्मण । हे द्विजन्मे तिन्ही वर्ण ।
ययाचें जें शुश्रूषण[4] । तें शूद्रकर्म ॥ ८८३ ॥
पै द्विजसेवेपरौतें । धांवणें नाही शूद्रातें ।
एव चतुर्वर्णोचितें । दाविलीं कर्मे ॥ ८८४ ॥ ( अ० १८ )

## ७ नित्य आणि नैमित्तिक कर्में.

सोमसूर्यग्रहणें[5] । येऊनि करविती पार्वणें[6] ।
कां मातापितरमरणें । अंकित जे दिवसँ[7] ॥ ११० ॥
अथवा अतिथि हन पावे । हें ऐसैसें पडे जें करावें ।
तें तें कर्म जाणावें । नैमित्तिक गा ॥ १११ ॥

---

१ क्षत्रियपण. २ शेतीवर निर्वाह. ३ स्वस्त दराच्या वस्तु महाग विकणें. ४ सेवा. ५ चंद्रसूर्यग्रहणें. ६ पर्वकाळींची श्राद्धदानादि क्रिया. ७ श्राद्धपक्षादि.

वार्षियां क्षोभे गगन । वसंतें दुणावें वन ।
देहा शृंगारी यौवन–। दशा जैसी ॥ ११२ ॥
तैसें नित्य जें का कर्म । तें निमित्ताचे लाहे नियम ।
एथ उचावे तेणें नाम । नैमित्तिक गा ॥ ११४ ॥
आणि सायंप्रातर्माध्यान्हीं । जें कां करणीय प्रतिदिनीं ।
परी दृष्टि जैसी लोचनी । अधिक नोहे ॥ ११५ ॥
कां नोंपादितां गती । चरणीं जैसी आथी ।
नातरी जे दीप्ती । दीपबिंबी ॥ ११६ ॥
नित्य कर्म ऐसें जनी । पार्था बोलिजे तें मानी ।
एव नित्यनैमित्तिक दोन्ही । दाविली तुज ॥ ११८ ॥
भोजनी जैसें होये । तृप्ति लाभे भूक जाये ।
तैसें नित्यनैमित्तिकी आहे । सर्वांगी फळ ॥ १२० ॥
प्रत्यवाय तव गळे । स्वाधिकार बहुवें उजळे ।
तेथ हातोफाळिया मिळे । सद्गतीसी ॥ १२२ ॥
नोलांडितां कर्मरेखा । चित्त दीजे नित्यनैमित्तिका ।
पाठी फळा कीजे अशेखा । वातीचिये वानी ॥१२५॥(अ०१८)

## ८ यज्ञदानतपादि कर्में केलींच पाहिजेत.

जियें यज्ञदानतपादिकें । इयें कर्मं आवश्यकें ।
तियें न सांडावीं पांथिकें । पाउलें जैसी ॥ १४९ ॥
हारपलें न देखिजे । तंव तयाचा मागू न साडिजे ।
का तृप्त न होतां न लोटिजे । भाणें जेवीं ॥ १५० ॥
तैसी आत्मज्ञानविखीं । जव निश्चिती नाहीं निकी ।

१ पावसाळ्यात. २ वनशोभा दुप्पट होते. ३ सध्यावदनादि पचमहायज्ञ. ४ न सपादिता. ५ आहेच. ६ मनाचे वगैरे दोष. ७ हातोहात. ८ वमनासारखें सर्व फळहेतु सोडावेत. ९ माग. १० भाडें.

तव नोहावें यागादिकीं । उदासीन ॥ १५२ ॥
तरी स्वाधिकारानुरूपें । तियें यज्ञदानतपें ।
अनुष्ठावीचि साक्षेपें । अविकेंवर ॥ १५३ ॥
जें चालणें वेगावत जाये । तो वेग बैसावयाचि होये ।
तैसा कर्मातिशय आहे । नैष्कर्म्यालागीं ॥ १५४ ॥
अधिकें जवजव औषधी । सेवायाची माडी बांधी ।
तव तव मुकिजे व्याधी । तयाचिये ॥ १५५ ॥
निष्ठा केलें कर्म । तें सांडी करूनि रजतम ।
सत्वबुद्धीचें धाम । डोळां दावी ॥ १५८ ॥
तीर्थें बाह्यमळ क्षाळे । कर्में अभ्यतर उजळे ।
एव तीर्थें जाण निर्मळें । सत्कर्मेंचि ॥ १६० ॥ (अ० १८)

### ९ कम बंधमोचक केव्हां होतात ?

कर्मेंचि कर्मबद्धैता । मुमुक्षु सोडविले पांडुसुता ।
जैसों रसरीती मरतां । राखिला विषें ॥ १६३ ॥
तैसी एके हातवटिया । कर्में कीजती धनजया ।
बधकेंचि सोडवावया । मुख्यें होती ॥ १६४ ॥
तरी महायागप्रमुखें । कर्में निफजताही अचुकें ।
कर्तेपणाचें न ठाके । फुंजणें अगीं ॥ १६६ ॥
जो मोलें तीर्था जाये । तया मी यात्रा करीत आहे ।
ऐसिये श्लाघ्यतेचा नोहे । तोष जेवी ॥ १६७ ॥

---

१ अतिवेगाचें चालणें बसण्यासाठीं ( विश्रांतीसाठी ) असतें, तसें कर्माचा भर नैष्कर्मासाठींच असतो. २ नियम मांडतो. ३ कर्मबंधापासून. ४ रसायनपद्धतीनें दिलेलें मारक विषही मरणाऱ्याला वाचवितें, तसें कर्म बधक खरें पण यथाशास्त्र आचरलें असतां मोक्ष देतें ५ पद्धत, शिस्त. ६ ताठा, अहंकार. ७ प्रतिष्ठेचा, मोठेपणाचा.

जो कांसे लागोनि तरे । तया पोहती उर्मी नुरे ।
पुरोहित नाविष्केरे । दातेपणें ॥ १६९ ॥
तैसें कर्तृत्व—अहंकारें । नेघोनि यथा अवसरें ।
कृत्यजातांचे मोहरें । सारीजती ॥ १७० ॥
केल्या कर्मा पांडवा । जो आथी फळाचा यावा ।
तया मोहरा हो नेदावा । मनोरथ ॥ १७१ ॥
सांडूनि दुधाची टकळी । गोंवारी गांवधेनु वेटाळी ।
किंबहुना कर्मफळीं । तैसें कीजे ॥ १७४ ॥
म्हणोनि फळीं लाग । साडोनि देहसंग ।
कर्में करावी हा चांग । निरोप माझा ॥ १७६ ॥ ( अ० १८ )

## १० कर्मत्याग नव्हे, फलत्याग !

हां गा सव्यसाची । मूर्ति लाहोनि देहाची ।
खती करिती कर्माची । ते गांढवे गा ॥ २१८ ॥
मृत्तिकेचा वीट । घेऊनि काय करील घट ? ।
केउतें ततू पट । साडील तो ? ॥ २१९ ॥
तैसा शरीराचेनि आभासे । नांदत जंव असे ।
तव कर्मत्यागाचें पिसें । काइसें तरी ? ॥ २२२ ॥
यया कर्मातें सांडिती परी । एकीचि ते अवधारीं ।
जे करितां न जाइजे हांरी । फळाशेचिया ॥ २२७ ॥
कर्मफळ ईश्वरी अर्पे । तत्प्रसादें बोध उद्दीपे ।
तेथ रज्जुज्ञानें लोपे । व्याळशंका ॥ २२८ ॥
तेणें आत्मबोधें तैसें । अविद्येसी कर्म नासे ।

---

१ गर्वानें फुगत नाही. २ बुद्धिबळांतील मोहऱ्याप्रमाणे कर्में करून सारीत असतो. ३ प्राप्ति. ४ मार्गाला. ५ इच्छा, ध्यास. ६ सभाळतो, गोळा करितो. ७ सबध. ८ अडाणी. ९ कर्मत्यागाचा प्रकार. १० फळाशेला वश न होणें.

पार्था ! त्यजिलें जैं ऐसें । तै त्यजिलें होय ! ॥ २२९ ॥
म्हणोनि स्वाधिकाराचेनि नांवें । जें वांटिया आलें स्वभावें ।
तें आचरे विधिगौरवें । शृंगारोनी ॥ २०० ॥
कर्तृत्वाचा मद । आणि कर्मफळाचा आस्वाद ।
या दोहींचें नांव बंध । कर्माचा कीं ॥ २०५ ॥ ( अ० १८ )

## ११ कर्मे ईश्वरार्पण कर.

का अभ्यासाही लागीं । कस नाहीं तुझिये अंगीं ।
तरी आम्हासि जया भागीं । तैसाचि अस ॥ ११४ ॥
इंद्रियें न कोंडीं । भोगातें न तोडीं ।
अभिमान न सांडीं । स्वजातीचा ॥ ११५ ॥
कुळधर्म चाळीं । विधिनिषेध पाळीं ।
मग सुखें तुज सरळी[1] । दिधली आहे ॥ ११६ ॥
परी मनें वाचा देहें । जैसा जो व्यापार होये ।
तो मी करित आहे । ऐसें न म्हणें ॥ ११७ ॥
करणें कां न करणें । हें आघवें तोचि जाणे ।
विश्व चळतसे जेणें । परमात्मेनि ॥ ११८ ॥
उणेयापुरेयाचे[2] कांहीं । उरों नेदीं आपुलिया ठायीं ।
स्वजातीचि[3] करूनि घेईं । जीवित्व हें ॥ ११९ ॥
माळिये जेउतें नेलें । तेउतें निवांतचि गेलें ।
तया पाणिया ऐसें केलें । । होआवें[4] गा ॥ १२० ॥
म्हणोनि प्रवृत्ति आणि निवृत्ति । इयें वोझीं नेघे मती ।

१ मोकळीक, सरळ मार्ग. २ कर्म पूर्ण झालें किंवा अपूर्ण राहिलें याचा विचार. ३ आपलें जीवित स्वजातिधर्मांत राबीव, किंवा सजातीचि इ० सजातीय—आपलें जीवित परमात्म्याशीं सजातीय करून घे. ४ त्या पाण्यासारखा मला अनुसर.

अखड चित्तवृत्ति । माझ्या ठायीं ॥ १२१ ॥
येऱ्हवीं तरी सुभटा । उजू कां अव्हाटा ।
रथ काई खटपटा । करित असे ? ॥ १२२ ॥
आणि जें जें कर्म निपजे । तें थोडें बहु न म्हणिजे ।
निब्रातचि अर्पिजे । माझ्या ठायीं ॥ १२३ ॥
ऐसिया मद्भावना । तनुत्यागीं अर्जुना ।
तू सायुज्यसदना । माझिया येसी ॥ १२४ ॥ ( अ० १२ )

## १२ विहितकर्मत्याग म्हणजे नैष्कर्म्य नव्हे.

प्राप्त कर्म साडिजे । येतुलेनि नैष्कर्म्य होइजे ।
हें अर्जुना वाया बोलिजे । मूर्खपणें ॥ ४६ ॥
सागें पैलतीरा जावें । ऐसें व्यसन का जेथ पावे ।
तेथ नावेतें त्यजावें । घडे केवी ? ॥ ७४ ॥
नातरी तृप्ति इच्छिजे । तरीं कैसेनि पाक न कीजे ? ।
की सिद्धही न सेविजे । केवीं सागें ? ॥ ४८ ॥
जव निरार्तता नाही । तव व्यापार असे पाही ।
मग संतुष्टीच्या ठायी । कुठे सहजें ॥ ४९ ॥
म्हणोनि आइकें पार्था । जया नैष्कर्म्यपदीं आस्था ।
तया उचित कर्म सर्वथा । त्याज्य नोहे ॥ ५० ॥
आणि आपुलालिये चाडे । आंपादिलें हें माडे ।
की त्यजिलें कर्म साडे । ऐसें आहे ? ॥ ५१॥
हें वायाचि सैरा बोलिजे । उकॅल तरी देखोनि पाहिजे ।
परी त्यजिता कर्म न त्यजे । निभ्रांत मानीं ॥ ५२ ॥

---

१ सरळ कां आडवाट २ वर्णविशेषानें भागाला आलेले कर्म. ३ कर्मापासून सुटका. ४ सकट. ५ आर्तता ह्म० इच्छा, तिचा अभाव, निरिच्छपणा. ६ कर्माचा स्वीकार व त्याग आपल्या इच्छेवर नाही. ७ उलगडा.

जव प्रकृतीचें अधिष्ठान । तव साडी मांडी हें अज्ञान ।
जे चेष्टा ते गुणाधीन । अपैसी असे ॥ ५३ ॥
देखें विहित कर्म जेतुलें । तें सगळें जरी वोसडिलें ।
तरी स्वभाव काय निमालें । इंद्रियांचे ? ॥ ५४ ॥
सांगें श्रवणी ऐकावें ठेलें ? । की नेत्रीचें तेज गेलें ? ।
हें नासारध्र बुझालें । परिमळ नेघे ? ॥ ५५ ॥
नातरी प्राणापानगति । कीं निर्विकल्पें जाहली मति ? ।
की क्षुधातृषादि आर्ति । खुंटलिया ? ॥ ५६ ॥
हे स्वप्नावबोध ठेले ? । कीं चरण चालों विसरले ? ।
हें असो काय निमाले । जन्ममृत्यू ? ॥ ५७ ॥
हें नै ठकेची जरी काहीं । तरी सांडिलें तें कायी ।
म्हणोनि कर्मत्याग नाहीं । प्रकृतिमता ॥ ५८ ॥
कर्म पराधीनपणें । निपजत असे प्रकृतिगुणें ।
येरीं धरी मोकळीं अंतःकरणें । वाहिजे वाया ॥ ५९ ॥
देखें रथी आरूढिजे । मग जरी निश्चळ बैसिजे ।
तरी चळ होऊनि हिंडिजे । परतंत्रा ॥ ६० ॥
का उचलिलें वायुवशें । चळे शुष्क पत्र जैसें ।
निचेष्ट आकाशें । परिभ्रमे ॥ ६१ ॥
तैसें प्रकृतिआधारें । कर्मेंद्रियविकारें ।
निष्कर्मही व्यापारे । निरंतर ॥ ६२ ॥
म्हणऊनि संग जव प्रकृतीचा । तव त्याग न घडे कर्माचा ।
ऐसियाहि करूं म्हणती तयाचा । आग्रहचि उरे ॥६३॥ (अ० ३)

---

१ मायेचा संग. २ संकल्पविकल्परहित. ३ याप्रमाणे इंद्रियाचे व्यापार जर राहत नाहींत. ४ कर्म प्रकृतीच्या गुणामुळे होत असल्यामुळे पराधीन आहे आणि म्हणून मी कर्म करीन ( धरीं ) किंवा टाकीन ( मोकळी ) असें मानणें व्यर्थ होय.

## १३ आशापाश सोडून क्रमप्राप्त कर्म कर.

जो अंतरीं दृढे । परमात्मरूपीं गूढ ।
बाह्ये तरी रूढ । लौकिक जैसा ॥ ६८ ॥
तो इंद्रियां आज्ञा न करी । विषयांचें भय न धरी ।
प्राप्त कर्म नाव्हेरी । उचित जें जें ॥ ६९ ॥
तो कर्मेंद्रियें कर्मीं । राहटतां तरी न नियमीं ।
परी तेथींचेनि ऊर्मी । झांकोळैना[3] ॥ ७० ॥
तो कामनामात्रें न घेपे । मोहमळें न लिंपे ।
जैसें जळीं जळें न शिंपे[4] । पद्मपत्र ॥ ७१ ॥
तैसा संसर्गामाजी असे । सकळांसारिखा दिसे ।
जैसें तोयसंगें आभासे । भानुबिंब ॥ ७२ ॥
तैसें सामान्यत्वें पाहिजे । तरी साधारणचि देखिजे ।
येरवीं निर्धारितां नेणिजे । सोय[5] जयाची ॥ ७३ ॥
ऐशा चिन्हीं चिन्हित । देखसी तोचि मुक्त ।
आशापाशरहित । वोळख पां ॥ ७४ ॥
अर्जुना तोचि योगी । विशेषिजे[6] जो जगीं ।
म्हणोनि ऐसा होय यालागीं । म्हाणिपे तूतें ॥ ७५ ॥
तू मानसा नियम करीं । निश्चळ होयें अंतरीं ।
मग कर्मेंद्रियें व्यापारीं । वर्ततु सुखें ॥ ७६ ॥
म्हणोनि नैष्कर्म्य होआवें । तरी एथ तें न संभवे ।
आणि निषिद्ध केवीं राहाटावें । विचारीं पां ! ॥ ७७ ॥
म्हणोनि जें जें उचित । आणि अवसरेंकरूनि प्राप्त ।

---

१ निश्चल. २ बाहेरून लोकाचाराप्रमाणें चालणारा. ३ विकारानीं झांकला जात नाहीं. ४ भिजत नाहीं. ५ खोली, आत्मस्थिति. ६ विशेष मानला जातो. ७ कर्मरहित. ८ उचित ह्म० वर्णाश्रमाला अनुसरून.

तें कर्म हेतुरहित । आचरें तूं ॥ ७८ ॥
पार्था आणिकही एक । नेणसी तूं हें कवतिक ।
जें ऐसें कर्ममोचक[1] । आपैसें असे ॥ ७९ ॥
देखें अनुक्रमाधारें[2] । स्वधर्म जो आचरे ।
तो मोक्ष तेणें व्यापारें । निश्चित पावे ॥ ८० ॥
स्वधर्म जो बापा । तोचि नित्ययज्ञ[3] जाण पा ।
म्हणोनि वर्ततां तेथ पापा । संचार नाही ॥ ८१ ॥
हा निजधर्म जै सांडे । आणि कुकर्मी रति घडे ।
तैचि बंध पडे । सांसारिक ॥ ८२ ॥
म्हणोनि स्वधर्मानुष्ठान । तें अखंड यज्ञयाजन ।
जो करी तया बंधन । कहींच न घडे ॥ ८३ ॥ ( अ० ३ )

## १४ ज्ञानयोग व कर्मयोग.

अवधारीं वीरश्रेष्ठा । ये लोकीं या दोनी निष्ठा[4] ।
मजचिपासूनि प्रगटा । अनादिसिद्धा ॥ ३५ ॥
एक ज्ञानयोग म्हणिजे । जो सांख्यीं[5] अनुष्ठिजे ।
जेथ वोळखीसवें पाविजे । तद्रूपता ॥ ३६ ॥
एक कर्मयोग जाण । जेथ साधकजन निपुण[6] ।
होऊनियां निर्वाण । पावती वेळें[7] ॥ ३७ ॥
हे मार्ग तरी दोनी । परी एकवटती निदानीं ।
जैसी सिद्धसाध्यभोजनीं[8] । तृप्ति एक ॥ ३८ ॥
का पूर्वापरसरिता । भिन्न दिसती वाहतां ।

---

१ कर्मबंधापासून सोडविणारें. २ वर्ण व आश्रम यांच्या क्रमानुसार ३ स्वधर्माचरण. ४ मार्ग, संप्रदाय. ५ ज्ञान्यांनीं आचरावा. ६ कर्ममार्गानें साधक तयार होत होत अखेर मोक्षधाम पावतात, हा सावकाशीचा पण सर्वसाध्य असा पथ आहे. ७ शेवटीं. दोघांना गांत एकच. ८ तयार अन्न व तयार करावयाचें अन्न यांच्या सेवनांत.

मग सिंधूमिळणीं ऐक्यता । पावती शेखीं ॥ ३९ ॥
तैसीं दोनीही मतें । सूचिंती एका कारणातें ।
परी उपास्ति ते योग्यते–। अधीन असे ॥ ४० ॥
देखें उत्प्लवनासरिसा । पक्षी फळासि झोंबे जैसा ।
सांगें नर केवी तैसा । पावे वेगा ॥ ४१ ॥
तो हळू हळू ढाळेंढाळें । केतुलेनि एके वेळे ।
मार्गाचेनि बळें । निश्चित ठाकी ॥ ४२ ॥
तैसें देख पा विहंगममतें । अधिष्ठूनि ज्ञानातें ।
साख्य सद्य मोक्षातें । आकळिती ॥ ४३ ॥
येर योगिये कर्माधारें । विहितेंचि निजाचारें ।
पूर्णता अवसरें । पावते होती ॥ ४४ ॥ ( अ० ३ ॥

## १५ संन्यास आणि कर्मयोग दोन्ही तुल्यबळ.

तो म्हणे गा कुंतीसुता । हे सन्यास योग विचारिता ।
मोक्षकर तत्त्वतां । दोनीही होती ॥ १५ ॥
तरी जाणानेणा सकळां । हा कर्मयोग कीरं प्रांजळा ।
जैसी नाव स्त्रियाबाळा । तोयंतरणी ॥ १६ ॥
तैसें सारासार पाहिजे । तरी सोहपा हाचि देखिजे ।

---

१ दोन्ही मार्गाचें साध्य एकच. २ कोणत्या मार्गाची उपासना किंवा अभ्यास करावयाचा हें ज्याच्या त्याच्या योग्यतेवर अवलबून आहे. ३ उड्डाणासरसा. ४ फांदीफांदीनें. ५ विहंगममार्गानें. ज्ञानमार्गाला विहंगममार्ग व कर्ममार्गाला पिपीलिकामार्ग म्हणतात. पिपीलिकेच्या म्ह० मुंगीच्या पावलानें चालतो म्हणून कर्ममार्ग हा पिपीलिकामार्ग होय ६ साख्य ( ज्ञानी ) सद्यः ( तत्काळ ) मोक्षपद गाठतो, कर्ममार्गी विहित स्वकर्माचरणानें तें पावतोच, पण अवसरें म्ह० दीर्घकालाने. ७ जाणत्यानेणत्या सर्वांना. ८ निश्चयेंकरून. ९ सुलभ. १० नदी तरून जाण्यास.

येणें सन्यासफळ लाहिजे । अनायासें ।। १७ ।।
आता याचिलागी सागेन । तुज सन्यासियाचें चिन्ह ।
मग सहजें हे अभिन्न । जाणसी तू ॥ १८ ॥
तरी गेलियाची से[1] न करी । न पवता चाड न धरी ।
जो सुनिश्चळ अतरी । मेरु जैसा ।। १९ ।।
आणि मी माझें ऐसी आठवण । विसरलें जयाचें अतःकरण ।
पार्था तो सन्यासी जाण । निरतर ॥ २० ॥
जो मनें ऐसा जाहला । संगीं तोचि सांडिला ।
म्हणोनि सुखें सुख पावला । अखडित ॥ २१ ॥
आतां गृहादिक आघवें । तें कांहीं न लगे त्यजावें ।
जे[3] घेतें जाहलें स्वभावें । निःसग म्हणऊनि ॥ २२ ॥
तैसा असतेनि उपाधी । नाकळिजे तो कर्मबधीं ।
जयाचिये बुद्धि । सकल्प नाहीं ॥ २४ ॥
म्हणोनि कल्पना जै सांडे । तैचि गा सन्यास घडे ।
इयें कारणें दोनी सांगडे । सन्यासयोग ॥ २५ ॥
सहजें ते अज्ञान । म्हणोनि म्हणती ते भिन्न ।
येऱ्हवीं दीपाप्रति काई आनानें । प्रकाश आहाती ? ॥२७॥
आणि सांख्यी जें पाविजे । तेंचि योगीं गमिजे ।
म्हणोनि ऐक्य दोहींतें सहजें । इयापरी ॥ २९ ॥ (अ० ५)

## १६ संन्यासी व कर्मयोगी दोघांचीं लक्षणें एकच.

जेणें भ्रांतीपासूनि हिरतलें । गुरुवाक्यें मन धुतलें ।
मग आत्मस्वरूपी घातलें । रोऊनियां ॥ ३४ ॥

---

१ सय, आठवण २ ‘ कहे तुका वोही सन्यास । छोडी आस तनकी ’ ३ कारण त्यास वश होणारें अत'करण नि.सग झालेलें असतें. ४ सारखे, तुल्यबल. ५ ज्ञानयोग आणि निष्कामकर्मयोग. ६ वेगवेगळे. ७ सोडवून घेतलें. ८ शिरकवून.

जैसें समुद्रीं लवण न पडे । तव वेगळें अल्प आवडे ।
मग होय सिंधूचिएवढें । मिळे तेव्हां ॥ ३५ ॥
तैसें संकल्पोनि काढिलें । जयाचें मनचि चैतन्य जाहलें ।
तेणें एकदेशियें परी व्यापिलें । लोकत्रय ॥ ३६ ॥
आतां कर्ता कर्म करावें । हें खुंटलें तया स्वभावें ।
आणि करी जऱ्ही आघवें । तऱ्ही अकर्ता तो ॥ ३७ ॥
जे पार्था तया देहीं । मी ऐसा आठऊ नाहीं ।
तरी कर्तृत्व कैचें काई । उरे सांगें ! ॥३८॥
ऐसे तनुत्यागेंविण । अमूर्ताचे गुण ।
दीसती संपूर्ण । योगयुक्तां ॥ ३९ ॥
येऱ्हवीं आणिकांचिये परी । तोही एक शरीरी ।
अशेषाही व्यापारीं । वर्तत दिसे ॥ ४० ॥
तोही नेत्रीं पाहे । श्रवणीं ऐकत आहे ।
परी तेथींचा सर्वथा नोहे । नवल देखें ॥ ४१ ॥
स्पर्शासि तरी जाणे । परिमळ सेवी घ्राणें ।
अवसरोचित बोलणें । तयाहि आथि ॥ ४२ ॥
आहारातें स्वीकारी । त्यजावें तें परिहरी ।
निद्रेचिया अवसरीं । निद्रिजे सुखें ॥ ४३ ॥
आपुलेनि इच्छावशें । तोही गा चालत दिसे ।
पैं सकळ कर्म ऐसें । राहाटे कीर ॥ ४४ ॥
हें सांगों काई एकैक । देखें श्वासोच्छ्वासादिक ।
आणि निमिषोन्मिमिख । आदिकरूनि ॥ ४५ ॥

---

१ तोंपर्यंत तें समुद्रापासून वेगळें असल्यामुळें थोडें वाटतें. २ एकदेशी दिसलें तरी तें त्रिभुवन व्यापतें. ३ देहांत असतांनाही ब्रह्माचे गुण त्यांत दिसतात ४ समयोचित भाषण. ५ टाकतो. ६ डोळे उघडणें व मिटणें.

पार्था तयाचे ठायी । हें आवघेंचि आथि पाहीं ।
परी तो कर्ता नव्हे कांहीं । प्रतीतिबळें[1] ॥ ४६ ॥
आता अधिष्ठानसंगती । अशेषाही इंद्रियवृत्ती ।
आपुलालिया अर्थीं[3] । वर्तत आहाती ॥ ४८ ॥
दीपाचेनि प्रकाशें । गृहींचे व्यापार जैसे ।
देहीं कर्मजात तैसें । योगयुक्ता ॥ ४९ ॥
तो कर्में करी सकळें । परी कर्मबंधा नाकळे ।
जैसें न लिंपे जळीं जळें । पद्मपत्र ॥ ५० ॥
अगा करितेनवीण[4] कर्म । तेंचि तें निष्कर्म ।
हें जाणतो सुवर्म । गुरुगम्य जें ॥ ६३ ॥ ( अ० ५ )

## १७ लोकसंग्रहासाठीं ज्ञात्यांनीं कर्म करावें.

देख पा जनकादिक । कर्मजात अशेख ।
न साडिता मोक्षसुख । पावते जाहले ॥ १५२ ॥
याकारणें पार्था । होआवी कर्मी आस्था ।
हे आणिकाही एका अर्था । उपकारेल[5] ॥ १५३ ॥
जे आचरता आपणपयां । देखी[6] लागेल लोका यया ।
तरी चुकेल हा अपाया । प्रसंगेंचि ॥ १५४ ॥
देखें प्राप्तार्थ[7] जाहले । जे निष्कामता पावले ।
तयाही कर्तव्य असे उरलें । लोकालागी ॥ १५५ ॥
मार्गी अंधासरिसा । पुढें देखणाही[8] चाले जैसा ।
अज्ञाना प्रकटावा धर्म तैसा । आचरोनी ॥ १५६ ॥
हा गा ऐसें जरी न कीजे । तरी अज्ञाना काय उमजे ? ।
तिहीं कवणपरी जाणिजे । मार्गातें या ? ॥ १५७ ॥

---

१ स्वानुभवबलानें. २ आत्मसत्तेनें. ३ विषयांत. ४ कर्तृत्वाहंकाररहित. ५ उपयोगीं पडेल. ६ मार्ग, वळण. ७ कृतकृत्य पुरुष ८ डोळस.

एथ वडील[1] जें जें करिती । तया नाम धर्म ठेविती ।
तेंचि येर अनुष्ठिती । सामान्य सकळ ॥ १५८ ॥
हें ऐसें असे स्वभावें । म्हणोनि कर्म न संडावें ।
विशेषें[2] आचरावें । लागे सतीं ॥ १५९ ॥
आता आणिकांचिया गोठी । कायशा सांगों किरीटी ।
देखें मीचि इये राहाटी । वर्तत असें ॥ १६० ॥
परी स्वधर्मी वर्ते कैसा । साकांक्ष का होय जैसा ।
तयाचि एका उद्देशा–। लागोनियां ॥ १६४ ॥
जें भूतजात सकळ । असे आम्हांअधीनची केवळ ।
तरी न व्हावें बरळ । म्हणोनिया ॥ १६५ ॥
इही आमुची वास पाहावी । मग वर्ततीपरी[7] जाणावी ।
ते लोकस्थिती आघवी । नासिली होईल ॥ १६७ ॥
म्हणोनि समर्थ जो एथें । आथिला सर्वज्ञते ।
तेणें विशेषें कर्मातें । त्यजावेंना ॥ १६८ ॥
देखें फळाचिया आशा । आचरे कामुक जैसा ।
कर्मी भर होआवा तैसा । निराशाही ॥ १६९ ॥
जे पुढतपुढती पार्था । हे सकळ लोकसंस्था ।
रक्षणीय सर्वथा । म्हणऊनिया ॥ १७० ॥
मार्गाधारें वर्तावें । विश्व हें मोहरे लावावें ।
अलौकिक नोहावें । लोकाप्रति ॥ १७१ ॥
तैसी कर्मी जयां अयोग्यता । तयाप्रति नैष्कर्म्यता ।
न प्रगटावी खेळतां । आदिकरुनी ॥ १७३ ॥

---

१ श्रेष्ठ पुरुष. २ सतांनी, पुढाऱ्यांनीं, मार्ग दाखविण्याची जबाबदारी घेणाऱ्यांनीं. ३ दुसऱ्याचे दाखले. ४ सकाम. ५ लोकसंग्रहाच्या हेतूनें. ६ भ्रष्ट. ७ वर्तन. क्रम. ८ लोकाचार, समाजस्थैर्य. ९ लोकसमाज.

तेथें सत्क्रियाचि लावावी । तेचि एकी प्रशसावी ।
निष्कर्मींही दावावी । आचरोनी ॥ १७४ ॥
तया लोकसग्रहालागीं । वर्तता कर्मसंगीं ।
तो कर्मबंध आंगी । वाजेलना ॥ १७५ ॥
जैसी बहुरूपियांची रावो राणी । स्त्रीपुरुषभावो नाहीं मनी ।
परी लोकसपादणी । तैसीच करिती ॥ १७६ ॥ ( अ० ३ )

## १८ कर्म करून अकर्ता.

जो सकळकर्मी वर्तता । देखे आपुली नैष्कर्म्यता ।
कर्मसगें निराशता । फळाचिया ॥ ९३ ॥
आणि कर्तव्यतेलागीं । जयाँ दुसरें नाही जगीं ।
ऐसिया नैष्कर्म्यता तरी चागी । बोधला असे ॥ ९४ ॥
तरी क्रियाकलाप आघवा । आचरत दिसे बरवा ।
तोचि तो ये चिन्ही जाणावा । ज्ञानिया गा ॥ ९५ ॥
अथवा नावे हन जो रिगे । तो थडियेचे रुख जाता देखे वेगें ।
तेचि साचोकारें पाहों जों लागे । तव रुख म्हणे अचळ ॥९७॥
आणि उदोअस्ताचेनि प्रमाणें । जैसें न चलता सूर्याचें चालणें ।
तैसें नैष्कर्म्यतत्त्व जाणे । कर्मींचि असतां ॥ ९९ ॥
तो मनुष्यासारिखा तरी आवडे । परी मनुष्यत्व तया न घडे ।
जैसें जळामाजीं न बुडे । भानुबिंब ॥ १०० ॥
जया पुरुषाच्या ठायीं । कर्माचा तरी खेद नाहीं ।
तरी फळापेक्षा काही । सचरेना ॥ १०३ ॥
आणि हें कर्म मी करीन । अथवा आदरिलें सिद्धी नेईन ।

---

१ आदळणार २ लोकाप्रमाणें वागणूक. ३ आत्मस्वरूपाव्यतिरिक्त विश्वात दुजेपणच नाहीं. ४ सर्व कर्म. ३ तीरावरचे वृक्ष. ५ सूर्याच्या उदयास्तावरून तो चालत नसून चालल्यासारखा दिसतो.

येणें संकल्पेंही जयाचें मन । विटाळेना ॥ १०४ ॥
ज्ञानाग्नीचेनि मुखें । जेणें जाळिली कर्में अशेखें ।
तो परब्रह्मचि मनुष्यवेखें । ओळख तूं ॥ १०५ ॥
कैसी अधिकाधिक आवडी । घेत महासुखाची गोडी ।
सांडोनि[1] या आशा कुरोंडी । अहंभावेंसीं ॥ १०८ ॥
तो दिठी जें पाहे । तें आपणचि होऊनि जाये ।
आइके तें आहे । तोचि जाहला ॥ ११० ॥
चरणीं हन चाले । मुखें जें जें बोले ।
ऐसें चेष्टाजात तेतुलें । आपणचि जो ॥ १११ ॥
हें असो विश्व पाहीं । जयासि आपणपेंवांचूनि नाहीं ।
आता कवण तें कर्म कायी । बाधी तयातें ! ॥ ११२ ॥
म्हणोनि सर्वांपरी मुक्त । तो सकर्मचि कर्मरहित ।
सगुण परी गुणातीत । एथ भ्रांति नाहीं ॥ ११४ ॥
तो देहसंगें तरी असे । परी चैतन्यासारिखा[2] दिसे ।
पाहता परब्रह्माचेनि कसें । चोखाळ[3] भला ॥ ११५ ॥
ऐसाही परी कौतुकें । जरी कर्म करी यज्ञादिकें ।
तरी तियें लया जाती निःशेखें । तयाच्याचि ठायीं ॥ ११६ ॥
तैसीं विधिविधानें विहितें । जरी आचरे तो समस्तें ।
तरी तियें ऐक्यभावें ऐक्यातें । पावतीचि गा ॥ ११८ ॥(अ. ४)

## १९ विहित कर्मानें मोक्षसिद्धी.

आता वर्णाश्रमवशें । जें करणीय[4] आलें असे ।
गोरेया आंगा जैसें । गोरेपण ॥ ८८७ ॥
तया स्वभावविहिता कर्मा । शास्त्राचेनि मुखें वीरोत्तमा ।

---

१ अहंभावासगट आशा ओवाळून सांडतो. २ परब्रह्मासारखा. ३ निर्मळ.
४ कर्तव्य.

प्रवर्तावयालागी प्रमा[1] । अढळ कीजे ॥ ८८८ ॥
पै आपुलेंचि रत्न थितें । घेपे पारखियांचेनि[2] हातें ।
तैसें स्वकर्म आपैतें[3] । शास्त्रें करावें ॥ ८८९ ॥
म्हणोनि ज्ञातिवशें साचार । सहज असे जो अधिकार ।
तो आपुलालिया शास्त्रें गोचर । आपण कीजे ॥ ८९१ ॥
स्वभावें भागा आलें । वरी शास्त्रें खरें केलें ।
तें विहित जो आपुलें । आचरे गा ॥ ८९३ ॥
परी आळस साडुनि । फळकाम दवडुनि ।
आगें जीवें माडुनि । तेथेंचि भरू[4] ॥ ८९४ ॥
वोघी पडिलें पाणी । नेणे आनानी[5] वाहणी ।
तैसा जाय आचरणी । व्यवस्थौनी ॥ ८९५ ॥
अर्जुना जो यापरी । तें विहितकर्म स्वयें करी ।
तो मोक्षाच्या ऐलतीरी । पैठा[6] होय ॥ ८९६ ॥
जे अकरणा[7] आणि निषिद्धा । नवचेचि काही सबंधा ।
म्हणोनि भवा विरुद्धा[8] । मुकला तो ॥ ८९७ ॥
आणि काम्यकर्माकडे । न परतेचि जेथें कोडें[9] ।
तेथं[10] चदनाचेही खोडें । न लेचि तो ॥ ८९८ ॥
येर नित्यकर्म तव । फळत्यागें वेंचिलें सर्व ।
म्हणोनि मोक्षाची शींव । ठाकू लाहे ॥ ८९९ ॥
ऐसेनि शुभाशुभी[11] ससारी । साडिला तो अवधारीं ।
वैराग्यमोक्षद्वारी । उभा ठाके ॥ ९०० ॥

---

१ बुद्धि. २ दुसऱ्याच्या परीक्षेनें ३ स्वाधीन, आपलेसें. ४ भर, आदर. ५ वेगवेगळे प्रवाह. ६ प्राप्त. ७ विहित कर्मे मुळींच न करणें. ८ दुःखयोनीला जात नाहीं. ९ आवडीनें. १० स्वर्गभोगादि चदनाच्या खोड्यांत पडत नाही. ११ पापपुण्यात्मक किंवा भवस्वर्गात्मक.

जें सकळभाग्याची सीमा । मोक्षलाभाची जें प्रमा[1] ।
नाना कर्ममार्गश्रमा । शेवट[2] जेथ ॥ ९०१ ॥
पाहीं आत्मज्ञानसुदिनाचा । वाधावा[3] सागतया अरुणाचा ।
उदय त्या वैराग्याचा । ठावो पावे ॥ ९०३ ॥
ऐसी मोक्षाची योग्यता । सिद्धी जाय तया पांडुसुता ।
अनुसरोनि विहिता । कर्मा यया ॥ ९०५ ॥
हें विहित कर्म पांडवा । आपुला अनन्य[4] वोलावा ।
आणि हेचि परमसेवा । मज सर्वात्मकाची ॥ ९०६ ॥
अगा जयाचें विहित । तें ईश्वराचें मनोगत ।
म्हणोनि केलिया निभ्रांत । सापडेचि तो ॥ ९११ ॥
स्वामीचिया मनोभावा । न चुकिजे हेचि परमसेवा ।
येर तें गा पांडवा । वाणिज्य[5] करणें ॥ ९१३ ॥
म्हणोनि विहित क्रिया केली । नव्हे तयाची खूण पाळिली ।
जयापासूनि कां आली । आकारा भूतें ॥ ९१४ ॥
जो अविद्येचिया चिंधिया । गुडूनि जीवबाहुलिया ।
खेळवितसे तिगुणियां[7] । अहंकाररज्जू ॥ ९१५ ॥
तया सर्वात्मका ईश्वरा । स्वकर्मकुसुमांची वीरा ।
पूजा केली होय अपारा । तोपालागी ॥ ९१७ ॥

## २० जातिधर्मच तारक.

अगा आपुला हा स्वधर्म । आचरणीं जरी विषम[8] ।
तरी पाहावा तो परिणाम । फळेल जेणें ॥ ९२३ ॥

---

१ माप. २ कर्माचरणाचा शेवट जेथें होतो. स्वधर्मकर्मानें मोक्षाचें द्वार असें जें वैराग्य तेंच मिळवायचें असतें ३ वर्धावा, पूर्वसूचना, शुभवर्तमान— (एक-भाग. अ. ७ ओवी ३१९।५७३). ४ एकच एक जिव्हाळा. ५ व्यापार. ६ आज्ञा किंवा मनोगत. ७ त्रिगुणाच्या अहंकाररूप दोरीनें. ८ कठिण.

जैं सुखालागी आपणपयां । निंबचि आथी धनंजया ।
तैं कडुवटपणा तयाचिया । उबगिजेनौ ॥ ९२४ ॥
तैसा स्वधर्मसाकडू । देखोनि केला जरी कॆडू ।
तरि मोक्षसुरवाडू । अंतरला कीं ॥ ९२६ ॥
आणि आपुली माये । कुब्जा जरी आहे ।
तरी जियें तें नोहे । स्नेह कुँन्हें कीं ॥ ९२७॥
येरी जिया परात्रिया । रंभेहूनि बरविया ।
तिया काय करात्रिया । बाळकें तेणें ! ॥ ९२८ ॥
अगा पाणियाहूनि बहुवें । तुपीं गुण कीर आहे ।
परी मीना काय होये । असणें तेथ ? ॥ ९२९ ॥
आघविया जगा जें विँख । तें विखकीडिया पीयूँख ।
जगा गूळ तें देख । मरण दे तया ॥ ९३० ॥
म्हणोनि जें विहित जया तेणें । फिटे ससाराचें धरणें ।
क्रिया कठोर तऱ्ही तेणें । तेचि करावी ॥ ९३१ ॥
येरा पराचाँरा बराविया । ऐसें होईल टेंकलेया ।
पायांचें चालणें डोइया । केलें जैसें ! ॥ ९३२ ॥
यालागी कर्म आपुलें । जें जातिस्वभावें असे आलें ।
तें करी तेणें जितिलें । कर्मबधातें ॥ ९३३ ॥

* * * *

म्हणोनि भलतिये कर्मी । आयास जरी उपक्रमी ।
तरी काय स्वधर्मीं । दोष सागे ? ॥ ९३६ ॥
अगा उजू वाटा चालावें । तरी पायाचि शिणवावें ।
ना आडरानें धावावें । तऱ्ही तेंचि ! ॥ ९३७ ॥

---

१ कटाळता नये. २ कठिण म्हणून सोडला. ३ मोक्षसुखाला मुकला. ४ ज्या मातृप्रेमामुळें आपण जगतों तें स्नेह वाकडें नाहीं. ५ विष. ६ अमृत. ७ चागले म्हणून दुसऱ्याचे आचार घेतले ( टेंकणें=विश्वास ठेवणें, आश्रय करणें ).

पै शिळा का शिदोरिया । दोटणें[1] एक धनजया ।
परी जें वाहता विसावया । मिळिजे तें घेपे ॥ ९३८ ॥
येऱ्हवी कणा आणि भुसा । काडिताही सोस सरिसा ।
जेंचि रवने[2] श्वानमासा । तेंचि हवी ॥ ९३९ ॥
हा गा पाठीं लागला घाई[3] । मरण न चुकेचि पाहीं ।
तरी समोरला काई । आगळें न कीजे[4] ? ॥ ९४३ ॥
कुळस्त्री दाडयाचे घाये । परघर रिघालीही जरी साहे ।
तरी स्वपतीतें वायें । त्यजिलें कीं ! ॥ ९४४ ॥
तैसें आवडतेंही करणें । न निफजे शिणल्याविणें ।
तरी विहित बा रे कोणें । बोलें भारी ? ॥ ९४५ ॥
म्हणोनि करावा स्वधर्म । जो करिता हिरोनि घे श्रम ।
उचित नेईल परम[5] । पुरुषार्थराज ॥ ९४९ ॥
नाना जैसी उदवी । महारोगी दिव्योषधी ।
न विसबिजे तया बुद्धी । स्वकर्म येथ ॥ ९५१ ॥
स्वकर्माचेनि वन्हीं । काम्यनिषिद्धाचिया इंधनीं ।
रजतम कीर दोन्हीं । जाळिली आधी ॥ ९९२ ॥
आणि स्वधर्माचें फळ । ईश्वरीं अर्पूनि सकळ ।
घेऊनि केलें अढळ । वैराग्यपद ॥ ९९५ ॥
वैराग्यलाभ जाला । वरी सद्‌गुरुही भेटला ।
वरी अंकुर फुटला । विवेकाचा ॥ १००१ ॥ ( अ० १८ )

## २० सर्वांचा उद्धार भक्तीनेंच होतो.

अगा कुळाचिया चोखटपणा[6] न लगा[7] । आभिजात्य[8] झणीं श्लाघा[9] ।

---

१ ओझें, भार. २ शिजवण्याचे श्रम. ३ घायानें. ४ पाठीवर शत्रूचा घाव घेऊन मरण्यापेक्षां शत्रूच्या समोर उभे राहून अधिक पराक्रम का गाजवू नये ? ५ मोक्ष. ६ उत्तमपणा, श्रेष्ठपणा. ७ पाहू नका. ८ अभिजातत्व, कुलीनत्व. ९ स्तवू नका.

व्युत्पत्तीचा वाडगा । सोस कां वाहावा ? ॥ ४३१ ॥
कां रूपवयसा माजा । आथिलेपणें कां गाजा ।
एक भाव नाही माझा । तरी पाल्हाळ तें ! ॥ ४३२ ॥
कणेंवीण सोपटें । कणसें लागलीं घनदाटें ।
काय करावें गोमटें । वोस नगर ! ॥ ४३३ ॥
नातरी सरोवर आटलें । रानी दुःखिया दुःखी भेटलें ।
कां वाझ फुली फुललें । झाड जैसें ॥ ४३४ ॥
तैसें सकळ तें वैभव । अथवा कुळजातिगौरव ।
जैसें शरीर आहे सावेव । परी जीवाचि नाही ॥ ४३५ ॥
तैसें माझिये भक्तीवीण । जळो तें जियालेपण ।
अगा पृथ्वीवरी पाषाण । नसती काई ? ॥ ४३६ ॥
म्हणोनि कुळ उत्तम नोहावें । जाती अत्यजही व्हावें ।
वरी देहाचेनि नावें । पशूचेंही लाभो ॥ ४४१ ॥
जे पापयोनी मूढ । मूर्ख जैसे का दगड ।
परी माझ्या ठायी दृढ । सर्वभावें ॥ ४४४ ॥
जयांचिये वाचे माझे आलाप । दृष्टी भोगी माझेंचि रूप ।
जयाचें मन सकल्प । माझाचि वाहे ॥ ४४५ ॥
माझिये कीर्तीवीण । जयांचे रितें नाही श्रवण ।
जया सर्वांगी भूषण । माझी सेवा ॥ ४४६ ॥
ते पापयोनीही होतु का । ते श्रुताधीतही न होतु का ।
परी मजसीं तुकितां तुकीं । तुटी नाहीं ॥ ४४९ ॥
तें उत्तमत्व तैचि तरे । तैचि सर्वज्ञता सरे ।
जै मनोबुद्धि भरे । माझेनि प्रेमें ॥ ४५५ ॥

---

१ चढून जाता. २ सपत्तीच्या डौलाने. ३ व्यर्थ. ४ फोल ५ अवयवसहित. ६ जिवतपण, जीवित. ७ रिकामे. ८ असोत. ९ वेद पढलेले. १० तुलनेला कमी नाहींत.

म्हणोनि कुळजातिवर्ण । हें आघवेंचि गा अकारण ।
एथ अर्जुना माझेपण । सार्थक एक ॥ ४५६ ॥
तेंचि भलतेणें भावें । मन मज आतु येतें होआवें ।
आलें तरी आघवें । मागील वावो ॥ ४५७ ॥

*　　*　　*　　*

दुष्कृती जरी जाहला । तरी अनुतापतीर्थी न्हाला ।
न्हाऊनि मजआत आला । सर्वभावें ॥ ४२० ॥
तरी आतां पवित्र तयाचें कुळ । आभिजात्य तेंचि निर्मळ ।
जन्मलेयाचें फळ । तयासीच जोडलें ॥ ४२१ ॥
जैसें तवचि वहोळवोहळ । जंव न पवती गंगाजळ ।
मग होऊनि ठाकती केवळ । गंगारूप ॥ ४५८ ॥
तैसे क्षत्री वैश्य स्त्रिया । का शूद्रअंत्यजादि इया ।
जाती तवचि वेगळालिया । जव न पवती मातें ॥ ४६० ॥
तंववरी नदनदीची नावें । तवचि पूर्वपाश्चिमेचे यांवे ।
जंव न येती आघवे । समुद्रामाजी ॥ ४६२ ॥
हेंचि कवणें एके मिसें । चित्त माझे ठायी प्रवेशे ।
येतुलें हो मग आपैसें । मीचि होणें असे ॥ ४६३ ॥
अगा वरी फोडावयाचि लागी । लोहो मिळो कां परिसाचे अगी
का जे मिळतिये प्रसगी । सोनेंचि होईल ॥ ४६४ ॥
पाहे पा वल्लभाचेनि व्याजें । तिया व्रजागनाची निजें[6] ।
मज मिनलिया काय माझें । स्वरूप नव्हती ? ॥ ४६५ ॥
नातरी भयाचेनि मिसें । मातें न पविजेचि काय कसें ? ।
कीं अखंड वैरवशें । चैद्यादिकीं ? ॥ ४६६ ॥

---

१ कोणत्याही. २ लहानमोठे ओढे. ३ पाण्याचे लोट, प्रवाह. ४ सहज, आपोआप. ५ स्पर्श झाल्याबरोबर. ६ अतःकरणें. ७ शिशुपालादिक.

अगा ! सोयरेपणेंचि[1] पांडवां । माझें सायुज्य[2] यादवा ।
की ममत्वें वसुदेवा- । दिकां सकळां ॥ ४६७ ॥
नारदा ध्रुवा अक्रुरा । शुका हन सनत्कुमारा ।
इया भक्ती मी धनुर्धरा । प्राप्य जैसा ॥ ४६८ ॥
तैसाचि गोपिकासि कामें । तया कसा भयसंभ्रमें ।
येरां घातका मनोधर्में । शिशुपाळादिकां ॥ ४६९ ॥
अगा ! मी एकलेंणीचें खागें । मज येवों ये भलतेनि मार्गें ।
भक्ति का विषयविरागें । अथवा वैरें ॥ ४७० ॥
भलतिया जाति जन्मावें । मग भाजिजे का विरोधावें ।
परी भक्ता का वैरिया व्हावें । माझियाचि ॥ ४७२ ॥
यालागी पापयोनीही अर्जुना । का वैश्य शूद्र अगना ।
मातें भजतां सदना । माझिया येती ॥ ४७४ ॥ ( अ० ९ )



1 भक्तीच्या योगानें. २ निर्वाणीचें स्थान.

# कर्मयोग

## २ सदाचार अथवा नीति.

### १ विषयसुखाची भ्रांती.

जींहीं आपणपें नाही देखिलें । तेचि इहीं इंद्रियार्थी रजले ।
जैसे[1] रंक का आळुकैलें । तुषातें सेवी ॥ ११० ॥
नातरी मृगें तृषापीडितें । सभ्रमें विसरोनि जळातें ।
मग तोयबुद्धी बरडीतें[2] । ठाकूनि येती ॥ १११ ॥
तैसें आपणपें नाहीं दिठें[3] । जयातें स्वसुखाचे सदा खैराटे[4] ।
तयासीचि विषय हे गोमटे । आवडती ॥ ११२ ॥
येऱ्हवी विषयी सुख आहे । हें बोलणेंचि सारिखें[5] नोहे ।
तरी विद्युत्स्फुरणें कां न पाहे[6] । जगामाजीं ? ॥ ११३ ॥
सागें वातवर्षआँतप[7] धेरे[8] । ऐसें अभ्रच्छायाचि जरी सेरे[9] ।
तरी त्रिमाळिकें[10] धवळारें । करावी कां ? ॥ ११४ ॥
म्हणोनि विषयसुख जें बोलिजे । तें नेणता गा वाया जाल्पिजे ।
जैसें महुरें[11] का म्हणिजे । विषकंदातें ॥ ११५ ॥
नातरी भौमा[12] नाम मगळ । रोहिणीतें म्हणती जळ ।
तैसा सुखप्रवाद बरळें[13] । विषयिक हा ॥ ११६ ॥

---

१ जसा भिकारी भुकेने हपापलेला ( आळुकैले ) कोंडा सुद्धा जातो. २ माळजमिनीवर. ३ पाहिलें. ४ दारिद्र्य ५ योग्य. हें बोलण्यासारखें नाहीं तर हें बरळणें आहे ६ प्रकाशे. ७ वारा, वृष्टि व ऊन. ८ निवारे. ९ सरतें, भागतें. १० तीन मजली चुनेगच्ची वाडे ११ मधुर १२ मगळ. हा पापग्रह आहे. १३ बडबडीचा.

हे असो आघवी बोली । सांग पां सर्पफणीची साउली ।
ते शीतल होईल केतुली । मूषकासी ? ॥ ११७ ॥
जैसा आमिषकवल पांडवा । मीन न सेवी तवचि बरवा ।
तैसा विषयसग आघवा । निभ्रांत जाणें ॥ ११८ ॥
हे विरक्तांचिये दृष्टी । जै न्याहाळिजे किरीटी ।
तैं पाडुरोगाचिये पुष्टी–। सारिखें दिसे ॥ ११९ ॥
म्हणोनि विषयभोगी जें सुख । तें साद्यतचि जाण दु:ख ।
परी काय करिती मूर्ख । न सेवितां न सरे ! ॥ १२० ॥
तें अतरें नेणती बापुडे । म्हणोनि अगत्य सेवणें घडे ।
सागें पूयपकीचे किडे । काय चिळसी घेती ? ॥ १२१ ॥
तया दु:खियां दुःखचि जिव्हार । ते विषयकर्दमाचे दर्दुर ।
ते भोगजळींचे जळचर । सांडिती केवीं ॥ १२२ ॥
ज्ञानियान्या हन ठायीं । याची मातेही कीर नाहीं ।
देही देहभाव जिहीं । स्ववश केले ॥ १२९ ॥ ( अ० ५ )

## २ त्रिविध सुख.

तरी सुख तें गा किरीटी । दाविजेल तुज दिठी ।
जें आत्मयाचिये भेटी । जीवासि होय ॥ ७७३ ॥
तें येथ आत्मसुख । जालें असे त्रिगुणात्मक ।
तेंही सागों एकैक । रूप आता ॥ ७७७ ॥

### १ सात्विकसुख.

जया सुखाचा आरभ । दावी काठिण्याचा क्षोभ ।
मग क्षीराब्धीं लाभ । अमृताचा जैसा ॥ ७८८ ॥
पैहिलिया वैराग्यगरळा । धैर्यशंभु वोडवी गळा ।

---

१ सूज. २ वर्म. ३ विषयाची वार्ताही. ४ आरभीं कठिण पण परिणामी क्षीरसागरमथनानतरच्या अमृतासारखा लाभ. ५ वैराग्यरूपी विषाला. ६ पुढें करितो.

तरी ज्ञानामृतें सोहळा । पाहे तेथें ॥ ७८९ ॥
सागरीं गंगा जैसी । आत्मीं मिनल्या बुद्धि तैसी ।
अद्वयानंदाची अपैसी । खाणी उघडे ॥ ७९२ ॥
ऐसें स्वानुभवविश्रामें । वैराग्यमूळ जें परिणमे ।
तें सात्विक येणें नामें । बोलिजे सुख ॥ ७९३ ॥

२ राजससुख.

आणि विषयेंद्रिया । मेळ होता धनंजया ।
जें सुख जाय थडियां । सांडूनि दोन्ही ॥ ७९४ ॥
नाना रोगिया जिभेपासी । केळें गोड साखरेसी ।
कां बचनागाची जैसी । मधुरता पैंहिली ॥ ७९६ ॥
पहिलें सवँचोराचें मैत्र । हाटैंभेटीचें कलत्र ।
कां लाँघवियाचे विचित्र । विनोद तें ॥ ७९७ ॥
तैसें विषयेंद्रियदोखीं । जें सुख जीवातें पोखी ...॥ ७९८ ॥
पै नामें विषें मधुरें । परी मारूनि अती खरें ।
तैसें आदि जे गोडिरें । अतीं कडू ॥ ८०४ ॥

३ तामससुख.

आणि अपेयाचेनि पानें । अखाद्याचेनि भोजनें ।
स्वैरस्त्रीसन्निधानें । होय जें सुख ॥ ८०६ ॥
जें आलस्यावरी पोखिजे । निद्रेमाजी जें देखिजे ।
जयाच्या आद्यंती भुलिजे । आपुली वाट ॥ ८०८ ॥
तें गा सुख पार्था । तामस जाण सर्वथा ।
हें बहु न सांगोंचि जे कथा । असंभाव्यं हें ॥ ८०९ ॥ (अ० ३)

---

१ ज्ञानामृताचा आनंद. २ मिळाली असता. ३ तीरें ओलांडून अफाट वाहतें. ४ प्रथमच. ५ संगतीचा संभावित चोर. ६ बाजारबसवी स्त्री. ७ बहुरूप्याचे खेळ. ८ जारिणींच्या संगतीनें. ९ पुष्ट होतें. १० त्याज्य.

## ३ कामक्रोध.

तरी हे कामक्रोध पाहीं । जयातें कृपेची साठवण नाहीं ।
हे कृतांताच्या ठायीं । मानिजती ॥ २४० ॥
हे ज्ञाननिधीचे भुजग । विषयदरीचे वाघ ।
भजनमार्गींचे मांग[1] । मारक हे ॥ २४१ ॥
हे देहदुर्गींचे धोंड । इंद्रियग्रामींचे कोंड ।
याचें व्यामोहादिक[2] बंड । जगावरी ॥ २४२ ॥
हे रजोगुण[3] मानसाचे । समूळ आसुरियेचे ।
धायपण ययांचें । अविद्या केलें ॥ २४३ ॥
जयासी भुकेलिया आमिषा[4] । हें विश्व न पुरेसि घांसा ।
कुळवाडी[5] याचि आशा । चाळीत असे ॥ २४६ ॥
हे आगा तव घडले । जीवीचि आथी जडले ।
परी नातुडती गिंवसिले । ब्रह्मादिका ॥ २५५ ॥
इहीं साध्वीशाती नागविली । मग मायामागी शृंगारिली ।
तियेकरवीं विटाळविलीं । साधुवृंदें ॥ २५१ ॥
इहीं संतोषवन खांडिलें । धैर्यदुर्ग पाडिलें ।
आनंदरोप साडिलें । उपडूनिया ॥ २५३ ॥
इहीं बोधाचीं रोपें रुचिलीं[6] । सुखाची लिपीही पुसिली ।
जिव्हारीं आगी सूदली[7] । तापत्रयाची ॥ २५४ ॥
हे जळेवीण बुडविती । आगीवीण जाळिती ।
न बोलतां कवळिती । प्राणियातें ॥ २५७ ॥
हे शस्त्रेंवीण साधिती । दोरेंवीण बांधिती ।

---

१ गावकूस. २ अविवेकादि. ३ मनातल्या रजोगुणापासून झालेले, रजोगुणाचें मानसपुत्र-आसुरी संपत्ति यांची आई व अविद्या यांची दाई. ४ खावयास. ५ यांचा सारा व्यापार आशा पाहत असते. ६ उपटून टाकलीं. ७ घातली.

ज्ञानियांसी तरी वधिती । पैज घेऊनी ॥ २५८ ॥
हे चिखलेंवीण रोंविती । पाशेंवीण गोविती ।
हे कवणाजोगे न होती । आतुंवटपणें ॥ २५९ ॥
हे अंतरीहूनि जरी फिटले । तरी निभ्रांत जाण निवटले ।
जैसें रश्मीवीण उरलें । मृगजळ नाहीं ॥ २७० ॥
तैसे रागद्वेष जरी निमाले । तरी ब्रह्मींचें स्वराज्य आलें ।
मग भोगीं सुख आपुलें । आपणची ॥ २७१ ॥ ( अ० ३ )

## ४ कामक्रोधलोभ.

या कामक्रोधलोभां—। मांजी जीवें जो होय उभा ।
तो निरयपुरीची सभा । सन्मान पावे ॥ ४३१ ॥
धर्मादिका चौहीआंतं । पुरुषार्थाची तैचि मात ।
करावी—जै सवार्त । सांडील हा ॥ ४३३ ॥
पोटीं बांधोनि पाषाण । समुद्रीं बाहीं आगवण ।
कां जियावयां जेवण । काळकूटाचें ॥ ४३६ ॥
इहीं कामक्रोधलोभेंसीं । कार्यसिद्धि जाण तैसी ।
म्हणोनि ठावचि पुसीं । ययांचा गा ॥ ४३७ ॥ ( अ० १६ )

## ५ कामादिकांच्या त्यागें कल्याणाचा मार्ग.

त्रिदोषीं सांडिलें शरीर । त्रिकुटीं फिटलिया नगर ।
त्रिदाह निमालिया अंतर । जैसें होय ॥ ४३९ ॥
तैसा कामादिकीं तिघीं । सांडिला सुख पावोनि जगीं ।
संग लाहे मोक्षमार्गी । सज्जनाचा ॥ ४४० ॥

---

१ प्रतिज्ञापूर्वक. २ फार आत राहत असल्यामुळें, बळकट असल्यामुळें. ३ यांचा जो आश्रय करितो ४ नरकाच्या सभेंत त्याला मानपत्र मिळतें. ५ चारी पुरुषार्थांपैकीं एखाद्याची. ६ संगत ७ बाहुबलानें पोहून जाणें. ८ जगण्यासाठीं. ९ कफवातपित्त याचा अतिरेक. १० चोरी, चहाडी व शिंदळकी. ११ आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक हे त्रिविध ताप.

भग सत्संगें प्रबळें । सच्छास्त्राचेनि बळें ।
जन्ममृत्यूची निमाळें । निस्तरे रानें ॥ ४४१ ॥
ते वेळीं आत्मानंदें आघवें । जें सदा वसतें बरवें ।
तें तैसेंचि पाटण पावे । गुरुकृपेचें ॥ ४४२ ॥
तेथ प्रियांची परमसीमा । तो भेटे माउली आत्मा ।
तये खेवीं आटे डिंडिमा । सांसारिक हें ॥ ४४३ ॥
ऐसा जो कामक्रोधलोभा । झाडी करूनि ठाके उभा ।
तोचि येवढिया लाभा । गोसावी होय ॥ ४४४ ॥ ( अ० १६ )

## ६ मनाची चंचलता व मनोजयाचा उपाय.

१

वाया मन हें नाव । येरवीं कल्पनाचि सावेव ।
जयाचेन सगें जीव-। दशा वस्तु ॥ ११० ॥
जें प्रकृतीस मूळ । कामा जयाचें बळ ।
जें अखंड सुये सळ । अहंकारासी ॥ १११ ॥
जें इच्छेतें वाढवी । आशेतें चढवी ।
जें पाठी पुरवी । भयासी गा ॥ ११२ ॥
द्वैत जेथ उठी । अविद्या जेणें लाठी ।
जें इंद्रियातें लोटी । विषयामाजी ॥ ११३ ॥
संकल्पें सृष्टि घडी । सवेंचि विकल्पूनि मोडी ।
मनोरथांच्या उतरंडी । उतरी रची ॥ ११४ ॥
जें भुलीचें कुहर । जें वायुतत्वाचें अंतर ।
बुद्धीचें द्वार । झाकविलें जेणें ॥ ११५ ॥ ( अ० १३ )

---

१ बरड जमीन. २ सर्वांत अत्यंत आवडती वस्तु. ३ गोंधळ, गलबला. ४ मूर्तिमंत. ५ परमात्मवस्तूला मनाच्या संगतीमुळे जीवदशा येते. ६ बळ देतें. ७ मोठी. ८ लगेच. ९ कोठार १० गाभा.

२

हें मन कैसें केवढें । ऐसें पाहों म्हणों तरी न सापडे ।
येरवीं राहाटावया थोडें । त्रैलोक्य यया !॥ ४१२ ॥
जें बुद्धीतें सैळी[1] । निश्चयातें टाळी ।
धैर्येसीं हातफेळी[2] । मिळवूनि जाय ॥ ४१४ ॥
जें विवेकातें भुलवी । संतोषासी चाड लावी ।
बैसिजे तरी हिंडवी । दाही दिशा ॥ ४१५ ॥
जें निरोधिलें घे[3] उवावो । जया संयमचि होय सांवावो[4] ।
तें मन आपुला स्वभावो । साडील काई ? ॥ ४१६ ॥
तंव श्रीकृष्ण म्हणती साचचि । बोलत आहासि तें तैसेंचि ।
यया मनाचा कीर चपळचि । स्वभाव गा ॥ ४१८ ॥
परी वैराग्याचेनि आधारें । जरी लाविलें अभ्यासाचिये मोहरे[5] ।
तरी केतुलेनि एके अवसरें । स्थिरावेल ॥ ४१९ ॥
यया मनाचें एक निकें । जें देखिलें गोडीचिया ठांया सोके[6] ।
म्हणोनि अनुभवसुखाचि कवतिकें । दावीत जाइजे (अ० ६)

३

जैसीं रथ्योदकें[7] सकळें । घेऊनि गंगा समुद्रीं मिळे ।
मग एकेक वेगळें । निवडूं नये ॥ १५४ ॥
तैसी वासनांतराची विवंचना । मग आपैसी पारुखे अर्जुना ।
जे वेळी गगनीं लयो मना । पवनें कीजे ॥ १५५ ॥
जेथ हें संसारचित्र उमटे । तो मनोरूप पट[9] फाटे ।
जैसें सरोवर आटे । मग प्रतिमा[10] नाही ॥ १५६ ॥

---

१ छळतें. २ हातावर टाळी. ३ उसळी घेतें. ४ साह्य. ५ मार्गाला. ६ ठिकाणाला धरून राहतें. ७ ओढ्यानाल्यांचीं सर्व उदकें. ८ राहते, थांबते. ९ वस्त्र. १० प्रतिबिंब.

तैसें मन एथ मुदल जाये । मग अहंभावादिक कें आहे ? ।
म्हणोनि शरीरेंचि ब्रह्म होये । अनुभवी तो ॥ १५७ ॥ (अ० ५)

४

तू मन हें मीचि करी । माझिया भजनी प्रेम धरीं ।
सर्वत्र नमस्कारीं । मज एकातें ॥ ५१७ ॥
माझेंनि अनुसधानें देख । सकल्प जाळणें निःशेख ।
मद्याजी चोख । याचि नांव ॥ ५१८ ॥ ( अ० ९ )

## ७ त्रिविध आहार.

येऱ्हवी तरी पाहीं । स्वभाववृद्धीच्या ठाईं ।
आहारावांचूनि नाही । बैळी[1] हेतू ॥ ११२ ॥
प्रत्यक्ष पाहे पा वीरा । जो सावध घे मदिरा ।
तो होऊनि ठाके माजिरा[2] । तियेचि क्षणीं ॥ ११३ ॥
का जो सावियां[3] अन्नरस सेवी । तो व्यापिजे वातश्लेष्मस्वभावी[4] ।
काय ज्वर जालिया निववी । पयादिक ? ॥ ११४ ॥
नातरी अमृत जयापरी । घेतलिया मरण वारी ।
का आपुलियाऐसें करी । जैसें विष ॥ ११५ ॥
तेवी जैसा घेपे आहार । धातु[5] तैसाचि होय आकार ।
आणि धातुऐसा आतर[6]- । भाव पोखे ॥ ११६ ॥
जैसें भाडियाचेनि तापें । आतुलें उदक ही तापे ।
तैसी धातुवशें आटोपे । चित्तवृत्ति ॥ ११७ ॥

### १ सात्विक आहार.

तरी सत्वगुणाकडे । जै दैवें भोक्ता पडे ।
तै मधुरीं रसीं वाढे । मेचूं[7] तया ॥ १२५ ॥

---

१ जोरदार कारण. २ उन्मत्त. ३ सावाधान्य, सहज ४ वात व कफ याचे गुणधर्म. ५ रक्तमांसादि धातूचा आकार. ६ अतरातील स्वभाव. ७ आवड.

आगेंचि द्रव्यें सुरसें[1] । जे आगेंचि पदार्थ गोडसे ।
आगेंचि स्नेहें सुपक्कें । बहुवसें जियें ॥ १२६ ॥
आकारें नव्हती डगळें[2] । स्पर्शें[3] अति निबळे[4] ।
जिभेलागी स्नेहाळे । स्वादें जियें ॥ १२७ ॥
रसें गाढीं वरी ढिली[5] । द्रवभावीं आथिलीं ।
ठायेंठाय[6] साडिली । अग्नितापें ॥ १२८ ॥
आगें सानें परिणामें थोर । जैसें गुरुमुखीचें अक्षर ।
तैसा अल्पीं जिहीं अपार । तृप्ति राहे ॥ १२९ ॥
आणि मुखी जैसी गोडें । तैसीचि ही ते आतुलेकडे ।
तिये अन्नीं प्रीति वाढे । सात्विकासी ॥ १३० ॥
शरीरा हन मानसा । बळाचा पै कुवासा ।
हा आहार तरी दशा । कैंची रोगा ? ॥ १३४ ॥
आणि सुखाचें घेणेंदेणें । निकें उवाय ये येणें ।
हें असो वाढे सांजणें । आनंदेसी ॥ १३६ ॥
येणें सात्विकरसें । जव देही मेहो[9] वरिसे ।
तव आयुष्यनदी उससे[10] । देहाचि देहा ॥ १३२ ॥

**२ राजस आहार.**

तरी मारें[11] उणें काळकूट । तेणें मानें जे कडुवट ।
का चुनियाहूनि दासट[12] । आम्लि[13] हन ॥ १३९ ॥
कणिकेतें जैसें पाणी । तैसें मिठ[14] बाचया आणी ।
तेतुलीच मेळवणी । रसांतराची ॥ १४० ॥

---

१ द्राक्ष, आम्र, अजीर, दुग्ध इ०. २ मोठीं, फणसादि ३ मृदु ४ भरपूर ५ साल पातळ. ६ खचित. ७ खरोखर भरभराटीस येतो. ८ सत्य. ९ मेघ वर्षतो. १० दिवसेंदिवस भरून वाहते. ११ मारकपणात काळकूट विष त्याहून कमी. १२ चटका देणारें. १३ आंबट. १४ तितकें मीठ त्यात घालतो.

ऐसें खारट अपांडें[1] । राजसा तया आवडे ।
उन्हांचेनि मिषें[2] तोंडें । आगीचि गिळी ! ॥ ॥ १४१ ॥
वाफेचिया सिगे[3] । वातीही लाविल्या लागे ।
तैसें उन्ह मागे । राजस तो ॥ १४२ ॥
आणि राखेहूनि कोरडें[4] । आतबाहेरी एके पाडें ।
तो जिव्हादशं आवडे । बहु तया ॥ १४४ ॥
आधीचि द्रव्यें चुरमुरी । वरी परवडिजती[5] मोहरी ।
जिये घेता होती धुवारी[8] । नाकातोंडा ॥ १४६ ॥
तैसाचि लवंघा[9] सुटे । मग भुई ना सेजे सांटे[10] ।
पाणियाचे न सुटे । तोंडोनि पात्र ॥ १४७ ॥
हें असो उंगें[11] आगीतें । म्हणे तैसें राइतें ।
पढियें प्राणापरतें । राजसासी गा ॥ १४९ ॥
ते आहार नव्हती घेतले । व्याधिव्याळ[12] जे सुतले ।
ते चेववाया घातलें । माजवण पोटी ॥ १५० ॥

**३ तामस आहार.**

आता तया तामसा । आवडे आहार जैसा ।
तेंही सागों चिळसा[13] । झणें तुम्ही १५३ ॥
तरी कुहिलें[14] उष्टें खाता । न मनिजे तेणें अनहिता ।
जैसें का उपहिता[15] । हैसी खाय ॥ १५४ ॥
निपजलें अन्न तैसें । दुपाहरीं कां येरे[16] दिवसें ।

---

१ अतिशय. २ कढत पदार्थांच्या मिषानें. ३ वाफेच्या टोकावर दिवा लावून घ्यावा इतके कढत ! ४ चिवडा, थालपीट वगैरे पदार्थ. ५ तोंडीं लावणें, चटण्या, तिखटें इ. ६ झणझणित. ७ लावतात ८ वाफा चालतात. ९ दाह, अतितहान. १० मावत नाहीं, गडबडा लोळतो. ११ गप्प बसंवील असें १२ निजलेलें व्याधिरूप सर्प जागृत करण्यासाठीं हे उत्तेजक पदार्थ पोटांत घेतो. १३ किळस मानाल. १४ कुजलेलें. १५ आबोण. १६ आदल्या दिवसाचें.

अति[1]करें तै तामसें । घेइजे तें ॥ १५५ ॥
ऐसेनि कही विपायें । सदन्ना वरपडा होये ।
तरी घाणी सुटे तंव राहे । व्याघ्र जैसा ॥ १५८ ॥
का बहुवे दिवसीं वोलाडिलें । स्वादपणें सांडलें ।
शुष्क अथवा सडलें । गा[2]भिणेंही हो ॥ १५९ ॥
तैसें अपेयांच्या पानी । अखाद्यान्या भोजनी ।
वाढविजे उती[3]न्ही । तामसें तेणें ॥ १६३ ॥ ( अ० १७ )

## ८ आहारविहारांत परिमितता पाहिजे.

जो रसनेंद्रियाचा अंकिला । कां निद्रेसी जीवें विकला ।
तो नाही येथ म्हणितला । अधिकारिया ॥ ३४५ ॥
अथवा आग्रहाचिये बादोडीं[4] । क्षुधा तृषा कोंडी ।
आहारातें तोडी । मारूनिया ॥ ३४६ ॥
निद्रेचिया वाटा न वचे । ऐसा दाढिवेचेनि अवत[5]रणें नाचे ।
तें शरीरचि नव्हे तयाचें । मग योग कवणाचा ! ॥ ३४७ ॥
म्हणोनि अतिशयें विषय सेवावा । ऐसा बोध नोहावा ।
कां सर्वथा निरोधावा । हेंही नको ॥ ३४८ ॥
आहार तरी सेविजे । परि युक्तीचेनि मापें मविजे[6] ।
क्रियाजा[7]त आचरिजे । तयाचि स्थिति ॥ ३४९ ॥
मापि[8]तला बोल बोलिजे । मितलि[9]या पाउली चालिजे ।
निद्रेही मान दीजे । अवसरें येकें ॥ ३५० ॥
जागणें जरी जाहलें । तरि व्हावें तें मितलें ।
येतुलेनि धातुसा[10]म्य सचलें । असेल सुखें ॥ ३५१ ॥ ( अ० ६ )

१ शिळें. २ फुगलेलें. ३ वासना. ४ बंधन, कैद. ५ हट्टवादीपणाचा संचार झाल्यानें. ६ मोजावा. ७ एकंदर सर्वच कर्में. ८ मोजके शब्द. ९ परिमित. १० कफवातपित्ताची समस्थिति.

## ९ सात्त्विक दान.

तरी स्वधर्मांआंतौतें[1] । जें जें मिळेल आपणयातें ।
तें तें दीजे बहुतें । सन्मानयोगें ॥ २६६ ॥
सणसुहृद[2]दसपत्ती । हे तिन्ही येकी मिळती ।
जै भाग्य धरी उन्नती । आपुल्याविषी ॥ २६९ ॥
तैसें निफजवावया दान । जै सत्वै सुये सवाहन ।
तै देशकाळभार्जन । द्रव्यही मिळे ॥ २७० ॥
आचाराचें मूळपीठ । वेदाची उतारपेंठ ।
तैसें द्विजरत्न । पावोनिया ॥ २७४ ॥
मग तयाचे ठायी वित्ता । निवर्तवावी स्वसत्ता ।
परी प्रियापुढें काता । रिगे जैसेनी ॥ २७५ ॥
कां जयाचें ठेविलें तया । देऊनि होय जे उतराइया ।
नाना हडपें विडा राया । दिधला जैसा ॥ २७६ ॥
तैसेंनि निष्कामें जीवें । भूम्यादिक अर्पावे ।
किंबहुना हात्रे[6] । नेदावे उठों ॥ २७७ ॥ ( अ० १७ )

## १० सात्त्विक यज्ञ.

तरी एक प्रियोत्तम- । वाचोनि वाढों नेदी काम ।
जैसा का मनोधर्म । पतिव्रतेचा ॥ १७१ ॥
तैसें जें आपल्या स्वहिती । वेंचूनिया चित्तवृत्ती ।
नुरवितीच अहंकृती । फळालागीं ॥ १७३ ॥
आणि फळवांछात्यागी । स्वधर्मावाचूनि विरागीं ।
कीजे जो यज्ञ सर्वांगीं । अळकृत ॥ १७६ ॥

---

१ आत, मध्यें. २ दसऱ्यासारखा सण, भोजनाला प्रिय आप्त ( जावई वगैरे ) व अनुकूलता. ३ सत्वगुणास प्रोत्साहन किंवा साह्य ( सवाहन ) मिळतें. ४ सत्पात्र. ५ विडा देणारा. ६ फलाशेला डोके वर काढू देऊ नये. ७ स्वधर्माव्यतिरिक्त आसक्ति न ठेवता.

सकळावय–उचितें । लेणी पातली जैसीं आंगातें ।
तैसे पदार्थ जेथींचे तेथें । विनियोगुनी ॥ १८० ॥
तैसा सांगोपाग । निपजे जो याग ।
नुठऊनियां लाग । महत्वाचा ॥ १८२ ॥
प्रतिपाळ तरी पाटींचा । झाडी कीजे तुळसीचा ।
परी फळाफुलाछायेचा । आश्रय नाही ॥ १८३ ॥
किंबहुना फळाशेवीण । ऐसेया निगुती निर्माण ।
होय तो याग जाण । सात्विक गा ॥ १८४ ॥ ( अ० १७ )

## ११ त्रिविध त्याग.

### १ तामस त्याग.

स्वभावें आलें विभागा । तें कर्मचि वोसंडी पै गा ।
तरी झणें आतळा त्यागा । तामसा तया ॥ १८३ ॥

### २ राजस त्याग.

पुढतपुढती कर्म । आरभींच अति विषम ।
म्हणोनि तो ते श्रम । करितां मानी ॥ १८८ ॥
ऐसा शरीराचिया क्लेशा – । भेणें कर्में वीरेशा ।
साडी तो परियेसा । राजस त्याग ॥ १९२ ॥

### ३ सात्विक त्याग.

तरी स्वाधिकाराचेनि नावें । जें वाटिया आलें स्वभावें ।
तें आचरे विधिगौरवें । शृंगारोनी ॥ २०० ॥
कर्तृत्वाचा मद । आणि कर्मफळाचा आस्वाद ।
या दोहींचें नांव बंध । कर्माचा कीं ॥ २०५ ॥
तरी या दोहींच्या विखीं । जैसा बाप नातळे लेकी ।
तैसा हों न शके दुःखी । विहिता क्रिया ॥२०६॥ ( अ०१८)

---

१ उत्तम प्रकारचा. २ युक्तीनें. ३ त्यागी. ४ स्पर्शू नका.

## १२ त्रिविध तप.

### १ शारीरतप.

तप जें का सम्यक । तेंही त्रिविध आइक ।
शारीर मानसिक । शाब्द[1] गा ॥ २०० ॥
आता या तिहीमाझारीं । शारीर तव अवधारीं ।
तरी शंभु का श्रीहरी । पढियंता होय ॥ २०१ ॥
तया प्रिय देवतालया । यात्रादिकें करावया ।
आठही पाहार[2] जैसें पायां । उळिग[3] घापे ॥ २०२ ॥
लिंग कां प्रतिमा दिठी । देखतखेवो[4] अगेष्टी[5] ।
लोटिजे का काठी । पडली जैसी ॥ २०४ ॥
विद्याविनयादिकी । गुणीं वडिल जे लोकीं ।
तया ब्राह्मणाची निकी । पाइकी[6] कीजे ॥ २०५ ॥
अथवा प्रवासें कां पीडा । कां शिणले जे साकडा[7] ।
ते जीव सुरवाडा[8] । आणिजती ॥ २०६ ॥
सकळ तीर्थांचिये धुरे[9] । जियें का मातापितरें ।
तया सेवेसी कीर शरीरें । लोण[10] कीजे ॥ २०७ ॥
आणि संसाराऐसा दारुण । जो भेटलाचि हरी शीण ।
तो ज्ञानज्ञानीं सकरुण । भजिजे गुरु ॥ २०८ ॥
वस्तु भूतमात्रीं नमिजे । परोपकारी भजिजे ।
स्त्रीविषयीं नियमिजे । नांवेनांवें[11] २०९ ॥

### २ वाङ्मयतप.

न दुखवतां सहजें । जावळिया[12] सुख निपजे ।

---

१ वाचिक, वाणीचें. २ प्रहर. ३ बिगार, वेठ. ४ दर्शन होतांच. ५ देहयष्टि, शरीर. ६ सेवा. ७ सकटानीं. ८ सुखस्थितीस. ९ अग्रभागीं. १० ओवाळून टाकणें. ११ क्षणक्षणीं. १२ जवळच्याला, इतरांला.

ऐसें साधुत्व कां देखिजे । बोलेणा जिये ॥ २१७ ॥
जोडे अमृताची सुरसॆरी । तै प्राणातें अमर करी ।
स्नानें पाप ताप वारी । गोडीही दे ॥ २१९ ॥
तैसा अविवेकही फिटे । आपुलें अनादित्व भेटे ।
आइकता रुचि न विटे । पीयूषीं जसी ॥ २२० ॥
जरी कोणी करी पुसणें । तरी होआवें ऐसें बोलणें ।
नातरी आवर्तणें । निगम का नाम ॥ २२१॥
ऋग्वेदादि तिन्ही । प्रतीष्ठीजति वाग्भुवनीं ।
केली जैसी वदनी । ब्रह्मशाळा ॥ २२२ ॥
नातरी एकाधें नांव । तेंचि शैव का वैष्णव ।
वाचे वसे-तें वाग्भव । तप जाणावें ॥ २२३ ॥

**३ मानसतप.**

नानाविकल्पजाळें । साडूनि गेलिया सकळें ।
मन राहे का केवळें । स्वरूपें जें ॥ २२७ ॥
नचॆलतें कलकेवीणें । शशिबिंब जैसें नित्य परिपूर्ण ।
तैसें चोखी शृगारपण । मनाचें जें ॥ २३० ॥

* * * *

पुरतिया सत्वशुद्धी । आचरिजे आस्तिक्यबुद्धी ।
तै तयातेंचि गा प्रबुद्धी । सात्विक म्हणिपे ॥२४१॥ (अ० १७)

## १३ सत्त्ववृद्धीचीं चिन्हें.

पै रजतमविजयें । सत्त्व गा देहीं इयें ।
वाढता चिन्हें तियें । ऐसी होतीं ॥ २०५ ॥
जे प्रज्ञा आतुलीकडे । न समाती बाहेरी वोसंडे ।

---

१ ज्याच्या भाषणांत २ देवनदी, गंगा. ३ असें बोलणें असावें. ४ वेदपठण किंवा नामस्मरण. ५ वाणीचें. ६ अचल. ७ निष्कलंक. ८ आंत न मावून प्रज्ञा उचंबळून बाहेर पडते.

वसती पद्मखडें । द्रुती जैसी ॥ २०६ ॥
सर्वेंद्रियांच्या आगणी । विवेक करी राबणी ।
साचचि करचरणीं । होती डोळे ॥ २०७ ॥
राजहंसापुढें । चांचूचें आगरडें[2] ।
तोडी जेवि झगडे । क्षीरनीराचे ॥ २०८ ॥
तेवीं दोषादोषविवेकी । इंद्रियेंचि होती पारखी[3] ।
नियम बा रे पायिकी[4] । वोळगे तै ॥ २०९ ॥
नायिकणें तें कानचि वाळी[5] । न पाहणें ते दिठीचि गाळी[6] ।
अवाच्य तें टाळी । जीभचि गा ॥ २१० ॥
वातीपुढां[7] जैसें । पळों लागे काळवसें[8] ।
निषिद्ध इंद्रियां तैसें । समोर नोहे ॥ २११ ॥
धाराधरकाळें[9] । महानदी उचंबळे ।
तैसी बुद्धि पघळे[10] । शास्त्रजातीं ॥ २१२ ॥
अगा पुनवेच्या दिवशी । चंद्रप्रभा धांवे आकाशी ।
ज्ञानी वृत्ति तैसी । फांके सैंध ॥ २१३ ॥
वासना एकवटे । प्रवृत्ति वोहटे[11] ।
मानस विटे । विषयावरी ॥ २१४ ॥ ( अ० १४ )

## १४ अज्ञानाचीं कांहीं लक्षणें.

ज्ञान जेथ नाहीं । तें अज्ञानचि पाहीं ।
तरी सांगों कांही काही । चिन्हें तियें ॥ ६५७ ॥
गर्वें पर्वताची शिखरें । तैसा महत्वावरूनि नुतरे ।
तयाचिया ठायीं पुरें । अज्ञान आहे ॥ ६५८ ॥

---

१ परिमळ. २ बारीक टोंक अग्र. ३ परीक्षक. ४ सेवा करण्यास नियमच तयार असतात. ५ टाकते. ६ दृष्टीच पाहणें सोडून देते. ७ दिव्यापुढें ८ अंधार. ९ मुसळधार पाऊस पडत असताना. १० पसरते, फाकते. ११ ओहटी लागते.

घाली विद्येचा पसारा । सुये सुकृताचा डांगोरा ।
करी तेतुलें मोहरा । स्फीतीचियां ॥ ६६० ॥
आणि फुकें भाता फुगे । रोचलिया सवेंचि उफेगे ।
तैसा सयोगावियोगें । चढे वोहटे ॥ ६६५ ॥
निंदा मोटकी आइके । आणि कपाळ धरूनि ठाके ।
थेंबे विरे वारेनि शोखे[3] । चिखल जैसा ॥ ६६७ ॥
तैसा मानापमानीं होये । जो कोण्हीही ऊर्मी । न साहे ।
तयाच्या ठायीं आहे । अज्ञान पुरें ॥ ६६८ ॥
आणि गुरुकुळीं लाजे । जो गुरुभक्ती उभजे[4] ।
विद्या घेऊनि माजे । गुरूसीच जो ॥ ६७३ ॥
जैसें पोटालागी सुणें । उघडें झांकलें न म्हणे ।
तैसें आपलें परावें नेणे । द्रव्यालागी ॥ ६८० ॥
कर्माचा वेळ चुके । कां नित्यनैमित्तिक ठाके[5] ।
तें जया न दुखे । जीवामाजी ॥ ६७१ ॥
मनोरथांचिया धारसा[6] । वाहणें जयाचिया मानसा ।
पूरीं पडला जैसा । दुधियां पाहीं ॥ ६८७ ॥
व्रतातें आड मोडी । स्वधर्म पायें वोलांडी ।
नियमाची आश तोडी । जयाची क्रिया ॥ ६९५ ॥
कुळेसीं जो पाठमोरा । वेदाज्ञेसी दुर्‍हा ।
कृत्याकृत्यव्यापारा । निर्वाड नेणे ॥ ६९७ ॥
वसूं जैसा मोकाट । वारा जैसा अफाट ।
फुटला जैसा पाट । निरंजनीं[11] ॥ ६९८ ॥
आंधळें हातिरूं[12] मारिलें । का डोंगरीं जैसें पेटलें ।

१ प्रतिष्ठेच्या मार्गाकडे. २ सोडला तर दबतो. ३ शुष्क होतो, सुकतो. ४ कटाळे. ५ राहिलें. ६ धारेबरोबर. ७ दुधा भोपळा. ८ दूर. ९ निश्चय. १० पोळ. ११ अरण्यांत. १२ हत्ती.

तैसें विषयी सुटलें । चित्त जयाचें ॥ ६९९ ॥
जन्मोनि मृत्यूवरी । विषयी त्रासितां बहुतीं परी ।
तरी त्रास नेघे धरी । अधिक प्रेमा ॥ ७०९ ॥
सद्‌गुणी मत्सर । व्युत्पत्ती अहकार ।
तपोज्ञानें अपार । ताठा चढे ॥ ७२४ ॥
जो लाटणें ऐसा न लवे । पाथर तेवि न द्रवे ।
गुणियासी नागवे । फोडसें जैसें ॥ ७२६ ॥
आणि पै तयाचिपरी । जीविताची फरौरी ।
देखोनि जो न करी । मृत्युचिंता ॥ ७३७ ॥
शरीरीची वाढी । अहोरात्राची जोडी ।
विषयसुखप्रौढी । साचचि मानी ॥ ७४४ ॥
न करावें तें करी । असंभाव्य मनीं धरी ।
चिंतूं नये तें विचारी । जयाची मती ॥ ७७३ ॥
आंगामनासी रुचावें । येतुलेनि कृत्याकृत्य नाठवे ।
जो करणेयाचेनि नावें । भलतेंचि करी ॥ ७७८ ॥
साखरेचिया राशी । बैसली नुठे माशी ।
तैसेनि स्त्रीचित्त आवेशी । जयाचें मन ॥ ७८३ ॥
ठेला बेडुक कुडीं । मशक गुंतला शेंबुडीं ।
जैसा ढोर सबुडबुडी । रुतला पंकीं ॥ ७८४ ॥
हानी लज्जा न देखे । परापवाद नाइके ।
जयाचीं इंद्रियें एकमुखें । स्त्रियां केली ॥ ७९२ ॥
चित्त आराधी स्त्रियेचें । आणि तियेचेचि छंदें नाचे ।
माकड गारुडियाचें । जैसें होय ! ॥ ७९३ ॥
आपणपेंही शिणवी । इष्टमित्र दुखवी ।

१ मांत्रिकास. २ फुरसें. ३ भरभराट ४ वेष्टून राहतें.

मग कवडाचि वाढवी । लोभी जैसा ॥ ७९४ ॥
तेविं प्रिय वस्तु पावे । आणि सुखें जो उंचावें ।
तैसाचि अप्रियासवें । तळवट घे ॥ ८०६ ॥
आणि अध्यात्मज्ञान काहीं । जेणें मानिलेंचि न्हाही ।
तो ज्ञानार्थ न देखे काई । हें बोलावें असें ? ॥८४३॥ (अ० १३)

## १५ आसुरीसंपत्तीचे सहा दोष.

### १ दंभ.

दृष्टादृष्टांचा[1] सखा । धर्म जाला तो फोकारिजे[2] देखा ।
तरी तारिता तोचि दोखा–। लागी होय ॥ २२२ ॥
म्हणोनि वाचेऱ्या चौबारा[3] । घातलिया धर्माचा पसारा ।
धर्मचि तो अधर्म होय वीरा । तो दंभ जाणे ॥ २२३ ॥

### २ दर्प

मादुरी[4] लोकाचा घोडा । गजपतीही मानी थोडा ।
का काटियेवरिल्या[5] सरडा । स्वर्गही नीच ॥ २२५ ॥
तैसा माजे स्त्रियाधनें । विद्यास्तुतिबहुतें मानें ।
एके दिवसीचेनि परान्नें । अल्पकु[6] जैसा ॥ २२६ ॥

### ३ अभिमान.

पतगा नावडे ज्योती । खद्योता[7] भानूची खती ।
टिटिभेनें अपार्पती[8] । वैरी केला ॥ २३४ ॥
तैसा अभिमानाचेनि मोहें । ईश्वराचेंही नाम न साहे ।
बापातें म्हणे मज हे । सवती जाली ! ॥ २३५ ॥
ऐसा मान्यतेचा पुष्टगड[9] । तो अभिमानी परमलड ।
रौरवाचा रूढ । मार्गचि हा ॥ २३६ ॥

---

१ इहपरलोकींचा. २ दाडोरा पिटणें. ३ चव्हाटयावर. ४ चाबुकस्वाराचा ठाणबदी घोडा ऐरावतालाही कमी मानतो. ५ काटयावरील. ६ भिकारी. ७ काजव्याला. ८ समुद्र. ९ मोठा ताठा.

### ४ क्रोध.

शीतजळाचिये भेटी । तातेला[1] तेली आगी उठी ।
चंद्र देखोनि जळे पोटीं । कोल्हा जैसा ॥ २३८ ॥
तैसा विद्याविनोदविभवें । देखे पुढिलाचीं दैवें ।
तव तव रोष दुणावे । क्रोध तो जाण ॥ २४२ ॥

### ५ पारुष्य.

आणि मन सर्पाची कुटी[2] । डोळे नाराचांची[3] सुटी ।
बोलणें ते वृष्टि । इगळांची[4] ॥ २४३ ॥
येर जें क्रियाजात । तें तिखयाचें[5] कर्वत ।
ऐसें सबाह्य खसखसित[6] । जयाचें गा ॥ २४४ ॥
तो मनुष्यांत अधम जाण । पारुष्याचें अवतरण ।
आता आइक खुण । अज्ञानाची ॥ २४५ ॥

### ६ अज्ञान.

वारा जैसा पारखी[7] । नव्हेचि गा मार्गामार्गाविखी ।
तैसें कृत्याकृत्यविवेकीं । अधपण जें ॥ २४९ ॥
हें चोख हें मैळ[8] । ऐसें नेणोनिया बाळ ।
देखे तें केवळ । मुखींचि घाली ॥ २५० ॥
तैसें पापपुण्याचें खिचटें । करोनि खाता बुद्धिचेष्टे[10] ।
कडु मधुर न वाटे । ऐसी जे दशा ॥ २५१ ॥
तिये नाम अज्ञान । या बोला नाहीं आन ।
एव साही दोषांचें चिन्ह । सांगितलें ॥ २५२ ॥ ( अ० १६ )

---

१ तापलेल्या तेलाची. २ वारूळ. ३ बाणाची वृष्टि. ४ निखाऱ्याची. ५ पोलादाचें कर्वत. ६ कठोर. ७ परीक्षक. ८ स्वच्छ व मलिन. ९ सळमेसळ, भिश्रण. १० बुद्धीच्या व्यापाराला.

## १६ असुरांची वागणुक.

प्रवृत्ति[1] निवृत्ती दोनी । नेणिजती आसुरीं जनीं ।
आणि शौच ते स्वप्नी । देखतीना ते ॥ २८४ ॥
काळिमा सांडील कोळसा । वरी चोखी[2] होईल वायसा ।
राक्षसही मांसा । विटों शके ॥ २८५ ॥
परी आसुरां प्राणियां । शौच नाही धनंजया ।
पवित्रत्व जेवीं भांडिया । मद्याचिया ॥ २८६ ॥
वाढविती विधीची आस । कां पाहती वडिलाची वास[3] ।
कर्मे आचरती–हे भाष । नेणतीचि ते ॥ २८७ ॥
जैसें चरणें शेळियेचे । कां धावणें वारियाचें ।
जाळणें अग्नीचें । भलतेउतें ॥ २८८ ॥
तैसें पुंढां[4] सूनि स्वैर । आचरती ते गा असुर ।
सत्येसी कीर वैर । सदाचि तया ॥ २८९ ॥
येऱ्हवीं करेयाऱ्या[5] ठायी चांग । तयासी कैचें नीट अंग ।
तैसा असुरांचा प्रसंग । प्रसगें परिस ॥ २९३ ॥
विश्व हा अनादि ठावो । येथ नियंता ईश्वररावो ।
चावडिये न्यावो[6] अन्यावो । निवडी वेद ॥ २९५ ॥
ऐसी हे विश्वव्यवस्था । अनादि जे पार्था ।
इयेतें ते म्हणती वृथा । अवघेंचि हें ! ॥ २९७ ॥
म्हणती ' नरकस्वर्ग । नव्हे पापपुण्यभाग ।
जे दोहीं ठायी सुखभोग । कामाचाचि तो ॥ ३०९ ॥
एवं कामावांचूनि कांही । जगा मूळचि आन नाहीं ' ।
ऐसें बोलती पाहीं । असुर ते गा ॥ ३१२ ॥

---

१ पुण्यमार्गाविषयीं तत्परता व पापमार्गाविषयीं विन्मुखता. २ शुभ्रता. ३ चालरीत. ४ स्वैराचाराला, स्वमताला किंवा व्यक्तिस्वातंत्र्याला पुढें करून. ५ उटाच्या. ६ न्यायअन्याय.

उदैजणें केतूचें जैसें । विश्वा अनिष्टोद्देशें[1] ।
जन्मती ते तैसें । लोका आटू ॥ ३१९ ॥
जिहीं परोपतापें[3] घडे । पैराचा[4] जीवू रगडे ।
तिहीं कर्मी होऊनि गाढे । जन्मवृत्ती ॥ ३२७ ॥
मग आपुलें केलें फोकारिती[5] । आणि जगातें धिक्कारिती ।
दाही दिशा पसरिती । स्पृहाजाळ ॥ ३२८ ॥
स्त्रिया गाइलें आइकावें । स्त्रीस्वरूप डोळा पाहावें ।
सर्वेंद्रियें आलिंगावें । स्त्रियेतेचि ॥ ३३४ ॥
कुरवंडी[6] कीजे अमृतें । ऐसें सुख स्त्रियेपरोतें ।
नाहीच म्हणोनि चित्तें । निश्चय केला ॥ ३३५ ॥
एकातें सांवोनि[7] मारिती । एकाचीं सर्वस्वें हरिती ।
एकालागी उभारिती[8] । अपाययंत्रें ॥ ३४४ ॥
मग लवों नेणती कैसे । आंटिवा[9] लोहाचे खाब जैसे ।
का उधंवले[10] आकाशें । शिळाराशी ॥ ३७९ ॥
देवाब्राह्मणाचेनि नांवें । आडवारेंनेंही[11] नोहावें ।
ऐसे आथी तेथ यावें । लागे कवणा ॥ ३८५ ॥ (अ० १६)

## १७ दैवी संपत्तीचे सव्वीस गुण.

जेथ एक एकातें पोखी[12] । ऐसे बहुत पदार्थ ऐकीं[13] ।
संपादिजेती[14] ते लोकी । सपत्ति म्हणिजे ॥ ६६ ॥
ते दैवी सुखसभवी । ते दैवागुणा एकोपजीवी[15] ।
जाली म्हणोनि दैवी । संपत्ती हे ॥ ६७ ॥

---

१ अकल्याणार्थ. २ मारण्यासाठीं. ३ परपाडी. ४ दुसरा ५ प्रसिद्ध करितात. ६ ओवाळून सोडावें. ७ सधी किंवा समय पाहून. ८ नाशाच्या युक्ति उभारतात. ९ मजबूत लोखडाचे स्तभ. १० उचावलेले. ११ वाराही नसावा. १२ पोसते. १३ एकत्र १४ मिळविले जातात १५ सर्व दैवी गुणांना एक आधार.

### १ अभय.

आतां तयाचि दैवगुणा–। माजी धुरेचा[1] बैसणा ।
बैसे[2] तया आकर्णी । अभय ऐसें ॥ ६८ ॥
ऐक्यभावाचेनि पैसें[3] । दुजें मानूनि आत्मा ऐसें ।
भयवार्ता देशें । दवडणें जें ॥ ७१ ॥
पाणी बुडवूं ये मिठातें । तव मीठचि पाणी आते ।
तेवी आपण जालेनि अद्वैतें । नाशे भय ॥ ७२ ॥

### २ सत्वसंशुद्धि.

का वार्षिया सांडिली । ग्रीष्में नाही मांडिली ।
[4]माजी निजरूपें निवडली । गंगा जैशी ॥ ७६ ॥
गावा गेलिया वल्लभ । पतिव्रतेचा विरहक्षोभ ।
भलतैसा[5]ही हानिलाभ । न मनी जेवीं ॥ ७९ ॥
तेवी सत्स्वरूप रुचलेपणें । बुद्धीचें जें अनन्य होणें ।
ते सत्वशुद्धि म्हणे । केशिहंता ॥ ८० ॥

### ३ ज्ञानयोगव्यवस्थिति.

कां सुकुळीनें आपुली । आत्मजा सत्कुळींचि दीधली ।
हे असो लक्ष्मी स्थिरावली । मुकुंदी जैसी ॥ ८३ ॥
तैसें निर्विकल्पपणें[6] । जे योगज्ञानीच वृत्तिक[7] होणें ।
तो तिजा गुण म्हणे । कृष्णनाथ ॥ ८४ ॥

### ४ दान.

आतां देहवाचाचित्तें । यथासंपन्नें वित्तें ।
वैरी जालियाही आर्तातें । न वचणें जें ॥ ८५ ॥

---

१ अग्रभागीं बसणारा, श्रेष्ठ. २ ऐका. ३ प्रसारानें. ४ पावसाळ्याचा पूर ओसरला व उन्हाळ्याचा खडखडाट झाला नाहीं अशा मधल्या वेळीं. ५ केवढाही मोठा. ६ निष्ठेनें ७ वतनदार.

फुलीं फळीं छाया । मूळी पत्रींही धनंजया ।
वाटेचा न चुके आलिया । वृक्ष जैसा ॥ ८६ ॥
तैसें मनौनि धनवरी । विद्यमानें आल्या अवसरीं ।
श्रातााचिये मनोहारी । उपयोगा जाणें ॥ ८७ ॥
तया नाव जाण दान । जें मोक्षनिधानाचें अंजन ।
हें असो, आइक चिन्ह । दमाचें तें ॥ ८८ ॥

५ दम.

तरी विषयेंद्रियमिळणी । करूनि धापे वितुटणी ।
जैसें तोडिजे खडूळ पाणी । पारकेयां ॥ ८९ ॥
तैसा विषयजाताचा वारा । वाजों नेदिजे इद्रियद्वारा ।
इये बांधोनि प्रत्याहारा-। हातीं वोपी ॥ ९० ॥

६ यज्ञ.

जया जें सर्वोत्तम । भजनीय देवताधर्म ।
तें तेणें यथागमें-। विधी यजिजे ॥ ९५ ॥
जैसा द्विज षट्कर्में करी । शूद्र तयातें नमस्कारी ।
या दोहींसीही सरोभरी । निपजे याग ॥ ९६ ॥
तैसा अधिकारपर्यालोचें । हें यज्ञ करणें सर्वांचें ।
परी विष फळाशेचें । न घापे माजी ॥ ९७ ॥
आणि मी कर्ता ऐसा भावो । नेदिजे देहाचेनि द्वारें जावों ।
वेदाज्ञेसी तरी ठावो । होइजे स्वयें ॥ ९८ ॥

७ स्वाध्याय.

आतां चेंडुवे भूमी हाणिजे । हें[10] नव्हे तो हाता आणिजे ।

---

१ मनापासून. २ मनोदयाप्रमाणें. ३ विषय व इद्रियें याची ताडातोड ४ निवळीचें बीं. ५ सयमन. ६ यथाशास्त्र, सप्रदायानुसार, ७ सारखाच. ८ अधिकारपरत्वें. ९ घालू नये. १० भूमीला मारावयासाठीं किंवा आपटण्यासाठीं नव्हे.

कीं शेती बीं विंखुरिजे[1] । परी पिकीं लक्ष ॥ १०० ॥
नातरी ठेविलें[2] देखावया । आदर कीजे दिविया ।
का शाखाफळें यावया । सिंपिजे मूळ ॥ १०१ ॥
हें बहु असो आरिसा । आपणपें देखावया जैसा ।
पुढतपुढती बहुवसा । उटिजे[3] प्रीती ॥ १०२ ॥
तैसा प्रतिपाद्य जो ईश्वर । तो होवयालागीं गोचर ।
श्रुतीचा निरंतर । अभ्यास करणें ॥ १०३ ॥
तें द्विजांसीच ब्रह्मसूत्र[4] । येरां[5] स्तोत्र का नाममंत्र ।
आवर्तणें[6] पवित्र । पावावया तत्व ॥ १०४ ॥
पार्था गा स्वाध्यावो[7] । बोलिजे तो हा म्हणे देवो ।
आता तपशब्दाभिप्रावो । आईक सांगों ॥ १०५ ॥

८ तप.

तरी दानें सर्वस्व देणें । वेंचणें तें व्यर्थ करणें ।
जैसें फळोनि स्वयें सुकणें । ओषधीचें ॥ १०६ ॥
तैसा स्वरूपाचिया प्रसरा–। लागी प्राणेंद्रियशरीरां ।
आटणी करणें जें वीरा । तेंचि तप ॥ १०८ ॥

९ आर्जव.

आता बाळाच्या हितीं स्तन्य । जैसें नानाभूतीं चैतन्य ।
तैसें प्राणिमात्रीं सौजन्य[8] । आर्जव तें ॥ ११३ ॥

१० अहिंसा.

आणि जगाचिया सुखोद्देशें । शरीरवाचामानसें ।
राहाटणें[9] तें अहिंसे । रूप जाण ॥ ११४ ॥

---

१ फेंकायचें. २ अधारात ठेवलेली वस्तु पाहण्यासाठीं. ३ घांसून स्वच्छ करावा. ४ व्यासांचीं वेदांतसूत्रें ? ५ स्त्रीशूद्रादिकांनीं. ६ वारवार पाठ म्हणणें. ७ स्वाध्याय, आत्माभ्यास. ८ समबुद्धीनें वागणें. ९ वागणें.

### ११ सत्य.

तोडावया संदेह । तीख जैसें कां लोह[1] ।
आव्यत्वें तरी माधुर्य । पायीं[2] घाली ॥ ११८ ॥
किंबहुना प्रियपणें । कोणातेंही झकऊं नेणे ।
यथार्थ तरी खुपणें । नाहीं कवणा ॥ १२० ॥
परि अहिती कोपोनि सोपें[3] । लालनी मऊ जैसें पुष्प ।
तिये मातेचें स्वरूप । जैसें का होय ॥ १२३ ॥
तैसें श्रवणसुखचतुर । परिणमोनि[4] साचार ।
बोलणें जें अविकार । तें सत्य येथें ॥ १२४ ॥
कानीं लागता महुर[5] । अर्थे विभाडी जिव्हार[6] ।
ते वाचा नव्हे सुंदर । लांवचि[7] पा ॥ १२२ ॥

### १२ अक्रोध.

आणि घालिताही पाणी । पाषाणी न निघे अणी[8] ।
का मथिलिया लोणी । काजी[9] नेदी ॥ १२५ ॥
त्वचीं[10] पायें शिरीं । हालेयींही[11] फडे न करी ।
वसतीही अंबरी । न होती फुलें ॥ १२६ ॥
नाना रंभेचेनि रूपें । शुकीं नुठिजेचि कंदर्पे ।
कां भस्मीं वन्ही न उद्दीपे । घृतेंही जेवीं ॥ १२७ ॥
पै धातेयांही[12] पाया पडता । नुठी गतायु पाडुसुता ।
तैसी नुपजे उपजविता । क्रोधोर्मी[13] गा ॥ १२९ ॥

---

१ संशयच्छेद करण्याचे कामीं तलवारीच्या धारेसारखें तिखट. २ लाजवितें. ३ पोकळ, लटकें रागावून ४ सत्यपर्यवसायी ५ मधुर ६ मर्मच्छेद करणारी. ७ हडळ, राक्षसी. ८ आणी, अणी ह्म० अंकूर. ९ काजी घुसळली तर लोणी निघत नाही. १० सापाच्या कातीच्या शिरावर. ११ हाणली तरी. १२ ब्रह्मदेवाच्याही. १३ क्रोधाची लाट.

### १३ त्याग.

आतां मृत्तिकात्यागें घट । तंतुत्यागें पट ।
त्यजिजे वटे[1] । बीजत्यागें ॥ १३१ ॥
का त्यजूनि भिंतिमात्र । त्यजिजे आघवेंचि चित्र ।
का निद्रात्यागें विचित्र । स्वप्नजाळ तें ॥ १३२ ॥
तेवी बुद्धिमतीं देहीं । अहता सांडून पाही ।
सांडिजे अशेषही । संसारजात ॥ १३४ ॥

### १४ शांति.

तरी गिळोनि ज्ञेयातें[2] । ज्ञाता ज्ञानही माघौतें ।
हारपे निरुतें । ते शांति पै गा ॥ १३७ ॥

### १५ अपैशुन.

अज्ञानप्रमादादिकीं । कां प्राक्तनीही सदोखीं ।
निंद्यत्वाच्या सर्वविखीं[3] । खिळिले जे ॥ १४५ ॥
तयां आंगीकें[4] आपलें । देऊनिया भलें ।
विसरविजती सलें[5] । सलती तियें ॥ १४६ ॥
अगा पुढिलांचे दोख[6] । करूनि आपुलिये दिटी चोख[7] ।
मग घांपे[8] अवलोक । तयावरी ॥ १४७ ॥
जैसा पूजूनि देव पाहिजे । पेरूनि शेता जाइजे ।
तोषौनि प्रसाद घेइजे । अतिथींचा ॥ १४८ ॥
तैसें आपुलेनि गुणें । पुढिलाचें उणें ।
फेडूनियां[9] पाहणें । तयाकडे ॥ १४९ ॥

### १६ भूतदया.

आतां दया ते ऐसी । पूर्णचंद्रिका जैसी ।

---

१ वटवृक्ष. २ जाणण्याचा विषय. ३ निंद्यत्वाच्या सर्व बाबींत जे जखडले गेले. ४ साह्य. ५ सलणारी शल्यें विसरवितात. ६ दुसऱ्याचे दोष. ७ आपल्या दृष्टीनें निर्मळ करून. ८ घालावा ९ घालवून.

निववितां न कडेसी । सानें थोर ॥ १५४ ॥
पुढिलाचेनि तापें । कळवळलिये कृपें ।
दिधलेंही आपेणपें । न्यूनचि मानी ॥ १५७ ॥
पै पायीं कांटा नेहटे । तव व्यथा जीवीं उमटे ।
तैसा पोळे संकटें । पुढिलाचेनि ॥ १५९ ॥
का पाँवो शीतळता लाहे । कीं तें डोळ्याचिलागीं होये ।
तैसा परसुखें जाये । सुखावत जो ॥ १६० ॥
किंबहुना तृषितालागी । पाणी आरांयिलें असे जगीं ।
तैसें दु:खिताचे सेलँभागी । जिणें जयाचें ॥ १६१ ॥
तो पुरुष वीरराया । मूर्तिमत जाण दया । ..

## १७ अलोलुप्त्व.

ऐहिकीचे का स्वर्गीचे । भोग पाइँक जालिया इच्छेचे ।
परी भोगावे हें न रुचे । मनामाजी ॥ १६६ ॥
बहुवें काय कौतुकी । जीव नोहे विषयाभिलाखी ।
अलोलुप्त्वदशा ठाउकी । जाण ते हे ॥ १६७ ॥

## १८ मार्दव.

आता माशिया जैसें मोहळ । जळचरा जेवी जळ ।
का पक्षिया अतराळ । मोकळें हें ॥ १६८ ॥
नातरी बाळकोद्देशें । मातेचें स्नेह जैसें ।
का वसतीचा स्पर्शें । मऊ मळयानिळ ॥ १६९ ॥
डोळ्यां प्रियाची भेटी । कां पिलिया कूर्मीची दिठी ।
तैसी भूतमात्री राहटी । मवाळ ते ॥ १७० ॥

---

१ विचारीत नाहीं. २ आपलें सर्वस्व. ३ हट्टानें घुसतो. ४ पाय. ५ उत्पन्न झालें, राहिलें. ६ अग्रभागीं, कल्याणासाठीं. ७ इच्छेचे सेवक. ८ आसक्ति नसणें, असगता. ९ वर्तणूक सौम्य.

### १९ ऱ्ही ( लज्जा ).

औ[1]टहातपणें । जें शव होऊनि जिणें ।
उपजों उपजों[2] मरणें । नोवानावां ॥ १७९ ॥
तियें गर्भमेदमुसें । रक्तमूत्ररसें ।
वोतीव[3] होऊनि असे । तें लाजिरवाणें ॥ १८० ॥
हें बहु असो देहपणें । नामरूपासि येणें ।
नाही लाजिरवाणें । तयाहूनी ॥ १८१ ॥

### २० अचापल.

मन[4]पवननियमें । होती दहा इंद्रियें अ[5]क्षमें ।
तें अचापल्य वर्मे । येणें होय ॥ १८५ ॥

### २१ तेज.

वोखटें मरणाऐसें । तेंही आलें अग्निप्रवेशें ।
परी प्राणेश्वरोद्देशें । न गणी[6]चि सती ॥ १८७ ॥
तैसें आत्मनाथाचिया आँधी[7] । लाऊनि[8] विषयविषाची बाधी ।
धावो आवडे पाणधी । शू[9]न्याचिये ॥ १८८ ॥
ऐसें ईश्वराकडे निज । धावे आपसयाँ[10] सहज ।
तया नाव तेज । आध्यात्मिक तें ॥ १९० ॥

### २२ क्षमा.

आतां सर्वही साहातियाँ[11] गरिमा । गर्वा न ये तेचि क्षमा ।
जैसें देह वाहोनि रोमां । वाहणें नेणें ॥ १९१ ॥

---

१ साडेतीन हाताचा देह होऊन. २ वारवार. ३ ओतलेला पुतळा. ४ मन व प्राण याच्या नियमनानें वागणें. ५ स्थिर. ६ मोजीत नाहीं. ७ आत्मप्राप्तीच्या चिंतेमुळें ८ विषयविषाची पीडा दूर करून. ९ शून्याच्या कांटेरी मार्गानें ( पाणधी –दोन कुपणामधील वाट ) योगमार्गानें योगी धावतात १० आपोआप, सहज ११ आपण सर्व सहन करितो अशा मोठेपणाच्या ( गरिमा ) कल्पनेनें.

## २३ धृति.

मा[1]तलिया इंद्रियांचे वेग । का प्राचीनें खवळले रोग ।
अथवा योगवियोग । प्रियाप्रियाचे ॥ १९२ ॥
आधिभूताधिदैवां । अध्यात्मादि उपद्रवां ।
पातलेया पांडवा । गिळूनि घाली ॥ १९५ ॥
ऐसें चित्तक्षोभाच्या अवसरीं । उचलूनि धैर्या जें चां[2]गोवें करी ।
धृति म्हणिपे अवधारीं । तियेतें गा ॥ १९६ ॥

## २४ शौच.

आणि निर्वाळूनि कनकें । भरिला गांगपीयू[3]खें ।
तया कलशाचियासारिखें । शौ[4]च असे ॥ १९७ ॥
जे[5] आंगी निष्काम आचार । जीवीं[6] विवेक साचार ।
तो सबाह्य घडला आकार । शुचित्वाचाचि ॥ १९८ ॥

## २५ अद्रोह.

कां फेडित पापताप । पोखि[5]ते तीरींचे पा[6]दप ।
समुद्रा जाय आप । गंगेचें जैसें ॥ १९९ ॥
का जगाचें आ[7]ध्यं फेडित । [8]श्रियेची राउळें उघडित ।
निघे जैसा भास्वत । प्रदक्षिणे ॥ २०० ॥
तैसीं बाधलीं सोडित । बुडालीं काढित ।
सां[10]कडी फेडित । आर्तांचिया ॥ २०१ ॥
किंबहुना दिवसराती । पुढिलांचें सुख उन्नती ।
आणित आणित स्वार्थी । प्रवेशिजे ॥ २०२ ॥

---

१ माजलेल्या, मर्यादेबाहेर गेलेल्या. २ चांगुलपणा–उत्तम धैर्य धरितो. ३ गंगाजलानें ४ शुद्धता. ५ पोषीत. ६ वृक्ष. ७ अंधार. ८ लक्ष्मीचीं निवासस्थानें ह्म० कमळें प्रफुल्लित करीत ९ बद्धांना. १० संकटें.

**२६ नातिमानिता.**

आणि गंगा शंभूचिया माथा । पावोनि संकोचली जेविं पार्थां ।
तेवीं मान्यपणें सर्वथा । लाजणें जें ॥ २०५ ॥

---

एवं इंहीं सव्विसें । ब्रह्मसंपदा हे वसत असे ।
मोक्ष[1]चक्रवर्तीचें जैसें । अग्रहार होय ॥ २०६ ॥ ( अ० १६ )



---

1 मोक्ष सार्वभौमाचे हे सव्वीस गुण जणू काय इनामच होत.

# ३ ज्ञानयोग.

## १ ज्ञानयोग अथवा सांख्यस्थिति.

तू आपेणपें तरी नेणसी । परी या कौरवातें शोचूं पाहसी ।
हा बहु विस्मय आह्मासी । पुढतपुढती ॥ ९४ ॥
तरी साग पा अर्जुना ! । तुजपासूनि स्थिति या त्रिभुवना ? ।
हे अनादि विश्वरचना । तें लटिकें काई ? ॥ ९५ ॥
येथ समर्थ येक आथी । तयापासूनि भूतें होती ।
हें वायाचि काय बोलती । जगामाजीं ? ॥ ९६ ॥
हो का सांप्रत ऐसें जाहलें । जे हे जन्ममृत्यु तुवां सृजिले ? ।
आणि नाश पावे नाशिले । तुझेनि कायी ? ॥ ९७ ॥
तू भ्रमलेपणें अहकृती । यांसी घात न धरिसी चित्तीं ।
तरी सागें काय हे होती । चिरंतन ? ॥ ९८ ॥
कीं तू येक वधिता । आणि सकळ लोक हा मरता ।
ऐसी भ्रांति झणें चित्ता । येवों देसी ! ॥ ९९ ॥
अनादिसिद्ध हें आघवें । होतजात स्वभावें ।
तरी तुवां का शोचावें । सागें मज ॥ १०० ॥
देखें विवेकी जे होती । ते दोहींतेंही न शोचिती ।
जे होय जाय हे भ्राती । ह्मणऊनियां ॥ १०२ ॥
हें उपजे आणि नाशे । तें मायावशें दिसे ।
येऱ्हवीं तत्वतां वस्तु जें असे । तें अविनाशचि ॥ १०५ ॥
जैसें पवनें तोय हालविलें । आणि तरगाकार जाहलें ।

---

१ स्वतःला. २ आधार. ३ आहे. ४ कदाचित्. ५ अशी भ्राति चित्तावर येऊ देऊ नकोस.

तरी कवण कें जन्मलें । ह्मणों ये येथ ? ॥ १०६ ॥
तेंचि वायूचें स्फुरण ठेलें[1] । आणि सहज उदक सपाट जाहलें ।
तरी आता काय निमालें[2] । विचारी पा ॥ १०७ ॥
आइकें शरीर तरी एक । परी वयसाभेदें[3] अनेक ।
हें प्रत्यक्षचि देख । प्रमाण तू ॥ १०८ ॥
तैसीं चैतन्याच्या ठायीं । शरीरांतरें[4] होती जाती पाहीं ।
ऐसें जाणे तया नाही । व्यामोहदुःख[5] ॥ ११० ॥
देखे इद्रियां आधीन होइजे । तै शीतोष्णांतें पाविजे ।
आणि सुखदुःखीं आकळिजे[6] । आपणपें ॥ ११९ ॥
या विषयांवांचूनि काही । आणीक सर्वथा रम्य नाहीं ।
ऐसा स्वाभावचि पाही । इद्रियांचा ॥ १२० ॥
हे विषय तरी कैसे । रोहिणींचें[7] जळ जैसें ।
कां स्वप्नीचा आभासे । भद्रजाती[8] ॥ १२१ ॥
देखे अनित्य ते यापरी । ह्मणऊनि तू अव्हेरी ।
हा सर्वथा सग न धरी । धनुर्धरा ॥ १२२ ॥

* * * *

या उपाधिमाजी[9] गुप्त । चैतन्य असे सर्वगत ।
तें तत्वज्ञ सतत । स्वीकारिती ॥ १२६ ॥
सलिली पय जैसें । एक होऊनि मिनलें असे ।
परी निवडूनि राजहसें । वेगळें कीजे ॥ १२७ ॥
कां अग्निमुखें किडांळ[10] । तोडोनियां चोखाळ[11] ।
निवडिती केवळ । बुद्धिमत ॥ १२८ ॥

---

१ थाबलें. २ मेलें ३ वयाच्या मानानें बाल्यतारुण्यादि ४ अनेक शरीरें. ५ भ्रान्तीमुळें होणारें दुःख. ६ स्वतःला बाधून घेतो ७ मृगजळ. ८ हत्ती. ९ नामरूपात्मक दृश्यामध्यें. १० हिणकस. ११ शुद्ध.

की भूस बीं एकवट । उपणितां राहे घनवट ।
तेथ उडे तें फळकट । जाणों आलें ॥ १३० ॥
तैसें विचारिता निरसलें । तें प्रपच सहजें सांडवलें ।
मग तत्वता तत्व उरलें । ज्ञानियांसी ॥ १३१ ॥
म्हणोनि अनित्याच्या ठायीं । तया आस्तिक्यबुद्धी नाही ।
निष्कर्ष दोहींही । देखिला असे ॥ १३२ ॥
हा लोकत्रयाकार । तो जयाचा विस्तार ।
तेथ नामवर्णआकार । चिन्ह नाही ॥ १३४ ॥
जो सर्वदा सर्वगत । जन्मक्षयातीत ।
तया केलियाही घात । कदा नोहे ॥ १३५ ॥
आणि शरीरजात आघवें । हें नाशवत स्वभावें ।
म्हणोनि तुवा झुजावें । पांडुकुमारा ॥ १३६ ॥

* * * *

अर्जुना तू हें नेणसी । जरी तत्वता विचारिसी ।
तरी वधिता तू नव्हसी । हे वध्य नव्हती ॥ १३८ ॥
पूर्णकुभ उलडलॉ । तेथ बिंबाकार दिसे भ्रशला ।
परी भानु नाही नासला । तयासवें ॥ १४१ ॥
तैसें शरीराच्या लोपी । सर्वथा नाश नाही स्वरूपीं ।
म्हणऊनि तू हे नारोपीं । भ्राति बापा ॥ १४३ ॥
जैसें जीर्ण वस्त्र साडिजे । मग नूतन वेढिजे ।
तैसें देहातरातें स्वीकारिजे । चैतन्यनाथें ॥ १४४ ॥
हा अनादि नित्यसिद्ध । निरुपाधि विशुद्ध ।
म्हणऊनि शस्त्रादिकी छेद । न घडे यया ॥ १४५ ॥

---

१ पाखडता. २ सारभूत दाणे. ३ निर्णय, सिद्धात. ४ पालथा झाला.

हा प्रळयोदकें नाप्लवे[1] । अग्निदाह न संभवे ।
एथ महाशोष न प्रभवे । मारुताचा ॥ १४६ ॥
अर्जुना हा नित्य । अचळ हा शाश्वत ।
सर्वत्र सदोदित । परिपूर्ण हा ॥ १४७ ॥
हा तर्काचिये[2] दिठी । गोचर नोहे किरीटी ।
ध्यान याचिये भेटी । उत्कंठा वाहे ॥ १४८ ॥
आदि स्थिति अंत । हा निरंतर असे नित्य ।
जैसा प्रवाह अनुस्यूत[3] । गंगाजळाचा ॥ १५३ ॥
जें सर्वत्र सर्वही देहीं । जया करिताही घात नाहीं ।
तें विश्वात्मक तूं पाहीं । चैतन्य एक ॥ १७७ ॥ ( अ० २ )

## २ ज्ञानाची पवित्रता व सामर्थ्य.

जरी कल्मषांचा[4] आगर । तूं भ्रांतीचा सागर ।
व्यामोहाचा डोंगर । होऊनि असंसी ॥ १७२ ॥
तऱ्ही ज्ञानशक्तीचेनि[5] पाडें । हें आघवेंचि गा थोकडें ।
ऐसें सामर्थ्य असे चोखडें[6] । ज्ञानीं इयें ! ॥ १७३
देखे विश्वसभ्रमा[7]ऐसा । जो अमूर्ताचा कवडसा ।
तो जयाचियां[8] प्रकाशा । पुरेचिना ॥ १७४ ॥
तया कायसे हे मनोमळ[9] । हें बोलतांचि अतिकिडाळ[10] ।
नाहीं येणें पाडें[11] ढिसाळें । दुजें जगीं ॥ १७५ ॥
बहुतीपरी पाहतां । पुढतपुढती निर्धारितां ।

---

१ बुडत नाहीं. २ तर्काच्या दृष्टीला दिसत नाहीं ३ अखंड वाहणारा. ४ पातकाची खाण. ५ ज्ञानाच्या प्रचंड शक्तीपुढें. ६ चांगलें. ७ निराकार परब्रह्माची पडछाया ( कडवसा ) जो दृश्याभास किंवा विश्वविस्तार. ८ तो ज्याच्या तेजापुढें कःपदार्थ आहे. ९ पापसंकल्प. १० अतिवाईट, अयोग्य. ११ मोठें, समर्थ.

हे ज्ञानाची पवित्रता । ज्ञानींचि आथी ॥ १८२ ॥
जैसी अमृताची चवी निवडिजे। तरी अमृताचिसारिखी ह्मणिजे ।
तैसें ज्ञान हें उपमिजे । ज्ञानेंसीचि ॥ १८३ ॥ ( अ० ४ )

* * * *

द्रव्यादि याग कीर होती । परी ज्ञानयज्ञाची सरी न पवती ।
जैसी तारा[1]तेजसपत्ती । दिनकरापाशी ॥ १५९ ॥
देखे परमात्मसुखनिधान । साधावया योगीजन ।
जें न विसबिती अजन । उन्मेष[2]नेत्री ॥ १६० ॥
जे धावतया[3] कर्माची लाणी । नैष्कर्म्यबोधाची खाणी ।
जे भुकेलिया धणी[4] । साधनाची ॥ १६१ ॥
जेथ प्रवृत्ति पागुळ जाहली । तर्काची दिठी गेली ।
जेणें इंद्रियें विसरली । विषयसग ॥ १६२ ॥
मनाचें मनपण गेलें । जेथ बोलाचें बोलकेपण ठेलें ।
जयामाजी सापडले । ज्ञेय[5] दिसे ॥ १६३ ॥
जेथ वैराग्याचा पांग[6] फिटे । विवेकाचाही सोस तुटे ।
जेथ न पाहतां सहज भेटे । आपणपें ॥ १७४ ॥ ( अ० ४ )

## ३ त्रिविध ज्ञान.

### १ तामस ज्ञान.

तरी किरीटी जें ज्ञान । हिंडे विधीचेनि वस्त्रें हीन ।
श्रुति पाठिमोरी नग्न[7] । म्हणोनि तया ॥ ५४९ ॥
अगा ! वाता का वाढिलेया । साजुक कां सडलिया ।
विवेक कावळिया । नाहीं जैसा ॥ ५५६ ॥

---

१ ताऱ्याचा प्रकाश. २ ज्ञानाच्या नेत्रीं. ३ सर्वकर्मांच्या समाप्तीचें स्थान, लाणी ह्म० शेवट. ४ तृप्ति. ५ ब्रह्म. ६ दारिद्र्य. ७ विधीचें वस्त्र टाकून दिलेलें, नागवें.

तैसें निषिद्ध सांडूनि द्यावें । कां विहित आदरें घ्या ।
हें विषयाचेनि नावें । नेणेचि जें ॥ ५५७ ॥
जेतुलें आडें पडे दिठीं । तेतुलें घेचि विषयासाठीं ।
मग तें स्त्रीद्रव्य वाटी । शिश्नोदरा ॥ ५५८ ॥
तीर्थातीर्थ हे भाखे । उदकीं नाहीं सनोळख ।
तृषा वोळे तेंचि सुख । वाचूनिया ॥ ५५९ ॥
तयाचिपरी खाद्याखाद्य । न म्हणे निंद्यानिन्द्य ।
तोंडा आवडे तें मेध्य । ऐसाचि बोध ! ॥ ५६० ॥
आणि स्त्रीजात जितुकें । त्वचेंद्रियेंचि वोळखे ।
तियेविषयीं सोयरिकें । सादराचि बहु ॥ ५६१ ॥
मृत्यूचें आघवेंचि अन्न । आगी आघवेंचि इंधन ।
तैसें जगचि आपुलें धन । तामस ज्ञाना ॥ ५६३ ॥
ऐसेंनि विश्व सकळ । जेणें विषयचि मानिलें केवळ ।
तया एक जाण फळ । देहभरण ॥ ५६४ ॥
आकाशपतिता नीरा । जैसा सिंधूचि एक थारा ।
तैसें कृत्यजात उदरा-। लागीचि बुझे ॥ ५६५ ॥
विपायें देव मानिजे । तरी पाषाणमात्रचि जाणिजे ।
आणि आत्मा तव म्हणे । देहातेंची ॥ ५७१ ॥
बधिराचे नीट कान । अपेया नाम पान ।
तैसें आडनाव ज्ञान । तामसा यया ॥ ५८० ! ॥

## २ राजस ज्ञान.

तरी पार्था परियेस । तें ज्ञान गा राजस ।
जें भेदाची कास । धरूनि चाले ॥ ५३८ ॥

१ नजरेपुढें येईल तें भोगासाठीं घेतोच. २ भाषा. ३ पवित्र. ४ समजतो.
५ कधींकाळीं.

अळंकारपणें झाकलें । बाळका सोनें का वाया गेलें ।
तैसें नामी रूपीं दुरावलें । अद्वैत जया ॥ ५४२ ॥
अवतंरली गाडग्या घडा । पृथ्वी सनोळख जाली मूढा ।
वन्हि जाला कानडा । दीपत्वासाठी ॥ ५४३ ॥
का वस्त्रपणाचेनि आरोपें । मूर्खाप्रति ततु हारपे ।
नाना मुग्धा पट लोपे । दाउनी चित्र ॥ ५४४ ॥
तैसी जया ज्ञाना । जाणोनि भूतव्यक्ति भिन्ना ।
ऐक्यबोधाची भावना । निमोनि गेली ॥ ५४५ ॥

**३ सात्विक ज्ञान.**

तरी अर्जुना तें गा फुडें । सात्विक ज्ञान चोखडें ।
जयाच्याँ उदयी ज्ञेय बुडे । ज्ञातेनिसी ॥ ५२९ ॥
जैसा सूर्य न देखे आंधारें । सरिता नेणिजती सागरें ।
का कवळलिया न धरे । आत्मछाया ॥ ५३० ॥
तयापरी जया ज्ञाना । शिवादि तृणावसाना ।
इया भूतव्यक्ति भिन्ना । नाडळती ॥ ५३१ ॥
जया ज्ञानाचिया हाता । नलगेचि दृश्यकथा ।
तें ज्ञान जाण सर्वथा । सात्विक गा ॥५३५॥ (ज्ञाने० अ० १८)

## ४ ज्ञेय.

तरी ज्ञेय ऐसें म्हणणें । वस्तु तें येणेंचिकारणें ।
जें ज्ञानेवाचूनि कवणें । उपाया नये ॥ ८६५ ॥
आणि जाणितलेयावरौतें । काहीं करणें नाहीं जेथें ।
जाणणेंचि तन्मयातें । आणी जयाचें ॥ ८६६ ॥

---

१ गाडगीं, घागरीं इ० नावरूपांत पृथ्वीतत्वाची ओळख विसरला. २ दुर्बोध. ३ नाना भूतें पाहतो पण त्यातील ऐक्याची भावना नाहीं. ४ खरोखर. ५ ज्याच्या उदयात ज्ञात्यासह ज्ञेय बुडतें, त्रिपुटी जेथें मावळतें. ६ शिवापासून तृणापर्यंत. ७ परमात्मवस्तु.

जें जाणतलेयासाठीं । संसार काढूनियां कांठीं[1] ।
जिरोनि जाइजे पोटीं । नित्यानंदाच्या ॥ ८६७ ॥
तें ज्ञेय गा ऐसें । आदि जया नसे ।
परब्रह्म आपैसें । नाम जया ॥ ८६८ ॥
रूप वर्ण व्यक्ति । नाहीं दृश्य द्रष्टा स्थिती ।
तरी कोण कैसे आथी । म्हणावें पा ॥ ८७० ॥
नाना भाडघटशरावीं[2] । तदाकार असे पृथ्वी ।
तैसें सर्व होऊनिया सर्वीं । असे जे वस्तु ॥ ८७३ ॥
नामरूपसंबध । जातिक्रियाभेद ।
हा आकारासीच प्रवाद । वस्तूसि नाहीं ॥ ९०५ ॥
अविनाशभावें । जें सूक्ष्मदशे आघवें ।
व्यापूनि असे तें जाणावें । ज्ञेय येथ ॥ ९१४ ॥
बाल्यादि तिन्हीं वयसी । काया एकचि जैसी ।
तैसें आदिस्थितिग्रासीं[3] । अखड जें ॥ ९२२ ॥
आदींची जे आदी । वृद्धीची जे वृद्धी ।
बुद्धीची जे बुद्धी । जीवाचा जीव ॥ ९२७ ॥
जें मनाचें मन । जें नेत्राचें नयन ।
कानाचें कान । वाचेची वाचा ॥ ९२८ ॥
जें प्राणाचा प्राण । जे गतीचे चरण ।
क्रियेचें कर्तेपण । जयाचेनि ॥ ९२९ ॥[4]
आकार जेणें आकारें । विस्तार जेणें विस्तारे ।
सहार जेणें सहारें । पाडुकुमरा ॥ ९३० ॥
किंबहुना पाडवा । जें आघवेंचि असे आघवा ।
जेथ नाही रिगावा । द्वैतभावासी ॥ ९३५ ॥ ( अ० १३ )

---

१ काठावर, तीरावर ठेवून. २ डेरा. घागर, परळ इ० ३ उत्पत्तिस्थिति-सहारीं. ४ या अर्थाची श्रुतिवचनें प्रसिद्ध आहेत.

### ५ जितेंद्रिय श्रद्धावंतालाच ज्ञान होतें.

आत्मसुखाचिया गोडियें[1] । विटे जो का सकळ विषया ।
जयाच्या ठायीं इंद्रिया । मानें[2] नाहीं ॥ १८७ ॥
जो मनासी चाड[3] न सांगे । जो प्रकृतीचें केलें[4] नेघे ।
जो श्रद्धेचेनि संभोगें । सुखिया जाहला ॥ १८८ ॥
तें ज्ञान हृदयीं प्रतिष्ठे । आणि शांतीचा अंकुर फुटे ।
मग विस्तार बहु प्रकटे । आत्मबोधाचा ॥ १९० ॥
अथवा ज्ञान[5] कीर आपु नोहे । परी ते चाड एकी जरी वाहे ।
तरी तेथ जिव्हाळी[6] काही आहे । प्राप्तीचा पै ॥ १९५ ॥ (अ० ४)

### ६ आत्मज्ञानापुढें इतर ज्ञानें !

अगा ज्ञान हें आपुलें । परी पर[7] ऐसेनि जालें ।
जे आवडोनि घेतलें । भवस्वर्गादिक ॥ ४३ ॥
अगा याचिकारणें । हें उत्तम सर्वांपरी मी म्हणे ।
जे वन्हि हे–तृणें । येरें ज्ञानें ॥ ४४ ॥
तियें आवघींचि ज्ञानें । केली येणें स्वप्नें ।
जैसा वातोर्मि[8] गगनें । गिळिजती अती ॥ ४६ ॥
का उदितें रश्मिराजें[9] । लोपिलीं चंद्रादि तेजें ।
नाना प्रळयांबुमाजें[10] । नदी नद ॥ ४७ ॥
तैसें येणें पाहलेयां[11] । ज्ञातजात जाय लया ।
म्हणोनिया धनंजया । उत्तम हें ॥ ४८ ॥ ( अ० १४ )

---

१ गोडीमुळें २ महत्व. ३ आवड ४ कर्तृत्व स्वतःवर घेत नाहीं. ५ ज्ञान नसलें तरी त्याची आवड–आस्था, जर आहे. ६ ओलावा ७ परकें. ८ वायुलहरी. ९ सूर्य १० प्रळयाच्या महापूरात नदनदी गडप होतात. ११ हें प्रकाशलें असता.

## ७ संशयात्मा विनश्यति.

जया प्राणियाऱ्या ठायीं । इया ज्ञानाची आवडी नाहीं ।
तयाचें जियालें म्हणो काई । वरी[2] मरण चांग ॥ १९३ ॥
जो विषयसुखें रजे[3] । जो ज्ञानेंसीचि माजे ।
तो संशयें अंगिकारिजे । एथ भ्रांति नाहीं ॥ १९८ ॥
जया काळज्वर आगी बाणे । तो शीतोष्णें जैसीं नेणे ।
आगी आणि चांदणें । सरिसेंचि मानी ॥ २०० ॥
तैसें साच आणि लटिकें । विरुद्ध आणि निकें ।
संशयी तो नोळखे । हिताहित ॥ २०१ ॥
हा रात्रीदिवस पाहीं । जैसा जात्यंधा ठाउवा नाहीं ।
तैसें संशयीं असतां कांही । मना न ये ॥ २०२ ॥
म्हणऊनि संशयाहूनि थोर । आणिक नाही पाप घोर ।
हा विनाशाची वागुर । प्राणियासी ॥ २०३ ॥
जै अज्ञानाचें गडदें पडे । तै हा बहुवस मनीं वाढे ।
म्हणोनि सर्वथा मार्ग मोडे । विश्वासाचा ॥ २०५ ॥ ( अ० ४ )

## ८ संतांपाशीं ज्ञान.

१

तें गा ज्ञान पै बरवें । जरी मनीं आथी जाणावें ।
तरी संतातें भजावें । सर्वस्वेंसी ॥ १६५ ॥
जे ज्ञानाचा कुरुठीं । तेथ सेवा हा दारवंटीं ।
तो स्वाधीन करीं सुभटा । वोळंगोनी ॥ १६६ ॥
तरी तनुमनजीवें । चरणासी लागावें ।

---

१ जिणें, जिवतपण. २ त्यापेक्षां. ३ सुखावतो ४ उन्मत्तपणा धरितो. ५ विषमज्वर ६ प्रतिकूळ व अनुकूळ. ७ जन्मांधाला. ८ जाळें ९ काळाकुट्ट अंधार. १० घर ११ उंबरा. १२ सेवा करून.

आणि अगर्वता करावें । दास्य सकळ ॥ १६७ ॥
मग अपेक्षित जें आपुलें । तेंही सांगतील पुसिलें ।
जेणें अतःकरण बोधलें । सकल्पा न ये ॥ १६८ ॥ ( अ० ४ )

२

परी सतांसवें वसतां । योगज्ञानीं पैसतां ।
गुरुचरण उपासिता । वैराग्येसी ॥ ४२२ ॥
येणेंचि सत्कर्में । अशेषही अज्ञान विरमे[3] ।
जयाचें अहं विरमे[4] । आत्मरूपीं ॥ ४२३ ॥ ( अ० १५ )

## ९ अभ्यासयोगाचें एकांतस्थान.

तरी विशेषें आता बोलिजेल । परी तें अनुभवें उपेगा जाईल ।
म्हणोनि तैसें एक लागेल । स्थान पाहावें ॥ १६३ ॥
जेथ आराणुकेचेनि कोडें । बैसलिया उठों नावडे ।
वैराग्यासी दुणीव चढे । देखिलिया जें ॥ १६४ ॥
जो संतीं वसविला ठावो । सतोषासि सावावो ।
मना होय उत्सावो । धैर्याचा ॥ १६५ ॥
अभ्यासचि आंपण यातें करी । हृदयातें अनुभव वरी ।
ऐसी रम्यपणाची थोरी । अखड जेथ ॥ १६६ ॥
जया आंड जाता पार्था । तपश्चर्या मनोरथा ।
पाखडियाही आस्था । समूळ होय ॥ १६७ ॥
स्वभावें वाटे येतां । जरी वरपंडा जाहला अवचितां ।

---

१ निःसकल्प, म्ह० निश्चयारूढ होतें. २ प्रवेश केला असतां. ३ निरास होतें. ४ विश्रांति पावतो. ५ ती जागा पूर्वी सतांनीं वसविलेली असावी. ६ मनात नसलें तरीही अभ्यासानें हृदयात घुसावें. ७ जवळून गेलें तरी पाखांड्याच्या ( अविश्वासी पुरुषाच्या ) ही मनात येथेंच तप करीत रहावें असे सकल्प उठावेत. ८ सहज तेथें प्राप्त झाला तरी.

तरी सकामही परी माघौता । निर्घो विसरे ॥ १६८ ॥
ऐसेनि न राहतयातें राहवी । भ्रमतयातें बैसवी ।
थापटूनि चेववी । विरक्तीतें ॥ १६९ ॥
हें राज्य वर साडिजे । मग निवाता एथेंचि असिजे ।
ऐसें शृगारियांहि उपजे । देखतखेवो ॥ १७० ॥
जें येणेंमानें बरवट । आणि तैसेंचि अतिचोखट ।
जेथ अधिष्ठान प्रगट । डोळा दिसे ॥ १७१ ॥
आणिकही एक पहावें । जें साधकी वसतें होआवें ।
आणि जनाचेनि पायरवें । रुळेचिना ॥ १७२ ॥
जेथ अमृताचेनि पाडें । मूळाहीसकट गोडें ।
जोडती दाटें झाडें । सदा फळतीं ॥ १७३ ॥
पाउला पाउला उदकें । वर्षाकाळावीण अतिचोखें ।
निर्झरें का विशेखें । सुलभें जेथें ॥ १७४ ॥
हा आतपही अळुमाळ । जाणिजे तरी शीतळ ।
पवन अति निश्चळ । मद झुळके ॥ १७५ ॥
बहुतकरूनि निःशब्द । दाट न रिघे श्वापद ।
शुक हन पद्पद । तेउतें नाहीं ॥ १७६ ॥
पाणिलगें हसें । दोनी चारी सारसें ।
कवणें एके वेळे बैसे । कोकिळही हो का ॥ १७७ ॥
निरंतर नाहीं । तरी आलीं गेलीं काहीं ।
होतु का मयूरेंही । आम्ही ना न म्हणों ॥ १७८ ॥
परी आवश्यक पाडवा । ऐसा ठाव जोडावा ।

१ शृगारी, विषयासक्त. २ हालवून जागे करी ३ पाहताक्षणींच ४ बरवें, चागलें. ५ आत्मस्वरूप. ६ वर्दळीनें ७ ऊनही थोडेसें-सौम्य. ८ पोपट किंवा भ्रमर फारसे नसावेत. ९ चक्रवाक पक्षी.

तेथ निगूढ मठ होआवा । का शिवालय ॥ १७९ ॥
दोहींमाजीं आवडे तें । जें मानलें होय चित्तें ।
बहुतकरूनि ऐकातें । बैसिजे गा ॥ १८० ॥
म्हणोनि तैसें तें जाणावें । मनरौहतें पाहावें ।
राहेल तेथें रचावें । आसन ऐसें ॥ १८१ ॥
वरी चोखट मृगसेवँडी । माजी धूतवस्त्राची घडी ।
तळवटीं अँमोडी । कुशाकुर ॥ १८२ ॥
मग तेथ आपण । एकाग्र्य अतःकरण ।
करूनि सद्गुरुस्मरँण । अनुभविजे ॥ १८६ ॥
जेथ स्मरतेनि आदरें । सबाह्य सात्त्विकें भरे ।
जत्र काठिण्य विरे । अहभावाचें ॥ १८७ ॥
विषयाचा विसर पडे । इंद्रियांची कसँमस मोडे ।
मनोंची घडी घडे । हृदयामाजीं ॥ १८८ ॥
ऐसें ऐक्य हें सहजें । फावे[10] तव राहिजे ।
मग तेणेंचि बोवें बैसिजे । आसनावरी ॥ १८९ ॥ (अ० ६)

## १० अश्वत्थवृक्षाचें रूपक.

### १ हेतु.

मोक्ष देईल ज्ञान । येथ कीर नाही ओंन ।
परी तेंचि थारे[12] ऐसें मन । शुद्ध होआवें ॥ ३५ ॥
तरी विरक्तीवाचूनि कहीं । ज्ञानासी तगणें[13] नाहीं ।

---

१ गुप्त गुहा किंवा शिवालय. २ हें वरील एकाताचें वर्णनही अत्यत मनोहर आहे. ३ मन स्थिर राहील असे. 'स्थिरमुखमासन' ४ मृगचर्म, कृष्णाजिन. ५ शेंडे न तोडलेल्या दर्भाचें आसन. ६ सर्व सकल्प दूर सारून. ७ मी श्रीगुरूचा चरणरज असें भावून अहकार दूर सारावा. ८ वळवळ. ९ मनाचा पट विस्तीर्ण करावा म्ह० क्षुद्र सकल्प मोडून घडी बसेल. १० प्राप्त होईतोंवर. ११ अन्यथा. १२ स्थिर होईल, टिकेल. १३ टिकणें.

हें विचारूनि ठायीं । ठेविलें देवें ॥ ३६ ॥
ससारा या समस्ता । जाणिजे जैं अनित्यता ।
तै वैराग्य दवडिता । पाठीं लागे ॥ ३९ ॥
आता अनित्यत्व या कैसें । तेंचि वृक्षाकारमिषें[1] ।
सांगिजत असे विश्वेशें । पचदर्शी ॥ ४० ॥
करूनि संसार वावो । स्वरूपी अहतेचा ठावो[2] ।
होआवया अध्यायो । पधरावा हा ॥ ४१ ॥

**२ संसारवृक्ष.**

अगा पै पाडुकुमरा । येता स्वरूपाचिया घरा ।
करीतसे आडवारा[3] । विश्वाभास जो ॥ ४६ ॥
तो हा जगडबरू । नोहे येथ ससारू ।
हा जाणिजे महातरू । थावलों[4] असे ॥ ४७ ॥
परी येरा रुखासारिखा[5] । तळीं मूळें वरी शाखा ।
तैसा नोहे, म्हणोनि लेखां[6] । न येचि कवणा ॥ ४८ ॥
अर्जुना हें कवतिक । सागतां असे अलौकिक ।
जे वाढी अधोमुख । रुखा यया ॥ ५१ ॥
जैसा भानु उची नेणों कें । रश्मिजाळ तळीं फाके ।
ससार हें कावरुँखें[7] । झाड तैसें ॥ ५२ ॥
आणि आथी नाथी जितुकें । रुंधलें[8] असे येणेंचि एकें ।
कल्पातीचेनि उदकें । व्योम जैसें ॥ ५३ ॥
यया फळ ना चुंबिता । फूल ना तुरबिता ।
जें कांहीं पडुसुता । ते रुखाचि गा ॥ ५५ ॥

---

१ वृक्षाच्या रूपकानें. २ आत्मरूपीं जीवाहता स्थिर व्हावी यासाठीं. ३ अडथळा. ४ वाढलेला, विस्तारलेला. ५ इतर सामान्य वृक्षासारखा. ६ अत लागत नाहीं. ७ आश्चर्योत्पादक ८ व्यापलें, आडवलें.

हा ऊर्ध्वमूळ आहे । परी उन्मूळिला नोहे ।
येणेंचि हा होये । शाड्वळ गा ॥ ५६ ॥

**३ हा ऊर्ध्वमूळ कसा ?**

मग म्हणे धनजया । तें ऊर्ध्व गा तरु यया ।
येणें रुखेंचि का जया । ऊर्ध्वता गमे ॥ ७२ ॥
येऱ्हवीं मध्योर्ध्व अध । हे नाही जेथ भेद ।
अद्वयासी एकवद । जया ठायीं ॥ ७३ ॥
जो नाइकिजता नाद । जो असौरभ्य मकरंद ।
जो आंगेंथिला आनद । सुरतेंविण ॥ ७४ ॥
जया जें आऱ्हा परौतें । जया जें पुढें माघौतें ।
दृश्येवीण देखते । अदृश्य जें ॥ ७५ ॥
ज्ञातृज्ञेयविहीन । नुसधेंचि जें ज्ञान ।
सुखों भरलें गगन । गाळीव जें ॥ ७७ ॥
जें कार्य ना कारण । जया दुजें ना एकपण ।
आपणया जें जाण । आपणाचि ॥ ७८ ॥
ऐसें वस्तु जें साचें । तें ऊर्ध्व गा यया तरूचें ।
जेथें अंार घेणें मूळाचें । तें ऐसें असे ॥ ७९ ॥

**४ त्याचा बीजांकुरभाव.**

तरी माया ऐसी ख्याती । नसधीच यया आथी ।
का वांझेची सतती । वानणें जैसें ॥ ८० ॥

---

१ उपटून टाकलेला. २ हिरवागार. ३ ज्याच्या ठायीं या ससारवृक्षामुळें ऊर्ध्वता वाटतें तें ब्रह्म याचें ऊर्ध्व आहे, तें याचें मूळ. ४ एकपण. ५ नाकानें वास न घेता येण्याजोगा परिमळ–तात्पर्य ब्राह्येंद्रियनिरपेक्ष सुख देणारा. ६ स्वयमेव, मूर्तिमत. ७ अलीकडे पलीक्डे. ८ केवळ ज्ञप्तिमात्र ९ आकाशापेक्षा सूक्ष्म ( गाळीव ) व सुखमय. १० अग्र, आर, आगर, अग्री ह्म० अकूर. ११ मिथ्या.

तैसी सत् ना असत् होये । जे विचाराचें नाम न साहे ।
ऐसियापरीची आहे । अनादि म्हणती ॥ ८१ ॥
जे नाना तत्वाची मादूस[1] । जे जगद्वस्त्राचें आकाश[2] ।
जे आकारजाताचें दुस । घडी केलें ॥ ८२ ॥
जे भवद्रुमबीजिका । जे प्रपंचचित्रभूमिका[3] ।
विपरीतज्ञानदीपिका । साचली जे ॥ ८३ ॥
ते माया वस्तूच्या ठायीं । असे जैसेंनि नाहीं ।
मग वस्तुप्रभावचि पाहीं । प्रगट होय ॥ ८४ ॥
जेव्हा आपणया आली निद[4] । करी आपणपें जेविं मुग्ध[5] ।
का काजळी आणि मंद-। प्रभा दीपीं ॥ ८५ ॥
तैसी स्वरूपी जाली माया । आणि स्वरूप नेणणें जें धनंजया ।
तेंचि तरू यया । मूळ पहिलें ॥ ८७ ॥
वस्तूसि आपुला जो अबोध । तो[6] ऊर्ध्वी आठुळैजे कंद ।
वेदातीं हाचि प्रसिद्ध । बीजभाव ॥ ८८ ॥
घनँ अज्ञान सुषुप्ती । तो बीजांकुरभाव म्हणती ।
येर स्वप्न हन जागृती । हा फळभाव तियेचा ॥ ८९ ॥
ऐसी यया वेदातीं । निरूपणभाषाप्रतीति ।
परी तें असो प्रस्तुतीं । अज्ञान मूळ ॥ ९० ॥

**५ हा अधःशाख कसा.**

मग आधिली[8] देहातरें । उठती जियें अपारें ।
तें चौपासीं[9] घेऊनि आगारें । खालावती ॥ ९२ ॥

---

१ पेटी. २ वस्त्र-विश्वाकारवस्त्राची घडी. ३ प्रपचचित्र लिहावयाची भिंत. ४ निद्रा. ५ मूढ. ६ आत्मविस्मृति हाच घट्ट झालेला ( आठुळलेला ) कंद, बीज. ७ पूर्ण अज्ञान ह्म० सुषुप्ती ही अकुरभाव व जागृति-स्वप्न हा फळभाव. ८ पहिले, खालचे ९ चोंहींकडे अकुर घेऊन खोल फैलावतात.

तेथ चिद्‌वृत्ति[1] पहिलें । महत्तत्त्व उमललें ।
तें पान वालेंदुल्हें[2] । एक निघे ॥ ९४ ॥
मग सत्वरजतमात्मक । त्रिविध अहंकार जो एक ।
तो तिवणा[3] अधोमुख । डिरु[4] फुटे ॥ ९५ ॥
तो बुद्धीची घेऊनि आगारी । भेदाची वृद्धि करी ।
तेथ मनाचे डांळ[5] धरी । सांजेपणें[6] ॥ ९६ ॥
मग आकाश वायु द्योतकँ[7] । आप पृथ्वी हे पांच फोक ।
महाभूताचे सरोखे[8] । सरळे होती ॥ ९८ ॥
एवं महदहं बुद्धि । मन महाभूत समृद्धि ।
इये संसाराचिये अवधी । सासनिजे ॥ १०५ ॥

**६ अश्वत्थ असून अव्यय !**

तरी अश्वत्थ म्हणिजे उंखा[11] । तोंवरी एकसारिखा ।
नाहीं निर्वाह यया रुखा । प्रपंचरूपा[12] ॥ १११ ॥
जैसा न लोटता क्षण । मेघ होय नानावर्ण ।
का विजू नसे संपूर्ण । निमेषभरी ॥ ११२ ॥
तैसीच ययाची स्थिती । नासत जाय क्षणक्षणाप्रती ।
म्हणोनि ययातें म्हणती । अश्वत्थ हा ॥ ११४ ॥
म्हणोनि हा प्रस्तुत । अलौकिक परिसा ग्रंथ ।
तरी क्षणिकत्वेंचि अश्वत्थ । बोलिजे हा ॥ ११७ ॥
आणिकही येक थोर । यया अव्ययत्वाचा डगरें[13] ।
आथी परी तो भींतरें[14] । ऐसा आहे ॥ ११८ ॥

---

१ चिद्‌वृत्ति जी माया तिजपासून. २ कोवळें लुसलुसित. ३ तीनपानी. ४ शेंडा. ५ डाहाळी. ६ ताजी. ७ अग्नि. ८ चांगले जोरदार. ९ अष्टधा प्रकृति. १० पूर्ण होते. ११ प्रातःकाळ. १२ प्रपंचवृक्षाला श्व: ( उद्या ) तोंपर्यंत एकसारखें टिकणें नाहीं. उद्याची शाश्वती नाहीं म्हणून अश्वत्थ. १३ प्रसिद्धि. १४ आतला अर्थ.

जैसा मेघाचेनि तोंडें । सिंधु एके आंगें काढे ।
आणि नदी येरीकडे । भरतीचि असती ॥ ११९ ॥
ऐसे या रुखाचें होणें जाणे । न तर्के होतेनि[२] वहिलेपणें ।
म्हणोनि ययातें लोक म्हणे । अव्यय हा ॥ १२१ ॥
येऱ्हवी दानशीळ पुरुष । वेंचकेंपणेंचि सचक[३] ।
तैसा व्ययेंचि हा रुख । अव्यय गमे ॥ १२२ ॥
रिगे मन्वंतर मनूपुढें । वंशावरी वंशाचें मांडे[४] ।
जैसी इक्षुवृद्धि काडेन काडें । जिंके[५] जेवीं ॥ १२८ ॥
वर्ततें वर्ष जाय । तें पुढिला मूळाहारी[६] होय ।
जैसा दिवस जात कीं येत आहे । हें चोजवेना ॥ १३० ॥
एकी देहाची डिरी[७] तुटे । तंव देहांकुरी बहुवीं फुटे ।
ऐसेनि भवतरु हा वाटे । अव्यय ऐसा ॥ १३२ ॥
हा संसारवृक्ष ऐसा । मोडत मांडत सहसा ।
न देखोनि लोक पिसा । अव्यय मानी ॥ १३८ ॥

**७ भववृक्षाचें छेदन.**

हा उन्मूळावेंयादोषें । येथ सायासचि का पिसे ? ।
काय बाळा बागुल देशीं[१०] । दवडावा आहे ? ॥ २१३॥
गंधर्वदुर्ग काय पाडावे ? । काय शशविषाण मोडावें ? ।
होआवे मग तोडावें । खपुष्प की ! ॥ २१४ ॥
तैसा संसार हा वीरा । रुख नाहीं साचोकारा ।
मा उन्मूळणीं दरारा[११] । कायिसा तरी ? ॥ २१५ ॥

---

१ उपसला जात असतो. २ होण्याच्या सत्वरपणामुळें, इतकें जलद होतें कीं. ३ खर्चाच्या रूपानें तो संचयच करीत असतो. ४ विस्तार होतो. ५ वाढतो. ६ मूळ बोलावणारा ७ शेंडा गळतो. ८ तो अनेक देहांचे अंकुर त्या प्रपंच-वृक्षाला फुटतात ९ याला उपटण्याचे श्रमच कशाला ? १० देशोधडी करावा लागतो काय ? ११ भीति.

आम्ही निरूपिलें जैसें । ययाचें अचंळ मूळ असे तैसें ।
आणि तैसाचि जरी हा असे । साचोकारा ॥ २१९ ॥
तरी कोणाचेनि मतानें । निपजती तया उन्मूळणें ।
काय फुकिलिया गगनें । जाइजेल गा ? ॥ २२० ॥
आणि प्रबोध जव नोहे । तव निद्रे काय अत आहे ? ।
कीं रात्री सरे तव पाहे । तैया आरौतें ? ॥ २२५ ॥
तैसा जव पार्था । विवेक नुधंवी माथा ।
तव अत नाही अश्वत्था । भवरूपा यया ॥ २२६ ॥
मूंळ बीज अविद्या खाये । तें ज्ञान जै उभें होये ।
तैंचि अत यया आहे । येऱ्हवीं नाही ॥ २२९ ॥
वाचूनि ज्ञानेंवीण एकें । उपाय करिसी जितुके ।
तिंही गुफंसी अधिकें । रुखीं इये ॥ २४९ ॥
मग किती खांदोखादी । यया हिंडावें ऊर्ध्वीं अधीं ? ।
म्हणोनि मूळचि अज्ञान छेदी । सम्यक्ज्ञानें ॥ २५० ॥
म्हणोनि स्वप्नीचिया घार्या । औषध चेवोचि धनजया ।
तेवीं अज्ञानमूळा यया । ज्ञानाचि खड्ग ॥ २५४ ॥
मंग इदतेसी वाळलें । जें मीपणेंवीण डाहारलें ।
तें रूप पाहिजे आपलें । आपणचि ॥ २६७ ॥

**८ भवपार झालेले महात्मे.**

जया पुरुषाचें का मन । सांडोनि गेलें मोह मान ।

---

१ बळकट. २ खरोखर ३ कोणता मायेचा पूत याला उन्मळू शकता ? ४ रात्र सरण्याच्या आंत उजाडेल काय? ५ डोकें वर करीत नाहीं. ६ मूळ बीज जी अविद्या तिला खाऊन टाकणारें ज्ञान प्रकटताच तिचा अत आहे. ७ गुतून पडशील. ८ जखमेला. ९ जागृति. १० आत्मज्ञानानें देहादि प्रपचाचा निरास केल्यावर. इदपणाविरहित व म्हणून अहपणारहित असें स्वस्वरूप आपणच पहावें.

वर्षांतीं जैसे घन । आकाशातें ॥ २८५ ॥
निकवड्या निष्ठुरा । उबगिजे जेविं सोयरा ।
तैसे नागवती विकारां । वेंटाळूं जे ॥ २८६ ॥
फळली केळी उन्मूळे । तैसी आत्मलाभें प्रबळें ।
जयाची क्रिया ढाळेढाळें । गळती आहे ॥ २८७ ॥
सूर्योदयासरिसी । रात्री पळोनि जाय आपैसी ।
गेली देहअहता तैसी । अविद्येसवें ॥ २९० ॥
स्वप्नीचें राज्य का मरण । नोहे हर्षशोकासी कारण ।
उपवैढलिया जाण । जियापरी ॥ २९४ ॥
तैसे सुखदुःखरूपी । द्वद्वी जे पुण्यपापीं ।
न घेपीजती सर्पी । गरुड जैसे ॥ २९५ ॥
आणि अनात्मवर्ग नीर । साडूनि आत्मरसाचे क्षीर ।
चरताति जे सविचार । राजहस ॥ २९६ ॥
आत्मभ्रातीसाठी । वस्तु विखुरली बारावाटीं ।
ते एकवटिती ज्ञानदृष्टी । अखड जें ॥ २९८ ॥
का लवणाची कुजरी । सूदलिया लवणसागरीं ।
होयचि ना माघारी । परती जैसी ॥ ३१८ ॥
तेवीं मजसी एकवट । जे जाले ज्ञानें चोखट ।
तया पुनरावृत्तीची वाट । मोडली गा ॥ ३२० ॥ ( अ० १५ )

## ११ आंबुली जोडी, आंबुला खाय !

तरी केवळ जे सत्ता । तो पुरुष गा ! पांडुसुता ।

---

१ कटाळून सोडून जातात २ सापडत नाहींत, विकारांना पकडू देत नाहींत. ३ जागृत झाल्यावर. ४ वेढले जात नाहींत. ५ अनात्मपदार्थरूपी पाणी टाकून आत्मरसदुग्ध घेतात. ६ आत्मस्वरूपाच्या भ्रांतीमुळें जो आत्मभाव देहधनदारापुत्रादिकांच्या ठिकाणीं पसरला असतो. ७ मिठाची हत्तीण. ८ घातली असता. ९ विमल ज्ञानानें. १० पुनर्जन्म सपला.

प्रकृती ते समस्ता । क्रिया नाम ॥ ९६६ ॥
बुद्धि इद्रियें अत करण । इत्यादि विकारभरणें ।
आणि ते तिन्ही गुण । सत्वादिक ॥ ९६७ ॥
हा अवघाचि मेळावा । प्रकृती जाहला जाणावा ।
हेचि हेतु सभवा । कर्माचिया ॥ ९६८ ॥
प्रकृतिपुरुषाची कुळवाडी । सागता असगडी ।
जे आबुळी जोडी । आबुला खाय ! ॥ ९७९ ॥
जे अनग तो पैंवा । निर्कवडा नुसता ।
जीर्ण अतिवृद्धा- । पासूनि वृद्ध ॥ ९८१ ॥
तया आडनाव पुरुष । येरवीं स्त्री ना नपुसक ।
किबहुना येक । निश्चयो नाही ॥ ९८२ ॥
तो अचक्षु अश्रवण । अहस्त अचरण ।
रूप ना वर्ण । नाम आथी ॥ ९८३ ॥
तो तरी अकर्ता । उदास अभोक्ता ।
परी इया पतिव्रता । भोगाविजे ॥ ९८५ ॥
हे प्रतिक्षणी नित्यनवी । रूपगुणाचीच आववी ।
जडातेंही माजवी । इयेचा माज ॥ ९८८ ॥
नामें इयें प्रसिद्धें । स्नेह इयें स्निग्धें ।
इद्रियें प्रबुद्धें । इयेचेनि ॥ ९८९ ॥
कायी मन हें नपुसक । कीं तें हिंडवी तिन्ही लोक ।
ऐसें ऐसें अलौकिक । करणें इयेचें ॥ ९९० ॥

---

१ प्रकृतिपुरुषविवेक हा कपिलप्रणीत सांख्यशास्त्राचा रहस्यभाग आहे. सारें कर्तृत्व प्रकृतीचें, सत्ता मात्र पुरुषाची. प्रकृति ही आबुळी ( स्त्री ) व तिचा पति ( आबुला ) पुरुष. २ विकाराची उत्पत्ति. ३ व्यापार, ससार. ४ अघटित. ५ बायको मिळविते व नवरा बसून खातो ६ अवयवरहित, निराकार. ७ पागळा; उदासीन. ८ दरिद्री, दिगबर. ९ पुराणपुरुष. १० या प्रकृतीमुळें.

हे भ्रमाचें महाद्वीप । हे व्याप्तीचें रूप ।
विकार उमैप । इया केले ॥ ९९१ ॥
हे कामाची माडैवी । हे मोहवनीची मार्वैत्री ।
इये प्रसिद्धचि दैवी । माया हे नाम ॥ ९९२ ॥
हे वाङ्मयाँची वाढी । हे साकारपणाची जोर्डी ।
प्रपंचाची धाँडी । अभंग हे ॥ ९९३ ॥
कळा येथूनि जालिया । विद्या इयेन्या केलिया ।
इच्छा ज्ञान क्रिया । वियाली हे ॥ ९९४ ॥
जे उत्पत्ति प्रलय होत । ते इयेचे सायप्रात ।
हें असो, अद्भुत । मोहन हे ॥ ९९६ ॥
इयेतें येतुलावरी । सौभाग्यव्याप्तीची थोरी ।
म्हणोनि तया आवरी । अनावरातें ॥ ९९८ ॥
तयाच्या तव ठायीं । निपैटूनि काहींच नाहीं ।
कीं तया आवघेंही । आपणाचि होय ९९९ ॥
तया स्वयंभाची संभूती । तया अमूर्ताची मूर्ती ।
आपण होय स्थिती । ठावो तया ॥ १००० ॥
तया निराकाराचा आकार । तया निर्व्यापाराचा व्यापार ।
निरहकाराचा अहकार । होऊनि ठाके ॥ १००३ ॥
ऐसेनि इया प्रकृती । आपुलिया सर्वव्याप्ती ।
तया अविकारातें विकृती-। माजीं कीजे ॥ १००७ ॥
जेवीं पय पशूर्न्या पोटीं । कां वन्हि जैसा काष्ठीं ।
गुंडूनि घेतला पटी । रत्नदीप ॥ १०१० ॥

---

१ पुष्कळ. ' अनेक बुद्धीचे तरग ! ' २ कामरूप वेलीचा मडप. ३ वसत. ४ शब्दशास्त्राची. ५ धाड. ६ मुळींच. ७ जन्म. ८ गाय वगैरे. ९ गुडाळून.

राजा पराधीन जाहला । की सिंह रोगें रुधेला ।
तैसा पुरुष प्रकृती आला । स्वतेजा मुके ॥ १०१२ ॥
जागता नर सहसा । निद्रा पाडूनि जैसा ।
स्वप्नीचिया सोसें[2] । वश्य कीजे ॥ १०१३ ॥
तैसें प्रकृतिजालेपणें । पुरुषा गुण भोगणें ।
उदास अतुरीगुणें । आतुडे जेवी १०१४ ॥
दर्पणाचिया जवळिका । दुजेपण जैसें ये मुखा ।
का कुकुमें स्फटिका । लोहितत्व ये ॥ १०१८ ॥
तैसा गुणसभ्रमें । अन्जमा हा जन्मे ।
पावत ऐसा गमे । येरवीं नाहीं ॥ १०१९ ॥
प्रकृतिसरितेच्या तटीं । मेरु होय हा किरीटी ।
माजीं बिंबे परी लोटी । लोटों नेणे[5] ॥ १०२३ ॥
प्रकृति येणें जिये[6] । याचिया सत्ता जग विये ।
इयालागीं इये । वरयितुँ हा ॥ १०२५ ॥
हा महद्ब्रह्मगोसावी । ब्रह्मगोलकलाघवी ।
अपारपण मैंवी । प्रपंचातें ॥ १०२७ ॥
पै या देहामाझारी । परमात्मा ऐसी जे परी ।
बोलिजे ते अवधारी । ययातेंचि ॥ १०२८ ॥
हे रूप हे छाया । पैल जळ हे माया ।
ऐसा निवाडें धनजया । जेवीं कीजे ॥ १०३१ ॥
तेणें पाडें अर्जुना । प्रकृतिपुरुषविवंचना ।
जयाचिया मना । गोचर जाहली ॥ १०३२ ॥

---

१ व्यापला. २ खटपटीनें. ३ उदासीन पुरुष स्त्रीच्या गुणास्तव तिच्या आधीन होतो. ४ तांबडेपण. ५ तिच्या प्रवाहात हा वाहत जात नाहीं. ६ जगते. ७ वर, भर्ता. ८ मूळमायेचा स्वामी. ९ ब्रह्माडाचा सूत्रधार. १० अजमावतो, मोजतो. ११ निर्णय, विवेक.

तो शरीराचेनि मेळें । करू कां कर्मे सकळें ।
परी आकाश धुंई न मैळे । तैसा असे ॥ १०३३ ॥ (अ० १३)

## १२ परा व अपरा प्रकृति आणि भूतसृष्टीची टांकसाळ.

तरी अवधारीं गा धनजया । हे महदादिकें माझी माया ।
जैसी प्रतिबिंबे । छाया । निजागाची ॥ १५ ॥
आणि इयेतें प्रकृति म्हणिजे । जे अष्टधा भिन्न जाणिजे ।
लोकत्रय निफजे । इयेस्तव ॥ १६ ॥
आप तेज गगन । मही मारुत मन ।
बुद्धि अहंकार हे भिन्न । आठै भाग ॥ १८ ॥
या आठांची जे साम्यावस्था । ते माझी परम प्रकृति पार्था ।
तिये नाम व्यवस्था । जीव ऐसी ॥ १९ ॥
जे जडातें जीववी । चेतनेतें चेतवी ।
मनाकरवीं मानवी । शोकमोहो ॥ २० ॥
ते सूक्ष्म प्रकृति कोडें । स्थूळांचिया आगा घडे ।
तै भूतसृष्टीची पडे । टाकसाळ ॥ २२ ॥
चतुर्विध ठसा । उमटों लागे आपैसा ।
मोलीं तरी सरिसा । परी थरचि आनान ॥ २३ ॥
होती चौऱ्यासी लक्ष थरा । येरा मिती नेणिजे भांडारा ।

---

१ धुळीनें आकाश मळत नाही तसा हा असग आहे. २ महत्तत्व आदिकरून. ३ आपल्या अगाची पडछाया पडते तशी. ४ उदक, तेज, आकाश, पृथ्वी, वायु ही पचभूतें व मन (रज) बुद्धि (सत्व) व अहकार (तम) हे त्रिगुण मिळून अष्टधा प्रकृति. ही अपरा. ५ लीनावस्था, कारणावस्था-जीमध्यें अष्टधा प्रकृति कारणरूपाने असते. ६ सूक्ष्म ह्म० परा प्रकृति जेव्हा स्थूल ह्म० अपरा प्रकृतीशीं सयुक्त होते. ७ सृष्टींतील प्राण्याची टाकसाळ सुरू होते ८ जारज, अडज, स्वेदज व उद्भिज या चहूंचा. ९ कसाला सारख्या, पण भिन्नभिन्न (आनान) जातीच्या (थर).

भरे आदिशून्येचा गाभारा । नाणेयांसीं ॥ २४ ॥
ऐसे एकतुकें[2] पाचभौतिक । पडती बहुवस टांकें[3] ।
मग तिये समृद्धीचे लेखें[4] । प्रकृतीचि धरी ॥ २५ ॥
जें[5] आंखूनि नाणें विस्तारी । पाठी तयाची आटणी[6] करी ।
माजीं कर्माकर्माचिया व्यवहारीं । प्रवर्तु[7] दावी ॥ २६ ॥
आणि प्रकृति तत्र माझ्या ठायी । बिंबे येथ आन नाहीं ।
म्हणोनि आदि मध्य अवसान पाही । जगासि मी ॥ २८ ॥
ऐसें होय दिसे न दिसे । हें मजचिमाजीं असे ।
मिया विश्व धरिजे जैसें । सूत्रें मणि ॥ ३१ ॥
सुवर्णाचे मणी केले । ते सोनियाचे सुतीं वोंविले ।
तैसें म्या जग धरिलें । सबाह्याभ्यतरीं ॥ ३२ ॥ ( अ०७ )

## १३ मूळमाया—विश्वविस्ताराचें मूळ.

येरव्ही तरी महत्ब्रह्म । यालागी हें ऐसें नाम ।
जे महदादिविश्राम— । शाळिका[8] हे ॥ ६८ ॥
विकारा बहुवस थोरी[10] । अर्जुना होचि करी ।
म्हणोनि अवधारी । महद्ब्रह्म ॥ ६९ ॥
अव्यक्तवादमतीं । अव्यक्त ऐसी वदती[11] ।
साख्याचिया प्रतीती । प्रकृति हेची ॥ ७० ॥
वेदांतीं इयेतें माया । ऐसें म्हणिजे प्राज्ञराया ।
असो किति बोलों वाया । अज्ञान हें ॥ ७१ ॥
आपला आपणपया । विसर जो का धनंजया ।

---

१ अव्यक्ताचा गाभारा किंवा आकाश असख्य नाण्यानीं भरून जातें. २ एका वजनाचे. ३ नाणीं. ४ जमाखर्च. ५ खूण, आकार करून. ६ गाळणी, लय. ७ घडामोड करी. ८ महत्तत्वादिकाचें उत्पत्तिस्थान किंवा घर म्हणून या मूळमायेला महत् ब्रह्म ह्मणतात. ९ वाढ. १० नाव, सज्ञा.

तेंचि रूप इया । अज्ञानासी ॥ ७२ ॥
आणिकही एक असे । जें विचारावेळे न दिसे ।
वातीं[1] पाहता जैसें । आंधारें का ॥ ७३ ॥
तरी माझी हे गृहिणी । अनादितरुणी ।
अनिर्वाच्यगुणी । अविद्या हे ॥ ८८ ॥
इये नोहीं हेचि रूप । ठाणें[3] हें अतिउपम ।
हे निद्रिता समीप । चेतां[4] दुरी ॥ ८९ ॥
पै माझेनिचि आगें । पहुडल्या[5] हे जागे ।
आणि सत्तासभोगें । गुर्विणी[6] होय ॥ ९० ॥
महद्ब्रह्मांड[7]उदरीं । प्रकृति आठै विकारी ।
गर्भाची करी । पेलोवेली[8] ॥ ९१ ॥
उभयसंगें पहिलें । बुद्धितत्व प्रसवलें ।
बुद्धितत्वें उभारलें । होय मन ॥ ९२ ॥
तरुणी ममता मनाची । अहंकारतत्व रची ।
तेणें महाभूताची । अभिव्यक्ति[9] होय ॥ ९३ ॥
आणि विषयेंद्रिया गौसी । स्वभावें तंव भूतासी ।
म्हणोनि येती सरिसीं । तियेंही रूपा ॥ ९४ ॥
जालेनि विकारक्षोभें । पाठीं त्रिगुणाचें उभें ।
तेव्हा ये वासना गर्भें । ठायेठाय ॥ ९५ ॥
मग गर्भगोळा तया । कैसें रूप तें ये आया[10] ।
तें परियेसे राया । सुजनाचिया ॥ ९८ ॥

---

१ दिवा हातीं घेऊन. २ माया=या मा ( जी नाहीं ), अविद्या ( न विद्यते या ). ३ आकार मोठा. ४ जागृताला. ५ मी निजलों कीं ही जागते. ६ गर्भार. ७ मूळमायेची अष्टधा प्रकृति. ८ वाढ. ९ प्रकटीकरण. १० आकारास.

पै मणिजं स्वेदज । उद्भिज जारज ।
उमटती सहज । अवयव हे ॥ ९९ ॥
ऐसे चारी हे सरळ । करचरणतळ ।
महाप्रकृति स्थूळ । तेंचि शिर ॥ १०४ ॥
प्रवृत्ति पेलैलें पोट । निवृत्ति ते पाठी नीट ।
सुरयोनि आगें आठें । उर्ध्वांचीं ॥ १०५ ॥
कठ उल्हासता स्वर्ग । मृत्युलोक मध्यभाग ।
अधोदेश चाग । नितंब तो ॥ १०६ ॥
ऐसें लेंकरू एक । प्रसवली हे देख ।
जयाचें तिन्ही लोक । बाळसें गा ॥ १०७ ॥
चौऱ्यायशी लक्ष योनी । तिये कांडपेरा सादणी ।
वाढे प्रतिदिनी । बाळक हें ॥ १०८ ॥
नानादेहअवयवीं । नामाची लेणीं लेववी ।
मोहस्तन्यें वाढवी । नित्य नवें ॥ १०९ ॥
पै ब्रह्मा प्रातःकाळ । विष्णु तो मध्यान्ह वेळ ।
सदाशिव सायंकाळ । बाळा यया ॥ ११२ ॥
याकारणें मी पिता । महद्ब्रह्म हे माता ।
अपत्य पाडुसुता । जगडंबर ॥ ११७ ॥
हा गा एकचि देहीं । काय अनारिसे अवयव नाहीं ? ।
तेवीं विचित्र विश्व पाहीं । एकचि हें ॥ ११९ ॥ ( अ० १४ )

## १४ सृष्टिकर्तृत्व देवाकडे नाहीं—' स्वभावस्तु प्रवर्तते. '

जैसा का सर्वेश्वरू । पाहिजे तव निर्व्यापारू[4] ।

---

१ अण्ड्यापासून ( पक्षी इ. ), घामापासून ( उवा, कृमि इ. ), उद्भिज ( वृक्ष ) वारेपासून ( मनुष्य इ. ) २ वाढलें. ३ आठ देवसर्ग ( भागवत ३–१०–२७ पहा ) ४ अकर्ता.

परी तोचि रची विस्तारू । त्रिभुवनाचा ॥ ७६ ॥
आणि कर्ता ऐसें म्हणिपे । तरी कवणें कर्मीं न शिंपे ।
जे[1] हातपावो न लिंपे । उदासवृत्तीचा ॥ ७७ ॥
योगनिद्रा तरी न मोडे । अकर्तेपणा सळु[2] न घडे ।
परी महाभूतांचें दळवाडें[3] । उभारी भलें ॥ ७८ ॥
पापपुण्यें अशेखें । पाँसीचि[4] असतु न देखे ।
आणि साक्षीही होऊ न ठाके[5] । येरां गोष्टी कायसी ? ॥ ८० ॥
पै मूर्तीचेनि[6] मेळें । तो मूर्तीचि होऊनि खेळे ।
परी[7] अमूर्तपण न मैळे । दादुलयाचें[8] ॥ ८१ ॥
तो सृजी पाळी सहारी । ऐसें बोलती जें चराचरी ।
तें अज्ञान गा अवधारीं । पाडुकुमरा ॥ ८२ ॥ ( अ० ५ )

## १५ कर्तृत्व प्रकृतीचें–साक्षित्व आत्म्याचें !

अगा नगर हें रायें केलें । या म्हणण्या साचपण कीर आलें ।
परी निरुती पाहतां सिणले । काय रायाचे हात ? ॥ ११० ॥
आणि मी प्रकृति अधिष्ठी तें कैसे । जैसा स्वप्नी जो असे ।
मग तोचि प्रवेशे । जागृतावस्थे ! ॥ १११ ॥
तरी स्वप्नौनि जागृती येता । काय पाय दुखती पांडुसुता ? ।
की स्वप्नामाजी असता । प्रवास होय ? ॥ ११२ ॥
या आघवियाचा अभिप्रावो कायी । जे हें भूतसृष्टीचें काहीं ।
मज एकही करणें नाहीं । ऐसाचि अर्थ ॥ ११३ ॥

---

१ तो उदासीन असल्यामुळें घर बाधूनही त्याच्या हातापायाला चिखल लागत नाहीं. २ न्यूनता, कमीपणा, किंवा धक्का. ३ समुदाय ४ जवळ असूनही. ५ साक्षीही होत नाहीं, कारण साक्षित्व हीही एक वृत्ति आहे आणि हा तर वृत्तिशून्य आहे. ६ देहेंद्रियाच्या सघातामध्यें ७ पण ह्या देहेंद्रियाचा स्वामी असलेल्या प्रभूचें निराकारत्व मोडत नाहीं. ८ खरेपण.

जैसी रायें अधिष्ठिली प्रजा । व्यापारे[1] आपुलालिया काजा ।
तैसा प्रकृती[2] संग माझा । येर करणें तें इयेचें ॥ ११४ ॥
पाहें पा पूर्णचंद्राचिये भेटी । समुद्रीं अपार भरतें दाटी ।
तेथ चंद्रासी काय किरीटी । उपखा[3] पडे ? ॥ ११५ ॥
जड परी जवळिका । लोह चळे तरी चळो कां ।
तरी कवण शीण भ्रामका[4] । सन्निधानाचा ? ॥ ११६ ॥
किंबहुना यापरी । मी निजप्रकृति अंगिकारी ।
आणि भूतसृष्टी एकसरी । प्रसवोंचि लागे ॥ ११७ ॥
स्थावरा आणि जंगमा । स्थूळा अथवा सूक्ष्मा ।
हे असो भूतग्रामा । प्रकृतीचि मूळ ॥ १२१ ॥
जैसा दीप ठेविला परिवरीं[5] । कवणातें नियमी ना निवारी ।
आणि कवण कवणिये व्यापारी । राहाटें तेंही नेणे ॥ १२८ ॥
तो जैसा का साक्षिभूतु । गृहव्यापारप्रवृत्तिहेतु ।
तैसा भूतकर्मीं अनासक्तु । मी भूतीं असे ॥ १२९ ॥ (अ० ९)

## १६ ब्रह्मीं माया कशी झाली ?

परी उदकीं जाली बाबुळी[6] । ते उदकातें जैसी झाकोळी[7] ।
का वायाचि आभाळीं । आकाश लोपे ॥ ६० ॥
हा गा स्वप्न लटिकें म्हणों ये । परी निद्रावशें बाणलें होये ।
तव आठव काय देत आहे । आपणपेयां ? ॥ ६१ ॥
हें असो डोळियाचें । डोळाचि पडळ[8] रचे ।
तेणें देखणेपण डोळियाचें । न गिळिजे कायी ? ॥ ६२ ॥
तैसी हे माझीच बिंबली[9] । त्रिगुणात्मक साउली ।
की मजाचि आड वोडवेली । जवनिका[10] जैसी ॥ ६३ ॥

१ व्यवहार करिते. २ प्रकृतीला. ३ श्रम. ४ लोहचुंबकाला जवळ असण्याचे काहीं श्रम आहेत का ? ५ घरात. ६ शेवाळ. ७ झाकते. ८ पडदा. ९ उभी राहिली. १० पडदा.

म्हणऊनि भूतें मातें मेणतीं । माझींच परी मी नव्हती ।
जैसीं जळीचीं जळीं न विरती[1] । मुक्ताफळें ॥ ६४ ॥
तैसे भूतजात सर्व । हे माझेंचि कीर अवयव ।
परी मायायोगें जीव– । दशे आले ॥ ६६ ॥ ( अ० ७ )

## १७ क्षर आणि अक्षर.

मग तो म्हणे गा सव्यसाची । पैं इये संसारपाटणीची ।
वस्ती साविया[2] टांची[3] । दुपुरुषीं ॥ ४७१ ॥
आणिकही तिजा पुरुष आहे । तो या दोहींचें नांव न साहे ।
जो उदैला गावेंसीं खाये । दोहींतें यया ! ॥ ४७३ ॥
तया एका नाम क्षर । एकातें म्हणती अक्षर ।
इहीं दोहींचि परी ससार । कोंदला असे ॥ ४७६ ॥

१

तरी महदहंकारा– । लागुनीया धनुर्धरा ।
तृणांतीचा[4] पांगोरों[6]–। वेरी पै गा ॥ ४७८ ॥
जें कांहीं सानें थोर । चालतें अथवा स्थिर ।
किंबहुना गोचर । मनबुद्धींसि जें ॥ ४७९ ॥
जेतुलें पाचभौतिक घडतें । जें नामरूपा सांपडतें[5] ।
गुणत्रयाच्या पडतें । कांमठां जे ॥ ४८० ॥
अगा काढूनि भ्रांतीचें दार्गे । उभवी सृष्टीचें आंग ।
हें असो बहु जग । जया नाम ॥ ४८३ ॥
जें अष्टधा भिन्न ऐसें । जें दाविलें प्रकृतिमिसें ।
जें क्षेत्रद्वारां छत्तिसें । भागीं केलें ॥ ४८४ ॥
अर्जुना ! गा यापरी । तें साकार कल्पूनि पुरी ।

1 मोत्यीं विरघळत नाहींस. २ सर्वथा. ३ थोडी. ४ अग्रापर्यंत. ५ चिमट्यांत सापडतें. ६ लाकडें

आत्मा विस्मृतीची करी । निद्रा तेथ ॥ ४८९ ॥
हा जनक हे माता । हा मी गौर हीन पुरता ।
पुत्र वित्त कांता । माझें हें ना ॥ ४९२ ॥
ऐसिया वळघोनि स्वप्ना । धांवत भवस्वर्गीचिया राना ।
तया चैतन्या नाम अर्जुना । क्षर पुरुष गा ॥ ४९३ ॥
जो आपुलेनि विसरें । सर्वभूतत्वें अनुकरे ।
तो आत्मा बोलिजे क्षरें । पुरुषनामें ॥ ४९४ ॥
आतां ऐक क्षेत्रज्ञ येणें । नामें जयातें बोलणें ।
जग जीव कां म्हणे । जिये दशेतें ॥ ४९५ ॥
एव जीवचैतन्य आघवें ' हें क्षर पुरुष म्हणावें ।
आतां रूप करूं बरवें । अक्षरासी ॥ ५०१ ॥

२

ना यथार्थज्ञानें एक होणें । ना अनेकत्वें दुजें घेणें ।
ऐसें निखळ जें नेणणें । तेंचि तें रूप ॥ ५०४ ॥
विश्व आघवेंचि मावळे । आणि आत्मबोध तरी नुजळे ।
तिये अज्ञानदशे केवळे । अक्षर नाम ॥ ५०८ ॥
सर्वां कळीं सांडिलें जैसें । चद्रपण उरे अंवसे ।
रूप जाणावें तैसें । अक्षराचें ॥ ५०९ ॥
वर्ने अज्ञान सुषुप्ती । तो बीजभाव म्हणती ।
येर स्वप्न हन जागृती । फळभाव तो ॥ ५१२ ॥
जयासी कां बीजभाव । वेदांतीं ऐसा केला आंव ।
तो तया पुरुषा ठाव । अक्षराचा ॥ ५१३ ॥
साचचि पुढती वीरा । जरी न येतां स्वप्नजागरां ।

---

१ भूतमात्रीं सचारतो. २ केवळ अज्ञान—ना यथार्थ ब्रह्मैक्यज्ञान ना विपरीत ज्ञान. ३ दाट. ४ आकार.

तरी ब्रह्मभावो साचोकारा । म्हणों येता ॥ ५१८ ॥
आणि विकाराची जे वारी । ते विपरीत ज्ञानाची परी ।
नेणिजे जियेमाझारी । ते सुषुप्ती गा हा ॥ ५२२ ॥
ऐसें जीवकार्यकारण । जया मायासंगचि लक्षण ।
अक्षरपुरुष जाण । चैतन्य तें ॥ ५२५ ॥

## १८ क्षराक्षरातीत उत्तम पुरुष (पुरुषोत्तम).

अज्ञान ज्ञानीं बुडालिया । ज्ञानें कीर्तिमुखत्व केलिया ।
जैसा वन्ही काष्ठ जाळूनिया । स्वयें जळे ॥ ५२७ ॥
तैसें अज्ञान ज्ञानें नेलें । आपणहि वस्तु देऊनि गेलें ।
ऐसें जाणणेंनिर्वाणें उरलें । जाणतें जें ॥ ५२८ ॥
तें तो गा उत्तम पुरुष । जो तृतीय कां निष्कर्ष ।
दोहींहून आणिक । मागिला तो ॥ ५२९ ॥
हें ना तो काष्ठीन्च्या काष्ठीहूनी । अनारिसा जैसा वन्ही ।
तैसा क्षराक्षरापासूनी । आनचि तो ॥ ५३२ ॥
अर्जुना ऐसियापरी । परमात्मा शब्दवरी ।
सूचिजे गा अवधारीं । पुरुषोत्तम ॥ ५४० ॥
येऱ्हवी न बोलणेंनि बोलणें । जेथिचें सर्व नेणिवा जाणणें ।
काहींच न होनि होणें । जे वस्तु गा ॥ ५४१ ॥
कां घ्राणा फुला दोहीं । वृत्तीं असे माझारिला ठायीं ।
तें न दिसे तरी नाहीं । ऐसें बोलों नये ॥ ५४४ ॥
तैसें द्रष्टा दृश्य हें जाये । मग कोण म्हणे काय आहे ।
हेंचि अनुभवें तेंचि पाहे । रूप तया ॥ ५४५ ॥
जो प्रकाश्येंविण प्रकाश । जो ईशितव्येंविण ईश ।

---

१ फेरी. २ आत्मसाक्षात्कार देऊन, सन्मुख होऊन. ३ वृत्तिज्ञानावाचून. ४ शेवट. ५ परिमळ.

आपणेंनीचि अवकाश । वसवीत असे जो ॥ ५४६ ॥
जो नादें ऐकिजता नाद । स्वादें चाखिजता स्वाद ।
जो भोगिजतसे आनद । आनदेंचि ॥ ५४७ ॥
जो पूर्णतेचा परिणाम । पुरुष गा सर्वोत्तम ।
विश्रातीचाही विश्राम । विराला जेथे ॥ ५४८ ॥
नाना अलकारदशे । सोनें न लपत लपालें असे ।
विश्व न होनिया तैसें । विश्व जो धरी ॥ ५५२ ॥
हें असो जलतरगा । नाही सिनानेंपण जेविं गा ।
तेविं सत्ता प्रकाश जगा । आपणचि जो ॥ ५५३ ॥
जो आपणपेंचि आपणया । प्रकाशितसे धनजया ।
काय बहु बोलों जया । नाहीं दुजें ॥ ५५७ ॥
जो गा मी निरुपाधिक । क्षराक्षरोत्तम एक ।
म्हणोनि म्हणे वेद लोक । पुरुषोत्तम ॥ ५५८ ॥ ( अ० १५ )

## १९ ब्रह्मसुख सुलभ आहे—

मोटकें[२] गुरुमुखें उदैजत दिसे । आणि हृदयी स्वयभचि असे ।
प्रत्यक्ष फावों लागे[३] तैसे । अपैसयाचि ॥ ४९ ॥
भोगाचिये ऐलीं[४]कडिलेये मेरें । चित्त उभें ठेलें सुखाभरें ।
ऐसें सुलभ आणि सोपारें । वरी परब्रह्म ॥ ५१ ॥
पै गा आणिकही एक याचें । जे हाता आलिया तरी न वचे ।
आणि अनुभविता काही न वेंचे । वरी विटेहि ना ॥ ५२ ॥
तरी पवित्र आणि रम्य । तेवीचि सुखोपाय सुगम ।
आणि सुसुख परमधर्म्य । वरी आपणपा जोडे ॥५५॥ (अ० ९)

## २० पण अश्रद्धेला दुर्लभ!

पाहे पा दूध पवित्र आणि गोड । पासीं त्वचेचिया पदराआड ।

---

१ वेगळेपण. २ थोडें, 'तत्वमसि' महावाक्य. ३ अनुभवाला येतें ४ अली-कडच्या तीरावर.

परी तें अव्हेरूनि गोचिड । अशुद्धचि सेवी ।। ५७ ।।
का कमलकंदा आणि दर्दुरीं । नांदणूक एकेचि घरीं ।
परी पराग सेविजे भ्रमरीं । येरा चिखलचि उरे ।। ५८ ।।
नातरी निदैवाच्या परिवरीं । लोह्यां रुतल्या आह्मति सहस्त्रवरी ।
परी तेथ बसोनि उपवास करी । कां दरिद्रें जियें ।। ५९ ।।
तैसा हृदयामध्यें मी राम । असतां सर्वसुखाचा आराम ।
कां भ्रांतासी काम । विषयांवरी ! ।। ६० ।।
बहु मृगजळ देखोनि डोळा । थुंकिजे अमृताचा गिळिता गळाला ।
तोडिला परिस बांधिला गळा । शुक्तिकालाभें ! ।। ६१ ।।
तैसी अहंममतेचिया लवडसेवडी । मातें न पवतीचि बापुडीं ।
म्हणोनि जन्ममरणाचिये दुथडी । डहुळतें ठेलीं ।। ६२ ।।
येऱ्हवीं मी तरी कैसा । मुखाप्रति भानु का जैसा ।
कहीं नसे न दिसे ऐसा । वाणीचा नोहे ।। ६३ ।। (अ० ९)

## २१ आदिदेवाला कोण जाणेल ?

१

एथ वेद मुके जाहले । मनें पवन पांगुळले ।
रातीवीण मावळले । रविशशी ।। ६४ ।।
अगा ! उदरीचा गर्भ जैसा । न देखे आपुलिये मायेची वयसा ।
मी आघवेया देवां तैसा । नेणवे कांहीं ।। ६५ ।।
आणि जळचरा उदधीचें मानें । मशका नोलांडवेचि गगन ।

१ रक्त. २ बेडकाना. ३ पुष्परज, परिमळ. ४ बाहेरचे भुंगे येऊन. ५ घरीं. ६ हजारों मोहरा पुरलेल्या आहेत. ७ किंवा दारिद्र्यात दिवस कठितो ८ गिळलेला घोंट. ९ शिंप सांपडली म्हणून. १० गडबडीनें. ११ दोन्ही तीराच्या मध्यें बुचकुळ्या खात राहतात. १२ न्यूनतेचा. १३ माझ्या स्वरूपीं मन व प्राण यांना गति नाहीं. १४ वय. १५ प्रमाण, खोली.

तेवीं महर्षीचें ज्ञान । न देखेचि मातें ॥ ६६ ॥
मी कवण पां केतुला । कवणाचा कै जाहला ।
या निरुती करितां बोला । कल्प गेले ! ॥ ६७ ॥
कां जे महर्षी आणि या देवां । येरां भूतजातां सर्वां ।
मीचि आदि म्हणोनि पांडवा । अवघड जाणतां ॥ ६८ ॥
उतरलें उदक पर्वत वळंघे । जरी झाड वाढत मुळीं लागे ।
तरी मियां जालेनि जगें । जाणिजे मातें ॥ ६९ ॥
कां गाभेवेनें वट गिंवसवे । जरी तरंगीं सागर साठवे ।
कां परमाणुमाजी सामावे । भूगोळ हा ॥ ७० ॥
तरी मियां जालियां जीवां । महर्षी अथवा देवां ।
मातें जाणावया होआवा । अवकाश गा ॥ ७१ ॥
ऐसाही जरी विपायें । सांडुनि पुढील पाये ।
सर्वेंद्रियासी होये । पाठिमोरा जो ॥ ७२ ॥
प्रवर्तलाही वेगीं बहुडे । देहें साडुनि मागिलीकडे ।
महाभूतांचिये चढे । माथयावरी ॥ ७३ ॥
तेथ राहोनि ठायठिके । स्वप्रकाशें चोखें ।
अजन्व माझें देखे । आपुलिया डोळां ॥ ७४ ॥
मी आदीसी पर । सकळलोकमहेश्वर ।
ऐसिया मातें जो नर । यापरी जाणे ॥ ७५ ॥
तो पाषाणांमाजी परिस । जैसा रसांआंत सिद्धरस ।
तैसा मनुष्याआंत तो अंश । माझाचि जाण ॥७६ ॥ ( अ० १० )

---

१ निश्चय. २ उलट वर चढेल. ३ गर्भपर्ण, सूक्ष्मांकुर—अंकुरात संपूर्ण वटवृक्ष कसा सापडावा? ४ सवड. ५ कदाचित्. ६ बहिर्मुखता टाकून इंद्रियांकडे पाठमोरा ( अंतर्मुख ) होईल तर. ७ मागें फिरतो. ८ देहांचा निरस करितो. ९ सुधारस.

## २२ ज्ञानयज्ञ.

भूतें[1] विषय करणें । हें वेगळालें काहीं न ह्मणे ।
आघवें एकचि ऐसें जाणे । आत्मबुद्धी ॥ २४५ ॥
जैसा चेइला[2] तो अर्जुना । म्हणे स्वप्नींची हे विचित्र सेना ।
मीचि जाहलों होतों ना । निद्रावशें ॥ २४६ ॥
मग तो जीव हे भाष सरे । आब्रह्म परमात्मबोधें भरे ।
ऐसे भजती ज्ञानाध्वरें[3] । एकत्वें येणें ॥ २४७ ॥
म्हणोनि विश्व भिन्नभिन्न । परी न भेदे तयाचें ज्ञान ।
जैसे अवयव तरी आनआन[4] । परी एकेचि देहींचे ॥ २५० ॥
का शाखा सानिया थोरा[5] । परी आहाति एकाचि तरुवरा ।
बहु रश्मि परी दिनकरा । एकाचे जेवीं ॥ २५१ ॥
मी जेतुला आघवा । तेंचि तुक[6] तयाचिया सद्भावा ।
तरी न करिता पाडवा । भजन जाहलें ॥ २६१ ॥
अखड सकळ हें सकळामुखीं । सहज अर्पत असे मज एकी ।
कीं नेणणेयासाठी मूर्खी । न पविजेचि मातें ॥२६४॥ ( अ० ९.)

## २३ जाणीव सांडावी.

एथ जाणीव करी तोचि नेणे । आथिलेपण[7] मिरवी तेंचि उणें ।
आम्ही जाहलों[8] ऐसें जो म्हणे । तो काहीच नेणे ॥ ३६८ ॥
पाहे पा जाणिवेचेनि बळें । कोणी वेदापासूनि असे आगळें[9] ? ।
कीं शेषाहूनि तोंडाळें । बोलकें आथी ? ॥ ३७० ॥
तोही आथरुणा[10]तळवटी दडे । येरू[11] नेतिनेति म्हणोनि बहुडे ।

---

१ पचभूतें, शब्दस्पर्शादि पचविषय व इंद्रियें. २ जागा झालेला. ३ ज्ञानयज्ञानें. ४ वेगवेगळे. ५ लहानमोठ्या. ६ प्रमाण, मान. ७ श्रीमती, मोठेपण. ८ कृतार्थ, मुक्त झालों. ९ अधिक, वरचढ. १० परमात्म्याची शय्या होतो. ११ हें नव्हे तें नव्हे असें निषेधमुखानें म्हणत वेद मागें सरतो.

एथ सनकादिक वेडे । पिसे जाहले ॥ ३७१ ॥
करितां तापसाची कंडसणी । कवण जवळा ठेविजे शूळपाणी ? ।
तोही अभिमान सांडूनि पायवेणी । माथा वाहे ॥ ३७२ ॥
नातरी आथिलेपणे सरिसी । कवण आहे लक्ष्मियेऐसी ? ।
श्रियेसारिखिया दासी । घरीं जियेतें ॥ ३७३ ॥
तेही सर्वस्वें करूनि सेवा । अभिमान साडूनि पाडवा ।
ते पाय धुवावयाचिया दैवा । पात्र जाहली ॥ ३७७ ॥
म्हणोनि थोरपण पऱ्हौं सांडिजे । एथ व्युत्पत्ति आघवी विसरिजे ।
जै जगा धाकुटें होइजे । तै जवळिक माझी ॥३७८॥ (अ० ९ )

## २४ ब्रह्म आणि जग यांचें ऐक्य.

हां गा एकाचि देहीं । काय अनारिसे अवयव नाहीं ? ।
तेवी विचित्र विश्व पाहीं । एकाचि हें ॥ ११९ ॥
नाना कल्लोळपरपरा । सतती जैसी सागरा ।
आम्हा आणि चराचरा । सबध तैसा ॥ १२२ ॥
म्हणोनी वन्हि आणि ज्वाळ । दोन्ही वन्हीचि केवळ ।
तेवी मी गा सकळ । सबध वावं ॥ १२३ ॥
जालेंनि जग मी झाके । तरी जगत्वें कोण फाके ? ।
किळेवॅरी माणिकें । लोपिजे काई ? ॥ १२४ ॥
अळकारातें आलें । तरी सोनेपण काई गेलें ? ।
की कमळ फाकलें । कमळत्वा मुके ? ॥ १२५ ॥
साग पा धनजया । अवयवीं अवयविया ।
आन्छादिजे कीं तया । तेंचि रूप ? ॥ १२६ ॥

---

१ विचार. २ पायाचें तीर्थ, गगा. ३ पलीकडे, दूर. ४ ज्ञानगर्व, जाणीव. ५ वेगवेगळे. ६ व्यर्थ, मिथ्या. ७ माणिक आपल्याच प्रभेनें काय लोपलें जातें ? कीळ=कांति, तेज.

विरूढलिया जोंधळा । कणिसाचा निर्वाळा ।
वेंचला कीं आगळा । दिसतसे ? ॥ १२७ ॥
म्हणौनि जग परौतें । सारूनि पाहिजे मातें ।
तैसा नोहें—उँखितें । आघवें मीचि ॥ १२८ ॥ ( अ० १४ )

२

तरी पार्था परियेसा । मी तव येथ ऐसा ।
रत्नीं किळावो जैसा । रत्नाचि तो ॥ ३७४ ॥
वान्हि तेचि ज्वाळ । दळींचि नांव कमळ ।
रूख तेचि डाळें । फळादिक ॥ ३७६ ॥
तैसें विश्व येणें नांवें । हें मीचि आघवें ।
घेईं चद्रबिंब सोलावें । नलगे कांहीं ! ॥ ३७८ ॥
घृताचें थिजलेपण । न मोडितां घृतचि जाण ।
कां नाटिलां काकण । सोनेंचि तें ॥ ३७९॥
न उकलितां पट । संतूचि असे स्पष्ट ।
न विरवितां घट । मृत्तिका जेवीं ॥ ३८० ॥
म्हणोनि विश्वपण जावें । मग तै मातें घेयावें ।
तैसा नव्हे, आघवें । सगटचि मी ॥ ३८१ ॥
ऐसेनि मातें जाणिजे । ते अव्यभिचारी भक्ति म्हणिजे ।
येथ भेद कांहीं देखिजे । तरी व्यभिचार तो ॥३८२॥ (अ०१४)

३

माझेया विस्तारलेपणाचेनि नांवें । हें जगचि नोहे आघवे ? ।
जैसें दूध मुरालें स्वभावें । तेंचि दहीं ॥ ६४ ॥

---

१ कणीसपणानें निवडून आल्यानें (निर्वाळा=प्रत्यतर, दाखला) जोंधळ्याचा दाणा नाहींसा झाला कीं वाढला ? २ दूर करून. ३ सकळ मीच आहे. ४ पांकळ्याच कमळ. ५ फांद्या. ६ बिंबाहून प्रकाश वेगळा करून पहायला नको. ७ न आटवितांही. ८ माझा विस्तार ह्मणजे सारें जग असें नाहीं काय ?

कां बीजचि जाहलें तरू । अथवा भांगारचि अळंकारू ।
तैसा मज एकाचा विस्तारू । तें हें जग ॥ ६५ ॥
हें अव्यक्तपणें थिजलें । तेंचि मग विश्वाकारें वोथिजेलें ।
अमूर्त मूर्तिमय विस्तारलें । त्रैलोक्य जाणे ॥ ६६ ॥
मी येपरीचा भूतभावनू । परी सर्वभूतांसि अभिन्नू ।
जैसी प्रभा आणि भानू । एकचि ते ॥ ८६ ॥
यालागीं मजपासूनि भूतें । आनें नव्हती हें निरुतें ।
आणि भूताकेगळिया मातें । कहींच न मनीं हो ॥ ८८॥ (अ०९)

## २५ आपली विश्वात्मकता.

मी तव सकळदेहीं । असे-येथ भ्राति नाहीं ।
आणि तैसेंचि माझ्या ठायीं । सकळ असे ॥ ३९१ ॥
येऱ्हवी तरी अर्जुना । जो एकवटलिया भावना ।
सर्वभूतीं अभिन्ना । मातें भजे ॥ ३९३ ॥
भूताचेनि अनेकपणें । अनेक नोहे अतःकरणें ।
केवळ एकत्वचि माझें जाणे । सर्वत्र जो ॥ ३९४ ॥
दीपा आणि प्रकाशा । एकवकीचा पाड जैसा ।
तो माझ्या ठायीं तैसा । मी तयामाजी ॥ ३९६ ॥
माझें व्यापकपण आघवें । गवसलें तयाचेनि अनुभवें ।
तरी न म्हणतां स्वभावें । व्यापक जाहला ॥ ४०२ ॥
सुखदुःखादि वर्में । का शुभाशुभें कर्में ।
दोनी ऐसी मनोधर्में । नेणेचि तो ॥ ४०५ ॥
हे समविषमभाव । आणिकही विचित्र जे सर्व ।
ते मानी जैसे अवयव । आपुले होती ॥ ४०६ ॥

---

१ पातळ होतें, पसरतें. २ भूतांचा उत्पन्नकर्ता. ३ भिन्न. ४ ऐक्यतेची योग्यता. ५ सापडलें.

हे एकैक काय सांगावें । जया त्रैलोक्यचि आघवें ।
मी ऐसें स्वभावें । बोधा आलें ॥ ४०७ ॥
तयाही देह एक कीर आथी । लौकिकी तयातें सुखदुःखी म्हणती ।
परी आह्मांतें ऐसी प्रतीती । परब्रह्मचि हा ॥ ४०८ ॥
म्हणोनि आपणपां विश्व देखिजे । आणि आपण विश्व होइजे ।
ऐसें साम्यचि एक उपासिजे । पांडवा गा ॥ ४०९ ॥
हें तूतें बहुतीं प्रसंगीं । आम्हीं म्हणों यचिलागीं ।
जे साम्यांपरौती जगी । प्राप्ति नाहीं ॥ ४१० ॥ ( अ० ६ )

## २६ ' जीवो ब्रह्मैव नापरः '

### १

याकारणें भेदातें । सांडूनि अभेदें चित्तें ।
आपणयासगट मातें । जाणावें गा ॥ ३८३ ॥
पार्था सोनयाची टीक[३] । सोनयासी लागली देख[२] ।
तैसें आपणपें आणिक । मानावेना ॥ ३८४ ॥
तेजाचा तेजौनि निघाला । परी तेजींचि असे लागला ।
तया रश्मीऐसा भला । बोध होआवा ॥ ३८५ ॥
पै परमाणू भूतळीं । हिमकण हिमाचळीं ।
मजमाजी न्याहाळी । अहं[५] तैसें ॥ ३८६ ॥
हो का तरंग लाहान । परी सिंधूसि नाहीं भिन्न ।
तैसा ईश्वरीं मी आन[६] । नोहेचि मा ॥ ३८७ ॥
ऐसेनि बा समरसें । दृष्टी जै उल्लासे[७] ।
ते भक्ति पै ऐसें । आम्ही म्हणों ॥ ३८८ ॥
आणि ज्ञानाचें चांगावें[८] । इये दृष्टी मानावें ।

---

१ समदृष्टीपलीकडे २ लाभ. ३ टिकली. ४ किरण सूर्यापासून निघतें. ५ मीपण. ६ अन्य, भिन्न. ७ फाकते. ८ चांगुलपण.

योगाचेंही आघवें । सर्वस्व हें ॥ ३८९ ॥
सिंधू आणि जलधरा-। माजीं लागली अखंड धारा ।
तैसी वृत्ति[1] वीरा । प्रवर्ते ते ॥ ३९० ॥
का कुहेसी[2] आकाशां । । तोंडी सांदा नाही जैसा ।
तो परमपुरुषी तैसा । एकवटे गा ॥ ३९१ ॥
प्रतिबिंबौनि बिंबवरी । प्रभेची जैसी उजैरी[3] ।
ते सोहवृत्ति अवधारी । तैसी होय ॥ ३९२ ॥
जैसा सैंधवाचा रवाँ[4] । सिंधुमाजी पाडवा ।
विरालेया विरवावा । हेंही ठाके ॥ ३९४ ॥
माझें पैलपण[5] जाय । भक्त हें ऐलपण ठाय ।
अनादि ऐक्य जें आहे । तेंचि निर्वडे[6] ॥ ३९६ ॥ ( अ० १४ )

२

शरीरांचिएवढें । जें आत्मज्ञान वेगळें पडे ।
तैं माझा अंश आवडे । थोडेपणें ॥ ३४३ ॥
समुद्र कां वायुवशें । तरंगाकार उल्हसे ।
तो समुद्राश ऐसा दिसे । सानिवा जेवि ॥ ३४४ ॥
तेवी जडातें जीवविता । देहअहंता उपजविता ।
मी जीव गमे पांडुसुता । जीवलोकी ॥ ३४५ ॥
अगा उजपणें निमणे । हें साचचि जें का मानणें ।
तो जीवलोक मी म्हणे । ससारं हन ॥ ३४७ ॥
एवंविध जीवलोकी । तू मातें ऐसा अवलोकी ।

---

१ वृत्ति, वृत्तिविषय व वृत्तिलय सर्वच ब्रह्मीं. २ आडाच्या तोंडीं आकाशाचा साधा न देता आतबाहेर आकाशच असतें ३ उत्कर्ष. ४ मिठाचा खडा. ५ माझें मायेच्या पलीकडे असणे व भक्ताचे अलीकडे असणें हें दोनी जाऊन. ६ प्रकटतें ७ शरीर तेंच आपण असें समजणारें. ८ मर्यादितपणामुळें. ९ लहानसा १० हाच ससार.

जैसा चंद्र कां उदकीं । उदकातीत ॥ ३४८ ॥
का काश्मीराचा राव । कुंकुमावरी पाडवा ।
आणिका गमे लोहिंवा । तरी तो नव्हे ॥ ३४९ ॥
तैसें अनादिपण न मोडे । माझें अक्रियत्व न खडे ।
परी कर्ता भोक्ता ऐसें आवेंडे । ते जाण गा भ्राती ॥ ३५० ॥
ज्ञानाचिये दिठीं[4] । मजसी अभिन्नाचि तो किरीटी ।
येर भिन्नपण तें उठी । अज्ञानास्तव ॥ ३३४ ॥ (अ० ५)

## २७ ज्ञात्याची साम्यबुद्धि.

तैरी आत्मयोगें आथिला । जो कर्मफळाशीं विटला ।
तो धर रिघोनि वरिला । शाती जगी ॥ ७१ ॥
जो जयाँकडे वास पाहे । तेउती सुखाची सृष्टि होये ।
तो म्हणे तेथ राहे । महाबोध ॥ ७२ ॥
नवद्वारदेहीं । तो असताचि परी नाहीं ।
करीतचि न करी कांहीं । फळत्यागी ॥ ७५ ॥
जगाच्या जीवी आहे । परी कवणाचा कहीं नोहे ।
जगचि हें होये जाये । तो शुद्धीही नेणे ॥ ७९ ॥
नातरी अंधकाराची वानी । जैसा सूर्य न देखे स्वप्नीं ।
अमृत नायके कानीं । मुत्युकथा ॥ ९१ ॥
हें असो संतॅप कैसा । चंद्र न स्मरे जैसा ।
भूतीं भेद नेणती तैसा । ज्ञानिये ते ॥ ९२ ॥

---

१ स्फटिकाचा तुकडा २ तांबडा. ३ वाटलें. ४ दृष्टीनें. ५ जो आत्मसंगतीनें सुखरूप झाला. ६ शांति त्याच्या घरांत घुसते. ७ तो दृष्टि फेंकील तिकडे सृष्टि सुखमय होते. ८ इंद्रियें दश आहेत, तथापि रसना दोहींकडे ( कर्मेंद्रियें व ज्ञानेंद्रियें ) असल्यामुळें नव द्वारेंच सांगितलीं आहेत ९ प्रकार. १० उष्णता.

मग हा मशकु[1] हा गज । कीं श्वपच[2] हा द्विज ।
पैलै[3] इतर हा आत्मज । हें उरलें कें ? ।। ९३ ।।
नातरी हे धेनु हें श्वान । एक गुरु एक हीन ।
हें असो कैचें स्वप्न । जागतया ? ॥ ९४ ॥
एथ भेद तरी की देखावा । जरी अहभाव उरला होआवा ।
तो आधींचि नाही आघवा । आतां विर्षम[4] काइ ? ॥ ९५ ॥
म्हणोनि सर्वत्र सदा सम । तें आपणचि अद्वय ब्रह्म ।
हें सपूर्ण जाणें वर्म । समदृष्टीचें ॥ ९६ ॥
जिहीं विषयसग न सोडिता । इद्रियातें न दडिता ।
परी भोगिली निःसंगता । कामनेविण ॥ ९७ ॥
जिहीं लोकांचेनि आधारें । लौकिकेंचि व्यापारें ।
परी साडिलें निदसुरें[5] । लौकिक हें ॥ ९८ ॥
हें असो पवनाचेनि मेळे । जैसें जळीचि जळ लोळे ।
तें आणिकें म्हणती वेगळें । कल्लोळ हे ॥ १०० ॥
तैसें नामरूप तयाचें । येऱ्हवीं ब्रह्मचि तो साचें ।
मग साम्या आलें जयाचें । सर्वत्र गा ॥ १०१ ॥
तरी मृगजळाचेनि पूरें । जैसें न लोटिजे[6] गा गिरिवरें ।
तैसा शुभाशुभी न विकरे[7] । पातलिया जो ॥ १०३ ॥
तोचि तो निरुता । समदृष्टि तत्त्वता ।
हरि म्हणे पाडुसुता । तोचि ब्रह्म ॥ १०४ ॥ ( अ० ५ )

## २८ ज्ञान उमटल्याचीं अठरा लक्षणें.

### ज्ञानाचा प्रभाव.

जया ज्ञानाची रिगर्वणी[8] । अविद्ये उणें आणी ।

---

१ माशी २ चाडाळ ३ पलीकडचा, दुसरा ४ भेदभाव. ५ अज्ञानात डुबलेलें. ६ पर्वत वाहून जात नाहीं. ७ विकार पावत नाहीं. ८ प्रवेश.

जीवा आत्मया बुझावणी । मांडूनि दे ॥ १६८ ॥
जें इंद्रियांचीं द्वारें आडी[२] । प्रवृत्तीचे पाय मोडी ।
जें दैन्यचि फेडी । मानसाचें ॥ १६९ ॥
जें ससारातें उन्मूळी । संकल्पपंक[३] प्रक्षाळी ।
अनावरातें वेंटाळी । ज्ञेयातें जें ॥ १७२ ॥
जयाचेनि उजाळें । उघडती बुद्धीचे डोळे ।
जीव दोंदावरी लोळे । आनंदाचिये ॥ १७४ ॥
ऐसें जें ज्ञान । पवित्रैकनिधान ।
जेथ विटाळलें[६] मन । चोख कीजे ॥ १७५ ॥
मग तेंचि इये शरीरीं । जै आपुला प्रभावो करी ।
तें इंद्रियांचिया व्यापारीं । डोळाही दिसे ॥ १७८ ॥
पै वसताचें रिगवणें । झाडांचेनि साजेपणें ।
जाणिजे, तेविं करणें । सागती ज्ञान ॥ १७९ ॥
अगा वृक्षासि पाताळीं । जळ सापडे मूळीं ।
तें शाखाचिये बाहोळीं । वरीही दिसे ॥ १८० ॥
नातरी केळी कापूर जाला । जेविं परिमळें जाणों आला ।
का भिंगारीं दीप ठेविला । बाहेरी फाके ॥ १८३ ॥
तैसें हृदयींचेनि ज्ञानें । जियें देहीं उमटती चिन्हें ।
तियें सांगों आतां अवधानें । चांगें आइक ॥ १८४ ॥

**१ अमानित्व.**

तरी कवणेंही विषयीचें । साम्य होणें न रुचे ।
सभावितपणाचें । वोझें जया ॥ १८५ ॥

१ ऐक्य, समजूत २ बद करितें. ३ कल्पनारूपी चिखल ( पाप ) साफ धुवून काढतें ४ आकळण्यास कठिण अशी जी परमात्मवस्तु तिला पोटात घेतें, व्यापतें. ५ प्रकाशानें. ६ विषयानें, द्वैतानें. ७ टवटवीतपणामुळें. ८ इंद्रियें ९ विस्तारावर. १० बरोबरी ११ मोठेपणाचें

आथिलेचि[1] गुण वानितां । मान्यपणें मानितां ।
योग्यतेचे येतां । आगा रूप ॥ १८६ ॥
तै गजबजों[2] लागे कैसा । व्याधें रुधला[3] मृग जैसा ।
कां बाहीं[4] तरतां वळसा । दाटला जेवि ॥ १८७ ॥
पार्था तेणें पाडें । सन्मानें जो सांकडे ।
गरिमेतें[5] आंगाकडे । येवोंचि नेदी ॥ १८८ ॥
पूज्यता डोळां न देखावी । स्वकीर्ति कानीं नायकावी ।
हा अमुका ऐसा नोहावी । सेचि[6] लोकां ॥ १८९ ॥
वाचस्पतीचेनि[7] पाडें । सर्वज्ञता तरी जोडे ।
परी वेडिवेमाजि[8] दडे । महिमेभेणें ॥ १९१ ॥
चातुर्य लपवी । महत्व हारवी ।
पिसेपण[9] मिरवी । आवडोनी ॥ १९२ ॥
लौकिकाचा उद्वेग । शास्त्रांवरी उबग ।
उगेपणीं[10] चांग । आथी भर ॥ १९३ ॥
जगें अवज्ञाचि करावी । सबधीं सोयचि[11] न धरावी ।
ऐसी ऐसी जीवी । चाड बहु ॥ १९४ ॥
माझें असतेपण लोपो । नामरूप हारपो ।
मज झणें[12] वासिपो । भूतजात ॥ १९८ ॥
किंबहुना ऐसऐसी । चिन्हें जया देखसी ।
जाण तया ज्ञानेसी । शेजे[13] जाहली ॥ २०१ ॥

## २ अदंभित्व.

तरी अदभित्व ऐसें । लोभियाचें मन जैसें ।

---

१ असलेलेच. २ घाबरू लागतो ३ आडविला. ४ हातांनीं पोहणारा जसा वळशात ( भोंवऱ्यात ) सापडावा तसा. ५ मोठेपणाला. ६ सय, आठवण. ७ बृहस्पतीच्या बरोबरीनें. ८ वेड्यात. ९ वेड. १० मौन धरून राहण्याचीच आवड. ११ सगत. १२ न भिवो. १३ शय्या, एकपण.

जीव जावो परी नुमसे । ठेविला ठावो ॥ २०३ ॥
तयापरी किरीटी । पडिलाही प्राणसकटीं ।
परी सुकृत ना प्रकटी । आगें बाळें ॥ २०४ ॥
खडाणे[3] आला पान्हा । पळवी[4] जेवीं अर्जुना ।
का लपवी पण्यागना । वडिलपण ॥ २०५ ॥
आढय[5] आतुडे अडवी । मग आढयता जेवीं हारवी ।
नातरी कुळवधू लपवी । अवयवातें ॥ २०६ ॥
नाना कृषीवळ[6] आपुलें । पाघुरवी पेरिलें ।
तैसें झाकी निपजलें । दानपुण्य ॥ २०७ ॥
वरिवरी देह न पूजी । लोकातें न रजी ।
स्वधर्म वाग्ध्वजीं[7] । बाधो नेणें ॥ २०८ ॥
परोपकार न बोले । न मिरवी अभ्यासिलें ।
न शके विकूं जोडलें । स्कीर्तीसाठीं[8] ॥ २०९ ॥
घरीं दिसे साकड[9] । देहीची आयती[10] रोड ।
परी दानीं जया होड[11] । सुरतरूची ॥ २११ ॥

### ३ अहिंसा.

कमळावरी भ्रमर । पाय ठेविती हळुवार ।
कुचबेल[12] केसर । इया शका ॥ २४८ ॥
तैसे परमाणुं[13] पा गुतले । जाणूनि जीव सानुले[14] ।
तेथ कारुण्यामाजी पाउलें । लपवूनि चाले ॥ २४९ ॥
ते वाट कृपेची करित । ते दिशाचि स्नेहभरित ।

---

१ प्रगट करीत नाहा. २ देहचेष्टेनें किंवा वाचेनें. ३ खडाण ह्म० लाथाळ, खोड्याळ गाय ४ चोरते. ५ संपन्न मनुष्य वनात सापडला असता. ६ शेतकरी. ७ वाचेच्या ध्वजावर, तोंडानें बोलत नाहीं. ८ प्रतिष्ठेसाठीं. ९ टचाई. १० थाट ११ स्पर्धा. १२ तनु चुरडेल या भीतिनें. १३ परमाणूत. १४ सूक्ष्म जतु.

जीवातळीं आथरिति । आपुला जीव ॥ २५० ॥
मुगिये मेरु नोलांडवे । मशका सिंधु न तरवे ।
तैसें भेटलियां न करवे । अतिक्रमं ॥ २६० ॥
स्वयें श्वसणेंचि तें सुकुमार । मुख मोहाचें माहेर ।
माधुर्या जाहले अंकुर । दशंन जैसे ॥ २६२ ॥
पुढा स्नेह पाझरे । माघा चालती अक्षरें ।
शब्द पाठीं अवतरे । कृपा आधीं ॥ २६३
तंव बोलणेंचि नाहीं । बोलों म्हणे जरी काही ।
तरी बोल कोणाही । खुपेल का ॥ २६४ ॥
तरी दुर्वोळी कोणा नोहावी । भवई कवणाची नुचलावी ।
ऐसा भाव जीवीं । म्हणोनियां । २६७ ॥
मग प्रार्थिला विपायें । जरी लोभें बोलों जाये ।
तरी परिसत्या होये । मायबाप ॥ २६८ ॥
का नादब्रह्मचि मुसे आलें । कीं गगापथ असॅळलें ।
पतिव्रते आलें । वार्धक्य जैसें ॥ २६९ ॥
तैसे साच आणि मवाळ । मितंले आणि रसाळ ।
शब्द जैसे कल्लोळ । अमृताचे ॥ २७० ॥
आता चद्रबिंबौनि धारा । निगता नव्हती गोचरां ।
तरी एकसरा चकोरां । निघती दोंदें ॥ २७६ ॥
तैसे प्राणिया होये । जरी तो कांहीं वांस पाहे ।
तया अवलोकनाची सोये[११] । कूर्मीही नेणे ॥ २७७ ॥
असो मन हें पांडवा । मूळ इद्रियभावां ।

---

१ उल्लघन, उपमर्द. २ दात. ३ नतर ४ क्लेश ५ उसळलें. ६ मृदु, न खुपणारें. ७ मोजकें. ८ चद्रबिंबापासून. ९ स्पष्ट. १० मार्ग. ११ प्रकार. कूर्मी प्रेमदृष्टीनें पिलाचें पोषण करिते, तिला स्तन नाहींत.

हेंचि राहाटे आघवा । द्वारीं इहीं ॥ ३०३ ॥
यालागीं साचोकारें । मनीं अहिंसा थांवे[1] थोरें ।
जैसी पिकलीं द्रुती आदरें । बोभांत[2] निघे ॥ ३०४ ॥
तैसें दयालुत्व आपुलें । मनें हातापायां आणिलें ।
मग तेथ उपजविलें । अहिंसेतें ॥ ३०९ ॥

## ४ क्षांति.

त्रिविध मुख्य आघवे । उपद्रवाचे मेळावे ।
वरि पडिलियाँ[3] नव्हे । वाकडा जो ॥ ३४४ ॥
अपेक्षित पावे । तें जेणें तोषें मानावें ।
अनपेक्षिताहि करवे । तोचि मान ॥ ३४५ ॥
जो मानापमानातें साहे । सुखदुःख जेथ सामाये[4] ।
निंदास्तुति नोहे । दुखँड[5] जो ॥ ३४६ ॥
घेऊनि जळाचे लोट । आलिया नदीनदांचे संघाट[6] ।
करी वाडँ[7] पोट । समुद्र जेवीं ॥ ३५० ॥
तैसें जयाचिया ठायीं । न साहणें कांहींचि नाहीं ।
आणि साहतसें ऐसेंहि । स्मरण नुरे ॥ ३५१ ॥

## ५ आर्जव ( ऋजुत्व, सरळपणा ).

तोंड पाहुनि प्रकाशु । न करी जेवीं चंडांशु ।
जगा येक अवकाशु । आकाश जैसें ॥ ३५६ ॥
तैसें जयाचें मन । माणुसाप्रती आनआन ।
नोहे आणि वर्तन । ऐसें पै तें ॥ ३५७ ॥
जें जगचि सनोळख[8] । जगेंसी जुनाट सोयरिक ।
आपपर हे भाकँ[9] । जाणणें नाहीं ॥ ३५८ ॥

---

१ चांगली बळावली. २ बोभाटा करीत. ३ एकदम कोसळले तरी. ४ सामावतें. ५ भग्न, हताश. ६ समुदाय. ७ मोठें. ८ ओळखीचें. ९ भाषा.

वारियाची वांव । तैसे सरळ भाव ।
शका आणि हाव । नाहीं जया ॥ ३६० ॥
फांकलियां इदीवरा[1] । परिवैर[2] नाहीं धनुर्धरा ।
तैसा कोनाकोपरा । नेणेचि जो ॥ ३६२ ॥
दिठी नोहे मिणवी[3] । बोलणें नाहीं सादिग्धी ।
कवणेसी हीनबुद्धी । राहाटों नेणे ॥ ३६५ ॥
दाहाही इद्रियें प्रांजळें । निःप्रपचें निर्मळें ।
पांचही[4] पालव मोकळे[5] । आठही पाहर ॥ ३६६ ॥
अमृताची धार । तैसें उजू[6] अतर ।
किंबहुना तो माहेर । या चिन्हाचें ॥ ३६७ ॥

## ६ आचार्योपासना.

आता सबाह्य आपुलें । जेणें गुरुकुळीं वोपिलें ।
आपणपें केलें । भक्तीचें घर ॥ ३७४ ॥
गुरुगृह जिये देशी । तो देशचि वसे मानसीं ।
विरहिणी का जैसी । वल्लभातें ॥ ३७५ ॥
तियेकडोनि येतसे वारा । देखोनि धावे सामोरा ।
आडँ[7] पडे म्हणे घरा । बीजें कीजो ॥ ३७६ ॥
म्हणे कै हें बिरडें[8] फिटेल । कै तो स्वामी भेटेल ।
युगाहूनि वडिल । निमिष मानी ॥ ३७९ ॥
एकाधिये वेळे । गुरु माय करी भावबळें ।
मग स्तन्यसुखें लोळे । अंकावरी ॥ ३९६ ॥

---

१ कमळ. २ गुप्तपण. ३ ओशाळी. ४ पचप्राण. ५ आंत तळमळ, कासाविशी नसते. ६ सरळ. ७ साष्टाग नमस्कार घालून गुरूच्या देशाकडून येणाऱ्या वाऱ्याला म्हणतो 'आपण माझ्या घरीं यावें.' बीजें=गमन. ८ ज्या दाव्यानें वासरू बाधतात त्या दाव्याची गांठ.

नातरी गा किरीटी । चैतन्यतरुतळवटीं ।
गुरु धेनु आपण पोटीं । वत्स होय ॥ ३९७ ॥
गुरुकृपास्नेहसलिलीं । आपण होय मासोळी ।
कोणे एके वेळीं । हेंचि भावी ॥ ३९८ ॥
गुरूतें पक्षिणी करी । चारा घे चाचूवरी ।
गुरु तारू धरी । आपण कास ॥ ४०१ ॥
श्रीगुरूचे डोळे । अवलोकनें स्नेहाळें ।
पाहती तिये सकळें । होईन रूपें ॥ ४२८ ॥
इये शरीराची माती । मेळवीन तिये क्षिती ।
जेथ श्रीचरण उभे ठाती । श्रीगुरूचे ॥ ४३२ ॥
जो गुरुदास्यें कृश । जो गुरुप्रेमें सपोष ।
जो गुरुआज्ञे निवास । आपणाचि ॥ ४४३ ॥
गुरुसप्रदायधर्म । तेचि जयाचे वर्णाश्रम ।
गुरुपरिचर्या नित्यकर्म । जयाचे गा ॥ ४४५ ॥
गुरु क्षेत्र गुरु देवता । गुरु माता गुरु पिता ।
जो गुरुसेवेपरता । मार्ग नेणे ॥ ४४६ ॥
जयाचे वक्त्र । वाहे गुरुनामाचे मत्र ।
गुरुवाक्यावाचूनि शास्त्र । हातीं न शिवे ॥ ४४८ ॥
श्रीगुरूचें द्वार । तें जयाचें सर्वस्व सार ।
गुरुसेवका सहोदर—। प्रेमें भजे ॥ ४४७ ॥
शिवतलें गुरुचरणीं । भलतैसें हो पाणी ।
तया तीर्थयात्रे आणी । तीर्थें त्रैलोक्यीचीं ॥ ४४९ ॥
कैवल्यसुखासाठीं । परमाणु घे किरीटी ।
उधळती पायापाठीं । चालतां जें ॥ ४५१ ॥

---

१ चोंचीनें. २ तारक. ३ राहतात. ४ पुष्ट. ५ स्पर्शलेलें. ६ चरणरज.

### ७ शौचं ( शुचित्व ).

म्हणें शुचित्व गा ऐसें । जयापाशीं दिसे ।
आंगे मन जैसें । कापुराचें ॥ ४६२ ॥
का रत्नाचें दळेवाडें । जैसें सबाह्य चोखडें ।
आतबाहेरी एके पाडें । सूर्य जैसा ॥ ४६३ ॥
बाहेरी कर्में क्षाळला । भीतरीं ज्ञानें उजळला ।
इहीं दोहीं परी आला । पाखांळा एका ॥ ४६४ ॥
येऱ्हवीं तरी पाडुसुता । अतर शुद्ध नसतां ।
बाहेरीं कर्म तो सर्वथा । विटबू गा ॥ ४६८ ॥
मृत जैसा शृगारिला । गाढव तीर्थी न्हाणिला ।
कडु दुधिया माखिला । गुळें जैसा ॥ ४६९ ॥
यालागीं बाह्य भाग । कर्में धुतला चांग ।
ज्ञानें फिटला वंर्गे । अतरीचा ॥ ४७४ ॥
म्हणोनि सद्भाव जीवंगत । बाहेरीं दिसती फाकत ।
स्फटिकगृहींचे डोलत । दीप जैसे ॥ ४७६ ॥
पाणियें हिरा न भिजे । आधणीं हरळ न शिजे ।
तैसी विकल्पजातें न लिंपिजे । मनोवृत्ती ॥ ४८३ ॥
तया नांव शुचित्वपण । पार्था गा सपूर्ण ।
हें देखसी तेथ जाण । ज्ञान असे ॥ ४८४ ॥

### ८ स्थैर्य.

जातया अभ्रासवें । जैसें आकाश न धावे ।
भ्रमणचक्रीं न भवें । ध्रुव जैसा ॥ ४८०. ॥
तैसें देह तरी वरिचिलीकडे । आपुलियापरी हिंडे ।

---

१ देह व मन, आंतबाहेर. २ आकार, स्वरूप. ३ शुद्धत्वाला. ४ कलक, कश्मल. ५ आंतील. ६ खडे, पाषण. ७ फिरत नाहीं. ८ वरच्या बाजूनें पाहता.

परी बैसका[1] न मोडे । मानसीची ॥ ४८६ ॥
दैन्यदुःखीं न तपे । भयशोकीं न कंपे ।
देहमृत्यू न वासिपे[2] । पातलेनी ॥ ४९३ ॥
क्षीरार्णवाच्या कल्लोळीं । कप नाहीं मंदराचळीं ।
आकाश न जळे जाळीं । वणवियाच्या ॥ ४९८ ॥
तैशा आल्या गेल्या उर्मी । नव्हे गजबज मनोधर्मी ।
किंबहुना धैर्यक्षमी । कल्पांतींही ॥ ४९९ ॥

### ९ आत्मविनिग्रह.

एकलौतिया[3] बाळका- । वरी पडोनि ठाके अंबिका[4] ।
मधुविषयीं मधुमक्षिका । लोभिणी जैसी ॥ ५०३ ॥
अर्जुना जो यापरी । अतःकरण जतन करी ।
नेदी उभें ठाकों द्वारीं । इंद्रियाच्या ॥ ५०४ ॥

### १० वैराग्य.

वमिलिया अन्ना । लाळ न घोटी जेवि रसना ।
आग न सूये आलिंगना । प्रेताचिया ॥ ५१४ ॥
अर्जुना तेणें पाडें । जयासी विषयवार्ता नावडे ।
नेदी इंद्रियांचेनि तोंडें । काहींच जावों ॥ ५१७ ॥
नाराचाचीं[5] आंथरुणें । पूयपकीं लोळणें ।
तैसें लेखी भोगणें । ऐहिकींचें ॥ ५२१ ॥
तें हें विषयवैराग्य । आत्मलाभाचें भाग्य ।
येणें ब्रह्मानंदा योग्य । होती जीव ॥ ५२२ ॥

### ११ अनहंकार.

हें कर्म मियां केलें । कीं हें माझेनि आदरिलें सिद्धी गेलें ।

---

१ बैठका, स्थैर्य. २ भीत नाहीं. ३ एकुलत्या एक. ४ आई. ५ बाणांची.

ऐसें नाहीं ठेविलें । वासनेमाजीं ॥ ५२७ ॥
श्रुति स्वभावता बोले । गंगा काजेवीण चाले ।
तैसें अवष्टंभहीन[1] भलें । वर्तणें ज्याचें ॥ ५२९ ॥

### १२ जन्मजरादिस्मरण.

जन्मजरामृत्युदुःखें । व्याधिवार्धक्यकलुषें[2] ।
तियें आगा न येतां देखे । दुरूनि जो ॥ ५३६ ॥

### १३ अनासक्ति.

तरी जो देहावरी । उदास ऐसियापरी ।
उखितां जैसा बिढारीं[3] । बैसला आहे ॥ ५९४ ॥
का वृक्षाची साउली । वाटे जातां मिनली ।
घरावरी तेतुली । आस्था नाहीं ॥ ५९५ ॥
आणि प्रजा जे जाली । तियें वस्तिकरें[4] आलीं ।
का गोरुवें बैसलीं । वृक्षातळीं ॥ ५९७ ॥
जो संपत्तिमाजी असता । ऐसा गमे पाडुसुता ।
जैसा कां वाटे जातां । साक्षी ठेविला ॥ ५९८ ॥
येरव्ही दारागृहपुत्रीं । नाहीं जया मैत्री ।
तो जाण पा धांत्री । ज्ञानासी गा ॥ ६०० ॥

### १४ समचित्तता.

महासिंधु जैसें । ग्रीष्मवर्षें सरिसे ।
इष्टानिष्ट तैसे । जयाच्या ठायी ॥ ६०१ ॥
का तिन्ही काळ होता । त्रिधा नव्हे सविता ।
तैसा सुखदुःखीं चित्ता । भेद नाहीं ॥ ६०२ ॥

---

१ निरहंकार. २ रोग, जरा व पातकें. ३ वाटसरू, पाहुणा. ४ पोरेंबाळें. ५पांथस्थ. ६ गुरें ७ स्थान, जन्मभूमि. ८ उन्हाळा व पावसाळा हे सागराला सारखेच.

### १५ एकनिष्ठ भक्ति.

शरीरवाचामानस । पियाली कृतनिश्चयाचा कोशं[1] ।
एक मीवाचूनि वास । न पाहती आन ॥ ६०५ ॥
मिळोनि मिळतचि असे । समुद्रीं गंगाजळ जैसें ।
मी होऊनि मज तैसें । सर्वस्वें भजती ॥ ६०८ ॥

### १६ एकांतवासाची आवड.

तीर्थें [2]धौतें तटें । तपोवनें चोखटें ।
आवडती कपाटें[3] । वसवू जया ॥ ६१२ ॥
शैलकक्षाचीं[4] कुहरें । जळाशयपरिसरें ।
अधिष्ठी[5] जो आदरें । नगरा नये ॥ ६१३ ॥
बहु एकांतावरी प्रीती । जया जनपदाची[6] खती ।
जाण मनुष्याकारें मूर्ती । ज्ञानाची तो ॥ ६१४ ॥

### १७ अध्यात्मज्ञान.

तरी परमात्मा ऐसें । जें एक वस्तु असे ।
तें जया दिसे । ज्ञानास्तव ॥ ६१६ ॥
तें एकवाचूनि आनें । जियें भवस्वर्गादि[7] ज्ञानें ।
तें अज्ञान ऐसा मनें । निश्चय केला ॥ ६१७ ॥
ज्ञानजातां करीं । आववेंचि एकीकडे सारी ।
मग मनबुद्धि मोहरी[8] । अध्यात्मज्ञानीं ॥ ६२० ॥

### १८ तत्वज्ञानार्थदर्शन.

म्हणोनि ज्ञान जेतुलें दावी । तेतुली वस्तुचि आववी ।
तें देखें ऐसी व्हावी । बुद्धि चोख ॥ ६२९ ॥
पै ज्ञानाचिये प्रभेसवें । जयाची मती ज्ञेयी पावे ।

---

१ शपथ घेतली आहे. २ पवित्र ३ गुहा. ४ पर्वताच्या बगलेंतील गुहा. ५ वसवितो. ६ लोकाच्या गलबल्याचा कंटाळा. ७ संसार व स्वर्ग यासंबधाचीं ज्ञानें. ८ मार्गाला लावतो.

तोहात धराणिया शिवे । परतत्वातें ॥ ६३२ ॥

### उपसंहार.

एवं इये अठरा । ज्ञानलक्षणें अवधारा ।
श्रीकृष्णें धनुर्धरा । निरूपिलीं ॥ ६५० ॥
करतळावरी वाटोळा । डोलत देखिजे आवळा ।
तैसें ज्ञान आम्हीं डोळा । दाविलें तुज ॥ ६५३ ॥

## २९ स्थितप्रज्ञाचीं लक्षणें.

म्हणे अर्जुना परियेसी । जो हा अभिलाष प्रौढ मानसीं ।
तो अतराय स्वसुखेंसीं करीत असे ॥ २९१ ॥
जो सर्वदा नित्यतृप्त । अंतःकरणभरित ।
परी विषयामाजीं पतित । जेणें सगें कीजे ॥ २९२ ॥
तो काम सर्वथा जाये । जयाचें आत्मसतोषीं मन राहे ।
तोचि स्थितप्रज्ञ होये । पुरुष जाणें ॥ २९३ ॥
नाना दुःखीं प्राप्तीं । जया उद्वेग नाहीं चित्तीं ।
आणि सुखाचिया आर्तीं । अडपैचिजेना ॥ २९४ ॥
अर्जुना तयाच्या ठायीं । कामक्रोध सहजें नाही ।
आणि भयातें नेणे कहीं । परिपूर्ण तो ॥ २९५ ॥
ऐसा जो निरवधी । तो जाण पा स्थिरबुद्धी ।
जो निरसूनि उपाधी । भेदरहित ॥ २९६ ॥
जो सर्वत्र सदा सरिसा । परिपूर्ण चद्र का जैसा ।
अधमोत्तम प्रकाशा- । माजी न म्हणे ॥ २९७ ॥
ऐसी अनवच्छिन्न समता । भूतमात्रीं सदयता ।
आणि पालट नाहीं चित्ता । कवणे वेळे ॥ २९८ ॥

---

१ हातोहात ब्रह्माला झोंबतो २ काम, इच्छा, वासना. ३ अडथळा. ४ सुखाच्या इच्छेंत अडकून पडत नाही ५ कामनेचा विटाळ दूर करून. ६ उच्च व नीच सर्वांना सारखाच प्रकाश देतो. ७ अखंड.

गोमटें कांहीं पावे । तरी सतोषें तेणें नोभिभवे ।
जो ओखटेनि नागवे । विषादासी ॥ २९९ ॥
ऐसा हरिखशोकरहितें । जो आत्मबोधभरित ।
तो जाण पां प्रज्ञायुक्त । धनुर्धरा ॥ ३०० ॥
का कूर्म जियापरी । उवाइला अवेव पसरी ।
नातरी इच्छावशें आवरी । आपुले आपण ॥ ३०१ ॥
तैसीं इंद्रियें अपैतीं । जयाचें म्हणितलें करिती ।
तयाची प्रज्ञा जाण स्थिती । पावली असे ॥ ३०२ ॥
अर्जुना आणिकही एक । सांगेन ऐकें कवतिक ।
जे विषयातें साधक । त्यजिती नियमें ॥ ३०३ ॥
श्रोत्रादि इंद्रियें आवरिती । परी रसने नियम न करिती ।
ते सहस्रधा कवळिजती । विषयीं इहीं ॥ ३०४ ॥
जैसी वरिवरी पालवी खुडिजे । आणि मुळीं उदक घालिजे ।
तरी कैसेनि नाश निपजे । तया वृक्षा ॥ ३०५ ॥
तो उदकाचेनि बळें अधिकें । जैसा आडवेनि आगें फांकें ।
तैसा मानसीं विषय पोखे । रसनाद्वारें ॥ ३०६ ॥
येरा इंद्रियां विषय तुटे । तैसा नियमू न ये रस हटें ।
जे जीवनेंचि हें न घटे । येणेंविण ॥ ३०७ ॥
मग अर्जुना स्वभावें । ऐसियाही नियमातें पावे ।
जै का परब्रह्म अनुभवें । होऊनि जाइजे ॥ ३०८ ॥

---

१ वाहवला जात नाहीं. २ सापडत नाहीं. ३ हर्षही नाहीं व शोक–खेदही नाहीं असा ४ आनदला म्हणजे कासव शरीर पसरतो. ५ स्वाधीन, वश. ६ म्हटलेलें करतात, ताब्यात राहतात. ७ कौतुक, आश्चर्य. ८ नियमन, दमन करून. ९ रसना स्वाधीन न ठेवणाऱ्या पुरुषाना विषय हजार वाटानीं येऊन दनि करितात. १० आडवा फुटतो, फोपावतो ११ त्याशिवाय जीवितच चालत नाहीं.

तें शरीरभाव नासती । इंद्रियें विषय विसरती ।
जे सोऽहंभावप्रतीती[1] । प्रगट होय ॥ ३०९ ॥
म्हणोनि आइकें अर्जुना । जैसा विस्फुलिंग[2] लागे इंधना ।
मग तो प्रौढ जालिया त्रिभुवना । पुरों शके ॥ ३२९ ॥
तैसें विषयांचें ध्यान । जरी विपायें[3] वाहे मन ।
तरी येसणें[4] हें पतन । गिंवसीत पावे ॥ ३३० ॥

* * *

म्हणोनि विषय आघवे । सर्वथा मनौनि[5] सांडावे ।
मग रागद्वेष स्वभावें । नाशतील ॥ ३३१ ॥
पार्था आणिकही एक । जरी नाशले हे रागद्वेख ।
[6]तरी इंद्रिया विषयीं बाधक । रमता नाहीं ॥ ३३२ ॥
जैसा सूर्य आकाशगत । रश्मिकरें जगातें स्पर्शत ।
तरी संगदोषें काय लिंपत । तेथींचेनि ? ॥ ३३३ ॥
तैसा इंद्रियार्थी उदासीन । आत्मरसेंचि निर्भिन्न[7] ।
जो कामक्रोधविहीन । होऊनि असे ॥ ३३४ ॥
तरी विषयातही कांही । [8]आपणपेंवाचूनि नाहीं ।
मग विषय कवण कायी । बाधितील कवणा ! ॥ ३३५ ॥
ऐसा आपणचि केवळ । होऊनि असे निखिळें[9] ।
तयाची प्रज्ञा अचळ । निभ्रांत मानीं ॥ ३३७ ॥
देखें अखंडित प्रसन्नता । आथी जेथ चित्ता ।

---

१ मीच ब्रह्म अशी प्रतीति. २ ठिणगी. ३ कदाचित्, चुकून ४ एवढें मोठें. ५ मनांतूनच विषय काढून टाकावेत. ६ मग इंद्रियें विषयात रमलीं तरी विषयांची बाधा होत नाहीं. ७ आत्मसुखानें स्थिर झालेला. ८ आत्मस्वरूपावाचून विषयांतही वेगळें कांहीं नाहीं. तुकोबानीं याच अर्थानें 'विषय तो त्याचा झाला नारायण' असें म्हटलें आहे. ९ सर्व, केवळ.

तेथ रिगणें[1] नाहीं समस्ता । संसारदुःखां ॥ ३३८ ॥
जैसा अमृताचा निर्झरें[2] । प्रसवे जयाचा जठर ।
तया क्षुधेतृषेचा अडदर[3] । कांहींचि नाहीं ॥ ३३९ ॥
तैसें हृदय प्रसन्न होये । तरी दुःख कैचें कें आहे ।
तेथ आपैसी बुद्धि राहे । परमात्मरूपीं ॥ ३४० ॥
जैसा निर्वातीचा[4] दीप । सर्वथा नेणे कंप ।
तैसा स्थिरबुद्धि स्वस्वरूप । योगयुक्त ॥ ३४१ ॥
म्हणोनि अयुक्तपण[5] मनाचें । तेंचि सर्वस्व दुःखाचें ।
याकारणें इंद्रियाचें । दमन कीजे ॥ ३४७ ॥
इंद्रियें जें जें म्हणती । तें तेंचि जे पुरुष[6] करिती ।
ते तरलेचि न तरती । विषयसिंधु ॥ ३४८ ॥
देखें कूर्म जियापरी । उँवाइला[7] अवयव पसरी ।
नातरी इच्छावशें आवरी । आपणपेंचि[8] ॥ ३५२ ॥
तैसीं इंद्रियें अपैतीं[9] होती । जयाचें म्हणितलें करिती ।
तयाची प्रज्ञा जाण स्थिती । पातली असे ॥ ३५३ ॥

* * * *

आता आणिक एक गहन । पूर्णाचें चिन्ह ।
अर्जुना तुज सांगेन । परिस पां ॥ ३५४ ॥
देखें भूतजात निदेलें । तेथेंचि जया पाहलें ।
आणि जीव जेथ चेइले । तेथ निद्रित जो ॥ ३५५ ॥

---

१ प्रवेश करणें, शिरणे. २ झरा. ३ भय पीडा. ४ निवाऱ्याच्या जागेंतला. ५ मनोजय न करणे, मनाचें नियमन न करणें. ६ सिद्ध पदाला पोंचलेला पुरुषही जर इंद्रियाचे लाड करील. ७ प्रसन्न झाला, खुषींत आला. ८ आपण स्वतःच. ९ वश, स्वाधीन. १० प्राणिमात्र जेथें ( आत्मस्वरूपीं ) निजले आहेत तेथें याचें उजाडतें ( पाहले ) व जीव जेथें जागे होतात ( चेइले ) तेथें ( विषयांत किंवा विषयाविषयीं ) हा निजलेला.

तोचि तो निरुपाधि । अर्जुना तो स्थिरबुद्धि ।
तोचि जाणें निरवधि । मुनीश्वर ॥ ३५६ ॥
पार्था आणीकही परी । तो जाणों येईल अवधारीं ।
जैसी अक्षोभता सागरीं । अखडित ॥ ३५७ ॥
जऱ्ही सरितावोघ समस्त । परिपूर्ण होऊनि मिळत ।
तऱ्ही अधिक नोहे ईषंत[1] । मर्यादा न मांडीं ॥ ३५८ ॥
नातरी ग्रीष्मकाळीं सरिता । शोषूनि जाती समस्ता ।
परी न्यून नव्हे पार्था । समुद्र जैसा ॥ ३५९ ॥
तैसा प्राप्तीं ऋद्धि सिद्धि । तयासि क्षोभ नाहीं बुद्धी ।
आणि न पवता न बाधी । अधृति[2] तयातें ॥ ३६० ॥
जो आपुलेनि नागरपणें[3] । इंद्रभुवनातें पाबळें[4] म्हणे ।
तो केवीं रजे पालवणें[5] । भिल्लांचेनि ॥ ३६३ ॥
जो अमृतातें ठी[6] ठेवी । तो जैसा कांजी न सेवी ।
तैसा स्वसुखानुभवी । न भोगी ऋद्धि ॥ ३६४ ॥
पार्था नवल हें पाहीं । जेथ स्वर्गसुखा लेखणी[7] नाहीं ।
तेथ ऋद्धिसिद्धि कायी । प्राकृता[8] होती ॥ ३६५ ॥
ऐसा आत्मबोधें तोषला । जो परमानदें पोखला[9] ।
तोचि स्थिरप्रज्ञ भला । वोळख तू ॥ ३६६ ॥
तो अहकारातें दवडुनी । सकळ काम सांडुनी ।
विचरे विश्व होऊनी । विश्वामाजीं ॥ ३६७ ॥ ( अ० २ )



---

१ किंचित् मात्र. २ चचलपणा. ३ ऐश्वर्यानें. ४ क्षुद्र. ५ भिकार पालानें.
६ खोडी, उणेपणा. ७ पर्वा. ८ क्षुल्लक. ९ पुष्ट झाला.

# ४ भक्तियोग.

---

## १ दुस्तर मायानदी.

आतां महदादि हे माझी माया । उतरोनियां धनंजया ।
मी होइजे[1] हें आया । कैसेनि ये ॥ ६८ ॥
जिये ब्रह्माचळांचा[2] आधौंडा[3] । पहिल्या संकल्पजलाचा उभडों[4] ।
सर्वेंचि महाभूतांचा बुडबुडा । सानों[5] आला ॥ ६९ ॥
जे सृष्टिविस्ताराचेनि वोघें । चढत काळकलनेचेनि[6] वेगें ।
प्रवृत्तिनिवृत्तीची[7] तुगें । तटें साडी ॥ ७० ॥
जे गुणघनांचेनि[8] वृष्टिभरें । भरली मोहाचेनि महापूरें ।
घेऊनि जात नगरें । यमनियमांचीं[9] ॥ ७१ ॥
द्वेषाच्या आवर्ती[10] दाटत । मत्सराचे वळसे[11] पडत ।
माजी प्रमदादि[12] तळपत । महामीन ॥ ७२ ॥
जेथ प्रपंचाची वळणें । कर्माकर्मांचीं वोभौणें[13] ।
वरी तरताती वोसौणें[14] । सुखदुःखांची ॥ ७३ ॥
रतीचियें[15] बेटा । आदळती कामाचिया लाटा ।
जेथें[16] जीवफेनसंघाटा । सैघ दिसे ॥ ७४ ॥

---

१ प्रतीतीस २ उंच ब्रह्मपर्वताच्या ३ अर्धकडा, मध्यभागावर. ४ 'एकोहं बहु स्याम्' हा संकल्प त्याचा उगम, झरा. ५ लहानसा. ६ कलागतीच्या. ७ प्रपंच व मोक्ष यांचे उंच तट ओलांडून चालली आहे. ८ सत्व-रज-तम हे गुणरूपी मेघ. ९ यमनियमांचीं नगरें बुडवून टाकीत. १० भोंवऱ्यांत. ११ वळणें, वाकणें. १२ प्रमादादि मोठे मासे. १३ वेग, पूर १४ पुरांतलीं लाकडें, केर-कचरा. १५ विषयवासनेच्या. १६ जीवरूप फेसाचे डोंगर.

अहंकाराचिया चळिया[1] । वरी मदत्रयांचिया[2] उकळिया ।
जेथ विषयोर्मींच्या आकाळिया । उल्हाळे[3] घेती ॥ ७५ ॥
उदयास्ताचे लोंढे । पाडित जन्ममरणाचें चोंढे[4] ।
जेथ पाचभौतिक बुडबुडे । होती जाती ॥ ७६ ॥
समोहविभ्रम मासे । गिळिताति धैर्याचीं आमिषें[5] ।
तेथ देव्हडे[6] भोंवत वळसे । अज्ञानाचे ॥ ७७ ॥
भ्रातीचेनि खडुळें[7] । रेवलें[8] आस्थेचें अवगाळें[9] ।
रजोगुणाचेनि खळाळें । स्वर्ग गाजे ॥ ७८ ॥
तमाचे धोरसे[10] वाड । सत्वाचें स्थिरपण जाड ।
किंबहुना हे दुर्वाड[11] । मायानदी ॥ ७९ ॥
पै पुनरावृत्तीचेनि उभडें[12] । झळंबती[13] सत्यलोकींचे हुडे[14] ।
घायें[15] गडबडती धोंडे । ब्रह्मगोळकाचे ॥ ८० ॥
तया पाणियाचेनि वहिलेपणें[16] । अझुनी न धरती वोभाणें[17] ।
ऐसा मायापूर हा कवणें । तरिजेल गा ॥ ८१ ॥

*　　　　*　　　　*

येथ एक नवलावो । जो जो कीजे तरणोपावो ।
तो तो अपावो । होय तें ऐक ॥ ८२ ॥
एक स्वयंबुद्धीच्या[18] बाहीं । रिगाले तयांची शुद्धीचि नाहीं ।
एक जाणिवेचे[19] डोहीं । गर्वेंचि गिळिले ॥ ८३ ॥
एकीं वेदत्रयाचिया सागडी । घेतल्या अहंभावाचिया धोंडी ।

१ लाटा, ओघ. २ विद्या, वैभव व शरीरबळ हे तीन मद ३ उचबळतात. ४ उंचवटे व खळगे. ५ मांसपिंड. ६ वाकडे. ७ गढूळ पाण्यानें. ८ रुतलें. ९ गाळांत. १० मोठाले प्रवाह ११ तरून जाण्यास कठिण, दुस्तर १२ पूरानें. १३ खचतात. १४ बुरूज. १५ आघातानें. १६ प्रवाहानें, वाहण्यानें. १७ वेग, वेग वाढतच आहे. १८ स्वतःच्या शहाणपणाच्या बळावर १९ ज्ञानाच्या घमेंडीच्या डोहात.

ते मदमीनाच्या तोंडी । सगळेचि गेले ॥ ८४ ॥
एकीं वयसेचें जाड बांधलें । मग मन्मथाचिये कांसे लागले ।
ते विषयमगरीं साडिले । चघळूनिया ॥ ८५ ॥
आता वार्धक्याच्या तरगा– । माजी मतिभ्रंशाचा जरंगा ।
तेणें कवळिजैताति पै गा । चहूकडे ॥ ८६ ॥
आणि शोकाचा कडा उपडत । क्रोधाच्या आवर्तीं दाटत ।
आपदागिधी चुबिजत । उधवलीठायी ॥ ८७ ॥
मग दु:खाचेनि बरबटें बोबले । पाठी मरणाचे रेंवे रेंवले ।
ऐसे कामाचे कांसे लागले । ते गेले वाया ॥ ८८ ॥
एकी यजनक्रियेची पेटी । बाधोनि घातली पोटीं ।
ते स्वर्गसुखाच्या कपाटी । शिरकोनि ठेले ॥ ८९ ॥
एकीं मोक्षीं लागावयाचिया आशा ।-केला कर्मबाह्यांचा भरवंसा ।
परी ते पाडिले वळसा । विधिनिषेधाच्या ॥ ९० ॥
जेथ वैराग्याची नाव न रिगे । विवेकाचा तांगा न लगे ।
वरी कांहीं तरों ये योगें । तरी विपायें तो ॥ ९१ ॥
ऐसें तरी जीवाचिये आगवणें । इये मायानदीचें तरणें ।
हें कासयासारिखें बोलणें । म्हणावें पा ॥ ९२ ॥
जरी अपथ्यशीळा व्याधी । नाकळे साधूसि दुर्जनाची बुद्धी ।
कीं रागी सांडी सिद्धी । आली साती ॥ ९३ ॥
जरी चोरा सभा दाटे । अथवा मीना गळ घोटे ।

---

१ वयाच्या बळावर कबर बांधली. २ जाळें. ३ वेढले जातात. ४ वर डोकें काढतांच ( उधवणें = वर करणें ), आपत्तिरूढ गिधाडाकडून टोंचले जातात. ५ चिखलानें. ६ भरले. ७ वाळूत रुतले ( रेंव=वाळू ). ८ कपारींत; भगदाडात. ९ अडकून पडले. १० नित्यनैमित्तिक कर्मांचा अथवा कर्मरूप बाहूचा. ११ दोर. १२ विरळा. १३ अगबळानें. १४ विषयी पुरुषाला ऐश्वर्य प्राप्त झालें असता ( साती ) तो तें जसें टाकणार नाहीं.

नातरी भेंडा[1] उलटे । त्रिवसी[2] जरी ॥ ९४ ॥
पाडस[3] वागुर कराडी । का मुंगी मेरु वोलांडी ।
तरी मायेची पैलथडी[4] । देखती जीव ! ॥ ९५ ॥
म्हणऊन गा पांडुसुता । जैसी सकामा[5] न जिणवेचि वनिता ।
तेवी मायामय हे सरिता । न तरवे जीवां ॥ ९६ ॥

* * *

येथ एकचि लीला[6] तरले । जे सर्वभावें मज भजले ।
तयां ऐलीच[7] थडी सरलें । मायाजळ ! ॥ ९७ ॥
जया सद्गुरुतारू फुडें । जे अनुभवाचे कासे गाढे ।
जया आत्मनिवेदन तराडें[8] । आकळलें ॥ ९८ ॥
जे अहंभावाचे वोझें साडूनि । विकल्पाचिया झुळका चुकाउनि ।
अनुरागांचा[9] निरुता होउनी । पाणिढाळें[10] ॥ ९९ ॥
जया ऐक्याचियां[11] उतारा । बोधाचा जोडला तारा[12] ।
मग निवृत्तीचिया पैलतीरा । झेंपावले[13] जे ॥ १०० ॥
ते उपरतीच्या[14] वावी सेलत । सोहंभावाचेनि थावें पेलत[15] ।
मग निघाले अनकळित[16] । निवृत्तितटीं[17] ॥ १०१ ॥
येणें उपायें मज भजले । ते हे माझी माया तरले ।
परी ऐसे भक्त विपाइले[18] । बहुवस नाहीं ॥ १०२ ॥ (अ० ७)

## २ ईश्वरभजनावांचून उपायच नाहीं.

यालागी शतजर्जर नावे । रिगोनि केवि निश्चित होआवें ? ।

---

१ भेकडाला २ पिशाच. ३ हरणाचें पाडस जर जाळें कुरतडील. ४ परतीर. ५ विषयी पुरुषाला स्त्री जशी जिंकवत नाहीं. ६ आनायासें, सहज. ७ अलीकडच्या तिराला. ८ ताफा. ९ आसक्तीचा. १० पायउतार ११ जीव व परमात्मा यांचे ऐक्य हाच उतार. १२ सागड. १३ उड्या टाकीत गेले. १४ वैराग्याचे हात टाकीत. १५ तोच मी अशा अभेदपणाच्या बळावर पोहत. १६ क्लेशरहित. १७ मुक्तितटावर. १८ विरळ.

कैसेंनि उघडिया असावें । शस्त्रवर्षी ? ॥ ४९० ॥
अगावरी पडता पाषाण । न सुवीवें केंवि वोडणें ।
रोगें दाटला आणि उदासपण । वोखदेंसी ! ॥ ४९१ ॥
जेथ चहुकडे जळत तणवा । तेथूनि न निगिजे केविं पांडवा ? ।
तेवि लोकां येऊनि सोपद्रवा । केविं न भजिजे मातें ॥ ४९२ ॥
अगा मातें न भजावयालागी । कवण बळ पा आपुलिया अंगीं ।
काई घरीं की भोगी । निश्चिती केली ? ॥ ४९३ ॥
नातरी विद्या की वयसा । यया प्राणियांसी हा ऐसा ।
मज न भजता भरवसा । सुखाचा कोण ! ॥ ४९४ ॥
आता सुखेंसी जीविता । कैची ग्राहिकी कीजेल पडुसुता ।
काय राखोंडी फुकिता । दीप लागे ? ॥ ४९७ ॥
अगा विपाचे कादे वाटुनी । जो रस घेईजे पिळुनी ।
तया नाव अमृत ठेउनि । जैसें अमर होणें ॥ ४९८ ॥
तेविं विषयाचें जें सुख । तें केवळ परम दु ख ।
परि काय कीजे मूर्ख । न सेविता न सरे ॥ ४९९ ॥
म्हणोनि मृत्युलोकी सुखाची कहाणी । ऐकिजेल कवणाचिये श्रवणी ।
कैची सुखनिद्रा आथरुणीं । इगळाऱ्या ॥ ५०१ ॥
ऐसी लोकीची जिये नादणुक । तेथ जन्मले आथि जे लोक ।
तयाचिये निश्चितीचें कौतुक । दिसत असे ! ॥ ५०७ ॥
जव जव बाळ बळिया वाढे । तव तव भोजें[4] नाचती कोडें ।
आयुष्य निमालें आतुलियेकडे । ते ग्लानीचि [6]नाहीं ॥ ५११ ॥
जन्मलिया दिवसदिवसें । हो लागे काळाचियाचि ऐसें ।
की वार्ढती करिती उल्हासें । उभाविती गुढिया ॥ ५१२ ॥

---

१ घ्यावी. २ ढाल. ३ सवदा. ४ सतोषानें. ५ आंतून कर्मी झालें. ६ खती
७ काळ्याच्या स्वाधीन. ८ वाढदिवस.

अगा ! मर हा बोल न साहती । आणि मेलिया तरी रडती ।
परि असतें जात न गणिती । गहिंसपणें[1] ॥ ५१३ ॥
दर्दुर सापें गिळिजतु आहे उभा । कीं तो मासिया वेंटाळी जिभा ।
तैसें प्राणिये कवणे लोभा । वाढविती तृष्णा ? ॥ ५१४ ॥
अहा कटकटा हें वोखटें । इये मृत्युलोकीचें उफराटें ।
येथ अर्जुना जरी अवचटें[2] । जन्मलासि तूं ॥ ५१५ ॥
तरि झडझडोनि वायिलें[3] निघ । इये भक्तीचिये वाटा लाग ।
जिया पावसी अव्यग । निजधाम माझें ॥ ५१६ ॥ ( अ० ९ )

## ३ चतुर्विध भक्त.

### १

तो पहिला आर्त म्हणिजे । दुसरा जिज्ञासु बोलिजे ।
तिजा अर्थार्थी जाणिजे । ज्ञानिया चौथा ॥ १०९ ॥
आर्त तो आर्तीचेनि[4] व्याजें । जिज्ञासु तो जाणावयालागी भजे ।
तिजेचि रेणें इच्छिजे । अर्थसिद्धि ॥ ११० ॥
मग चौथियाच्या ठायीं । कांहींच करणें नाहीं ।
म्हणोनि भक्त एक पाहीं । ज्ञानिया जो ॥ १११ ॥
तया ज्ञानाचेनि प्रकाशें । फिटलें भेदाचें कडवसे[5] ।
मग मीचि जाहला समरसें । आणि भक्तही तेवीचि ॥ ११२ ॥
शरीरी हन कर्में । तो भक्त ऐसा गमे ।
परी अतरप्रतीति धर्में । मीचि जाहला ॥ ११६ ॥
म्हणोनि आपुलाल्या हिताचेनि लोभें । मज आवडे तोही भक्त झोंबे ।
परी मीचि करी वाल्लभें[6] । ऐसा ज्ञानिया येक ॥ ११९ ॥
पाहें पां दुभतेयाचिया आशा । जग धेनूसि करितसे फांसा ।

---

१ मूर्खपणें. २ दैवयोगानें. ३ वेगळा. ४ दुःखनिवारणार्थ भजणारा. ५ द्वैताचा अधकार. ६ वल्लभ, प्रिय.

परी दोरेंवीण कैसा । वत्साचा बळी ! ॥ १२० ॥
कां जें तनुमनप्राणें । तें आणिक काहीच नेणे ।
देखतसातें म्हणे । हे माय माझी ! ॥ १२१ ॥
तें येणेंमानें अनन्यगती । म्हणऊनि धेनूंही तैसीच प्रीती ।
तयालागीं लक्ष्मीपती । बोलिले साचें ॥ १२२ ॥
अंतःकरणकुहरी जन्मली । जयाची प्रतीतिगंगा मज मीनली ।
तो मी हे काय बोली । फार करूं ॥ १२५ ॥
एऱ्हवी ज्ञानिया जो म्हणिजे । तो चैतन्यचि केवळ माझें ।
हें न म्हणावें परी काय कीजे । न बोलणें बोलों ॥ १२६॥ (अ०७)

२

हा सहज माझा । प्रकाश जो कपिध्वजा ।
तो भक्ति या वोजा । बोलिजे गा ॥ १११७ ॥
म्हणोनि आर्ताच्या ठायी । हे आर्ति होऊनि पाही ।
अपेक्षणीय जें काही । तें मीचि केला ॥ १११८ ॥
जिज्ञासूपुढां वीरेशा । हेचि होऊनि जिज्ञासा ।
मी का जिज्ञास्यु ऐसा । दाखविला ॥ १११९ ॥
होचि होऊनि अर्थना । मीचि माझ्या अर्थी अर्जुना ।
करूनि अर्थाभिधाना । आणी मातें ॥ ११२० ॥
एवं घेऊनि अज्ञानातें । माझी भक्ति जे हे वर्ते ।
ते दावी मज द्रष्टयातें । दृष्य करूनी ॥ ११२१ ॥
तें अज्ञान आतां फिटलें । माझें द्रष्टत्व मज भेटलें ।
निजबिंबीं एकवटलें । प्रतिबिंब जैसें ॥ ११२५ ॥

---

१ पाहतांच. २ अंतःकरणरूप गुहेंत जन्मलेली त्याची स्वानुभवगंगा मला मिळाली. ३ रीतीनें. ४ इच्छित. ५ ज्ञानाचा विषय. ६ अभ्यर्थनीय विषय ७ अर्थ या नावाला.

कां पूर्णिमेआधी कायी । चद्र सावयव नाहीं ? ।
परी तिये दिवशीं भेटे पाहीं । पूर्णता तया ॥ ११२७ ॥
म्हणोनि दृश्यपथा--। अतीत माझा पार्था ।
भक्तियोग चौथा । म्हणितला गा ॥ ११२८ ॥
इया ज्ञानभक्ती सहज । भक्त एकवटला मज ।
तो मीचि केवळ हें तुज । श्रुतही आहे ॥ ११२९ ॥ (अ०१८)

**४ वेडे माझा व्यापकपणा न ओळखतां मला भजतात !**

तैसें न करिती प्राणिये । वाया आपुल्या हिती वाणिये[२] ।
जे पोहताति पाणिये । तळहातींचेनि ॥ १५१ ॥
अमृताच्या सागरीं बुडिजे । मग तोंडा का वज्रमिठी[३] पाडिजे ।
आणि मनीं तरी आठविजे । थिल्लरोदकातें[४] ! ॥ १५२ ॥
हें ऐसें कासया करावें । जे अमृतींही रिगोनि मरावें ।
तें सुखें अमृत होऊनि का नसावें । अमृतामाजी ? ॥ १५३ ॥
तैसा फळहेतूचा पांजरा[५] । सांडूनिया धनुर्धरा ।
का प्रतीतिपाखीं[६] चिदंबरा । गोसाविया नोहावे ? ॥ १५४ ॥
जेथ उचांवलेनि[७] पवाडें[८] । सुखाचा पैसार जोडे ।
आपुलेनि सुरवाडें । उडों ये ऐसा ॥ १५५ ॥
तया उमपा माप का सुवावें[९] ? मज अव्यक्ता व्यक्त का मानावें ?।
सिद्ध असता का निमावें[१०] । साधनवरी ? ॥ १५६ ॥ ( अ० ७ )

**५ भक्तांचा अभ्यासयोग.**

डोळा जें देखावें । का कानी हन ऐकावें ।

---

१ ' ज्ञानी त्वात्मैव केवलम्. ' वर १२६ ओवी पहा. २ हिताची हानी करून घेतात. ३ घट्ट मिटून धरणे ४ डबक्यातलें घाण पाणी ५ पिंजरा, शरीर. ६ अनुभवाच्या पखांनीं चिदाकाशाचे स्वामी का होऊ नये ? ७ उचींवर गेल्यानें. ८ विस्तार, विपुलपणा ९ अपाराला माप का लावावें? १० साधनातच कां मरावें ?

मनीं जें भावावें । बोलावें वाचे ॥ ७६ ॥
तें आंतबाहेरी आघवें । मीचि करूनि घालावें ।
मग सर्वकाळीं स्वभावें । मीचि आहे ॥ ७७ ॥
अर्जुना ऐसें जाहलिया । मग न मरिजे देह गेलिया ।
मा संग्राम केलिया । भय काय तुज ? ॥ ७८ ॥
तू मनबुद्धि साचेसी । जरी माझिया स्वरूपीं अर्पिसी ।
तरी मातेंचि गा पावसी । हे माझी भाक ॥ ७९ ॥
येणेंचि अभ्यासेसीं योगू । चित्तासि करी पा चागू ।
अगा ! उपायबळें पगू । पहाड ठाकी ॥ ८१ ॥
तेवीं सदभ्यासें निरतर । चित्तासि परमपुरुषाची मोहेर ।
लावी, मग शरीर । राहो अथवा जावो ॥ ८२ ॥
जें नाना गतीतें पावविते । तें चित्त वरील आत्मयातें ।
मग कवण आठवी देहातें । गेलें की आहे ! ॥ ८३ ॥
पै सरितेचेनि वोघें । सिंधुजळा मीनले घोघें[2] ।
ते काय वर्तत आहे मागें । म्हणोनि पाहों येती ? ॥ ८४ ॥
ना ते समुद्रचि होऊनि ठेलें । तेविं चित्ताचें चैतन्य जालें ।
जेथ[3] यातायात निमालें । घनानद जें ॥ ८५ ॥
ऐसे निरतर एकवटले । जे अत करणी मजासि लिगटले ।
मीचि होऊनि आतले[4] । उपासिती ॥ १२६ ॥
ऐसे जे नित्ययुक्त । तयासी सुलभ मी सतत ।
म्हणऊनि देहातीं निश्चित । मीचि होती ॥ १३०. ॥ ( अ० ८ )

## ६ अभ्यासास दुष्कर कांहीं नाहीं.

म्हणोनि माझिया स्वरूपीं । मन बुद्धि इये निक्षेपीं ।

---

१ मार्ग. २ घों घों करीत किंवा जलद. ३ जेथें पुनर्जन्म नाहीं, येरझार नाहीं. ४ व्यापक झाले

येतुलेनि सर्वव्यापी । मीचि होशी ॥ १०२ ॥
अथवा हें चित्त । मनबुद्धिसहित ।
माझ्या हातीं अचुबितें । न शकमी देवों ॥ १०४ ॥
तरि गा ऐसें करीं । यया आठा पाहारांमाझारीं ।
मोटकें निमिषभरीं । देत जाई ॥ १०५ ॥
मग जें जें का निमिख । देखेल माझें सुख ।
तेतुलें अरोचकें । विषयी घेईल ॥ १०६ ॥
जैसें शरत्काल रिगे । मग सरिता वोहटू लागे ।
तैसें चित्त काढेल वेगें । प्रपचौनि ॥ १०७ ॥
मग पुनवेहूनि जैसें । शशिबिंब दिसेंदिसें ।
हारपत अंवसें । नाहींचि होय ॥ १०८ ॥
तैसें भोगाआतूनि निघता । चित्त मजमाजीं रिगता ।
हळूहळू पांडुसुता । मीचि होसील ॥ १०९ ॥
अगा अभ्यासयोग म्हणिजे । तो हा एक जाणिजे ।
येणें कांहीं न निपजे । ऐसें नाहीं ॥ ११० ॥
पै अभ्यासाचेनि बळें । एका गती अतंराळें ।
व्याघ्र सर्प प्रांजळें । केलें एकी ॥ १११ ॥
विष की आहारीं पडे । समुद्री पायवाट जोडे ।
एकीं वाग्ब्रह्म थोकडें । अभ्यासें केलें ॥ ११२ ॥
म्हणोनि अभ्यासासी कांहीं । सर्वथा दुष्कर नाहीं ।
यालागी माझिया ठायी । अभ्यासें मिळें ॥ ११३ ॥ (अ० १२)

### ७ ‘ मी गोसावी समस्ता त्रैलोक्याचा ’

हें चराचर आघवें । जिये प्रकृतीआंत सांठवे ।

---

१ समग्र. २ प्रहरांमध्यें ३ अल्प, क्षणभर मात्र. ४ अनावड, अप्रीति, ५ प्रपचांतून. ६ दिवसेंदिवस. ७ अतरिक्षात. ८ निरुपद्रवी, निर्वैर, सरळ. ९ श-द-ज्ञान स्वाधीन केलें.

ते शिणली जेथ विसंबे[1] । ते परम गती मी ॥ २७८ ॥
आणि जयाचेनि प्रकृति जिये । जेणें अधिष्ठिली[2] विश्व विये ।
जो येऊनि प्रकृती इये । गुणातें भोगी ॥ २७९ ॥
तो विश्वश्रियेचा भर्ता । मीचि गा येथ पाडुसुता ।
मी गोसावी समस्ता । त्रैलोक्याचा ॥ २८० ॥
आकाशें सर्वत्र वसावें । वायूनें नांवभरी[3] उगें नसावें ।
पावकें दाहावें । वर्षावें जळें ॥ २८१ ॥
पर्वतीं बैसका[4] न सडावी । समुद्रीं रेखा[5] नोलांडावी ।
पृथ्वीया भूतें वाहावीं । हे आज्ञा माझी ॥ २८२ ॥
म्या बोलविल्या वेद बोले । म्या चालविल्या सूर्य चाले ।
म्या हालविल्या प्राण हाले । जो जगातें चाळिता ॥ २८३ ॥
मियाचि नियमिला[6] साता । काल ग्रासितसे भूता ।
इयें म्हणियागतें[7] पाडुसुता । सकळें जयाचीं ॥ २८४ ॥
जो ऐसा समर्थ । तो मी जगाचा नाथ ।
आणि गगनाऐसा साक्षीभूत । तोही मीचि ॥ २८५ ॥
इहीं नामरूपीं आघवा । जो भरला असे पांडवा ।
आणि नामरूपांचाही वोलांवा[8] । आपणचि जो ॥ २८६ ॥
जैसे जळाचे कल्लोळ । आणि कल्लोळीं आथी जळ ।
ऐसेनि वसवीतसे सकळ । तो निवास मी ॥ २८७ ॥
जो होय मज अनन्यशरण । त्याचें निवारी मी जन्ममरण ।
यालागीं शरणागता शरण्य[9] । मीचि एक ॥ २८८ ॥
जैसा समुद्र थिल्लर[10] न म्हणता । भलतेथ बिंबे सविता ।
तैसा ब्रह्मादि सर्वांभूतां । सुहृद तो मी ॥ २९० ॥

---

१ लीन होते. २ ज्याच्या अधिष्ठानावर, सत्तेवर. ३ क्षणभर. ४ बैठक. स्थैर्य ५ मर्यादा ६ आज्ञापिला असता. ७ म्हटलेलें करणारीं, आज्ञांकित, सेवक, ८ जिव्हाळा. ९ आश्रय. १० डबकें

मीचि गा पांडवा । या त्रिभुवनासि वोलावा ।
सृष्टिक्षयप्रभवा । मूळ ते मी ॥ २९१ ॥
बीज शाखातें प्रसवे । मग तें रुखपण[1] बीजी समावें ।
तैसें सकल्पें होय आघवें । पाठी[2] सकल्पी मिळे ॥ २९२ ॥
ऐसें जगाचें बीज जो सकल्प[3] । अव्यक्त वासनारूप ।
तया कल्पांतीं जेथ निक्षेपें[4] । होय तें मी ॥ २९३ ॥
इयें नामरूपे लोटती । वर्णव्यक्ती ऑटती[5] ।
जातींचे भेद फिटती । जै आकार नाही ॥ २९४ ॥
तै सकल्पवासनासस्कार[6] । माघौतें रचावया आकार ।
जेथ राहोनि असती अमर । तें निधान मी ॥ २९५ ॥
अग्नि काष्ठें खायें । तें काष्ठचि अग्नि होये ।
तैसें मारतें मरतें पाहे । स्वरूप माझें ॥ २९७ ॥
आता बहु बोलोनि सांगावें । तें एकहेळा[7] घे पा आघवें ।
तरी सतासतही[8] जाणावें । मीचि पै गा ॥ २९९ ॥ ( अ० ९ )

## ८ माझा विश्वविस्तार.

पाहे पा आरभी बीज एकलें । मग तेंचि विरूढलिया[9] बूड जाहलें।
बुडीं कोंभ निघाले । खांदियांचे ॥ ९८ ॥
खादियापासूनि अनेका । फुटलिया नाना शाखा ।
शाखास्तव देखा । पल्लुव पानें ॥ ९९ ॥
पल्लवी फूलफळ । एव वृक्षत्व जाहलें सकळ ।
तें निर्धारितां[10] केवळ । बीजचि आघवें ॥ १०० ॥
तैसें मी एकचि पहिलें । मग मी तेंचि मनातें व्यालें ।

१ वृक्षपण. २ पुन्हां, शेवटी. ३ आदिसकल्प, मूळमाया. ४ ठेवणें, लीन होणें. ५ लय पावतात. ६ सकल्परूप मूळ वासनाशक्ति. ७ एकदम. ८ व्यक्त व अव्यक्त. ९ अकुर फुटल्यावर. १० विचार करून पाहतां.

तेथ सप्तऋषी आणि जाहलें । चारी मनु ॥ १०१ ॥
इहीं लोकपाळ केले । लोकपाळीं विविध लोक स्रजिले[1] ।
लोकापासूनि निपजलें । प्रजाजात ॥ १०२ ॥
ऐसेनि हें विश्व येथें । मीचि विस्तारिलेंसे निरुतें ।
परी भावाचेनि हातें । माने जया ॥ १०३ ॥
आगीचिया रोमा किती । जयाचिया तयासी न गणवती ।
तैसिया माझिया विभूती । असंख्य मज ॥ २१० ॥
पृथ्वीये परमाणूचा उगाणा[2] घ्यावा । तरी भूगोलचि काखे सुवावा[3] ।
तैसा विस्तार माझा पहावा । तरी जाणावें मातें ॥ २६० ॥
सानें थोर न म्हणावें । उचनीचभाव सांडावे ।
एक मीचि ऐसें मानावें । वस्तुजातातें ॥ ३०५ ॥
माझेनि एकें अंशें । हें जग व्यापिलें असे ।
यालागी भेद सांडूनि सरिसें[4] । साम्यें भज ॥ ३१७ ॥ (अ० १०)

## ९ यंत्रारूढ भूतांचा चाळक ईश्वर.

पै पूर्वे वाहता पाणी । पोंहिजे[5] पश्चिमेचे वाहणीं[6] ।
तरी आग्रहचि उरे-तें आणी । आपुलिया लेखा ॥ १२८६ ॥
का साळीचा कण म्हणे । मी नुगवे साळीपणें ।
तरी आहे आन करणें । स्वभावासी ? ॥ १२८७ ॥
तैसा क्षात्रसंस्कारसिद्धा[9] । प्रकृती घडलासि प्रबुद्धा ।
आतां नुठीं म्हणसी—हा धांदा[10] । परी उठवीजसीच तू ॥१२८८॥
पै शौर्य तेज दक्षता । एवमादिक पांडुसुता ।
गुण दिधले जन्मता । प्रकृती तुज ॥ १२८९ ॥

---

१ निर्मिले. २ माप, गणती ३ घालावा. ४ सारखे ५ पोहावे. ६ दिशेस, प्रवाहाकडे ७ मार्गास. ८ वेगळे. ९ क्षत्रियाच्या संस्कारांनी बनलेला. १० लोकव्यापार, व्यवहार.

तू आपुलियाकडुनी । मीं कांहींच न करीं म्हणौनी ।
ठांसी परी भरवसेनी । तूंचि करिसी ॥ १२९४ ॥
उत्तर वैराटीचा राजा । पळता तू कां निघालासि झुंजा ? ।
हा क्षात्रस्वभाव तुझा । झुंजवील तूनें ! ॥ १२९५ ॥
हा गा रोग कायी रोगिया । आवडे ? दरिद्र दरिद्रिया ? ।
परी भोगविजे बळिया । अदृष्टें जेणें ॥ १२९७ ॥
तें अदृष्ट अनौरिसें । न करील ईश्वरवशें ।
तो ईश्वरही असे । हृदयीं तुझ्या ॥ १२९८ ॥

---

सर्व भूतान्या अतरीं । हृदय–महा अंबरीं ।
चिद्वृत्तीन्या सहस्रकरी । उदयला असे जो ॥ १२९९ ॥
असो हें तो ईश्वर । सकळभूताचा अहकार ।
पाघरोनि निरतर । उल्हासत असे ॥ १३०२ ॥
स्वमायेचें आडवस्त्र । लावूनि एकला खेळवी सूत्र ।
बाहेरी नटी छायाचित्र । चौऱ्यांसी लक्ष ॥ १३०३ ॥
तया ब्रह्मादि कीटांता । अशेषाही भूतजाता ।
देहाकार योग्यता । पाहोनि दावी ॥ १३०४ ॥
तेथ जें देह जयापुढें । अनुरूपपणें माडे ।
तें भूत तया आरूढे । हें मी म्हणोनी ॥ १३०५ ॥
सूत सुतें गुतलें । तृण तृणेंचि बांधलें ।
का आत्मबिंबा घेतलें । बाळकें जळीं ॥ १३०६ ॥
तयापरी देहाकारें । आपणपेंचि दुसरें ।

---

१ स्वस्थ उभा राहसी. २ गोग्रहण समयीं उत्तराचें सारथ्य करीत असताना तुझें क्षात्रतेज सळसळून बाहेर पडलें व तू युद्धात शत्रु जिंकून गाई सोडविल्यास. ३ वेगळें, विपरीत. ४ महदाकाशात. ५ चैतन्यवृत्तीच्या सहस्र किरणांनीं. ६ नाचवितो. ७ योग्यतेनुसार

देखोनि जीव आविष्करे । आत्मबुद्धी ॥ १३०७ ॥
ऐसेनि शरीराकारीं । यत्रीं भूतें अवधारीं ।
वाहूनि हालवी दोरी । प्राचीनाची ॥ १३०८ ॥
तेथ जया जें कर्मसूत्र । माडूनि ठेविलें स्वतंत्र ।
तें तिथे गती पात्र । होंचि लागे ॥ १३०९ ॥
भ्रामकाचेनि सगें । जैसें लोहो वेढा रिगे ।
तैसीं ईश्वरसत्तायोगें । चेष्टती भूतें ॥ १३११ ॥

———

बीजप्रकृतिवशें । अनेकें भूतें एकें ईशें ।
चेष्टविजती तो असे । तुझ्या हृदयी ॥ १३१४ ॥
अर्जुनपण न घेता । मी ऐसें जें पाडुसुता ।
उठतसे तें तत्वता । तयाचें रूप ॥ १३१५ ॥
यालागीं तो प्रकृतीतें । प्रवर्तवील हें निरुतें ।
आणि ते झुजवील तूतें । न जुझसी जरी ॥ १३१६ ॥
तू करणें न करणें दोन्ही । लावूनि प्रकृतीच्या मानीं ।
प्रकृतीही का अधीनी । हृदयस्था जया ॥ १३१८ ॥
तया अहवाचा चित्त आंग । देउनिया शरण रिघ ।
महोदधी का गार्ग । रिगालें जैसें ॥ १३१९ ॥
मग तयाचेनि प्रसादें । सर्वोपशातिप्रमदे ।
कात होऊनिया स्वानदें । स्वरूपीच रमसी ॥१३२०॥ (अ०१८)

## १० विश्वरूपदर्शनाची उत्कंठा.

आता जयाचेनि सकल्पें । हे लोकपरपरा होय हारपे ।

---

१ प्रगटतो २ पूर्वकर्माची ३ लोहचुबकाच्या. ४ फिरू लागतें. ५ त्या हृद-यस्थ ईश्वराला. ६ गगाप्रवाह. ७ सर्वांचा लय जींत आहे अशी महाशाति तिचा स्वामी होऊन.

जया ठायातें आपणपें । मी ऐसें म्हणसी ॥ ८२ ॥
तें मुदेल रूप तुझें । जेथूनि इयें द्विभुजें हन चतुर्भुजें ।
सुरकार्याचेनि व्याजें । घेवों घेवों येसी ॥ ८३ ॥
उपनिषदें जें गाती । योगिये हृदयीं रिगोनि पाहती ।
जयातें सनकादिक आहाती । पोटाळूनियां ॥ ८५ ॥
ऐसें अगाध जें तुझें । विश्वरूप कानीं ऐकिजे ।
तें देखावया चित्त माझें । उतावीळ देवा ॥ ८६ ॥ ( अ० ११ )

## ११ विश्वरूपदर्शन.

' माझें निजरूप देखिजे । ते दृष्टी देवों तुज ' ॥ १६२ ॥
मग दिव्यचक्षु प्रगटला । तया ज्ञानदृष्टी फांटा फुटला ।
ययापरी दाविता जाहला । ऐश्वर्य आपुलें ॥ १७९ ॥
हे अवतार जे सकळ । ते जियें समुद्रीचे का कल्लोळ ।
विश्व हें मृगजळ । जया रश्मीस्तव दिसे ॥ १८० ॥
जियें अनादिभूमिके निटे[6] । चराचर हें चित्र उमटे ।
आपणपें श्री वैकुंठें । दाविलें तया ॥ १८१ ॥
जैसा आब्रह्म पूर्णोदकीं । पोहे मार्कंडेय एकाकी ।
तैसा विश्वरूपकौतुकीं । पार्थ लोळे ॥ १८७ ॥
नाना सूर्यतेजप्रतापें । सचंद्र तारागण जैसें लोपे ।
तैसी गिळिली विश्वरूपें । प्रपंचरचना ॥ १९० ॥
तेव्हां मनासी मनपण न स्फुरे । बुद्धि आपणपें न सांवरे ।
इंद्रियांचे रश्मी माघारें । हृदयवरी भरले ॥ १९१ ॥
तैसा विस्मित पाहे कोडें । तंव पुढां होतें चतुर्भुजरूपडें ।
तेंचि नानारूप चहूंकडे । मांडोनि ठेलें ॥ १९३ ॥

* * *

१ स्वतः आपण, निजरूप, स्वरूप. २ मूळचें ३ निमित्तानें. ४ बिलगून. ५ किरणांमुळें. ६ नीट, स्वच्छ.

तेथ सैघ[1] देखे वदनें । जैसीं रमानायकाचीं राजभुवनें ।
नाना प्रगटलीं निधानें । लावण्यश्रियेचीं ॥ १९७ ॥
तैसी अद्‌भुतें भयासुरें । तेथ वदनें देखिलीं वीरें ।
आणिकें असाधारणें साळकारें । सौम्यें बहुतें ॥ २०१ ॥
तव नानावर्णीं कमळवनें । विकासिली तैसें अर्जुनें ।
नेत्र देखिले पालिगनें[2] । आदित्याची ॥ २०३ ॥
चरणौनी मुकुटवरी । देखत विश्वरूपाची थोरी ।
जे नानारत्नअळकारीं । मिरवत असे ॥ २१० ॥
मग तेणेंचि ज्ञानाचिया डोळां । पाहात करपल्लवा सरळां ।
तोडित कल्पातींचिया ज्वाळा । तैशी शस्त्रें झळकत देखे॥२१४॥
आपण आंग आपण अळकार । आपण हात आपण हतियार ।
आपण जीव आपण शरीर । देखें चराचर कोंदले देवें ॥ २१५ ॥
अनावर मुखें समोर देखे । तयाभेणें पाठिमोरा जव ठाके ।
तव तयाहीकडे श्रीमुखें । करचरण तैसेचि ॥ २२८ ॥
कैसें अनुग्रहाचें करणें । पार्थाचें पाहणे आणि न पाहणें ।
तयाही सगट नारायणें । व्यापूनि घेतलें ॥ २३० ॥
तो विश्वतोमुख स्वभावें । आणि तेंचि दावावया पाडवें ।
प्रार्थिला आता आघवें । होऊन ठेला ॥ २३३ ॥
तिये अगप्रभेचा देवा । नवलावा काइसया ऐसा सांगावा ।
कल्पातीं एकचि मेळावा । द्वादशादित्याचा ॥ २३७ ॥
तैसे ते दिव्य सूर्य सहस्रवरी । जरी उदयजती एके अवसरीं ।
तऱ्ही तया तेजाची थोरी । उपमू न ये ॥ २३८ ॥
विश्व आघवेंचि तयापरी । तिया देवचक्रवर्तीचिया शरीरीं ।
अर्जुन तियें अवसरीं । देखता जाहला ॥ २४४ ॥

---

१ असख्य. २ समुदाय, पक्ति.

तेथ एक विश्व एक आपण । ऐसें अळुमाळ होतें दुजेपण ।
तेंही आटूनि गेलें अंतःकरण । विराले सहसा ॥ २४५ ॥
सात्विकाही आठा भावा । परस्परें वर्ततसे हेवा ।
तेथ ब्रह्मानंदाची जीवा । राणीव फावली ॥ २५२ ॥

* * * *

" देवा ! एकचि निरंतर । देखत असे तुझे कर ।
करीत अवघेचि व्यापार । एकेचि काळीं ॥ २६७ ॥
मग महाशून्याचेनि[३] पैसारें । उघडली ब्रह्मकटाहाची भांडारें ।
तैसीं देखतसे अपारें । तुझीं उदरें ॥ २६८ ॥
इयें नानापरी अपरिमितें । जेतुलीं साठविलीं होतीं महाभूतें ।
तेतुलाही पवाँड तुवां अनंतें । कोंदला देखे ॥ २७३ ॥
तूं उभा ना बैठा । दिघँडा ना खुजटा ।
तुज तळींवरी वैकुंठा । तूंचि आहासी ॥ २७७ ॥
या तुझिया रूपाआंत । जी एक उणीव असे देखत ।
जे आदि मध्य अंत । तिन्ही नाहीं ॥ २८० ॥
एवं आदिमध्यांतरहिता । तूं विश्वेश्वरा अपरिमिता ।
देखिलासि जी तत्वता । विश्वरूपा ॥ २८२ ॥
जे आकाराचें आयतन[६] । तूं विश्वनिक्षेपैकनिधानँ ।
तें अव्यय तूं गगन । अविनाश जी ॥ ३०८ ॥
द्यौर्लोक आणि पाताळ । पृथिवी आणि अंतराळ ।
अथवा दशदिशा समाकुंळ । दिशाचक्र ॥ ३१५ ॥
महर्षी अथवा सिद्ध । विद्याधरसमूह विविध ।
हे बोलत तुज स्वस्तिवाद । करिती स्तवन ॥ ३२७॥

१ थोडेंसे. २ राज्य ३ अव्यक्ताच्या विस्तारानें ४ विस्तार ५ उंच ना ठेंगणा ६ स्थान. ७ विश्व साठवण्याची जागा ८ देवांचा लोक, स्वर्ग. ९ सगळया दिशांचें चक्र.

' देवा अविद्यार्णवीं पडिलों । जी विषयवागुरें आतुडलों ।
स्वर्गसंसाराचिया साकडलों । दोही भागीं ॥ ३२९ ॥
ऐसें आमुचें सोडवणें । तुजवांचोनि कीजेल कवणें ।
तुज शरण गा सर्वप्राणें । म्हणत देवा ' ॥ ३३० ॥
असो एकचि परी विचित्रें । आणि भयानकें वक्त्रें ।
बहुलोचन बहुशस्त्रें । अनंतभुजा ॥ ३४० ॥
अनंत उरु बाहु चरण । बहूदर आणि नानावर्ण ।
कैसे प्रतिवदनी मातलेपण । आवेशाचें ॥ ३४१ ॥
देवा ! संहारकें तुझीं मुखें । देखोनि धीर का आम्हा पारुखे ।
आता भुललों मी दिशा न देखे । आपणपें नेणें ॥ ३८० ॥
हें नव्हे मा रोकडें । सैंघ पसरोनिया तोंडें ।
कवळितासि चहूंकडे । सैन्यें इयें ॥ ३९१ ॥
वेगीं प्रसन्न होई देवराया । संहरीं संहरीं आपुली माया ।
काढीं मातें महा भया-। पासूनिया " ॥ ३८५ ॥

* * * *

अरे ! कोण्ही कोण्हातें न मारी । एथ मीचि हो सर्व संहारीं ।
हें विश्वरूपव्याजें हरी । प्रकटित असे ॥ ४०७ ॥
मी मारिता हे कौरव मरते । ऐसेंनि वेटाळिला होता मोहें बहुतें ।
तो फेडावयालागीं अनंतें । हें दाखविलें निज ! ॥ ४०८ ॥

## १२ विश्वरूपस्तुति.

तू प्रकृतिपुरुषांचिया आदि । जी महत्तत्त्वा तूंचि अवधी ।
स्वयें तू अनादी । पुरातन ॥ ५१४ ॥
तू सकळविश्वजीवन । जीवासि तूंचि निधान ।
भूतभविष्याचें ज्ञान । तुझ्याचि हातीं ॥ ५१५ ॥

---

१ विषयरूप जाळ्यांत. २ नष्ट होतो, खुटतो. ३ शेवट. ४ ठेवा

जी श्रुतीचिया लोचना । स्वरूपसुख तूंचि अभिन्ना ।
त्रिभुवनाचिया आयतनीं । आयतन तू ॥ ५१६ ॥
म्हणोनि जी परम । तूतें म्हणिजे महाधाम ।
कल्पांती[2] महद्ब्रह्म । तुजमाजी रिगे ॥ ५१७ ॥
किबहुना तुवां देवें । विश्व विस्तारिलें आहे आघवें ।
तरी अनंतरूपा वानावें । कवणे तूतें ! ॥ ५१८ ॥
जी काय एक तू नव्हसी । कवणे ठायीं नससी ।
हें असो जैसा आहासी । तैसिया नमो ॥ ५१९ ॥
वायु तू श्रीअनंता । यम तू नियामिता[3] ।
प्राणिगणीं वसता । अग्नि[4] तो तू ॥ ५२० ॥
वरुण तू सोम । स्रष्टा तू ब्रह्म ।
पितामहाचाही[5] परम । आद्यजनक तू ॥ ५२१ ॥
आणिकही जें जें कांहीं । रूप आथि अथवा नाहीं ।
तया नमो तुज तैसियाही । श्रीजगन्नाथा ॥ ५२२ ॥

* * *

पाठी[6] तियें साद्यन्तें । न्याहाळी श्रीमूर्तीतें ।
आणि पुढती म्हणे नमस्ते । नमस्ते प्रभो ॥ ५२४ ॥
[illegible] चराचरीं जीं भूतें । सर्वत्र देखे तयातें ।
आणि पुढती म्हणे नमस्ते । नमस्ते प्रभो ॥ ५२६ ॥
उभा माझिये पाठीसी । म्हणोनि पाठिमोरे म्हणावें तुम्हासी ।
सन्मुखविन्मुख[7] जगेसी । न घडे तुज ॥ ५३१ ॥
आतां वेगळालिया अवयवां । नेणे रूप करूं देवा ।
म्हणोनि नमो तुज सर्वा । सर्वात्मका ॥ ५३२ ॥

---

१ आश्रयस्थान जी मूळमाया तिला २ प्रळयकाळच्या शेवटीं ही मूळमाया तुझ्याच स्वरूपीं लीन होते. ३ शासन करणारा. ४ जठराग्नि ५ ब्रह्मदेवाचा. ६ पुन्हा. ७ समोर अथवा पाठिमोरें.

## १३ अपराधक्षमापन.

ऐसिया तूतें स्वामी । कहींच नेणोजी आम्ही ।
म्हणोनी सोयरेसंबंधधर्मी[1] । राहटलों तुजसीं ॥ ५३७ ॥
अहा थोर वाउरें[2] जाहलें । अमृतें समार्जन म्यां केलें ।
वारिकें[3] घेऊनि दिधलें । कामधेनूतें ॥ ५३८ ॥
परिसाचा खडँ[4] वाचि जोडला । की, फोडोनि आम्हीं गाँडोरां[5]
घातला । कल्पतरू तोडोनि केला । कूप शेता ॥ ५३९ ॥
हें आजीचेंचि पाहे पां रोकडें । कवण क्षुज हें केवढें ।
एथ परब्रह्म तूं उघडें । सारथी केलासी ! ॥ ५४१ ॥
यया कौरवाचिया घरा । शिष्टाई धाडिलासी दातारा ।
ऐसा वणिजे[6]साठीं जगेश्वरा । विकलासि आम्हीं ॥ ५४२ ॥
स्वजनपणाचिया वाटा । तुजपुढां बैसे उफराटा[7] ।
हा पाड काय वैकुंठा । परी चुकलों आम्ही ॥ ५४७ ॥
देवेसीं कोल्हाटी[8] धरूं । आखाडा झोंबीलोंबी करूं[9] ।
सारीं[10] खेळतां तस्करू । निकरें[11]ही भांडों ॥ ५४८ ॥
देवाचिया भोगायतनीं[12] । खेळतां आशंकेना मनीं ।
जी रिगोनिया शयनीं । सरिसां[13] पहुडे ॥ ५५२ ॥
मज एकासनीं बैसणें । की तुझा बोल न मानणें ।
हें वोतटीचेनि[14] दाटपणें । बहुत घडलें ॥ ५५४ ॥
या लागीं पुढां[15] अथवा पाठीं । जियें राहाटलों[16] बहुवें वोखटीं ।

---

१ आत्मसंबंधाच्या नात्यानें तुजशी वागला २ अनुचित, वाईट. ३ शिंगरू. ४ खडक. ५ घराच्या भिंतींच्या पायांत. ६ व्यापारासाठीं, आपल्या लाभासाठीं ७ पाठ करून. ८ दांडपट्टा ९ तालमींत कुस्ती करूं १० सोंगट्या खेळतांना देवाला तूं चोर असें धिक्कारून बोलूं ११ कडोविकडी. १२ विलासमंदिरांत. १३ शेजारीं निजत होतों. १४ अतिसंघट्टनाच्या, अतिपरिचयाच्या. १५ समक्ष किंवा पश्चात्. १६ वाईट रीतीनें वागलों.

तियें मायेचियापरी पोटीं । सामावी प्रभो ॥ ५५६ ॥
प्रीती का प्रमादें । देवेंसीं मज विरुद्धें ।
बोलविली तियें मुकुंदें । उपसाहावी जी ॥ ५५८ ॥
तरी आता अप्रमेया । मज शरणागता आपुलिया ।
क्षमा कीजो जी यया । अपराधासी ॥ ५६० ॥ ( अ० ११ )

## १४ चतुर्भुज पाहिजे !

हें विश्वरूप आपुलें । तुम्ही मज डोळां दाविलें ।
तरि माझें मन झालें । हृष्ट देवा ॥ ५८९ ॥
परि आतां ऐसी चाड जीवीं । जे तुजसी गोठी[२] करावी ।
जवळिक हे भोगावी । आलिंगावयासी ॥ ५९० ॥
तें इयेचि रूपीं करूं म्हणिजे । तरि कोणे एके मुखेसी चावळिजे ?
आणि कवणा एका खेंव देइजे । तुज लेखँ[३] नाही[१] ॥ ५९१ ॥
म्हणोनि वारियासवें धांवणें । न ठके गगना खेंव देणें ।
जळकेळी[४] खेळणें । समुद्रीं केउतें ? ॥ ५९२ ॥
पैं चराचर विनोदें पाहिजे । मग तेणें सुखें घरीं राहिजे ।
तैसें चतुर्भुज रूप तुझें । तो विसावा आह्मा ॥ ५९४ ॥
आम्ही योगजात अभ्यासावें । तेणें याचि अनुभवा यावें ।
शास्त्रातें आलोडावें । परि सिद्धांत तो हाचि ॥ ५९५ ॥
आम्ही यजनें किजती सकळें । परि तियें फळावीं येणेंचि फळें ।
तीर्थें होतु सकळें । याचिलागी ॥ ५९६ ॥
आणिकही कांही जें जें । दानपुण्य आम्ही कीजे ।
तया फळीं फळ तुझें । चतुर्भुज रूप ॥ ५९७ ॥
हे विश्वरूपाचे सोहळे । भोगूनि निवाले जी डोळे ।
आतां होताति आधले[५] । कृष्णमूर्तीलागीं ॥ ६०६ ॥

---

१ पोटात घाल २ सवाद. ३ मर्यादा, पार. ४ जलक्रीडा. ५ उतावीळ.

तें साकार कृष्णरूपडें । वाचूनि पाहों नावडे ।
तें न देखता थोडें । मानिताति हें [1] ॥ ६०७ ॥
आम्हा भोगमोक्षाचिया ठायीं । श्रीमूर्तिवाचूनि नाही ।
तैसाचि साकार होई । हें उपसहरी आता ॥ ६०८ ॥

## १५ विश्वरूपीं चित्त ठेव.

या अर्जुनाचिया बोला । विश्वरूपा विस्मयो जाहला ।
म्हणे " ऐसा नाही देखिला । [1]धसाळ कोणी ॥ ६०९ ॥
कोण हे वस्तु पावला आहासी । तया लाभाचा तोष न घेसी
भेणें काय नेणों बोलसी । हेकेंड[2] ऐसा ॥ ६१० ॥
हें अपरपार । स्वरूप माझें परात्पर ।
ऐथूनि ते अवतार । कृष्णादिक [1] ॥ ६१४ ॥
हें ज्ञानतेजाचें निखिळ[3] । विश्वात्मक केवळ ।
अनत हें अढळ । आद्य सकळा ॥ ६१५ ॥
परी नेणसीच गावढिया । काय कोपों आता धनजया ।
आग सोडोनि छाया । आलिंगितोसि पा ! ॥ ६२९ ॥
हें रूप जरी घोर । विकृत[4] आणि थोर ।
तरी कृतनिश्चयाचें घर । हेंचि करी ॥ ६३२ ॥
का अजातपक्षियाजवळा । जीव ठेऊनि अविसाळा[5][6] ।
पक्षिणी अतराळा- । माजी जाय ॥ ६३४ ॥
नाना गाय चरे डोंगरीं । परी चित्त बाधिलें वत्सें वरीं ।
तैसें प्रेम [7]यथिचें करी । स्थानपती[8] ॥ ६३५ ॥
येरें वरिचिलेनि[9] चित्तें । बाह्य सख्य सुखापुरतें ।

---

१ अविचारी. २ हेकट, एककल्ली. ३ सपूर्ण. ४ विक्राळ, अफाट. ५ पख फुटले नाहींत अशा पिल्लाजवळ. ६ घरट्यात. ७ विश्वरूपाच्या ठिकाणचें ८ वतनदार. ९ वरवर बाह्य प्रेमानें.

भोगिजो का श्रीमूर्तीतें । चतुर्भुज " ॥ ६३६ ॥

* * *

मग विश्व व्यापूनि भगवतें । जें दिव्य तेज प्रगटलें होतें ।
तेंचि सामावलें मागुते । कृष्णरूपीं तिये ॥ ६४७ ॥
ययावरी तो पाडुकुमर । जाहला आनंदसंपदा थोर ।
आणि कृष्णचरणचतुर । एक तो जगी ॥ ७०१ ॥
तेणें देवाचिया दोनही मूर्तीं । निकिया न्याहाळिलिया चित्तीं ।
तव विश्वरूपाहूनि कृष्णाकृतीं । देखिला लाभ ॥७०२॥(अ० ११)

## १६ निर्गुणोपासना मोक्षदायक पण कष्टप्रद आहे.

आणि येरे[1] तेही पांडवा । जे आरूढोनि सोहंभावा ।
झोंबती निरवयवा । अक्षरासी ॥ ४० ॥
मनाची नखी न लगे । जेथ बुद्धीची दृष्टी न रिगे ।
इंद्रिया कीर जोगें । काय होईल [?] ॥ ४१ ॥
परि ध्यानाही कुवांडें[2] । म्हणोनि एके ठायीं न सापडे ।
व्यक्तीसी मांजिवडें[3] । कवणेही नोहे ॥ ४२ ॥
जया सर्वत्र सर्वपणें । सर्वांही काळी असणे ।
जें पावूनि चिंतवणें । हिपुटी[4] जाहलें ॥ ४३ ॥
जें होय ना नोहे । जें नाहीं ना आहे ।
ऐसें म्हणोनि उपाये । उपजतीचि ना ॥ ४४ ॥
जें चळे ना ढळे । सरे ना मैळे ।
तें आपुलेनीचि बळें । आगंविलें[5] जिंहीं ॥ ४५ ॥
ऐसे जे समबुद्धी । मिळावया सोहंसिद्धी ।
आगविताति निरवधी । योगदुर्गें ॥ ५७ ॥

---

१ अव्यक्ताचे–निर्गुणाचे उपासक २ कठिण ३ मध्यें, आकारात जें सापडत नाहीं. ४ स्तब्ध झालें, थाबलें. ५ स्वाधीन केलें.

आपुलिया साटोवाटी । शून्य घेती उठाउठी ।
तेही मातेंचि किरिटी । पावती गा ॥ ५८ ॥
वाचूनि योगाचेनि बळें । अधिक काही मिळे ।
ऐसें नाही–आगळे । कष्टचि तया[1] ॥ ५९ ॥
जिंही सकळभूताचिया हितीं[2] । निरालबी अव्यक्तीं ।
पसरलिया आसक्ति । भक्तीविणे ॥ ६० ॥
तया महेंद्रादि पदें । करिताति वाटवधें[3] ।
आणि ऋद्धिसिद्धीची द्वंद्वें । पडोनि ठाती ॥ ६१ ॥
कामक्रोधाचे विलग । उठावती अनेग ।
आणि शून्येसी आग । झुजवावे की ॥ ६२ ॥
ताहानें ताहानचि पियावी । भुकेलिया भूकचि खावी ।
अहोरात्र वावी । मर्वाचा वारा ॥ ६३ ॥
शीत वेढावें । उष्ण पांघुरावें ।
वृष्टीचिया असावें । घराआत ॥ ६५ ॥
किंबहुना पाडवा । हा अग्निप्रवेश नित्य नवा ।
भ्रतारावीण करावा । तो हा योग ॥ ६६ ॥
ऐसें मृत्युहूनि तिखें । का घोटे कढत विख ।
डोंगर गिळिता मुख । न फाटे काई ? ॥ ६८ ॥
म्हणोनि योगाचिया वाटा । जे निगाले गा सुभटा ।
तया दुःखाचाचि वाटा । भागा आला ॥ ६९ ॥
पाहें पा लोहाचे चणे । जै बोचेरिया पडती खाणें ।
तै पोट भरणें कीं मरणें । शुद्धि नेणे[1] ॥ ७० ॥
म्हणोनि समुद्र बाहीं । तरणें आथी केंही[10] ? ।

1 मोबदल्यात २ भूताचें मूर्तिमत कल्याण ( हित ), निराश्रय व निर्गुण अशा ब्रह्मीं ३ वाटमारेपणा ४ आडवीं येतात ५ उपद्रव ६ मोजावा. ७ तिखट. ८ विष ९ बाथऱ्याला, दांत पडलेल्याला. १० कोठें तरी ?

का गगनामाजी पायी । खोलिजेत असे ? ॥ ७३ ॥
ऐसाही जरी धिवसा । बांधोनिया आकाशा ।
झोंबती तरी क्लेशा । पात्र होती ॥ ७४ ॥
म्हणोनि येर ते पार्था । नेणतीचि हे व्यथा ।
जे का भक्तिपथा । वोठगले[२] ॥ ७५ ॥ ( अ० १२ )

## १७ प्रेमळ सगुणभक्त हेच खरे योगी.

वर्षाकाळीं सरिता । जैसी चढों लागे पाडुसुता ।
तैसी नीच[३] नवी भजता । श्रद्धा दिसे ॥ ३६ ॥
ठाकलेयाही[४] सागर । जैसा मागीलही यावा[५] अनिवार ।
तिये गंगेचियेऐसा पडिभरु[६] । प्रेमभावा ॥ ३७ ॥
तैसे सर्वेद्रियासहित । मजमाजी सूनि[७] चित्त ।
जे रात्रिदिवस न म्हणत । उपासिती ॥ ३८ ॥
इयापरी जे भक्त । आपणपें मज देत ।
तेचि मी योगयुक्त । परम मानी ॥ ३९ ॥ ( अ० १२ )

## १८ सगुण निर्गुण दोनी एक.

१

तरी व्यक्त[८] आणि अव्यक्त । हे तूंचि एक निभ्रांत ।
भक्ती[९] पाविजे व्यक्त । अव्यक्त योगें ॥ २३ ॥
या दोनी जी वाटा । तूतें पावावया वैकुंठा[१०] ।
व्यक्ताव्यक्त दारवटा । रिगिजे येथ ॥ २४ ॥
पै वांनी[११] श्यातुका[१२] । तोचि वेगळिये वाला एका ।
म्हणोनी एकदेशीया व्यापका । सरिसा पाडु[१३] ॥ २५ ॥

---

१ पुढे चालवतें काय ? २ आश्रय केला. ३ नित्य. ४ मिळाली असताही. ५ प्रवाह. ६ भर ७ घालून, ठेवून. ८ साकार व निराकार. ९ भक्तीनें. १० श्रीकृष्णा. ११ कस. १२ शभर भाराला. १३ सारखी योग्यता.

अमृताचिया सागरीं । जे लाभे सामर्थ्याची थोरी ।
तेचि दे अमृतलहरी । चुळी घेतालिया ॥ २६ ॥ ( अ० १२ )

२

म्हणूनि आखरामाजी सापडे[1] । कीं कानावरी जोडे ।
हें तैसें नव्हे फुडें । त्रिशुद्धी गा ॥ ३१६ ॥
शब्दजात मोघौतें सरे । जेथ सकल्पाचें आयुष्य पुरे ।
वाराही जेथ न सरे । विचाराचा ॥ ३१७ ॥
जे उन्मनियेचे लावण्य । जें तुर्येचें तारुण्य ।
अनादि जें अगण्य । परमतत्व ॥ ३२० ॥
जें विश्वाचें मूळ । जें योगद्रुमाचें फळ ।
जे आनदाचें केवळ । चैतन्य गा ॥ ३२१ ॥
जें आकाराचा प्रात । जो मोक्षाचा एकात ।
जेथ आदि आणि अत । विरोनि गेलें ॥ ३२२ ॥
जें महाभूताचें बीज । जे महातेजाचें तेज ।
एव पार्था जें निज-। स्वरूप माझें ॥ ३२३ ॥
ते हे चतुर्भुज कोंभेली[4] । जयाची शोभा रूपासि आली ।
देखोनि नास्तिकीं नांकिलीं[5] । भक्तवृंदें[1] ॥ ३२४ ॥ ( अ० ६ )

३

यया ब्रह्मत्वासीचि पार्था । सायुज्य ऐसी व्यवस्था ।
याचि नाव चौथा । पुरुषार्थ गा ॥ ४०२ ॥
परी माझें आराधन । ब्रह्मत्वीं होय सोपान ।
तेथ मी हन साधन । गमेन हो[1] ॥ ४०३ ॥
तरी झणीं ऐसें । तुझ्या चित्तीं पैसे[8] ।

---

१ अक्षरात. २ मागें ३ निर्गुण निराकार ४ आकाराला आली. ५ गाजली. ६ ब्रह्मस्थितीलाच मोक्ष म्हणतात. ७ दादर. ८ शिरू देऊ नकोस.

परी ब्रह्म आन नसे । मीवांचूनी ॥ ४०४ ॥
पै मडळ आणि चद्रमा । दोनी नव्हतो सुवर्मा[1] ।
तैसा मज आणि ब्रह्मा । भेद नाही ॥ ४०६ ॥ ( अ० १४ )

४

या जगदीश्वराचें प्रेम । येथ दिसतसे निरुपम ।
कैसें पार्थे येणें सर्वोत्तम । पुण्य केलें ॥ ११ ॥
हो का जयाचिया प्रीती । अमूर्त हा आला व्यक्ती ।
मज एकंवंकी[2] याची स्थिती । आवडत[3] असे ॥ १२ ॥
येऱ्हवी हा योगिया नाढळे । वेदार्थासि नाकळे ।
जेथ ध्यानाचेही डोळे । पावतीना ॥ १४ ॥
तो हा निजस्वरूप । अनादि निष्कप ।
परी कवणें मानें सकृप । जाहला आहे ॥ १४ ॥
हा त्रैलोक्यपटाची घडी । आकाराची पैलथडी[4] ।
कैसा याचिये आवडी । आवरला असे[5] ॥ १५ ॥ ( अ० ४ )

५

पै मूर्तीचेनि मेळें । तो मूर्तीचि होऊनि खेळे ।
परी अमूर्तपण न मैळे[6] । दादुलियाँचें[7] ॥ ८१ ॥ ( अ० ५ )

## १९ अवताराचे प्रयोजन.

अमूर्तीचि मी किरीटी । परी प्रकृति जै अधिष्ठी[8] ।
तै साकारपणे नटनेटी[9] । कार्यालागी ॥ ४८ ॥
जे धर्मजात आघवें । युगायुगी म्यां रक्षावें ।
ऐसा ओघ हा स्वभावें । आद्य असे ॥ ४९ ॥

१ मर्मज्ञ २ एकरूपतेची ३ वाटतें ४ पैलतीर ५ स्वाधीन झाला. ६ कमी होत नाहीं, जात नाहीं ७ स्वामीचें ८ आश्रय करितों, मायायुक्त होतों. ९ नटासारखा नटतो.

म्हणोनि अजत्व परतें ठेवी । मी अव्यक्तपणही नाठवी ।
जे वेळीं धर्मातें अभिभवी[1] । अधर्म हा ॥ ५० ॥
ते वेळीं आपुल्यांचेनि कैवारें[2] । मी साकार होऊनि अवतरें ।
मग अज्ञानाचें आधारें । गिळोनि घाली ॥ ५१ ॥
अधर्माची अवधी तोडीं । दोषांचीं लिहिलीं फाडीं[3] ।
सज्जनाकरवीं गुढी[4] । सुखाची उभवी ॥ ५२ ॥
दैत्याचीं कुळें नाशीं । साधूंचा मान गिंवशीं ।
धर्माशी नीतीशीं । शेंस[5] भरीं ॥ ५३ ॥
स्वसुखें विश्व कोंदे । धर्माचि जगीं नांदे ।
भक्तां निघती दोंदें । सात्विकाची[6] ॥ ५५ ॥
तै पापाचा अचळ[7] फिटे । पुण्याची पहाट फुटे ।
जै मूर्ति माझी प्रगटे । पाडुकुमरा ॥ ५६ ॥
ऐसेया काजालागीं । अवतरें मी युगायुगीं ।
परी हेंचि वोळखे जो जगीं । तो विवेकिया ॥ ५७ ॥
माझें अजत्वें जन्मणें । अक्रियताचि कर्म करणें ।
हें अविकार जो जाणे । तोचि परममुक्त ॥ ५८ ॥ ( अ० ४ )

---

येऱ्हवीं तरी पाहीं । जे जैसे माझ्या ठायीं ।
भजती तया मीही । तैसाचि भजें ॥ ६६ ॥
कडेयातळवटीं[8] । जैसा आपलाचि बोल किरीटी ।
पडिसाद[9] होऊनि उठी । निमित्तयोगें ॥ ७५ ॥
तैसा समस्ता या भजना । मी साक्षीभूत पैं अर्जुना ।
येथ प्रतिफळे भावना । आपुलाली ॥ ७६ ॥ ( अ० ४ )

---

१ व्यापतो, पराभूत करितो २ भक्ताचे. ३ पातकाच्या सनदा, लेख. ४ ध्वज, पताका. ५ मळवट भरतो, लग्न लावतो. ६ सत्वगुणानी पूर्ण होतात. ७ पर्वत. ८ डोंगराच्या कड्याखालीं. ९ प्रतिध्वनि.

## २० " नामघोषगौरवें धवळले विश्व "

तरी कीर्तनाचेनि नटनाचें[1] । नाशिले व्यवसाय प्रायश्चित्ताचे ।
जे नामचि नाहीं पापाचें । ऐसें केलें ॥ १९७ ॥
यमदमा अवकळा आणिली । तीर्थें ठायावरूनि उठविलीं ।
यमलोकीची खुटली । राहाटी आघवी ॥ १९८ ॥
यम म्हणे काय यमावें । दम म्हणे कवणातें दमावें ।
तीर्थें म्हणती काय खावें । दोष औषधासि नाहीं ॥ १९९ ॥
ऐसें माझेनि नामघोषें । नाहीचि करिती विश्वाची दुःखें ।
अवघें जगाचि महासुखें । दुमदुमित भरलें ॥ २०० ॥
ते पाहाटेवीण पाहावित । अमृतेंवीण जीववित ।
योगेंवीण दावित । कैवल्य डोळा ॥ २०१ ॥
परि राया रंका पाड धरू । नेणती सानेयाथोरा[2] कडसणी करू ।
एकसरें आनंदाचें आवारू । होत जगा ॥ २०२ ॥
कहीं[3] एकाधेनि वैकुंठा जावें । तें तिहीं वैकुंठचि केलें आघवें ।
ऐसें नामघोषगौरवें । धवँळलें[4] विश्व ॥ २०३ ॥
तेजें सूर्य तैसे सोज्ज्वळ । परी तोही अस्तवे हें किडाळ[5] ।
चंद्र संपूर्ण एकादे वेळ । हे सदा पुरते ॥ २०४ ॥
मेघ उदार परी वोसरे । म्हणऊनि उपमेसी न पुरे ।
हे निःशंकपणें सपाँखरे[6] । पंचानन ॥ २०५ ॥
जयाचे वाचेपुढां भोजें[7] । अखंड नाम नाचत असे माझें ।
जें जन्मसहस्री वोळंगिजे[8] । एक वेळ यावया ॥ २०६ ॥
तो मी वैकुंठी नसे । वेळ एक भानुबिंबींही न दिसे ।

---

१ नाचण्याउडण्यानें. २ लहानथोर हा विचार त्याच्या मनात येत नाहीं. ३ एखादे वेळीं. ४ पावन केलें. ५ कमीपणा. ६ सदय असून सिंहासारखे, दयाळु. ७ आवडीनें. ८ सेवा करावी.

वरी योगियाचीही मानसें । उमरेडोनि[1] जाय ॥ २०७ ॥
परी तयापासी पाडवा । मी हारपला गिंवसावा ।
जेथ नामघोष बरवा । करिती माझा ॥ २०८ ॥
कैसे माझ्या गुणी धाले । देशकाळातें विसरले ।
कीर्तनसुखें सुखावले । आपणपाचि ॥ २०९ ॥
कृष्ण विष्णु हरि गोविंद । या नामाचे निखिल प्रबंधे[2] ।
माजी आत्मचर्चा विशद । उदंड गाती ॥ २१० ॥ (अ० ९)

## २१ नमनभक्ति.

आदी[3] ब्रह्मा करूनी । शेवटी मशक धरूनी ।
माजी समस्त हें जाणूनी । स्वरूप माझें ॥ २२१ ॥
मग वाडधाकुटें[4] न म्हणती । सजीवनिर्जीव नेणती ।
देखिलिये वस्तु उजू लुटिती[5] । मीच म्हणोनी ॥ २२२ ॥
आपलें उत्तमत्व नाठवे । पुढील योग्यायोग्य नेणवे ।
एकसरें व्यक्तिमात्राचेनि नावें । नमूंचि आवडे ॥ २२३ ॥
उंचीहूनि उदक पडलें । तें तळवटवरी येऊं लागलें ।
तैसें नमिजे भूतजात देखिलें । हा स्वभावचि तयाचा ॥ २२४ ॥
का फळतया तरूची शाखा । सहजें भूमीसि उतरे देखा ।
तैसें जीवमात्रा अशेखा । खालावती जे ॥ २२५ ॥
अखंड अगर्वता होऊनि असती । तयाची विनय हेचि संपत्ती ।
जे जयजयमंत्रें अर्पिती । माझ्या ठायीं ॥ २२६ ॥
नमिता मानापमान गळाले । म्हणोनि अवचिता मीचि जाहले ।
ऐसे निरंतर मिसळले । उपासिती ॥ २२७ ॥ ( अ० ९ )

---

१ उल्लंघन करून जाणें. २ कवनें. ३ ब्रह्मदेवापासून तों चिलटापर्यंत. ४ वडीलधाकटे. ५ लोटांगण घालतात, लोळतात.

## २२ देवाला सर्वस्व हवें, उपचार नकोत.

मग मीचि डोळा देखिला । जिहीं कानीं मीचि ऐकिला ।
मीचि मनीं भाविला । वानिला वाचा ॥ ३५९ ॥
सर्वांगी सर्वांठायी । मीचि नमस्कारिला जिहीं ॥
दानपुण्यादिकें जें कांही । तें माझियाचि मोहेरा ॥ ३६० ॥
जे अहंकार वाहत अंगी । आम्ही हरीचे भूपावयालागीं ।
जे लोभिये एकचि जगीं । माझेंनि लोभे ॥ ३६२ ॥
जे माझेनि कामें सकाम । जे माझेनि प्रेमें सप्रेम ।
जे माझिया भुली सभ्रम । नेणती लोक ॥ ३६३ ॥
जयांचीं जाणती मजचि शास्त्रें । मी जोडे जयाचेनि मंत्रें ।
ऐसें जे चेष्टामात्रें । भजले मज ॥ ३६४ ॥
ते मरणाचऐलीकडे । मज मिळोनि गेले फुडे ।
मग मरणीं आणिकीकडे । जातील केवीं ? ॥ ३६५ ॥
म्हणोनि मद्याजी जे जाहले । ते माझिया सायुज्या आले ।
जिहीं उपचारमिषें दिधलें । आपणपें मज ॥ ३६६ ॥
अर्जुना माझे ठायीं । आपणपेंवीण सौरसु नाही ।
मी उपचारें कवणाही । नाकळे गा ॥ ३६७ ॥ ( अ० ९ )

## २३ भक्ताची लक्षणें.

तो सर्वभूताच्या ठायीं । द्वेषातें नेणेचि कहीं ।
आपपर जया नाहीं । चैतन्या जेंवि ॥ १४४ ॥
उत्तमातें धरिजे । अधमातें अव्हेरिजे ।
हें काहीचि नेणिजे । वसुधा जेवीं ॥ १४५ ॥
का रायाचे देह चाळूं । रंका परौतें गाळूं ।

---

१ प्रीत्यर्थ, समोर. २ खचित ३ सर्वस्व, निजरूप. ४ गोडी, प्रेम. ५ कधीं ६ पलीकडे, दूर.

हें न म्हणेचि कृपाळू । प्राण पै गा ॥ १४६ ॥
गाईची तृषा हरू । व्याघ्रा विष होऊनि मारू ।
ऐसें नेणेचि गा करू । तोय जैसें ॥ १४७ ॥
आणि मी हे भाष नेणे । माझें कांहींच न म्हणे ।
सुखदु ख जाणणें । नाहीं जया ॥ १४९ ॥
तेवीचि क्षमेलागी । पृथ्वीसी पवाड[1] अगीं ।
सतोषा उत्सगीं[2] । दिधलें घर ॥ १५० ॥
वार्षियेवीण[3] सागर । जळें जैसा निर्भर ।
तैसा निरुपचार[4] । सतोषी जो ॥ १५१ ॥
जीव परमात्मा दोनी । बैसले एकासनी ।
जयाचिया हृदयभुवनी । विराजती ॥ ३५३ ॥
ऐसा योगसमृद्धि । होऊनि जो निरवधि ।
अर्पी मनोबुद्धि । माझिया ठायीं ॥ १५४ ॥
तरी सिंधूचेनि माजे[5] । जळचरा भय नुपजे ।
आणि जळचरीं नुबजे[6] । समुद्र जैसा ॥ १६५ ॥
तेवी उन्मत्तें जगें । जयासि खती[7] न लगे ।
आणि जयाचेनि आगें । न शिणे लोक ॥ १६६ ॥
किंबहुना पाडवा । शरीर जैसा अवयवा ।
तैसा नुबगे जीवा । जीवपणें[8] जो ॥ १६७ ॥
जगचि देह जाहलें । म्हणोनि प्रियाप्रिय गेलें ।
हर्षामर्ष ठेले[9] । दुजेवीण ॥ १६८ ॥
ऐसा द्वंद्वनिर्मुक्त[10] । भयोद्वेगरहित ।

---

१ साम्यता. २ मांडीवर ३ वर्षाकाळ नसता. ४ सहज. ५ क्षोभानें. ६ कटाळत नाहीं ७ खेद, वीट. ८ सर्व जीवाशीं आपलेपणा जाणून. ९ आनंदशोक गेले. १० सुखदु:खादि द्वंद्वरहित.

याहीवरी भक्त । माझ्या ठायीं ॥ १६९ ॥
आतबाहेरी चोखाळ । सूर्य तैसा निर्मळ ।
आणि तत्वार्थीचा पायाळ । देखणा तो ॥ १७०. ॥
व्यापक आणि उदास । जैसें का आकाश ।
तैसें जयाचें मानस । सर्वत्र गा ॥ १८० ॥
ससारव्यथे फिटला । जो नैराश्यें विनटला ।
व्याधाहातोनि सुटला । विहंगम जैसा ॥ १८१ ॥
जो आत्मलाभासारिखें । गोमटें काहीच न देखे ।
म्हणोनि भोगविशेखें । हरिखेना जो ॥ १९० ॥
पै आपुलें जें साचें । तें कल्पांतीही न वचे ।
हें जाणोनि गताचें । न शोची जो ॥ १९२ ॥
वोखटें का गोमटें । हें काहीचि तया नुमटें ।
रात्रिदिवस न घटे । सूर्यासि जेवीं ॥ १९३ ॥
पार्था जयाचिया ठायीं । वैषम्याची वार्ता नाहीं ।
रिपुमित्रा दोही । सरिसा पाडू ॥ १९४ ॥
कां घरिचिया उजियेड करावा । पारखियां आंधार पाडावा ।
हें नेणेचि गा पाडवा । दीप जैसा ॥ १९५ ॥
जो खाडावया घाव घाली । कां लावणी जयानें केली ।
दोघां एकचि साउली । वृक्ष दे जैसा ॥ १९९ ॥
नातरी इक्षुदंडु । पाळितया गोडु ।
गाळितया कडु । नोहेचि जेवीं ॥ २०० ॥
अरिमित्री तैसा । अर्जुना जया भाव ऐसा ।
मानापमानीं सरिसा । होत जाय ॥ २०१ ॥

---

१ निर्मळ, शुद्ध. २ तत्वदर्शनरूप धन पाहणारा पायाळू ३ आशारहित५ा. शोभला. ४ हर्षत नाहीं. ५ वाईट कां चांगलें. ६ तोडण्यासाठीं. ७ सारखा, सम.

दक्षिणउत्तर मारुता । मेरु जैसा पाडुसुता ।
तैसा सुखदु खप्राप्ता । मध्यस्थ जो ॥ २०३ ॥
माधुर्ये चंद्रिका । सरिसी राया रंका ।
तैसा जो सकळिका । भूता सम ॥ २०४ ॥
आघविया जगा येक । सेव्य जैसें उदक ।
तैसें जयातें तिन्ही लोक । कांक्षिती गा ॥ २०५ ॥
जो निंदेतें नेघे । स्तुती न श्लाघे ।
आकाशा न लगे । लेप जैसा ॥ २०७ ॥
जो यथालाभें सतोखे । अलाभे न पारुखे ।
पाउसेंवीण न सुके । समुद्र जैसा ॥ २१० ॥
आघवाचि आकाशस्थिती । जेवीं वायूसि नित्यवस्ती ।
तेवीं जगाचि विश्राति–। स्थान जया ॥ २१२ ॥

## २४ देवाचें भक्तप्रेम.

हें विश्वचि माझें घर । ऐसी मती जयाची स्थिर ।
किंबहुना चराचर । आपण जाहला ॥ २१३ ॥
मग यावरीही पार्था । माझ्या भजनी आस्था ।
तरी तयातें मी माथा । मुकुट करी ॥ २१४ ॥
जे पुरुषार्थसिद्धी चौथी । घेऊनि आपुलिया हाती ।
रिगाला भक्तिपथीं । जगा देत ॥ २१९ ॥
म्हणोनि गा नमस्कारू । तयातें आम्ही माथा मुकुट करूं ।
तयाची टांच धरू । हृदयीं आम्ही ॥ २२१ ॥
तयाचिया गुणाची लेणी । लेववू आपुलिये वाणी ।
तयाची कीर्ति श्रवणीं । आम्हीं लेवू ॥ २२२ ॥
तो पाहवा हे डोहळे । म्हणोनि अचक्षूसि मज डोळे ।


१ पारुषणें=रागावणें. २ मोक्ष ( धर्मार्थकाममोक्षातला चौथा पुरुषार्थ ).

हातीचेनि लीलाकमळें । पूजू तयातें ॥ २२३ ॥
दोंवरी दोनी । भुजा आलों घेऊनी ।
आलिंगावयालागुनी । तयाचें अग ॥ २२४ ॥
तया सगाचेनि सुर्रवाडें । मज विदेहा देह धरणें घडे ।
किंबहुना आवडे । निरुपम ॥ २२५ ॥
तेणेसीं आम्हां मैत्र । येथ कायसें विचित्र ।
परी तयाचें चरित्र । ऐकती जे ॥ २२६ ॥
तेही प्राणापरौते । आवडती हें निरुतें ।
जे भक्तचरित्रातें । प्रशसिती ॥ २२७ ॥
ते हे गोष्टी रम्य । अमृतधारा धर्म्य ।
करिती प्रतीतिगम्य । आइकोनि जे ॥ २२८ ॥
पार्था ! गा जगीं । तेचि भक्त तेचि योगी ।
उत्कठा तयालागीं । अखड मज ॥ २३४ ॥
पै प्रेमळाची वार्ता । जे अनुवादती पाडुसुता ।
ते मानू परम देवता । आपुली आम्ही ॥ २३८ ॥ ( अ० १२ )

## २५ भक्तांच्या मेळ्यांतलें संवादसुख.

चित्तें मीचि जाहले । मियेंचि प्राणें धाले[२] ।
मग जीवों मरों विसरले । बोधाचिया भुली ! ॥ ११९ ॥
मग बोधाचेनि माजे । नाचती संवादसुखाचीं भोजे[३] ।
आता एकमेका घेपे दीजे[४] । बोधचि वरी ॥ १२० ॥
जैसीं जवळिकेचीं सरोवरें । उचबळलिया कालवती[५] परस्परें ।
मग तरगासीं धवळारें[६] । तरगचि होती ॥ १२१ ॥
तैसी येरयेराचिये मिळणी । पडत आनदकल्लोळाची वेणी ।

१ त्याचें सगसुखासाठीं. २ सतोष पावले. ३ आनदोल्हास. ४ प्रेमसुखाची देवघेव करितात ५ एकमेकात मिसळतात. ६ घरें, पाढरें चुनेगच्ची घर ह्म० धवळार.

तेथें बोधाची लेणी । बोधचि मिरवी ॥ १२२ ॥
जैसें सूर्ये सूर्याते वोवाळिलें । कीं चद्रें चंद्रम्या क्षेम दीधलें ।
नातरी सरिसेनि पांडे मिनले । दोनी वोघ ॥ १२३ ॥
जैसी कमळकळिका जालेपणें । हृदयीचिया मकरदा राखों नेणे ।
दे राया रंका पारणें । आमोदाचें ॥ १२७ ॥
तैसेंचि मातें विश्वी कथित । कथिलेनि तोषें कथू विसरत ।
मग तया विसरामाजी विरैत । आगें जीवें ॥ १२८ ॥
ऐसें प्रेमाचेनि बहुवसँपणें । नाहीं राती दिवो जाणणें ।
केलें माझें सुख अव्यगवोणें । आपणपेया जिहीं ॥१२९॥ (अ०१०)

## २६ हे समस्तही श्रीवासुदेव.

गुरुकृपा उखा उजळली । ज्ञानाची वोतँपली पडली ।
तेथ साम्याची ऋद्धि उवडली । तयाचिये दिठीं ॥ १३१ ॥
ते वेळीं जयाकडे वास पाहे । तेउता मीचि तया एक आहे ।
अथवा निवांत जरी राहे । तऱ्ही मीचि तया ॥ १३२ ॥
हें असो आणिक काही । तया सर्वत्र मीवाचूनि नाहीं ।
जैसें सबाह्य जळ डोहीं । बुडलिया घटा ॥ १३३ ॥
तैसा तो मजभीतरी । मी तया आतबाहेरी ।
हें सागिजेल बोलेंवरी । तैसें नव्हे ॥ १३४ ॥
हें समस्तही श्रीवासुदेव । ऐसा प्रतीतिरसाचा वोतला भाव ।
म्हणोनि भक्तामाजी राव । आणि ज्ञानिया तोचि ॥ १३६ ॥
जयाचिये प्रतीतीऱ्या वेंखारा । पैंवाड होय चराचरां ।
तो महात्मा धनुर्धरा । दुर्लभ आँर्था ॥ १३७ ॥ ( अ० ७ )

---

१ बरोबरीच्या ऐश्वर्यानें २ विकसित झाल्यावर. ३ नाहींसे होत, रमत. ४ पुष्कळपणें. ५ पूर्ण. ६ उषा, प्रभात. ७ तिरिप, कोंवळें ऊन. ८ ऐश्वर्य. ९ तेथें. १० शब्दानीं. ११ वखारींत १२ प्रवेश १३ आहे.

## २७ ज्ञानभक्ति म्हणजेच अद्वैतभक्ति.

### १

जैसी भोजनाच्या व्यापारीं । क्षुधा जिरत जाय अवधारीं ।
मग तृप्तीच्या अवसरीं[1] । नाहींच होय ॥ ११०२ ॥
नाना चालीचिया वाढी । वाट होत जाय थोडी ।
मग पातलेठायीं[2] बुडी । देऊनि निमे[3] ॥ ११०३ ॥
का जागृती जव उद्दीपे । तव तव निद्रा हारपे ।
मग जागिनलिया स्वरूपे । नाहींच होय ॥ ११०४ ॥
हें ना आपलें पूर्णत्व भेटे । तेथ चद्रासी वाढी खुटे ।
तेथ शुक्लपक्ष आटे । निःशेष जैसा ॥ ११०५ ॥
तैसा बोध्यजात[4] गिळित । बोध बोधें मज ये आत ।
मिसळला तेथ साद्यत । अबोध गेला ॥ ११०६ ॥
कल्पांताचिये वेळे । नदी सिंधूचें पेंडवळें[5] ।
मोडूनि भरिलें जळें । आब्रह्म जैसें ॥ ११०७ ॥
नातरी लेणियांचे[6] ठसे । आटोनि गेलिया मुसे[7] ।
नामरूपभेदें जैसें । सांडिजे सोनें ॥ ११०९ ॥
तैसा मी एकवाचूनि काही । तया तयाहीसकट नाहीं ।
हे चौथी भक्ति पाही । माझी तो लाहे ॥ ११११ ॥
येर आर्त जिज्ञासु अर्थार्थी । हे भजती जिये पथीं ।
ते तिन्ही पावोनि चौथी । म्हणिपत आहे ॥ १११२ ॥
येऱ्हवी तिजी ना चौथी । हे पहिली ना सरती ।
पै माझिये सहजस्थिती[8] । भक्ति नाम ॥ १११३ ॥
इया ज्ञानभक्ती सहज । भक्त एकवटला मज ।

---

१ वेळीं. २ मुक्कामाच्या जागी पोंचल्यावर ३ नाहींशी होते. ४ जाणण्याचे विषय. ५ मर्यादा, बाध. ६ अलंकाराचे. ७ मुशींत ८ सहजावस्था, ब्रह्मस्थिति.

तो मीचि केवळ हें तुज । श्रुतही आहे ॥ ११३० ॥
ज्ञानी इये स्वसंविति । शैव म्हणती शक्ति ।
आम्ही परमभक्ति । आपली म्हणों ॥ ११३३ ॥
तेथ विवेक वैराग्येसी । आटे बंध मोक्षेसी ।
वृत्ति तये अवृत्तीसी । बुडोनि जाय ॥ ११३५ ॥
जया मी होणें नाही । तया मीचि आहे कंहीं ।
मग भजेल हें कायी । बोलों कीर ? ॥ १४६ ॥
तरंग सर्वांगीं तोय चुंबी । प्रभा सर्वत्र विलसे बिंबीं ।
नाना अवकाश नभीं । लुठत जैसा ॥ ११४८ ॥
तैसा रूप होउनि माझें । मातें क्रियावीण जो भजे ।
घनाकार का सहजें । सोनयातें जेविं ॥ ११४९ ॥
का चंदनाची द्रुती जैसी । चंदनीं भजे अपैसी ।
का अकृत्रिम शशी । चंद्रिका ते ॥ ११५० ॥
तैसी क्रिया कीर न साहे । तऱ्ही अद्वैतीं भक्ति आहे ।
हें अनुभवाचिजोगें, नव्हे । बोलाऐसें ॥ ११५१ ॥ (अ० १८)

२

तरी मीचि एक सर्वां । या जगा जन्म पाडवा ।
आणि मजचिपासूनि आघवा । निर्वाह यांचा ॥ ११२ ॥
कल्लोळमाळा अनेगा । जन्म जळीचि पैं गा ।
आणि तया जळचि आश्रय तरंगा । जीवनही जळ ॥ ११३ ॥
ऐसें अघवाचि ठायीं । तया जळचि जेवीं पाही ।
तैसा मीवाचूनि नाही । विश्वीं इये ॥ ११४ ॥

---

१ 'ज्ञानी त्वात्मैव मे मतम्' (अ० ७-१८) २ आत्मज्ञानकला. ३ ह्या ज्ञानभक्तीमध्यें. ४ लय पावतो ५ निवृत्तीसगट. ६ कोठें. ७ सोन्याची लगड. ८ स्थिति. ९ लाटांना.

ऐसिया व्यापका मातें । मानूनि जे भजती भलतेथें ।
परि साचोकारें[1] उदितें । प्रेमभावें ॥ ११५ ॥
देशकाळवर्तमान । आघवें मजसी करूनि अभिन्न ।
जैसा वायू होऊनि गगन । गगनीच विचरे ॥ ११६ ॥
ऐसेनि जे निजज्ञानीं । खेळत सुखें त्रिभुवनीं ।
जगद्रूपा मनी । सांठवूनि मातें ॥ ११७ ॥
जें जें भेटे भूत । तें तें मानिजे भगवत ।
हा भक्तियोग निश्चित । जाण माझा ॥ ११८ ॥ ( अ० १० )

## २८ ज्ञानी भक्त.

र[2]वि आधार प्रकाशिता । नुरेचि जेवि प्रकाश्यता ।
तेवि दृश्यीं नाही द्रष्टृता । मी जालिया ॥ ११६२ ॥
मग देखिजे ना न देखिजे । ऐसी जे दशा निपजे ।
तें तें दर्शन माझें । साचोकारें ॥ ११६३ ॥
सर्व मी जालेपणें । ठेलें[3] तया येणेंजाणें ।
तेंचि गा यात्रा करणें । अद्वया मज ॥ ११६८ ॥
पै जळावरील तरग । जरी धाविन्नला सवेग ।
तरी नाही भूमिभाग । आक्रमिला तेणें ॥ ११६९ ॥
जें सांडावें का मांडावें । जें चालणें जेणें चालावें ।
तें तोयचि येक आघवें । म्हणोनिया ॥ ११७० ॥
तेथ कर्म आणि कर्ता । हे जाऊनि पाडुसुता ।
मिया [4]आत्मेनि मज पाहता । मीचि होय ॥ ११७४ ॥
क्रियाजात मी जालेपणें । घडे काहीचि न करणें ।

---

१ खऱ्या उत्कट प्रेमभावानें. २ रवि अधाराला प्रकाशू लागला तर प्रकाश्य ( अधार ) तर उरत नाहींच, पण रवीचें प्रकाशकत्वही उरत नाहीं. ३ खुटलें. ४ आत्मत्वानें.

तयाचि नांव पूजणें । खुणेचें माझें ।। ११७८ ।।
एथ तो बोले तें स्तवन । तो देखे तें दर्शन ।
अद्वया मज गमन । तो चाले तेंचि ।। ११८० ।।
तो करी तेतुली पूजा । तो कल्पी तो जप माझा ।
तो निजे तेंचि कपिध्वजा । समाधि माझी ।। ११८१ ।।
जैसा कनकेसी काकणें । असिजे अनन्यपणें ।
तो भक्तियोगें येणें । मजसी तैसा ।। ११८२ ।।
उदकीं कल्लोळ । कापुरी परिमळ ।
रत्नी उजाळ । अनन्य जैसा ।। ११८३ ।।
किबहुना ततूसी पट । का मृत्तिकेसी घट ।
तैसा तो येकवट । मजसी माझा ।। ११८४ ।।
तिन्ही अवस्थाचेनि द्वारें । उपाध्युंपहिताकारें[1] ।
भावाभावरूप स्फुरे । दृश्य जें हें ।। ११८६ ।।
तें हें आवघेंचि मी द्रष्टा । ऐसिया बोधाचा माजिवटा[2] ।
अनुभवाचा सुभटा । घेंडा[3] तो नाचे ।। ११८७ ।।
रज्जु जालिया गोचर । आभासता तो व्याळाकार[4] ।
रज्जुच ऐसा निर्धार । होय जेविं ।। ११८८ ।।
तैसें जें कांहीं आथि नाथी । तेणें होय ज्ञेयस्फूर्ती ।
तें ज्ञाताचि मी हे प्रतीती । होऊनि भोगी ।। ११९२ ।।
जाणे अज मी अजर । अक्षय मी अक्षर ।
अपूर्व मी अपार । आनद मी ।। ११९३ ।।
अचळ मी अच्युत । अनंत मी अद्वैत ।
आद्य मी अव्यक्त । व्यक्तही मी ।। ११९४ ।।

---

१ उपाधि ( क्षेत्र ) व उपहित ( क्षेत्रज्ञ ) या उभयरूपानीं. २ भर, उन्माद. ३ वधूवरास खाद्यावर घेऊन नाचणारा मनुष्य. ४ सर्पाकार.

ईश्य[1] मी ईश्वर[2] । अनादि मी अमर ।
अभय मी आधार । आधेय मी ॥ ११९५ ॥
स्वामी मी सदोदित । सहज मी सतत ।
सर्व मी सर्वगत । सर्वातीत मी ॥ ११९६ ॥
ऐसें आत्मत्वें मज एकातें । इया अद्वयभक्ती जाणोनि निरुतें ।
आणि याही बोधा जाणतें । तेंही मीचि जाणे ॥ १२०० ॥
मग द्वैताद्वैतातीत । मीचि आत्मा एक निभ्रांत ।
हें जाणोनि जाणणें जेथ । अनुभवी रिघे ॥ १२०५ ॥
मी तो हें जें असे । तें स्वानदानुभवसमरसें ।
कालवूनिया प्रवेशे । मजचि माजी ॥ १२०९ ॥
आणि तो हे भाष जेथ जाये । तेथ मी हे कोण्हासी आहे ? ।
ऐसा मी ना तो तिये सामाये । माझ्याचि रूपीं ॥ (अ० १८)

## २९ अनन्यांचा योगक्षेम.

पै सर्वभावेंसीं उखिंतें । जे वोपिलें[4] मज चित्तें ।
जैसा गर्भगोळ उद्यमातें । कोण्याही नेणे ॥ ३३५ ॥
तैसा मीवाचूनि काहीं । आणीक गोमटेंचि नाहीं ।
मजचि[5] नाम पाही । जिणेया ठेविलें ॥ ३३६ ॥
ऐसें अनन्यगतिकें[6] चित्तें । चिंतितसाते[7] मातें ।
जे उपासिती तयातें । मीचि सेवी ॥ ३३७ ॥
ते एकवटूनि जिये क्षणीं । अनुसरले गा माझिये वाहणी[8] ।
तेव्हांचि तयाची चिंतवणी[9] । मजचि पडली ॥ ३३८ ॥
मग तिहीं जें जें करावें । तें मजचि पडिलें आघवें ।

---

१ नियम्य. २ नियामक. ३ उक्तें, सर्वच्या सर्व. ४ मनोभावे मला अर्पण झाले. ५ आपल्या जीवाचें नाव मीच ठेवलें. ६ एकातभक्तीनें ७ माझें चिंतन करीत असता. ८ मार्गाला. ९ चिंता.

जैसी अजातपक्षाचेनि जीवें । पक्षिणी जिये ॥ ३३९ ॥
आपुली तहानभूक नेणे । तान्हया निकें ते माउलीसचि करणें ।
तैसें अनुसरले मज प्राणें । तयाचें सर्व मी करी ॥ ३४० ॥
तया माझिया सायुज्याची चाड । तरी तेंचि पुरवीं कोडें ।
का सेवा म्हणती तरी आड । प्रेम सुयें ॥ ३४१ ॥
ऐसा मनी जो जो धरिती भावो । पुढा पुढा लागे तया देवों ।
आणि दिधलियाचा निर्वाहो[4] । तोही मीचि करीं ॥ ३४२ ॥
हा योगक्षेम आघवा । तयाचा मजचि पडिला पाडवा ।
जयाचिया सर्वभावा । आश्रय मी ॥ ३४३ ॥ ( अ० ९ )

## ३० अनन्यभक्ताच्या उद्धाराची सर्व काळजी देवाला.

ते कर्मेंद्रिये सुखें । करिती कर्मे अशेखें ।
जियें का वर्णविशेखें । भागा आली ॥ ७६ ॥
विधीतें पाळित । निषेधातें गाळित ।
मज देऊनि जाळित । कर्मफळें ॥ ७७ ॥
ययापरी पाही । अर्जुना माझे ठायी ।
सन्यसूनि नाहीं । करिती कर्मे ॥ ७८ ॥
आणीकही जे जे सर्व । कायिक वाचिक मानसिक भाव ।
तया मीवाचूनि धाव । आनौती[7] नाही ॥ ७९ ॥
ऐसे जे मत्पर । उपासिती निरंतर ।
ध्यानमिषें घर । माझें झाले ॥ ८० ॥
जयांचिये आवडी । केली मजसी कुळवाडी ।
भोगमोक्ष बापुडीं । त्यजिली कुळें ॥ ८१ ॥

---

१ पख न फुटलेल्या पिलासाठीं. २ आवड ३ घालतो. ४ रक्षण. ५ वर्णविशेषानें वाट्याला आलेलीं कर्मे करितात ६ मला देऊन नाहींशीं करितात ७ अन्य, दुसरी. ८ व्यापार.

ऐसे अनन्ययोगें । विकले जीवें मनें आंगें ।
तयांचें कायि एक सांगें । जें सर्व मी करीं ॥ ८२ ॥
येऱ्हवीं तरी माझिया भक्तां । आणि संसाराची चिंता [१] ।
काय समर्थाची कांता । कोरान्न मागें [२] ॥ ८५ ॥
जन्ममृत्यूंचिया लाटीं । झळंबतीं[१] इया सृष्टी ।
तें देखोनिया पोटीं । ऐसें जाहालें ॥ ८७ ॥
भवसिंधूचेनि माजें । कवणासी धाक नुपजे [२] ।
तेथ जरी की माझे । बिहिती[२] हन ॥ ८८ ॥
म्हणोनि गा पांडवा । मूर्तीचा मेळावा ।
करूनि त्यांचिया गांवा । धांवत आलों ॥ ८९ ॥
नामाचेया सहस्त्रवरी । नावा इया अवधारी ।
सजूनियां संसारीं । तारूं[३] जाहलों ॥ ९० ॥
सैंडे[४] जे देखिले । ते ध्यानकांसे लाविले ।
परिग्रही[५] घातले । तरियांवरी[६] ॥ ९१ ॥
प्रेमाची पेटी । बांधली एकाचिया पोटीं ।
मग आणले तटीं । सायुज्याचिया ॥ ९२ ॥
परि भक्ताचेनि नांवें । चतुष्पदादि[७] आघवे ।
वैकुंठीचिये राणिवे । योग्य केले ॥ ९३ ॥
म्हणोनि गा भक्तां । नाहीं एकही चिंता ।
तयातें समुद्धर्ता । आथि मी सदा ॥ ९४ ॥ ( अ० १२ )

## ३१ संपूर्ण प्रसाद.

याकारणें गा तुवां इया । सर्वकर्मा आपुलिया ।
माझ्या स्वरूपीं धनंजया । संन्यास कीजे ॥ १२६० ॥

---

१ बुडतीं. २ कदाचित् भितील. ३ तारक. ४ एकटे. ५ गृहस्थ, खटलेवाले. ६ नौकेवर. ७ गजेंद्रादि पशुही.

परी तोचि संन्यास वीरा । करणीयाचा[1] झणें करा ।
आत्मविवेकीं धरा । चित्तवृत्ति हे ॥ १२६१ ॥
मग तेणें विवेकबळें । आपणपें कर्मावेगळें ।
माझ्या स्वरूपी निर्मळें । देखिजेल सर्व ॥ १२६२ ॥
बुद्धि अनन्य येणें योगें । मजमाजी जै रिघे ।
तै चित्त चैत्यत्यागें[2] । मातेंचि भजे ॥ १२६७ ॥
मग अभिन्ना इया सेवा । चित्त मियांचि भरेल जेव्हा ।
माझा प्रसाद जाण तेव्हा । सपूर्ण जाहला ॥ १२६९ ॥ (अ०१८)

## ३२ ईश्वरशरणता–शेवटचा गोड घांस !

तरी अवधान पघळ[3] । करूनिया आणीक एकवेळ ।
वाक्य माझें निर्मळ । अवधारी पा ॥ १३४१ ॥
आता द्वैताची वाँरी[4] । सारूनि ऐक्याच्या परिवेंरीं[5] ।
भोगिजे तें अवधारी । रहस्य हें ॥ १३४५ ॥
आणि निरुपचारा[6] प्रेमा । विषय होय जें प्रियोत्तमा ।
तें दुजें नव्हे की आत्मा । ऐसेंचि जाणावें । १३४६ ॥
म्हणोनि जिव्हारींचें[7] गुज । सांगतसे जीवासी तुज ।
जें अनन्यगतींचें मज । आथी व्यसन[8] ॥ १३४९ ॥
तरी बाह्य आणि अतरा । आपुलिया सर्व व्यापारा ।
मज व्यापकातें वीरा ! । विषय करी ॥ १३५३ ॥
किंबहुना आपुलें मन । करी माझें एकायतन[9] ।
माझेनि श्रवणें कान । भरूनि घाली ॥ १३५५ ॥

---

१ करणीय, नित्य नैमित्तिककर्माचा मात्र त्याग करू नका. २ चित्तातल्या विषयाचा त्याग. ३ विस्तृत, विशाळ. ४ वेरझार. ५ घरात. ६ निर्निमित्त प्रेमाचा विषय आत्मारामच होय. ७ जिव्हाळ्याची गुजगोष्ट. ८ आवड, वेड. ९ एकट्याचें निवासस्थान.

आत्मज्ञानें चोखडीं[1] । संत जे माझी रूपडी ।
तेथ दृष्टि पडो आवडी । कामिनी जैसी ॥ १३५६ ॥
मी सर्ववस्तीचें वसौटें[2] । माझी नामें जियें चोखटें ।
तियें जीवा यावया वाटे । वाचेचिया लावीं[3] ॥ १३५७ ॥
हाताचें करणें । का पायाचें चालणें ।
तें होय मजकारणें । तैसें करीं ॥ १३५८ ॥
हें एकैक शिकवूं काई । पै सेवकै[4] आपुल्या ठायीं ।
उरवूनि येर सर्वही । मी सेव्यचि करीं ॥ १३६० ॥
मग भरलेया जगाआत । जाऊनि तिजयाची मात ।
होऊनि ठाकेल एकात । तुम्हाआम्हा ॥ १३६२ ॥
आणि तिजें आडळें[5] करितें । निमालें अर्जुना जेथें ।
तै मीचि म्हणौनि तूं मातें । पावसी शेखी ॥ १३६४ ॥
म्हणौनि तूं आणि आम्ही । हें दिसताहे देहधर्मी ।
मग ययाच्या[6] विरामीं । मीचि होसी ॥ १३६७ ॥
अर्जुना तुझेनि वेधें[7] । मिया देवपणाची बिरुदें ।
साडिलीं गा मी हे आंधें । सगळेनि तुवा ॥ १३७२ ॥
सर्वत्र मातें भजता । सर्व मी होता अहता ।
नि·शेष जाऊनि तत्वता । मीचि होसी ॥ १३७१ ॥

* * * *

आधी तव पाडुसुता । सर्व कर्मे मज अर्पितां ।
सर्वत्र प्रसन्नता । लाहिजे माझी ॥ १३८३ ॥
पाठीं माझ्या इये प्रसादीं । माझें ज्ञान जाय सिद्धी ।

---

१ शुद्ध. २ वसतिस्थान. ३ अतरात उतरण्यासाठीं वाचेच्या मार्गाला लाव. ४ सेवकपण. ५ प्रतिबध. ६ देहाचा निरास झाल्यावर. ७ प्रेमानें, ध्यासानें. ८ अर्धा.

तेणें मिसाळिजे त्रिशुद्धी । स्वरूपीं माझ्या ॥ १३८४ ॥
मियां ज्ञान तुज आपुलें । नानापरी उपदेशिलें ।
येणें अज्ञानजात साडी वियालें । धर्माधर्म जें² ॥ १३८९ ॥
आशा जैसी दुःखांतें । व्याली निंदा दुरितें ।
हें असो जैसें दैन्यातें । दुर्भगैत्व ॥ १३९० ॥
तैसें स्वर्गनरकसूचक । अज्ञान व्यालें धर्मादिक ।
तें सांडूनि घाली अशेख । ज्ञानें येणें ॥ १३९१ ॥
हातीं घेऊनि तो दोर । साडिजे जैसा सैर्पाकार ।
कां निद्रात्यागें घराचारें । स्वप्नीचा जैसा ॥ १३९२ ॥
तैसें धर्माधर्मांचें टवाळ । दावी अज्ञान जें का मूळ ।
तें त्यजूनि त्यजी सकळ । धर्मजात ॥ १३८५ ॥
मग अज्ञान निमालिया । मीचि एक असे अपैसँया ।
सनिद्र स्वप्न गेलिया । आपणपें जैसें ॥ १३९६ ॥
तैसा मी एकवांचूनि काही । मग भिन्नाभिन्न आन नाही ।
सोहबोधें तयाच्या ठायीं । अनन्य होय ॥ १३९७ ॥
पै आपुलेनि भेदेवीण । माझें जाणणें जें एकपण ।
तयाचि नांव शरण । मज येणें गा ॥ १३९८ ॥
सुवर्णमणि सोनया । ये कल्लोळ जैसा पाणिया ।
तैसा मज धनजया । शरण ये तू ॥ १४०० ॥
मजही शरण रिगिजे । आणि । जीवत्वेंचि असिजे ।
धिक् बोली यिया न लजे । प्रज्ञा केवि ॥ १४०२ ॥
अगा प्राकृताही रायीं । आंगीं पडे जें धनजया ।

---

१ निश्चयेंकरून. २ धर्माधर्मांचें मूळ कारण जें अज्ञान तें टाकून दे. ३ दुर्भाग्य. ४ दोरीवर भासणारी सर्पाची कल्पना. ५ स्वप्नांतला प्रपच. ६ बड. ७ आपला आपण. ८ तोच मी या बोधानें. ९ बुद्धि. १० सामान्य राजालाही

तें दोंसिरूही कीं तया । समान होय ॥ १४०३ ॥
मा मी विश्वेश्वर भेटे । आणि जीवग्रथि न सुटे ।
हे बोल नको वोखटे । कानीं लावूं ॥ १४०४ ॥
म्हणौनि मी होऊनि मातें । सेवणें आहे आयितें ।
तैसें करीं हाता ये तें । ज्ञानें येणें ॥ १४०५ ॥
मग ताकौनियां[2] काढिलें । लोणीं माघौतें घातलें ।
परी न घेपेचि[3] कांहीं केलें । तेणें जेविं ॥ १४०६ ॥
तैसें अद्वयत्वें मज । शरण रिघालिया तुज ।
धर्माधर्म हे सहज । लागतील ना ॥ १४०७ ॥

* * *

ऐसें सर्वरूपरूपसें[4] । सर्वदृष्टिडोळसें ।
सर्वदेशनिवासें । बोलिलें श्रीकृष्णें ॥ १४१७ ॥
मग सांवळा[5] सककण । बाहु पसरोनि दक्षिण ।
आलिंगिला स्वशरण । भक्तराज तो ॥ १४१८ ॥
बोलाबुद्धीसीं अटक[6] । ऐसें जें कांहीएक ।
तें द्यावया मिखं[7] । खेंवांचें[8] केलें ॥ १४२० ॥
हृदया हृदय येक जाहलें । ये हृदयींचें तें हृदयीं घातलें ।
द्वैत न मोडितां केलें । आपणाऐसें अर्जुना ॥ १४२१ ॥
दीपें दीप लाविला । तैसा परिष्वग तो जाला ।
द्वैत न मोडिता केला । आपणपें पार्थ ॥ १४२२ ॥
तेव्हा सुखाचा मग तया । पूर आला जो धनंजया ।
तेथ वाड तरी बुडोनियां । ठेला देव ॥ १४२३ ॥
तैसें तया दोघांचें मिळणें । दोघां नावरे जाणावें कवणें ? ।
किंबहुना श्रीनारायणें । विश्व कोंदलें ॥ १४२५॥ (अ० १८)

---

१ बटीक सुद्धा २ ताकातून. ३ मिसळून जात नाहीं. ४ सर्व रूपाचें रूप. ५श्यामसुदर. ६ वाचेला व बुद्धीला जेथें प्रतिबंध होतो. ७ मिष. ८आलिंगनाचें

# ५ ज्ञानेश्वरीचा उपसंहार.

## १ उपकृतिस्मरण.

कैसा विश्वाचिया कृपा । करूनि महानंद सोपा ।
अर्जुनव्याजें रूपा । आणिला देवें ॥ १६८७ ॥
चकोराचेनि निमित्तें । तिन्हीं भुवनें सततें ।
निववली कळावंतें । चद्रें जेवी ॥ १६८८ ॥
तैसें गीतेचें हें दुभतें । वत्स करूनि पार्थातें ।
दुभिन्नली जगापुरतें । श्रीकृष्ण गाय ॥ १६९० ॥
हे श्रवणें पाठें अर्थें । गीता नेदी मोक्षाआरौतें ।
जैसा समर्थ दाता । कोण्हातें नास्ति न म्हणे ॥ १६९५ ॥
शब्दें जें न लभे । तें घडूनियां अनुष्टुभें ।
स्त्रीशूद्रादिप्रतिभे । सामाविलें ॥ १७०० ॥
द्रष्टा श्रीगुरुमूर्ती । न रिगतां दृश्यैंपथी ।
तरी कोंह्या उपास्ती । आकळता तो ? ॥ १७०४ ॥
व्यासाचा हा थोर । विश्वासि जाला उपकार ।
जे श्रीकृष्णउक्ती आकार । ग्रथाचा केला ॥ १७०८ ॥
आणि तोचि हा मी आता । श्रीव्यासाचीं पदें पाहता पाहतां ।
आणिला श्रवणपथा । मऱ्हाठिया ॥ १७०९ ॥
व्यासादिकांचे उन्मेखँ । राहटती जेथ साशक ।
तेथ मीही एक रक । वाचाळी करी ॥ १७१० ॥
परी गीता-ईश्वर भोळा । ले व्यासोक्तिसुमनमाळा ।
तरी माझिया दूर्वादळा । ना न म्हणे कीं ! ॥ १७११ ॥

---

१ जगाच्या कळवळ्याने. २ मोक्षाच्या अलीकडे. ३ सगुण साकार झाला नसता तर तो उपासनेनें कसा आकळता ? ४ कसा. ५ ज्ञानस्फूर्ति.

आणि बाप पुढां जाये । ते घेत पाउलांची सोये ।
बाळ ये तरी न लाहे । पावों कायी ? ॥ १७२२ ॥
तैसा व्यासाचा मागोवा घेत । भाष्यकारातें वाट पुसत ।
अयोग्यही मी न पवत । कें जाईन ? ॥ १७२३ ॥

## २ हा ग्रंथ गुरुकृपेचें वैभव.

तो सर्वोपकारी समर्थ । सद्गुरु श्रीनिवृत्तिनाथ ।
राहटत असे मजही आत । रिघोनिया ॥ १७२९ ॥
आतां आयती गीता जगी । मी सांगे मऱ्हाठिया भंगीं[4] ।
येथ कें विस्मयालागीं । ठाव आहे ? ॥ १७३० ॥
श्रीगुरूचेनि नावें माती । डोंगरी जयापासी होती ।
तेणें कोळियें त्रिजगती । येकवेद केली ॥ १७३१ ॥
मा मी तव चित्ताथिला । आणि श्रीगुरुऐसा दादुला ।
जो दिठीवेनि[7] आपुला । बैसवी पदीं ॥ १७३३ ॥
म्हणोनि माझे नित्य नवे । श्वासोच्छ्वासही प्रबंध होआवे ।
श्रीगुरुकृपा काय नोहे । ज्ञानदेव म्हणे ॥ १७३५ ॥
तेणें आबाळसुबोधें । वोवीचेनि प्रबंधें ।
ब्रह्मरससुस्वादें अक्षरें । गुफिली ॥ १७४३ ॥
अध्यात्मशास्त्री इयें । अंतरंगचि अधिकारिये ।
परी लोक वाक्चातुर्यें । होईल सुखिया ॥ १७५० ॥
ऐसें श्रीनिवृत्तिनाथाचें । गौरव आहे जी साचें ।
ग्रंथ नोहे–कृपेचें वैभव तिये ॥ १७५१ ॥

---

१ पावलाचें अनुसधानें राहून २ माग काढीत. ३ शकराचार्य. ४ भाषेनें. ५ गोळा केली. ६ स्वामी. ७ कटाक्षमात्रें करून. ८ कवनें. ९ अतर्मुख तेवढेंच.

## ३ गुरुपरंपरा.

क्षीरसिंधुपरिसरीं[1] । शक्तीच्या[2] कर्णकुहरीं ।
नेणों कें श्रीत्रिपुरारी । सांगितलें जें ॥ १७५२ ॥
तें क्षीरकल्लोळाआंतु । मकरोदरीं[3] गुप्तु ।
होता जयाचा हातु । पैठें जालें[4] ॥ १७५३ ॥
तो मत्स्येंद्र सप्तशृंगीं । भग्नावयवा[5] चौरंगी ।
भेटला कीं तो सर्वांगीं । संपूर्ण जाला ॥ १७५४ ॥
मग समाधि अव्यत्यया[6] । भोगावी वासना या ।
ते मुद्रा[7] श्रीगोरक्षराया । दिधली मीनीं ॥ १७५५ ॥
तेणें योगाब्जिनीसरोवर । विषयविध्वंसैकवीर ।
तिये पदीं का सर्वेश्वर । अभिषेकिले ॥ १७५६ ॥
मग तिहीं तें शांभव[8] । अद्वैयानंदवैभव[9] ।
संपादिलें सप्रभव[10] । श्रीगैनीनाथा ॥ १७५७ ॥
तेणें कळिकळितें भूतां[11] । आला देखोनि निरुता ।
ते आज्ञा श्रीनिवृत्तिनाथा । दिधली ऐसी ॥ १७५८ ॥
' ना आदिगुरु शंकरा- । लागोनि शिष्यपरंपरा ।
बोधाचा हा संसारीं[12] । जाला जो आमुतें ॥ १७५९ ॥
तो हा तूं घेऊनि आघवा । कळीं गिळितया जीवा ।
सर्व प्रकारीं धांवा । करीं पां वेगीं ' ॥ १७६० ॥
आधींच तव तो कृपाळू । वरी गुरुआज्ञेचा जाला बोळू[13] ।
जाला जैसा वर्षाकाळू । खवळणें मेघा ॥ १७६१ ॥

---

१ क्षीरसमुद्राच्या आसमंतात. २ शक्तीच्या ह्म० पार्वतीच्या कानात. ३ मत्स्याच्या पोटात. ४ हातात सापडलें. ५ हातपाय तुटलेल्या चौरंगीनाथाला. ६ अखंड. ७ रहस्य, वर्म. ८ शंकरापासून परंपरेनें प्राप्त झालेलें. ९ अद्वयानंदाचें ऐश्वर्य. १० सामर्थ्यासह. ११ कलीनें ग्रासलेल्या भूतांना. १२ विस्तार. १३ चातक.

तेथ पुढा मी बापिया । मांडला आर्ती आपुलिया ।
कीं यासाठीं येवढिया । आणिलों यशा ॥ १७६३ ॥

## ४ ग्रंथरचनेचें समाधान.

वांचूनि पढे ना वाची । ना सेवाही जाणे स्वामीची ।
ऐसिया मज ग्रथाची । योग्यता कें असे ॥ १७६५ ॥
परी साचचि गुरुनाथें । निमित्त करूनि मातें ।
प्रबधव्याजें जगातें । रक्षिलें जाणा ॥ १७६६ ॥
आणि तुम्हा सताचिये सभे । जें उणिवेसी ठाके उभें ।
तें पूर्ण नोहे तै लोभें । तुम्हांसीच कोपों[3] ॥ १७७१ ॥
वोहळें हेंचि करावें । जे गंगेचें आंग ठाकावें ।
मगही गगा जरी नोहावें । तै ते काय करी ? ॥ १७७३ ॥
काय बहु बोलों सकळा । भेळविलों जन्मफळा ।
ग्रथसिद्धीचा सोहळा । दाविला जो हा ॥ १७८५ ॥
मजलागी ग्रंथाची स्वामी । दुजी सृष्टि केली जे हे तुम्ही ।
तें पाहोनि हासों आम्ही । विश्वामित्रातेंही ! ॥ १७८७ ॥
किंबहुना तुमचें केलें । धर्मकीर्तन हें सिद्धी नेलें ।
येथ माझें जी उरलें । पाइकपण ॥ १७९३ ॥

## ५ स्थलकालनिर्देश.

ऐसें युगीं परि कळीं । आणि महाराष्ट्रमंडळीं ।
श्रीगोदावरीच्या कूळीं । दक्षिणिली ॥ १८०३ ॥

---

१ ह्या ग्रथाच्या निमित्तानें. २ उणीव राहिली तर. ३ आम्हीच प्रेमानें तुम्हां सतांवर रागावू. ४ जाऊन मिळावें ५ ग्रथसमाप्तीचा आनद. ६ ब्रह्मदेवाच्या स्पर्धेनें त्रिशकूराजासाठीं केलेली सृष्टी नाशवत होती, आमची ही ग्रथसृष्टि अविनाशी आहे म्हणून विश्वामित्राला आम्ही हसू. ७ सेवकपण. ८ कलियुगात. ९ दक्षिण तीरावर.

त्रिभुवनैकपवित्र । अनादि पचक्रोशीक्षेत्र ।
जेथ जगाचें जीवनसूत्र । श्रीमहालया असे ॥ १८०४ ॥
तेथ यदुवशविलास । जो सकळकळानिवास ।
न्यायातें पोषी क्षितीश । श्रीरामचंद्र ॥ १८०५ ॥
तेथ महेशान्वयसभूतें । श्रीनिवृत्तिनाथसुतें ।
केलें ज्ञानदेवें गीते । देशीकारलेणें ॥ १८०६ ॥
पुढतपुढती पुढती । इया ग्रथपुण्यसपत्ती ।
सर्वसुखीं सर्वभूतीं । संपूर्ण होइजे ॥ १८१० ॥
शके बाराशतें बारोत्तरें । तै टीका केली ज्ञानेश्वरें ।
सच्चिदानदबाबा आदरें । लेखकू जाहला ॥ १८११ ॥ (अ० १८)

---

## ६ ज्ञानेश्वरीसंशोधक एकनाथमहाराजांच्या ओव्या.

श्रीशके पधराशें साहोत्तरीं । तारणनाम संवत्सरीं ।
एकाजनार्दनें अत्यादरीं । गीताज्ञानेश्वरीप्रति शुद्ध केली ॥ १ ॥
ग्रथ पूर्वीच अतिशुद्ध । परी पाठांतरी शुद्ध अबद्ध ।
तो शोधूनिया एवविध । प्रतिशुद्ध सिद्ध ज्ञानेश्वरी ॥ २ ॥
नमो ज्ञानेश्वरा निष्कलंका । जयाची गीतेची वाचिता टीका ।
ज्ञान होय लोका । अतिभाविका ग्रथार्थिया ॥ ३ ॥
बहुकाळ पर्वणी गोमटी । भाद्रपदमास कपिलाषष्ठी ।
प्रतिष्ठानीं गोदातटीं । लेखनकामाटी संपूर्ण जाली ॥ ४ ॥
ज्ञानेश्वरीपाठीं । जो वोंवी करील मऱ्हाठी ।
तेणें अमृताचे ताटीं । जाण नरोटी ठेविली ॥ ५ ॥

---

१ पचक्रोशींत. २ नगर जिल्ह्यात नेवासें गावीं महालया ( श्रीमोहिनीराज ) नादते. ३ रामदेवराव जाधव. ४ आदिनाथ शकर यांच्या परपरेंत ( अन्वय ) उत्पन्न झालेला. ५ श्रीनिवृत्तिनाथाचा सुत ( शिष्य ) यानें. ६ गीतेवर मऱ्हाठी भाषेचा अलकार चढवला. ७ ज्ञानेश्वरीच्या पाठात.

## पसायदान उर्फ प्रसाददान.

आतां विश्वात्मकें देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें ।
तोषोनि मज द्यावें । पसायदान हें ॥ १७९४ ॥
जे खळांची व्यंकटी सांडो । तयां सत्कर्मी रती वाढो ।
भूतां परस्परें घडो । मैत्र जीवाचें ॥ १७९५ ॥
दुरिताचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो ।
जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ॥ १७९६ ॥
वर्षत सकळमंगळीं । ईश्वरनिष्ठांची मांदियाळी ।
अनवरत भूतळीं । भेटो तयां भूतां ॥ १७९७ ॥
चला कल्पतरूंचें आरव । चेतना चिंतामणींचे गांव ।
बोलते जे अर्णव । पीयूषाचे ॥ १७९८ ॥
चंद्रमे जे अलांछन । मार्तंड जे तापहीन ।
ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे होतु ॥ १७९९ ॥
किंबहुना सर्वसुखीं । पूर्ण होऊनि तिहीं लोकीं ।
भजिजो आदिपुरुखीं । अखंडित ॥ १८०० ॥
आणि ग्रंथोपजीविये । विशेषीं लोकीं इयें ।
दृष्टादृष्टविजयें । होआवें जी ॥ १८०१ ॥
येथ ह्मणे श्रीविश्वेशरावो । हा होईल दानपसावो ।
येणें वरें ज्ञानदेवो । सुखिया जाहला ॥ १८०२ ॥ (अ० १८)



१ प्रसादाचें दान. २ वाकडेपण. ३ स्वधर्मसूर्यानें प्रकाशो. ४ समुदाय, माद्याळ, मायदळ हे शद्ब गांवकरीलोकांत प्रचलित आहेत. ५ बगीचे. ६ अमृताचे सागर. ७ श्रीनिवृत्तिनाथ.

## ६ स्फुट विषयसंग्रह.



### १ वीरवृत्ति पार्थाला सोडून निघाली !

तेथ मनीं गजबज जाहली । आणि आपैसी कृपा उपजली ।
तेणें अपमानें निघाली । वीरवृत्ति ॥ १८५ ॥
जिया उत्तम कुळीचिया होती । आणि गुणलावण्य आथी ।
तिया आणिकीतें न साहती । सुतेजपणें ॥ १८६ ॥
नविये आवडीचेनि भरें । कामुक निजवनिता विसरे ।
मग पाडेंवीण अनुसरें । भ्रमला जैसा ॥ १८७ ॥
तैसें अर्जुना तेथ जाहलें । असतें पुरुषत्व गेले ।
जें अंतःकरण दिधलें । कारुण्यासी ॥ १८९ ॥ ( अ० १ )

### २ स्नेहाचें काठिण्य.

जेणें संग्रामीं हर जिंतिला । निवातकवचाचा ठाँव फेडिला ।
तो अर्जुन मोहें कळविला । क्षणामाजी ॥ २०० ॥
जें वज्रापासोनि अतिकठिण । दुर्धर अतिदारुण ।
तयाहून असाधारण । हें स्नेह नवल ॥ १९९ ॥
जैसे भ्रमर भेदी कोडें । भलतैसें काष्ठ कोरडें ।
परि कळिकेमाजीं सांपडे । कोंवळिये ॥ २०१ ॥
तेथ उत्तीर्ण होईल प्राणें । परी तें कमळदळ चिरू नेणे ।
तैसें कठिण कोवळेपणें । स्नेह देखा ॥ २०२ ॥ ( अ०१ )

### ३ धर्मसंमूढता.

तिमिरावरुद्ध जैसें । दृष्टीचें तेज भ्रशे ।

---

१ योग्यता विसरून. २ मागमूसही ठेवला नाहीं, पुसून टाकला. ३ वज्रापेक्षा. ४ लीलेनें. ५ अधारानें वेढलेले.

मग पासींच असतां न दिसे । वस्तुजात ॥ ५६ ॥
देवा तैसें मज जाहलें । जे मन हें भ्राती ग्रासिलें ।
आता काय हित आपुलें । तेंही नेणे ॥ ६७ ॥ ( अ० २ )

### ४ सद्बुद्धि किंवा व्यवसायात्मिका बुद्धि.

अर्जुना ! ते पुण्यवशें । जरी अल्पचि हृदयी बुद्धि प्रकाशे ।
तरी अशेषही नाशे । ससारभय ॥ २३७ ॥
जैसी दीपकळिका[२] धाकुटी । परी बहुतेजातें प्रगटी ।
तैसी सद्बुद्धि हे थेकुटी[३] । म्हणों नये ॥ २३८ ॥
पार्था ! बहुतीपरी । हे अपेक्षिजे विचारशूरी ।
जे दुर्लभ चराचरीं । सद्वासना ॥ २३९ ॥
आणिकांसारिखा बहुवस[४] । जैसा न जोडे परिस ।
का अमृताचा लेश । दैवगुणें ॥ २४० ॥
तैसी दुर्लभ सद्बुद्धि । जिये परमात्माचि अवधी[५] ।
जैसा गगोसि उदधी । निरतर ॥ २४१ ॥
तैसें ईश्वरावाचूनि काहीं । जिये आणिक लाणी[६] नाहीं ।
ते एकचि बुद्धि पाही । अर्जुना जगी ॥ २४२ ॥ ( अ० २ )

### ५ ज्ञान, विज्ञान व अज्ञान.

जाणीव जेथ न रिगे । विचार मागुतापाउली निघे ।
तर्क आयँणी[७] नेघे । आंगीं जयान्या ॥ ५ ॥
अर्जुना तया नाव ज्ञान । येर प्रपच हें विज्ञान ।
तेथ सत्यबुद्धि तें अज्ञान । हेंही जाण ॥ ६ ॥ ( अ० ७ )

### ६ कर्म, विकर्म व अकर्म.

तरी कर्म म्हणिजे स्वभावें । जेणें विश्वाकार संभवे ।

---

१ जवळ. २ दीपज्योति. ३ अल्प. ४ इतर पाषाणासारखा विपुल. ५सीमा. ६ पर्यवसान, शेवट. ७ बळ, ईर्षा.

तें सम्यक् आधीं जाणावें । लागे येथ ॥ ८९. ॥
मग वर्णाश्रमासी उचित । जें विशेष कर्म विहित[1] ।
तेंही वोळखावें निश्चित । उपयोगेसीं ॥ ९० ॥
पाठीं जें निषिद्ध म्हणिपे । तेंहीं बुझावें स्वरूपें । (अ० ४)

## ७ आत्मसुखभोगानें विषय अपाप सुटतात.

जया आपणपें साडूनि कहीं । इंद्रियग्रामावरी येणें नाहीं ।
तो विषय न सेवी हें काई । विचित्र येथ ? ॥ १०५ ॥
सहजें स्वसुखाचेनि अपारें । सुरवाडलेनि अतरें ।
रचिला म्हणऊनि बाहिरें । पाऊल न घाली ॥ १०६ ॥
सांगें कुमुददळाचेनि[2] ताटें । जो जेविला चंद्रकिरणें चोखटें ।
तो चकोर कायि वाळुवटें । चुंबित असे ? ॥ १०७ ॥
तैसें आत्मसुख उपाइलें[3] । जयासी आपणपेंचि फावलें ।
तया विषय सहज सांडवले । म्हणों काई ? ॥१०८॥ (अ०५)

## ८ संत.

जे ऐसे स्वसुखें मातले । आपणपाचि आपण राहिले ।
ते मी जाणे निखिळ[4] वोतले । सामरस्याचे ॥ १३७ ॥
ते आनंदाचे अनुकार[5] । सुखाचे अंकुर ।
कीं महाबोधें विहार[6] । केले जैसे ॥ १३८ ॥
ते विवेकाचे गाव । कीं परब्रह्मीचे स्वभाव ।
नातरी अळंकारले अवयव । ब्रह्मविद्येचे ॥ १३९ ॥
ते सत्वाचे सात्विक । कीं चैतन्याचे आंगिक[7] ।
हें बहु असो एकैक । वानिसी काई ? ॥ १४० ॥

---

१ विकर्म म्ह० विहितकर्म व अकर्म म्ह० निषिद्धकर्म. २ चंद्रविकासी कमळाच्या. ३ मिळालें. ४ संपूर्ण ब्रह्मसुखाचेंच घडले. ५ पुतळे. ६ क्रीडास्थान. ७ अवयव.

म्हणोनि असो हें आघवें । एथ न बोलणें काय बोलावें ।
ते खुणाचि पावेल स्वभावें । आत्माराम ॥ १३६ ॥ ( अ० ५ )

## ९ शुकनालिकेचा दृष्टांत.

तव हासोनि कृष्ण म्हणे । तुझें नवल ना हें बोलणें ।
कवणासि काय दिजेल कवणें । अद्वैती एथ [1] ॥ ६७ ॥
हा विचारूनि अहकार सांडिजे । मग असतीच वस्तु होइजे ।
तरी आपली स्वस्ति सहजें । आपण केली ॥ ७१ ॥
येऱ्हवीं कोशकीटकाचियेपरी । तो आपणया आपण वैरी ।
जो आत्मबुद्धि शरीरी । चारुस्थळी ॥ ७२ ॥
कैसे प्राप्तीचिये वेळे । निदैवा आधळेपणाचे डोहळे ।
कीं असते आपुले डोळे । आपण झांकी ॥ ७३ ॥
जैसी ते शुकाचेनि आगभरें । नळिका भोविन्नली एरी
मोहरे । तरी तेणें उडावें परी न पुरे । मनशंका ॥ ७६ ॥
वांयाचि मान पिळी । अटुवें हिये आवळी ।
टिटांतु नळी । धरूनि ठाके ॥ ७७ ॥
म्हणे बांधला मी फुडा । ऐसिया भावनेचिया पडे खोडां ।
कीं मोकळिया पायाचा चवडा । गोंवी [5] अधिकें ॥ ७८ ॥
ऐसा काजेंवीण आतुडला । तो साग पां काय आणिकें बाधला
मग न सोडीच जऱ्ही नेला । तोडूनि अर्धा ॥ ७९ ॥

---

१ हा रेशमाचा किडा आपल्या तोंडांतून ततु काढून धागा पसरतो; पण स्वतः त्यात सापडून मरतो २ जो सुदर देहालाच आत्मा मानतो. ३ पोपट धरण्यासाठीं पारधी लोक एक आमिष लावलेली नलिका उभी करितात. पोपट तीवर बसला कीं त्याच्या अगभारानें ती उलट गिरकी खाते, पण तो उडून न जाता आपणच फिरलों अशा भ्रमानें ती सोडीत नाहीं. ४ व्यर्थ मानेचे हिसडे देतो, वांकड्या ( अटुवें ) छातीनें ( हियें ) आवळतो व ती पायाच्या चवड्यांत ( टिट=पायाचें तिकटे ) गच्च धरून ठेवतो. ५ गुतली.

आपणया आपणाचि रिपु । जेणें वाढविला हा संकल्पु ।
येर स्वयबुद्धी म्हणे बापु । जो नाथिलें नेघे ॥ ( अ० ६ )

## १० योग्यतेची काय खाण आहे ?

पै योग्यता जे म्हणिजे । ते प्राप्तीचि अधीन जाणिजे ।
का जे योग्य होऊनि कीजे । तें आरंभिलें फळे ॥ ३४० ॥
तरी तैसी एथ काही । सावियाचि कोणी नाही ।
आणि योग्यतेची काई । खाणी असे ? ॥ ३४१ ॥
नावेकं विरक्त । जाहला देहधर्मी नियत ।
जरी तोचि नव्हे व्यवस्थित । अधिकारिया ? ( अ० ६ )

## ११ आस्थावंताला सद्गतिच—दुर्गतीचें भय नको !

म्हणोनि सागें श्रीगोविंदा । कवण एक मोक्षपदा ।
झोंबत होता श्रद्धा । उपायेंविण ॥ ४३१ ॥
इद्रियग्रामोनि निगाला । आस्थेचिये वाटा लागला ।
आत्मसिद्धिचिया पुढिला । नगरा यावया ॥ ४३२ ॥
तंव आत्मसिद्धि न ठकेचि । आणि मागुतें न येववेचि ।
ऐसा अस्तु गेला माझारीचि । आयुष्यभानु ॥ ४३३ ॥
ऐसा दोहोंला अतरला का जी । जो श्रद्धेच्या समाजीं ।
बुडाला तया हो जी । कवण गति ? ॥ ४३६ ॥
तव श्रीकृष्ण म्हणती पार्था । जया मोक्षासुखी आस्था ।

---

१ योग्यता ही प्राप्तीच्या आधीं समजत नाहीं, कसें तर अगीं योग्यता आणून जें कार्य आरंभिलें जातें तें सफळ होतें. २ खरोखर. ३ प्रकार. ४ क्षणभर, थोडासा. ५ देहधर्म ज्यानें नियमित केलें, इद्रियें वश ठेवलीं. ६ ' नावेक विरक्त आणि ' देहधर्मी नियत ' एवढें असले म्हणजे पुरें. ७ नुस्त्या श्रद्धेनें. ८ इद्रियग्रामाहून आत्मसिद्धीच्या नगरास यायला निघाला. ९ पोंचला नाहीं. १० मध्येंच मरण पावला. ११ केवळ श्रद्धेंत निमग्न झाला.

तया मोक्षावांचूनि अन्यथा । गति आहे गा ? ॥ ४३७ ॥
परी एतुलें हेंचि एक घडे । जें माझारीं विसावावें पडे[१] ।
तेंही परी ऐसेंनि सुरवाडें । जो देवां नाहीं[२] ॥ ४३८ ॥
पाठीं[३] जन्म ससारी । परी सकल धर्माचिया माहेरीं ।
[४]लांबा उगवे आगरी । विभवश्रियेचा ॥ ४४४ ॥
जयातें नीतिपंथें चालिजे । सत्यधूतें[५] बोलिजे ।
देखावें तें देखिजे । शास्त्रदृष्टी ॥ ४४५ ॥
वेद तो जागेश्वरु[६] । जया व्यवसाय निजाचारु[७] ।
सारासारविचारु । मैत्री[८] जया ॥ ४४६ ॥
जयाच्या कुळी चिंता । जाली ईश्वराची पतिव्रता[९] ।
जयातें गृहदेवता—। आदि ऋद्धि[१०] ॥ ४४७ ॥
ऐसी निजपुण्याची जोडी । वाढिन्नली सर्वसुखाची कुळवाडी[११] ।
तिये जन्मे तो सुरवाडी[१२] । योगच्युत ॥ ४४८ ॥
जे विवेकद्रुमाचे मुळीं । बैसले आहाती नित्य फळीं ।
तयां योगियाचिया कुळीं । जन्म पावे ॥ ४५१ ॥
मोटकी[१३] देहकांति उमटे । आणि निजज्ञानाची पाहाट फुटे ।
सूर्यापुढें प्रगटे । प्रकाश जैसा ॥ ४५२ ॥
तैसी दशेची[१४] वाट न पाहता । वयसेचिया गांवा न येता ।

---

१ मध्येंच विश्राति ध्यावी लागते. २ पण त्यातही त्याला जें सुख आहे तें देवांना नाहीं ३ नतर तो मृत्युलोकीं जन्म घेतो, पण सर्व धर्माचें माहेरघर अशा घरीं. ४ भात कापलेल्या बुडख्यांतून उगवणारें रोप. तो लाबा जसा जोरानें फोंपावतो तशी याच्या ऐश्वर्याची वृद्धि होते. ५ सत्यानें पवित्र असें वाक्य उच्चारणार. ' सत्यपूत वदेद्वाक्य. ६ जागृत देवता. ७ स्वधर्माचार. ८ सचिव. ९ चिंता ईश्वरविषयकच आहे, प्रपचाची नाहीं. १० आईबाप हेंच ज्याचें धन. ११ व्यापार. १२ सुखसतोषानें. १३ लहानशी. १४ वयाची, प्रौढपणाची.

बाळपणींच सर्वज्ञता । वरी तयातें ॥ ४५३ ॥
तियें सिद्धप्रज्ञेचेनि लाभें । मनचि सारस्वतें दुंभे ।
मग सकळ शास्त्रें स्वयमें । निघती मुखें[3] ॥ ४५४ ॥
मागील जे सद्बुद्धि । जेथ जीवित्वा जाहाली होती अवधी ।
मग तेचि पुढती निरवधि । नवी लाहे ॥ ४५७ ॥
तेथ सदैवा आणि पायाळा । वरी दिव्याजन होय डोळा ।
मग देखे जैसी अवलीळा । पाताळधनें ॥ ४५८ ॥
तैसे दुर्भेद्य जे अभिप्राय । का गुरुगम्य हन ठाय ।
तेथ ससरेंवीण जाय । बुद्धि तयाची ॥ ४५९ ॥
जे वर्षशतांचिया कोडी । जन्मसहस्राचिया आडी ।
लघिता पातला थेंडी । आत्मसिद्धीची ॥ ४६५ ॥
म्हणोनि साधनजात आघवें । अनुसरे[11] तया स्वभावें ।
मग आयतिये बैसे राणिवे[12] । विवेकाचिये ॥ ४६६ ॥
आणि ब्रह्मीची स्थिति । जे सकळा गतींसी गति ।
तया अमूर्ताची मूर्ति । होवोनि ठाके ॥ ४७० ॥ ( अ० ६ )

## १२ दैवी प्रकृतीचे महात्मे.

जयाचिये चोखट मानसी । मी होऊनि असे क्षेत्रसंन्यासी[13] ।
जया निजेलियातें उपासी । वैराग्य गा ॥ १८८ ॥
जे ज्ञानगगे नाहले । पूर्णता जेऊनि धाले ।

---

१ पूर्वजन्मीं सिद्ध झालेल्या बुद्धिवैभवाच्या लाभानें. २ सर्व विद्या अपाव येतात. ३ ह्या ओंव्यांत वयाच्या सोळाव्या वर्षी ज्ञानेश्वरीसारखा अनुपम ग्रथ प्रसवणारे ज्ञानेश्वरमहाराज आत्मचरित्र सांगत आहेत असें वाटतें ' अथवा योगभ्रष्टाला ही योग्यता प्राप्त होते मग महाराजासारख्या योगेश्वराची गोष्ट काय सागावी ? ४ सहज, लीलेनें. ५ कठिण ६ गुरुकृपेनें प्राप्त होणारे ७ बिनचूक. ८ कोटि. ९ प्रतिबध. १० तीर. ११ त्याला सहज प्राप्त होतात. १२ राज्यावर. १३ यावज्जीव एकाच क्षेत्रांत राहणारा.

जे शांतीसी झाले । पल्लुव नवे ॥ १९० ॥
जे परिणामा निघाले कोंब । जे धैर्यमडपाचे स्तभ ।
जे आनदसमुद्रीं कुभ । चुबुकळेनि भरिले ॥ १९१ ॥
जया भक्तीची येतुली प्राप्ती । जे कैवल्यातें परतें सर म्हणती ।
जयाचिये लीलेमाजी नीति । जियाली दिसे ॥ १९२ ॥ (अ० ९)

## १३ संत ते देव.

देहाहकार नाथिला । हा समूळ जयाचा नासिला ।
तोचि परमात्मा सचला । आधीच आहे ॥ ८४ ॥
ऐसा शरीरीचि परी कौतुकें । ब्रह्माचेनि पाडे तुके ।
जेणें जिंतलीं एकें । इद्रियें गा ॥ ९० ॥
देखे सोनयाचें निखिळ । मेरुयेसणें ढिसाळें ।
आणि मातियेचें डिखळें । की सरसेंचि मानी ॥ ९२ ॥
पाहतां पृथ्वीचें मोल थोडें । ऐसें अनेर्घ्य रत्न चोखडें ।
देखे दगडाचेनि पाडें । निचाड ऐसा ॥ ॥ ९३ ॥
तया बधु कोण काह्याचा ? । द्वेषिया कवण तयाचा ? ।
मीचि विश्व ऐसा जयाचा । बोध जाहला ॥ ९५ ॥
जयाचें नाव तीर्थरावो । दर्शनें प्रशस्तीसि ठावो ।
जयाचेनि संगे ब्रह्मभावो । भ्रातासही ॥ १०२ ॥
जयाचेनि बोलें धर्म जिये । दिठी महासिद्धीतें विये ।
देखें स्वर्गसुखादि इयें । खेळ जयाचा ॥ १०३ ॥
विपायें जरी आठविला चित्ता । तरी दे आपुली योग्यता ।
हें असो तया प्रशसिता । लाभ आथि ॥ १०४ ॥ ( अ० ६ )

---

१ पूर्णस्थितीला. २ लाभानद. ३ मोक्षाला दूर सारतात. ४ जिवत. ५ बरोबरीनें तोलतो. ६ लड, गोळा. ७ मेरुसारखा प्रचड. ८ ढेकूळ. ९ अमोल. १० निष्काम, चाड किंवा कामना नसलेला. ११ पूज्यतेला आधार.

## १४ ‘ मनुष्याणां सहस्रेषु. ’

पै गा मनुष्याचियां सहस्रशा-। माजी विपाइलेचियां[1] येथ धिंवसा[2]।
तैसें या धिवसेकरा बहुवसा- । माजी विरळा जाणे ॥ १० ॥
जैसा भरलेया त्रिभुवना- । आत एक एक चागे[3] अर्जुना ।
निवडूनि कीजे सेना । लक्षवरी ॥ ११ ॥
की तयाहीपाठीं । जे वेळीं लोहें[4] मासातें घाटी ।
ते वेळीं विजयाश्रियेच्या पाठीं । एकाचि बैसे ॥ १२ ॥
तैसे आस्थेच्या महापुरी । रिघताति कोटिवरी ।
परी प्राप्तीच्या पैलतीरी[5] । विपाइला निगे ! ॥ १३ ॥ (अ० ७)

## १५ स्वसुखाच्या गोष्टींची पुनरुक्तीही गोडच !

“ जयाची गोठीचि ऐकर्तखेवों[6] । आघवा ससार होय वावो ।
बळिया नित्यता लागे येवों । आपणपेया ॥ १९७ ॥
जन्ममृत्यूची भाखं । हारपोनि जाय नि.शेख ।
आंतबाहेरी महासुख । वाढोंचि लागे ॥ १९८ ॥
आता हें सुख कायिसयासारिखें। कांहीं निर्वचेना मज परितोखें[10]।
तरी येतुलें जाणें-जे येणें मुखें । पुनरुक्तही हो ॥ २०१ ॥
हा गा सूर्य काय शिळा ? । आग्नि म्हणों येत आहे वोवळा ? ।
कां नित्य वाहतया गगाजळा । पारसेपणें[11] असे ? ॥ २०२ ॥
तुवा स्वमुखें जें बोलिलें । हें आम्ही नांदासि[12] रूप देखिलें ।
आजि चदनतरूचीं फुलें । तुरंबीतें[13] आहों मा ! ” ॥ २०३ ॥
यया पार्थाचिया बोला । श्रीकृष्ण सर्वांगें डोलला ।
म्हणे भक्तिज्ञानासि जाहला । आगर हा !॥ २०४ ॥ (अ० १०)

---

१ विरळ २ धैर्य. ३ शूर. ४ शस्त्र अगाला कापीत जातें. ५ जयश्रीच्या पर्दी. ६ ऐकताक्षणींच. ७ भाषा. ८ कशासारखें. ९ बोलवत नाहीं. १० आनदामुळें. ११ शिळेपण. १२ मूर्त नादब्रह्म. १३ चुबीत.

## १६ विषयांतरदोषाचा परिहार.

घांसाआंतील हेरळ । फेडिता लागे वेळ ।
तें दूषण नव्हे—खडळ । सांडावा की ॥ ३३६ ॥
कां सवचोरा चुकवितां । दिवस लागलिया मातां ।
कोपावें कीं जीवितां । जिताणें कीजे ? ॥ ३३७ ॥( अ० १३ )

## १७ देह आणि आत्मा.

देह तव पाचाचें जालें । हें कर्माचें गुणी गुथलें ।
भवतसे चाकीं सूदलें । जम्ममृत्यूच्या ॥ ११०४ ॥
हें काळानळाच्या कुडीं । घातलीं लोणियाची उडी ।
माशी पांख पारवंडी । तव हें सरे ! ॥ ११०५ ॥
हें विपायें आगीत पडे । तरी भस्म होऊनि उडे ।
जाहलें श्वाना वैरपडे । तरी ते विष्टा ॥ ११०६ ॥
या चुके दोहीं काजा । तरी होय कृमीचा पुजा ।
हा परिणाम कपिध्वजा । कश्मल गा ॥ ११०७ ॥
या देहाची हे दशा । आणि आत्मा तो ऐसा ।
पै शुद्ध नित्य आपैसा । अनादिपणें ॥ ११०८ ॥
सकळ ना निष्कळ । अक्रिय ना क्रियाशीळ ।
कृश ना स्थूळ । निर्गुणपणें ॥ ११०९ ॥
आनद ना निरानंद । एक ना विविध ।
मुक्त ना बद्ध । आत्मपणें ॥ १११२ ॥
साभास ना निराभास । प्रकाश ना अप्रकाश ।
अल्प ना बहुवस । अरूपपणें ॥ १११० ॥
येतुला ना तेतुला । आयिता न रचिला ।

---

१ खडे. २ मातेनें. ३ जीवावरून निंबलोण उतरावें. ४ दोऱ्यांत गुफलेलें. ५ फिरतें. ६ झाडी. ७ प्राप्त. ८ वाईट.

बोलता ना उगला । अलक्षपणें ॥ १११३ ॥
अहोरात्रें जैसीं । येती जाती आकाशी ।
आत्मसत्ते तैसी । देहें जाण ॥ १११८ ॥ ( अ० १३ )

## १८ भाषणांत कोणते दोष टाळावेत.

विरोधवाद्बळू । प्राणितापढाळू ।
उपहास छळू । वर्मस्पर्श ॥ २७१ ॥
आटू वेग विंदाण । आशा शंका प्रतारण ।
हे सन्यसिले अवगुण । जिया वाचा ॥ ॥ २७२ ॥ ( अ० १३)

## १९ अहंकार.

जैसा ज्वर धातुगत । अपथ्याचें मिष पाहत ।
मग जालिया आत–। बाहेरी व्यापी ॥ ८० ॥
तैसी पाचांही गांठी पडे । जै देहाकार उघडे ।
तै नाचवी चहूंकडे । तो अहंकार गा ॥ ८१ ॥
नवल अहंकाराची गोठी । विशेषें नलगे अज्ञानापाठीं ।
सज्ञानाचे झोंबे कठीं । नाना संकटी नाचवी ! ॥८२॥ (अ०१३)

## २० बुद्धि.

हें सुख हें दुःख । हें पुण्य हें दोख[3] ।
हें मैळ[4] हें चोख । ऐसें निवडिजे ॥ ८६ ॥
जें तेंजतत्वाची[5] आदी । जे सत्वगुणाची वृद्धी ।
ते आत्मया जीवाची सधी । वसवित असे ॥ ८७ ॥
अर्जुना ते गा जाण । बुद्धि तू सपूर्ण ।...( अ० १३ )

---

१ विरोध वादाचें बळ, प्रतिपक्षीयाला कासावीस करणें, उपहास, छळ, वर्म काढणें, आवेशाचें कोरडें बोलणें ( आट्ठवेग ), विंदाण म्ह० छद्मी किंवा कपटाचें भाषण, आशा, शका व प्रतारण म्ह० फसवेगिरी हे दोष टाळून बोलावें. २ पचभूताची. ३ पाप. ४ मलिन. ५ ज्ञानेंद्रियांची.

## २१ डोळस कोण ?

हा नाशतां भूताभास । एक आत्मा तो अविनाश ।
जैसा केयूरादिकीं कस । सुवर्णाचा ॥ १०६७ ॥
एव जीवधर्महीन । जो जीवेंसी अभिन्न ।
देखे–तो सुनयन । ज्ञानियामाजी ॥ १०६८ ॥
ज्ञानाचा डोळा डोळसा– । माजी डोळस तो वीरेशा ।
हे स्तुति नोहे बहुवसा । भाग्याचा तो ॥१०६९॥ (अ० १३)

## २२ गुणातीत.

का नटलेनि लाघवें । नट जैसा न झकवे ।
तैसे गुणजात देखावे । न होनिया ॥ २९१ ॥
समुद्राचि भरती । सोमकातचि द्रवती ।
कुमुदें विकसती । चद्र तो उगा ॥ ३४७ ॥
कां वाराचि वाजे विझे[3] । गगनें निश्चळ असिजे ।
तैसा गुणाचिये गजबजे । डोलेना तो ॥ ३४८ ॥ (अ० १४)

## २३ आला आणि गेला !

परी देहाचें मोटॅकें उभें । आणि चेतना तेथ उॅपलभे ।
तिये चळवळेचेनि लोभें । 'आला' म्हणती ॥ ३७३ ॥
पाठीं भोगक्षीण आपैसें । देह गेलिया ते[6] न दिसे ।
तेथ 'गेला गेला' ऐसे । बोॅभाती ॥ ३७५ ॥
पै रुॅख डोलत देखावा । तरी वारा वाजत मानावा ।
रुख न दिसे तेथें पांडवा । नाही तो गा ? ॥ ३७६ ॥
कां आरसा समोर ठेविजे । आणि आपणपें तेथ देखिजे ।

---

१ आपण जीवधर्मरहित असून जीवमात्राशीं एकरूप आहोंत हें ज्यानें जाणलें तो खरा डोळस. २ स्वत: भुलत नाहीं. ३ बद होतो ४ लहान गाठोडें. ५ प्राप्त होते, मिळते. ६ चेतना. ७ बोभाटा करितात, ओरडतात. ८ वृक्ष.

तरी तेधवांचि जालें मानिजे । काय आधी नाहीं ? ॥ ३७७ ॥
का परता केलिया आरसा । लोप जाला तया आभासा ।
तरी आपणपें नाही ऐसा । निश्चय करावा ? ॥ ३७८ ॥
तैसें होइजे जाइजे देहें । तें आत्मसत्ते अविक्रिये ।
निष्टकिती[1] गा मोहें । आधळे ते ॥ ३८० ॥ ( अ० १५ )

## २४ उपाधि दूर कीं वस्तु सिद्ध !

तरी ताकाचे अश फेडणें[2] । तयाचें नाव लोणी काढणें ।
चोखाचिये शुद्धी तोडणें । कीडचि[3] जेवी ॥ ४६४ ॥
बाबुंळीचि[4] सारावी हातें । परी पाणी तव असे आइतें ।
अभ्रचि जावें—गगन तें । सिद्धचि की ! ॥ ४६५ ॥
जैसें न सागणेवरी । बाळा पतीसी रूप करी ।
बोल निमालेपणें[5] विवरी । अचर्चातें ॥ ४६८ ॥ ( अ० १५ )

## २५ विषयप्रीति व अहंता गेल्यावांचून देव नाहीं.

आणि ज्ञानही आपैतें[6] होईल । प्रज्ञा परमाणूही उगाणा[7] देईल ।
सकळ शास्त्राचें येईल । सर्वस्व हाता ॥ ३९१ ॥
परी ते व्युत्पत्ति ऐसी । जरी विरक्ति न रिगे मानसी ।
तरी सर्वात्मका मजसी । नव्हेचि भेटी ॥ ३९२ ॥
पै तोंड भरो का विचारा । आणि चित्ती विषयाचा थारा ।
तरी नातुडे धनुर्धरा । त्रिशुद्धी मी ॥ ३९३ ॥
चित्ती अहतें ठावो । आणि जिभे सकळ शास्त्राचा सरावो ।
ऐसेनि कोडि एक जन्म जावो । परी न पविजे मातें ॥ (अ०१५)

---

१ निश्चय करितात २ निराळे करणें ३ चांगलें सोनें घेणें ह्म० हिणकस ( कीड ) जाळणें. ४ शेवाळ. ५ शब्द खुटणें हेंच अचर्च्याचें विवरण. ६ प्राप्त. ७ हिशेब, झाडा.

## २६ ब्रह्माला ॐ हें नांव कसें पडलें ?

ब्रह्म कीर अनाम अजाती । परी अविद्यावर्गाचिया राती-।
माजी वोळखावया श्रुती । खूण केली ॥ ३२९ ॥
उपजलिया बाळकासी । नांव नाहीं तयापाशीं ।
ठेविलेनि नावेसी । ओ देत उठी ॥ ३३० ॥
कष्टले संसाराशिणें । जे देवो येती गाऱ्हाणें ।
तया ओ दे नावें जेणें । तो संकेत हा ! ॥ ३३१ ॥
ब्रह्माचा अबोला फिटावा । अद्वैतत्वें तो भेटावा ।
ऐसा मंत्र देखिला कणवा । वेदें बापें ॥ ३३२ ॥
मग दाविलेनि जेणें एकें । ब्रह्म आळविलें कवतिकें ।
मागां असत ठाके । पुढा उभें ॥ ३३३ ॥
परी निगमाचळशिखरीं । उपनिषदार्थनगरी ।
आहाति जे ब्रह्माच्या एकाहारीं । तयांसीच कळे ।।३४।।(अ०१७)

## २७ सात्त्विक श्रद्धा.

म्हणोनि श्रद्धा स्वाभाविक । असे पैं त्रिगुणात्मक ।
रजतमसात्विक । भेदीं इहीं ॥ ६७ ॥
जैसें जीवनचि उदक । परी विषीं होय मारक ।
का मिरयामाजी तिख । उसीं गोड ॥ ६८ ॥
हे सात्विक श्रद्धा । जतन करावी प्रबुद्धा ।
येरी दोनी विरुद्धा । सांडाविया ॥ ८३ ॥
हे सात्विकमती जया । निर्वाहती होय धनंजया ।
वागुंल नोहे तया । कैवल्य तें ॥ ८४ ॥
तो न पढो कां ब्रह्मसूत्र । न लेंढो सर्व शास्त्र ।

---

१ कृपेनें. २ जो एक मंत्र वेदानें सांगितला. ३ वृत्तीच्या किंवा मनाच्या मागें. ४ पर्क्तास. ५ रक्षक. ६ बाऊ. ७ मोक्ष. ८ पारगत होतो.

सिद्धात न होत स्वतंत्र । तयाच्या हाती ॥ ८५ ॥
परि श्रुतिस्मृतीचे अर्थ । जे आपण होऊनि मूर्त ।
अनुष्ठानें गाजत । वडिले जे हे ॥ ८६ ॥
तयाची आचरती पाउलें । पाऊनि सात्विकी श्रद्धा चाले ।
तो तेंचि फळ ठेविलें । ऐसें लाहे ॥ ८७ ॥ ( अ० १७ )

## २८ अनुभव मुरायला हवा.

सुक्षेत्री आणि वोलेंटें[1] । बीजहि पेरिलें गोमटें[2] ।
तरी अलोटै[3] फळ भेटें । तरी वेळें कीं गा ॥ ९९ ॥
जोडला मार्ग प्राजळ । मिनला सुसगाचाही मेळ ।
तरी पाविजे वाचूनि वेळ । लागेचि की ॥ १०० ॥
तैसा वैराग्यलाभ झाला । वरी सद्गुरुही भेटला ।
जीवी अकुर फुटला । विवेकाचा ॥ १००१ ॥
तेणें ब्रह्म एक आथी । येर आघवीचि भ्राती ।
हेही कीर प्रतीती । गाँढ[4] केली ॥ १००२७ ॥
परी तेंचि जें परब्रह्म । सर्वात्मक सर्वोत्तम ।
मोक्षाचेंही काम । सरे जेथ ॥ १००३॥
यया तिन्हीं अवस्था पोटी । जिरवी जें गा किरीटी ।
तया ज्ञानासिही मिठी । दे जे वस्तु ॥ १००४ ॥
ऐक्याचें एकपण सरे । जेथ आनंदकणही विरे ।
कांहींचि नुरोनि उरे । जें काही गा ॥ १००५ ॥
तिये ब्रह्मी ऐक्यपणें । ब्रह्मचि होऊनि असणें ।
तें क्रमेंचि करूनि तेणें । पाविजे पै ॥ १००६ ॥ ( अ० १८ )



---

१ सत. २ ओल्या जमीनीत. ३ अतिशय. ४ बळकट.

# ६ ज्ञानेश्वरी सुभाषितें.



## १ देव.

१ ॐ नमोजी आद्या । वेदप्रतिपाद्या ।
जयजय स्वसंवेद्या । आत्मरूपा ॥
२ सुवर्णाचिये मणि केले । आणि सुवर्णाचे सुती वोविले ।
तैसें मियां जग धरिलें । सबाह्याभ्यतरीं ॥
३ म्हणोनि जग परौतें । सारूनि पाहिजे मातें ।
तैसा नोहे-उखितें । आघवें मीचि ॥
४ सानें थोर न म्हणावें । उच्चनीच भाव सांडावे ।
एक मीचि ऐसें जाणावें । वस्तुजातातें ॥
५ जी तू एकरसाचें लिंग । केविं करू गुणागुणी विभाग ।
मोती फोडूनि साधितां चांग । की तैसेंचि भलें ॥
६ स्तुति काही न बोलणें । पूजा कांही न करणें ।
सन्निधि काही न होणें । तुझ्याठायी ॥
७ तूप होवोनि माघौतें । जेवी दूधपणा नयेचि निरुतें ।
तेवी पावोनियां जयातें । पुनरावृत्ति नाहीं ॥

## २ गुरु.

८ म्हणोनि जाणतेनें गुरु भाजिजे । तेणें कृतकार्य होइजे ।
जैसें मूळसिंचनें सहजें । शाखापल्लव संतोषती ॥
९ तयापरी श्रीगुरु । करिती जै अंगिकारू ।
तै होऊनि ठाके ससारु । मोक्षमय आघवा ॥

## ३ शिष्य.

१० गुरु क्षेत्र गुरु देवता । गुरु माता गुरु पिता ।

जो गुरुसेवेपरता । मार्ग नेणे ॥
११ गुरुसंप्रदायधर्म । तेचि जयाचे वर्णाश्रम
गुरुपरिचर्या नित्यकर्म । जयाचें गा ॥

## ४ श्रुतिशास्त्रप्रामाण्य.

१२ विश्व हा अनादि ठावो । येथ नियता ईश्वररावो ।
चावडिये न्यावो अन्यावो । निवडी वेद ॥
१३ पै अहितापासूनि काढिती । हित देऊनि वाढविती ।
नाही श्रुतीपरौती । माउली जगा ॥
१४ पै आपुलेंचि कर्म थितें । घेपे पारखीयाचेनि हातें ।
तैसें स्वकर्म आपैतें । शास्त्रें करावें ।
१५ स्वभावविहिता कर्मा । शास्त्राचेनि मुखें वीरोत्तमा ।
प्रवर्तवावयालागीं प्रमा । अढळ कीजे ॥
१५ शास्त्र म्हणेल जें साडावें । तें राज्यही तृण मानावें ।
जें घेववी तें न म्हणावें । विषही विरु ॥

## ५ गीताशास्त्र.

१७ हें गीतानाम विख्यात । सर्व वाङ्मयाचें मथित ।
आत्मा जेणें हस्तगत । रत्न होय ॥
१८ साचचि बोलाचें नव्हे हें शास्त्र । पै ससार जिणतें शस्त्र ।
आत्मा अवतरविते मत्र । अक्षरें इयें ॥
१९ येथ अविद्यानाश हें स्थळ । तेणें मोक्षापादन हें फळ ।
या दोही केवळ । साधन ज्ञान ॥
२० शास्त्र वान्यें अर्थें फळे । मग आपण मावळे ।
तैसें नव्हे–हें सगळें । परब्रह्मचि ॥
२१ गीता हें वाङ्मयी मूर्ति । श्रीप्रभूची ।–
२२ येथ देव बोलिले एक । जे दुजें नाहीं ।–

## ६ श्रवण.

२३ मनाचा मार न करितां । आणि इंद्रिया दुःख न देता ।
येथ मोक्ष असे आयिता । श्रवणाचिमाजी ॥

## ७ स्वधर्म.

२४ जैसी भर्तारेंहीन वनिता । उपहती पावे सर्वथा ।
मग तैसी दशा जीविता । स्वधर्मेंवीण ॥
२५ म्हणोनि जें जें उचित । आणि अवसरेंकरोनि प्राप्त ।
तें कर्म हेतुरहित । आचरे तूं ॥
२६ तेवी आवडे तैसा साकड । आचरिता जरी दुवाड ।
तरी स्वधर्मचि सुरवाड । परत्रीचा ॥
२७ मन भावशुद्धि भरलें । आंग क्रिया अळकारलें ।
ऐसें सबाह्य जियालें । साजिरें गा ॥
२८ यालागी कर्म आपुलें । जातिस्वभावें असे आलें ।
तें करी—तेणें जिंतिलें । कर्मबंधातें ॥
२९ तया सर्वात्मका ईश्वरा । स्वकर्मकुसुमाची वीरा ।
पूजा केली होय अपारा । तोषालागी ॥
३० अगा आत्मजेच्या विषी । जीव जैसा निरभिलाषी ।
तैसा कर्मी अशेषी । निष्काम होई ॥
३१ अमृतें तरीच मरिजे । जरी विषेसी सेविजे ।
तैसा स्वधर्मी दोष पाविजे । हेतुकपणें ॥
३२ कर्तृत्वाचा मद । आणि कर्मफळाचा आस्वाद ।
या दोहींचें नाव बंध । कर्माचा कीं ॥
३३ म्हणोनि फळी लाग । साडोनि देहसंग ।
कर्में करावीं हा चाग । निरोप माझा ॥
३४ चालणें वेगावत जाय । तो वेग बैसावयाचि होय ।
तैसा कर्मातिशय आहे । नैष्कर्म्यालागीं ॥

३५ निजवृत्ति जेथ साडे । तेथ स्वतंत्रते वस्ती न घडे ।
३६ जगी कीर्ति रूढवी । स्वधर्माचा मान वाढवीं ।
इया भारापासोनि सोडवीं । मेदिनी हे ॥

## ८ गृहस्थधर्म.

३७ तुम्हा वर्णविशेषवशें । आम्ही हा स्वधर्म विहिला असे
यातें उपासा मग आपैसे । पुरती काम ॥
३८ गुरु गोत्र अग्नि पूजी । अवसरीं भजे द्विजी ।
निमित्तादिकी यजीं । पितरोद्देशें ॥
३९ स्वधर्में जें अर्जे । तें स्वधर्मेंचि विनियोगिजे ।
मग उरे तें भोगिजे । सतोषेसी ॥
४० हें सपत्तिजात आववें । हवनद्रव्य मानावें ।
स्वधर्मयज्ञें अर्पावें । आदिपुरुषीं ॥
४१ वस्तु भूतमात्री नमिजे । परोपकारी भजिजे ।
स्त्रीविषयी नियमिजे । नात्रेंनात्र ॥
४२ हें असो वनिता आपुली । कुरूप जरी जाहली ।
तरी भोगितां तेंचि भली । जियापरी ॥
४३ सकळ तीर्थांचिये धुरे । जियें का मातापितरें ।
तया सेवेसीं कीर शरीरें । लोण कीजे ॥
४४ जयाचें ऐहिक धड नाही । तयाचें परत्र पुससी काई ?
४५ स्वाधिकाराचेनि नावें । जें वाटिया आलें स्वभावें ।
तें आचरे विधिगौरवें । शृंगारोनी ॥
४६ आणि बाह्येंद्रियांचें वेंडें । पिटूनि विधीचेनि दंडें ।
नेदिजे अधर्माकडे । कहीच जावों ॥
४७ मार्गाधारें वर्तावें । विश्व हें मोहरें—लावावें ।
अलौकिक नोहावें । लोकांप्रती ॥

४८ येथ वडिल जें करिती । तया नाम धर्म ठेविती ।
येर तेंचि अनुष्ठिती । सामान्य सकळ ॥
४९ देखे प्राप्तार्थ जाहले । जे निष्कामता पावले ।
तयाही कर्तव्य असे उरलें । लोकालागीं ॥

## ९ भक्त आणि भक्ति.

५० अह वाचा चित्त आग । देऊनियां शरण रिघ ।
महोदधी का गाग । रिगालें जैसें ।
५१ हें समस्तही श्रीवासुदेव । ऐसा प्रतीतिरसाचा वोतला
भाव । तरी भक्तांमाजी राव । आणि ज्ञानिया तोचि ॥
५२ मिळोनि मिळताचि असे । समुद्रीं गगाजळ जैसें ।
मी होऊनि मज तैसें । उपासिती ॥
५३ जें जें भेटे भूत । तें तें मानिजे भगवत ।
हा भक्तियोग निश्चित । जाण माझा ॥
५४ तैसा शरीरी हन कर्में । तो भक्त ऐसा गमे ।
परी अंतरप्रतीति धर्में । मीचि जाहला ॥
५५ येथ एकचि लीला तरले । जे सर्वभावें मज भजले ।
तया ऐलीच थडी सरलें । मायाजळ ॥
५६ तैसेचि मातें विश्वी कथित । कथिलेनि तोषें कथू
विसरत । मग तया विसरामाजीं विरत । आंगें मनें ॥
५७ तैसें उत्तमत्व तैंचि तरे । तैंचि सर्वज्ञता सरे ।
जै मनोबुद्धि भरे । माझेनि प्रेमें ॥
५८ तू मनबुद्धि वाचेसी । जरि माझिया स्वरूपी अर्पिसी ।
तरी मातेंचि गा पावसी । हे माझी भाक ॥

## १० मराठी भाषा.

५९ देशियेचेनि नागरपणें । शात श्रृंगारातें जिणे ।

तरी वोविया होती लेणें । साहित्यासी ॥

६० दावू वेल्हाळ देशी नवी । जे साहित्यातें वोजावी ।
अमृतातें चुकी ठेवी । गोडसपणें ॥

## ११ प्रपंचविषयक.

६१ पाहे पा अनुरागें भजे । जे प्रियोत्तमें मानिजे ।
ते पतीहूनि काय न वानिजे । पतिव्रता ? ॥

६२ चालतयाचि मार्ग साडे । पारखियाचि अखरें पडे ।
राहाटीमाजी न घडे । काई काई ? ॥

६३ दानशीळपुरुष । वेंचकपणेंचि संचक ।

६४ निकवड्या निष्ठुरा । उबगिजे जेविं सोयरा ।

६५ आथिला आणि विलासिया । तैंचि वोळखों ये धनंजया ।
जै राजसेव्या ठाया । वस्तीसि ये ! ॥

६६ हें चोख हें मैळ । ऐसें नेणोनिया बाळ ।
देखे ते केवळ । मुखींचि घाली ॥

६७ जैसें न सागणेवरी । बाळा पतीसी रूप करी ।
बोल निमालेपणें विवरी । अचर्च्यातें ॥

६८ जैसा स्वभाव मायबापाचा । अपत्य बोले जरी बोबडी
वाचा । तरी अधिक तयाचा । संतोष आथी ॥

६९ मातेच्या कोपी थोकलें । स्नेह आथी ।

७० वेश्याभोगी कवडा वेंचे । मग द्वारही चेपू न ये तियेचें ।
तैसें लाजिरवाणें दीक्षिताचें । काय सागों ॥

७१ जिया उत्तम कुळींचिया होती । आणि गुणलावण्य आथी ।
तिया आणिकीतें न साहती । सुतेजपणें ॥

७२ जाणतेनें तंवचि जियावें । जंव अपकीर्ती अंगा न पवे ।

७३ लोक सायासें करूनि बहुतें । वेंचिती आपुलीं जीवितें ।
परी वाढविती कीर्तीतें । धनुर्धरा ॥

७४ मातेच्या ठायी । आपल्या अनवसर नाहीं ।
स्तन्यालागूनि पाहीं । जियापरी ॥

७५ दैवास्तव पाळण । जो चिंतीना देहभरण ।
तो महायोगी जाण । दैवयोगें ॥

## १२ दैव आणि पौरुष.

७६ हां गा रोग काय रोगिया । आवडे ? । दरिद्र दरिद्रिया ? ।
परी भोगविजे बळिया । अदृष्टें येणें ॥

७७ म्हणोनि भाग्य जै अनुकूळ । जालिया उद्यम सफळ ।

७८ होय अदृष्ट आपैतें । तै वाळूचि रत्नें परते ।
उजू आयुष्य तै मारितें । लोभ करी ॥

७९ अगा उपायबळें पगू । पहाड ठाकी ।

८० अगा अभ्यासयोग ह्मणिजे । तो हा येक जाणिजे ।
येणें काहीं न निपजे । ऐसें नाही ॥
म्हणोनि अभ्यासासी काहीं । सर्वथा दुष्कर नाहीं ।
यालागीं माझिया ठायी । अभ्यासें मिळे ॥

## कांहीं उत्कृष्ट व्याख्या.

**अभयः**— पाणी बुडवूं ये मिठातें । तव मीठाचि पाणी आते ।
तेवी आपण जालेनि अद्वैतें । नाशे भय ॥ ८१ ॥

**सत्वशुद्धिः** सत्स्वरूप रुचलेपणें । बुद्धीचें जें अनन्य होणें ।
ते सत्वशुद्धि—म्हणे । केशिहता ॥ ८२ ॥

**दानः**— आता देहवाचाचित्तें । यथासंपन्नें वित्तें ।
वैरी जालियाही आर्तातें । न वचणें जें ॥ ८३ ॥
फुलीं फळीं छाया । मुळीं पत्रींही धनंजया ।
वाटेचा न चुके आलिया । वृक्ष जैसा ॥ ८४ ॥

**स्वाध्यायः**- तैसा प्रतिपाद्य जो ईश्वर । तो होवयालागीं गोचर ।
श्रुतीचा निरंतर । अभ्यास करणें ॥ ८५ ॥

तें द्विजांसींच ब्रह्मसूत्र । येरां स्तोत्र का नाममंत्र ।
आवर्तणें पवित्र । पावावया तत्व ॥ ८६ ॥

**तपः**— स्वरूपाचिया प्रसरा—। लागी प्राणेंद्रियशरीरा ।
आटणी करणें जें वीरा । तेचि तप ॥ ८७ ॥

**अहिंसा**:—जगाचिया सुखोद्देशें । शरीरवाचामानसें ।
राहाटणें तें अहिंसे । रूप जाण ॥ ८८ ॥

**सत्य**:— श्रवणसुखचतुर । परिणमोनि साचार ।
बोलणें जें अविकार । तें सत्य येथें ॥ ८९ ॥

**दयाः**— पायीं काटा नेहटे । तव व्यथा जीवी उमटे ।
तैसा पोळे सकटें । पुढिलांचेनि ॥ ९० ॥
किंबहुना तृषितालागी । पाणी आरायिलें असे जगी ।
तैसे दु:खिताचे सेलभागी । जिणें जयाचें ॥
तो पुरुष वीरराया । मूर्तिमत जाण दया ॥ ९१ ॥

**संतः**—आत्मज्ञानें चोखडी । सत हे माझीं रूपडी ॥ ९२ ॥

**वैराग्यः**—वमिलिया अन्ना । लाळ न घोटी रसना—
नाराचांची आथरुणें । पूयपकी लोळणें—
तें हें विषय वैषयवैराग्य । आत्मलाभाचें भाग्य ।
येणें ब्रह्मानदायोग्य । होती जीव ॥ ९३ ॥

**वैराग्यः**—ससारा या समस्ता । जाणिजे जै अनित्यता ।
तै वैराग्य दवडिता । पाठीं लागे ॥ ९४ ॥
विरक्तीवांचूनि कही । ज्ञानासी तगणें नाही ।— ॥ ९५ ॥

**मन:शुद्धिः**—मोक्ष देईल ज्ञान । येथ कीर नाहीं आन ।
परी तेंचि थारे ऐसें मन । शुद्ध होआवे ॥ ९६ ॥

**अनहंकारः**-हें कर्म मियां केलें । कीं माझेनि आदरिलें सिद्धी गेलें ।
ऐसें नाहीं ठेविलें । वासनेमाजी ॥ ९७ ॥

थोरपण पऱ्हा साडिजे ! व्युत्पत्ति आघवी विसरिजे ।
जै जगा धाकुटें होइजे । तै जवळिक माझी ॥ ९८ ॥

**ब्रह्मीं माया कशी?** उदकी जाली बाबुळी । ते उदकातें जैसी झाकोळी ।
का वायाचि आभाळीं । आकाश लोपे ॥ ९९ ॥
स्वप्न लटिकें म्हणों ये । परि निद्रावशें बाणलें होये ।--
हें असो डोळियाचे । डोळांचि पडळ रचे ।--

**जगः**--जेतुलें पाचभौतिक घडतें । जें नामरूपा सापडतें ॥
गुणत्रयान्या पडतें । कामठा जें ॥ १०० ॥

**पुरुषोत्तमः**-अज्ञान ज्ञाने नेलें । आपणही वस्तु देऊनि गेलें ।
ऐसें जाणणेनिवीण उरलें । जाणतें जें ॥ १०१ ॥
अर्जुना ऐसियाण्री । परमात्मा शब्दवरी ।
सूचिजे गा अवधारी । पुरुषोत्तम ॥ १०२ ॥

**ब्रह्मसुखः**--मोटकें गुरुमुखें उदैजत दिसे ।
आणि हृदयी स्वयमचि असे ॥ १०३ ॥

**शम.**-- बुद्धीचा उपरम । तया नाव बोलिजे शम ॥ १०४ ॥

**तपः**-- ईश्वरनिर्णय चित्ती । वाहणें सदा ॥ १०५ ॥

**शौचः**-- मन भावशुद्धी भरलें । आग क्रिया अळकारिलें ।
ऐसें सबाह्य जियालें । साजिरें जें का ॥ १०६ ॥

**ज्ञानः**-- तैसें शास्त्राचारें तेणें । ईश्वराचि येक पात्रणें ।
हें फुडें जें का जाणणे । तें येथ ज्ञान ॥ १०७॥

**विज्ञानः**- तरी सत्वशुद्धिचिये वेळे । शास्त्रें का ध्यानबळें ।
ईश्वरतत्वींचि मिळे । निष्टकबुद्धी ॥ १०८ ॥

**शौर्यः**--भानु हा तेजें । नापेक्षी जेविं विरजें ।
का सिंहें न पाहिजे । जावळिया ॥ १०९ ॥
आदित्याची झाडें । सदा सन्मुख सूर्याकडे ।
तेंवी समोर शत्रूपुढें । होणें जें का ॥ ११० ॥

**सेवा:—** स्वामीचिया मनोभावा। न चुकिचे होचि परमसेवा ॥१११॥

**स्थितप्रज्ञ:—**जो हरिखशोकरहित। जो आत्मबोधभरित।
तो जाण पा प्रज्ञायुक्त। धनुर्धरा ॥ ११२ ॥
तो अहकारातें दवडुनी। सकळ काम साडुनी।
विचरे विश्व होऊनी। विश्वामाजी ॥ ११३ ॥

**स्वराज्य:** – ब्रह्मैक्यासारिखें। स्वराज्य येता जवळिके।
झळबत आहे हरिखें। तिन्ही लोक ॥ ११४ ॥

**निष्काम आत्मप्रेम:—**निरुपचारा प्रेमा। विषय होय जें प्रियोत्तमा ॥
तें दुजें नव्हे कीं आत्मा। ऐसेंचि जाणावें ॥ ११५ ॥

**ज्ञान:—** जयाचेनि उजाळें। उघडती बुद्धीचे डोळे।
जीव दोंदावरी लोळे। आनदाचिये ॥ ११६ ॥
जें ससारातें उन्मूळी। सकल्पपक प्रक्षाळी।
अनावरातें वेंटाळी। ज्ञेयातें जें ॥ ११७ ॥
ऐसें जें ज्ञान। पवित्रैकनिधान।... ॥ ११८ ॥
तरी परमात्मा ऐसें। जे एक वस्तु असे।
तें जया दिसे। ज्ञानास्तव ॥ ११९ ॥

**अज्ञान:—**ते एकवाचूनि आनें। जियें भगस्वर्गादि ज्ञानें।
तें अज्ञान ऐसा मनें। निश्चय केला ॥ १२० ॥

**ब्रह्मत्व:—**किडाळाचा दोष जाये। तरी पंधरें तेंचि होये।
तैसें जीवा ब्रह्मत्व आहे। सकल्पलोपीं ॥ १२१ ॥

**सौजन्य:—**आपुलेनि गुणें। पुढिलाचें उणें।
फेडूनिया पाहणें। तयाकडे ॥ १२२ ॥

**क्षमा:—** सर्वही साहातिया गरिमा। गर्वा नये तेचि क्षमा।
जैसा देह वाहोनि रोमा। वाहणें नेणे ॥ १२३ ॥

**शौच:—** आंगी निष्काम आचार। जीवीं विवेक साचार।

तो सबाह्य घडला आकार । शुचित्वाचाचि ॥ १२४ ॥

**परोपकारः**--कां फेडीत पाप ताप । पोखीत तीरींचे पादप ।
समुद्रा जाय आप । गंगेचें जैसें ॥ १२५ ॥
कां जमाचें आंध्य फेडित । श्रियेचीं राउळें उघडित ।
निघे जैसा भास्वत । प्रदक्षिणे ॥ १२६ ॥
तैसीं बाधलीं सोडित । बुडालीं काढित ।
सांकडीं फेडित । आर्तांचिया ॥ १२७ ॥
किंबहुना दिवसराती । पुढिलाचें सुख उन्नती
आणित आणित स्वार्थी । प्रवेशिजे ॥ १२८ ॥

**संन्यासीः**—मी माझें ऐसी आठवण । विसरलें जयाचें अतःकरण ।
पार्था तो संन्यासी जाण । निरतर ॥ १२९ ॥

**शुचित्वः**—आग मन जैसें । कापुराचें ! ।–
आंतबाहेरी एके पाडे । सूर्य जैसा ।–
बाहेरीं कर्में क्षाळिला । भीतरीं ज्ञानें उजळला ।
इही दोहींपरी आला । पाखाळा एका ॥ १३० ॥

**स्थैर्यः**— आल्या गेल्या उर्मी । नव्हे गजबज मनोधर्मी ॥ १३१ ॥
देह तरी वरिचिलीकडे । आपुल्यापरी हिंडे ।
परी बैसका न मोडे । मानसीची ॥ १३२ ॥

**सुखः**— तें आत्मयाचिये भेटी । जीवासि होय ॥ १३३ ॥

## सामान्य सुभाषितें.

१३४ अर्जुना समत्व चित्ताचें । तेंचि सार जाण योगाचें ।
१३५ अयुक्तपण मनाचें । तेंचि सर्वस्व दुःखाचें ।
याकारणें इद्रियांचें । दमन कीजे ॥
१३६ जव निरार्तता नाहीं । तव व्यापार असे पाहीं ।
१३७ तैसे गा पार्था । जे विमुख या परमार्था ।
तयासी भाषण सर्वथा । करावेंना ॥

१३८ वैराग्याची शींव न देखती । विवेकाची भाषा नेणती ।
ते मूर्ख केवीं पावती । मज ईश्वरातें ॥

१३९ मनुष्यजात सकळ । हें स्वभावता भजनशीळ ।

१४० कर्म म्हणिजे स्वभावें । जेणें विश्वाकार संभवे ।

१४१ साच आणि लटिकें । विरुद्ध आणि निकें ।
संशयी तो नोळखे । हिताहित ॥

१४२ म्हणऊनि सशयाहूनि थोर । आणीक नाही पाप घोर ।
हा विनाशाची वागुर । प्राणियांसी ॥

१४३ रोग जाय दुधेंसाखरें । तरी निंब कां पियावा ? ॥

१४४ देखे रोगातें जिणावें । तरी औषध देयावें ।
परी तें अतिरुच्य व्हावें । मधुर जैसें ॥

१४५ हें असो वयसेचिये शेवटी । एकचि विये वांझोटी ।
मग ते मोहाची त्रिपुटी । नाचों लागे ॥

१४६ आवडी आणि लाजवी । व्यसन आणि शिणवी ।
पिसें आणि न भुलवी । तरी तें काई ? ॥

१४७ सुमन आणि शुद्धमती । जो अनिंदक अनन्यगती ।
पै गा गौप्यही तयाप्रती । चावळिजे सुखें ॥

१४८ वासरूं देखिलियाचि साठीं । धेनु खडबडोनि मोहें उठी ।
मग स्तना मुखाचिये भेटी । काय पान्हा धरे ? ॥

१४९ वत्स धालियाहीवरी । धेनु न वचावी दुरी ।
अनन्यप्रीतीची परी । ऐसी आहे ! ॥

१५० स्वभाव मायबापांचा । अपत्य बोले जरी बोबडी वाचा
तरी अधिक तयाचा । संतोष आथीं ॥

१५१ बीज मोडे झाड होये । झाड मोडे बीजीं सामाये ।
ऐसेनि कल्पकोडी जाये । परि जाती न नाशे ॥

१५२ अनादिसिद्ध हें आघवें । होत जात स्वभावें ।
१५३ या उपाधिमाजी गुप्त । चैतन्य असे सर्वगत ।
सें तत्वज्ञ सतत । स्वीकारिती ।
१५४ सांगें पूयपकीचे किडे । काय चिळसी घेती ? ॥
१५५ आघवी गोठी होईल । मुकयाबहिरयाची ॥
१५६ पव्हण्याहूनि पायउतारा । सोहपा जैसा ॥
१५७ अग्निसेवा न सांडिता । कर्माची रेखा नोलांडिता
आहे योगसुख स्वभावतां । आपणपांचि ॥
१५८ दर्शनाचिये प्रशस्ती । पुण्यपुरुष ॥
१५९ अनियतासी सर्वथा । योग्यता नाहीं ॥
१६० साम्यापरौती जगीं । प्राप्ति नाही ॥
१६१ देखा बाळकाचिया धणी धाइजे । कां शिष्याचेनि
जाहलेपणें होइजे । हें सद्गुरुचि एकलेनि जाणिजे
का प्रसवतिया ॥
१६२ मरणी जया जें आठवे । तो तेचि गतीतें पावे ॥
१६३ तेंवी सदभ्यासें निरतर । चित्तासि परमपुरुषाची
मोहर । लावी मग शरीर । राहो अथवा जावो ॥
१६४ श्रोता दुश्चित तरी वितुळे । माडला रस ॥
१६५ आइके जेथ वाचा विसवे । ते साधुकथा ॥
१६६ स्वर्गा पुण्यात्मकें पापें येइजे । पापात्मकें पापें नरका
जाइजे । मग मातें जेणें पाविजे । तें शुद्ध पुण्य ॥
१६७ हे काम क्रोध पाहीं । जयांतें कृपेची सांठवण नाहीं
हे कृतांतान्या ठायीं । मानिजती ॥
१६८ भिंगारीं दीप ठेविला । बाहेरि फांके ! ॥
१६९ अवयव तरी आन आन । परी एकेचि देहीचे !

१७० वांझेचिया लेका । कैची जन्मपत्रिका ? ।

१७१ स्वप्नीचें राज्य का मरण । नोहे हर्षशोकासी कारण ।

१७२ स्वप्नीचिया घाया । औषध चेवोचि धनजया ।
तेवीं अज्ञानमूळा यया । ज्ञानचि खड्ग ॥

१७३ अनात्मवर्गनीर । सांडूनि आत्मरसाचें क्षीर ।
चरतााति सविचार । राजहस ॥

१७४ हें असो स्वातीचें उदक । शुक्तीं मोती व्याळीं विख ।
तैसा सज्ञानासी मी सुख । दु ख तों अज्ञानासी ॥

१७५ लाटणेंऐसा न लवे । पाथर तेविं न द्रवे ।–

१७६ थोरपण पऱ्हां सांडिजे । व्युत्पत्ति आघवी विसरिजे ।
जैं जगा धाकुटें होइजे । तै जवळिक माझी ॥

१७७ इये मृत्युलोकीचें उफराटें ।

१७८ तरी झडझडोनि वहिला निघ । इये भक्तीचिये
वाटा लाग । मग पावसी अव्यंग । निजधाम माझें ।

१७९ हा गा सूर्य काय शिळा ? । अग्नि म्हणों येत आहे वोवळा ? ।
का नित्य वाहतया गगाजळा । पारसेपण असे ?

१८० रोगें दाटला आणि उदासपण । वोखदेसी ! ॥

१८१ काय राखोंडी फुकता । दीप लागे ? ।

१८२ विषयाचें जें सुख । तें केवळ परमदु ख ।

१८३ कैची सुखनिंद्रा आंथरुणीं । इगळाऱ्या ? ।

१८४ पाहे पा दुभतेयाचिया आशा । जग धेनूसि करितसे फासा ।
परी दोरेवीण कैसा । वत्साचा बळी ! ॥

१८५ सिद्ध असता का निमावें । साधनवरी ? ।

———

# अमृतानुभव.



## १ शिवशक्तींची एकरूपता.

ऐसीं इयें निरुपाधिकें । जगाची जियें जनकें ।
तियें वंदिलीं मियां मूळिकें । देवोदेवी[1] ॥ १ ॥
जो प्रियुचि प्राणेश्वरी । उलथे आवडीचिया सरोभरी ।
चारुस्थळी एकाहारी । एकांगाचि ॥ २ ॥
कैसी स्वसुखाची आळुकी । जे दोनीपण मिळोनि एकी ।
नेदितीचें कवतुकीं । एकपण फुटो ॥ ५ ॥
हा ठावोवरी वियोगभेडे[5] । जे बाळ जगाएवढें ।
वियाली परी न मोडे । दोघुलेपण ॥ ६ ॥
जया एके सत्तेचें बैसणें । दोघां एका प्रकाशाचें लेणें ।
जे अनादि एकपणें । नांदती दोघे ॥ ८ ॥
कैसा मेळु आला गोडिये । दोघे न माती जगीं इये ।

---

१ नाना ब्रह्मांडांना निर्माण करणारे जगाचे आईबाप प्रकृतिपुरुष किंवा शिवशक्ति. २ आवडीच्या भरात तो प्रिय ( शिव ) स्वयेंच प्राणेश्वरी ( शक्ति ) होऊन म्ह० दृश्य विषय होऊन आपणासमोर ठाकला. दोघांना अधिष्ठान एक ब्रह्मच ३ आवड, छंद. ४ स्वसुख भोगण्यासाठीं दोनपण दाखवितात पण एकपण मोडूं देत नाहींत. ५ तिसरा कोणी मध्येंच शिरकल्यानें वियोग होईल तो न व्हावा म्हणून त्याना हें जगडबररूप बाळ झालें तरी त्याचें अन्योन्य प्रेम कमी झालें नाहीं ? ' विभक्तमप्येकसुतेन तत्तयोः परस्परस्योपरि पर्यचीयत ' ( रघुवंश ३-२४ ). ६ दोघांची बैठक एक म्ह० मूल अधिष्ठान ब्रह्म-एका ब्रह्मचैतन्यावर अर्धनारीनटेश्वर किंवा शिवभक्ति हे नांदत आहेत. ७ योग.

की परमाणूहीमाजी उवाये[1] । मांडिली आहाती ॥ ११ ॥
स्त्रीपुरुषनामभेदें । शिवपण एकलें नांदे ।
जग सगळें अधार्धे- । पणें[2] जिहीं ॥ १७ ॥
दो दांडी[3] एक श्रुती । दोहीं फुलीं एक द्रुती[4] ।
दोहों दिवीं दीप्ती । एकीचि जेवीं ॥ १८ ॥
दो ओठी एकी गोठी । दो डोळा एकी दिठी ।
तेवी दोघी जिहीं सृष्टी । एकीचि जे ॥ १९ ॥
दाऊनि दोनीपण । एकरसाचें आरोगण[5] ।
करीत आहे मेहुण । अनादि जें ॥ २० ॥
गोडी आणि गुळु । कापूर आणि परिमळु ।
निवडू जाता पागुळु[6] । निवाडु होय ॥ २३ ॥
जैसी सूर्य मिरवे प्रभा । प्रभे सूर्यत्वचि गाभा ।
तैशी भेद गिळित शोभा । एकाचि जे ॥ २५ ॥
ऐश्वर्येंशी ईश्वरा । जियेचे अंग संसारा ।
आपण होऊनि उभारा । आपणचि जे ॥ २९ ॥
पतीचेनि अरूपपणें । लाजोनि अंगाचें मिरवणें ।
केलें जगाएवढें लेणें । नामरूपाचें ! ॥ ३० ॥
निदेलेनि भ्रतारें । जे विये चराचरें ।
जियेचा विसावला नुरे । आबुलेपणही ॥ ३७ ॥
जियेचेनि अंगलगें । आनंद आपणा आरोगू लागे ।
सर्वभोक्तृत्वपणही नेघे । जियेवीण कांहीं ॥ ३९ ॥
जैसी समीरेसगट गती । कां सोनियासगट कांती ।

---

१ आनंदानें परमाणूतही दोघे राहतात, त्यांना संकोच होत नाहीं. २ अर्धार्धपणानें. ३ टिपऱ्या दोन पण नाद एक ४ परिमळ. ५ अत्यानंदाचें भोजन. ६ वेगळेपणानें जाणता येत नाहीं.

तैसी शिवेशी शक्ती । आवघीच जे ॥ ४१ ॥
का कस्तूरीसगट परिमळु । कां उष्मेसगट अनळु ।
तैसा शक्तीशी केवळु । श्रीशिवूचि जो ॥ ४२ ॥
सिंधु आणि गंगेची मिळणी । स्त्रीपुरुषनामाची मिरवणी ।
दिसतसे तरी काय पाणी । द्वैत होईल ? ॥५४॥ ( प्रकरण १ )

## २ शब्दमंडण व शब्दखंडण.

बाप उपेगी वस्तु शब्दु । स्मरणदानी प्रसिध्दु ।
अमूर्तांचा विशदु । आरिसा नोहे ? ॥ १ ॥
विधिनिषेधाचिया वाटा । दाविता हाचि दिवटा ।
बध मोक्षकळिकटा । शिष्ट हाचि ॥ ५ ॥
जीव देहे बांधिला । तो बोलें येकें सुटला ।
आत्मा बोलें भेटला । आपणपया ॥ ८ ॥
प्रवृत्ति आणि निवृत्ति । विरुद्धा इया हाता धरिती ।
मग शब्देंचि चालती । एकलेनि ॥ १० ॥
सहाय आत्मविद्येचें । करावया आपण वेचे ।
गोमटें काय शब्दाचें । एकैक वानू ? ॥ ११ ॥
किंबहुना शब्दु । स्मरणदानीं प्रसिध्दु ।
परी ययाही सबधु । नाही येथें ॥ ६ ॥

---

१ शब्द हा मोठी उपयोगी वस्तु आहे. २ जीवाला स्वस्वरूपाचें स्मरण करून देणारा, ' तत्वमसि ' या महावाक्यानें आत्मरूपाची जागृति देणारा. ३ जीवाला आत्मरूप आरशात स्वतःच्या मुक्ततेची ओळख पटते. ४ मशाल. ५ बधमोक्ष यांच्या हद्दी ठरविणारा, कलह मिटविणारा, न्यायाधीश. ६ देहाभिमानानें. ७ शब्दाचा हात धरितात. ८ विवेकवैराग्यादि किंवा श्रवणमननादि हा निवृत्तिमार्ग आणि विहित व लौकिक कर्में हा प्रवृत्तिमार्ग हे दोनी मार्ग शब्द म्ह. वेदच दाखवितो. ९ मरतो, शब्द निमाल्यावरच आत्मविद्या प्राप्त होते.

आत्मया बोलाचे । कांहीच उपेगा न वचे[1] ।
स्वसंवेद्या कोणाचें । ओझें[2] आथी ? ॥ १३ ॥
सूर्यो रात्री पा नेणे । मा दिवो काय जाणे ?[3]।
तेवीं स्मरणास्मरणें । आपण वस्तु ॥ १७ ॥
एव स्मरणास्मरण नाहीं । तरी स्मारकें काज काई ?[4] ।
म्हणोनि इये ठायीं । बोलू न सरे ॥ १८ ॥
आत्मा सच्चिदानदु । आपणया आपण सिध्दु ।
आता काय दे शब्दु । तयाचें तया ? ॥ ९३ ॥
कोणाही प्रमाणाचेनि हातें । वस्तु घे ना नेघे आपणयातें ।
जे स्वयें आइतें । घेणें ना न घेणें ॥ ९४ ॥
आता अविद्या नाहींपणें । नाहीं तये नासणें ।
आत्मा सिद्धचि मा कोणें । काय साधावें ? ॥ ९७ ॥
एवं माध्यान्हीची दिवी । तम धाडी ना दिवो दावी[6] ।
तैसी उभयता पदवी । शब्द जाली ॥ ९६ ॥ ( प्र० ६ )

## ३ अविद्येचा निरास !

अविद्या येणें नावें । मी विद्यमानचि नव्हे ।
हे अविद्याचि स्वभावें । सांगतसे ॥ ३८ ॥
ऐसी अविद्या नासावी । हें वाहेल जो जीवीं ।
तेणें साली काढावी । आकाशाची ! ॥ ४७ ॥
तेणें शेळी गळां दोहावी । गुडघाडोळां[7] वास पाहावी ।
वाळवूनि काचरी करावी । साजवेळेची ॥ ४८ ॥

---

१ उपयोगी पडत नाही. २ उपकाराचा भार. ३ आत्मसूर्याच्या ठिकाणीं ' आठव ना विसर '. ४ स्मरणदाता शब्द पाहिजेच कशाला ? ५ कोणत्याही प्रमाणानें स्वयसिद्ध आत्मा सिद्ध वा असिद्ध होत नाहीं. ६ दिवस. ७ गुडघ्याच्या डोळ्यांनीं.

जाभई वाटूनि रसू । तेणें काढावा बहुवसु ।
कालवूनि आळसू । मोदळी पाजावा ॥ ४९ ॥
तो पाटा पाणी परतु । पडली साउली उलथु ।
वारयाचे तांथु । वळू सुखें ॥ ५० ॥
तो बागुलातें मारू । प्रतिबिंब खोळे[3] भरू ।
तळहातीचा विंचरू । केश सुखें ॥ ५१ ॥
घटाचें नाहींपणें फोडू । गगनाची फुलें तोडू ।
सशियाचे मोडू । शिंग सुखें ॥ ५२ ॥
तो कापराची मॅशी करू । रत्नदीपीं काजळ धरू ।
वांझेचें लेंकरू । पर्णू[6] सुखें ॥ ५३ ॥
अहो ! हें किती बोलावें । अविद्या रचिली अभावें ।
आता काय नासावें । शब्दें येणें ? ॥ ५५ ॥ ( प्र० ६ )

## ४ जग चिद्विलास.

यालागी एकें चिद्रूपें । आपणपया आपणपें ।
देखिजे, का आरोपें । काय काज ? ॥ १६५ ॥
किळेचें पांघरूण । आपजेंवी रत्ना कोण ? ।
कीं सोनें ले सोनेपण । जोडजोडू ? ॥ १६६ ॥
चदन सौरभ वेढी ? । कां सुधा आपणया वाढी ? ।

---

१ धड, शिरोहीन देह २ ततु, दोरे. ३ पदरात बांधून घ्यावें. ४ अभाव, घटाभाव. ५ शाई. ६ विवाह करू. ७ नाही त्या अविद्येचें खडण करू पाहणें वेडेपण होय. ८ ब्रह्मावर विश्व आरोपित आहे, हा अध्यारोप आहे; विश्व अज्ञान आहे-मिथ्या आहे असें कोणी मानतात पण याचें खडण करून ज्ञानोबाराय 'जग आघवी वस्तुप्रभा आहे–' तो चिद्विलास आहे असें सागतात. आपले आपल्या ठिकाणी नित्य स्फुरद्रूप असणें हा चैतन्याचा स्वभाव आहे ९ कीळ, कील = कांति, तेज, प्रकाश. १० रत्नावर तेजाचें पांघरूण कोण घालते ? सोन्यानें सोनेंपण कमावून आणलें आहे काय ? तें स्वत:सिद्ध आहे.

की गूळ चाखे गोडी । ऐसें आथी कें[1] ? ॥ १६७ ॥
नाना ते लता । आपुले वेली गुडाळता ।
घर करी न करिता । जयापरी ॥ १६९ ॥
का प्रभेचा उभेळा[2] । दीप प्रकाशें संचला ।
तैसा[3] चैतन्यें गिंवसिलों[4] । चिद्रूप स्फुरे ॥ १७० ॥
द्रष्टा दृश्य ऐसें । दोनी अळुमाळ[5] दिसे ।
तेंही परस्परानुप्रवेशें[6] । कांहीना कीं ॥ १७४ ॥
सिंधू पूर्वापर[7] । न मिळती तवचि सागर ।
मग एकवट नीर[8] । जैसें होय ॥ १८१ ॥
दोनी विशेष गिळी । ना निर्विशेषातें उगळी ।
उघडी झापी एकी डोळीं । वस्तूची हे ॥ १८३ ॥
पातया पातें मिळे । की द्रष्टृत्वें सैधें[9] पघळे ।
तिये उन्मळिता मावळे । नवलावो हा ॥ १८४ ॥
देखोनि कां न देखोनी । ऐक्य का नाना होऊनी ।
परि हा–येणें वांचूनी । देखणें असे ? ॥ २२३ ॥
आरशानें हो कां दाविलें । तऱ्ही मुखाचि मुखें देखिलें ।
तो न दावी तऱ्ही सचलें । मुखाचि मुखी ॥ २२७ ॥
तैसें दाविते नाही । तरी हाचि ययाऱ्या ठायीं ।
ना दावी तऱ्हीही । हाचि यया[10] ! ॥ २२५ ॥

---

१ आहे काय ? २ उठाव. उभारा. ३ त्याप्रमाणें हा नामरूपात्मक दृश्य जगदाभास हें चैतन्याचेंच स्फुरण आहे, जग चिद्विलास आहे. ४ व्यापलेला. ५ किंचित भासमात्र. ६ एकमेकात नाहींसा होतो, दोनी परस्पर सापेक्ष अर्थात् मिथ्या आहेत, चैतन्यमात्र सत्य आहे. ७ पूर्व समुद्र, पश्चिम समुद्र. ८ उदक मात्र. ९ मीलनात व उन्मीलनात, सकोचविकासात–विश्वाचे उत्पत्तिप्रलय होतात. दृश्यदृष्टा उभे राहतात, पण चैतन्य मात्र सत्य आहे. ( ज्ञानेश्वरी १७–५ पहा. ) १० एकदम दृश्य फैलावतें.

कां रायातें तूं रावो । ऐसा दाविजे प्रत्ययो ।
तऱ्ही ठायेठावो[1] । राजाचि असे ॥ २२७ ॥
नातरी रायपण राया । नाणिजे कीं प्रत्यया[2]।
तऱ्ही काही उणें तया- । माजी असे ? ॥ २२८ ॥
तैसें दावितां न दाविता । हा ययापरोता ।
चढे ना तुटे, आइता । असतचि असे ॥ २२९ ॥
म्हणोनी स्वयप्रकाशा यया । आपणपे देखावया ।
निमित्त हा वाचोनिया । नाहीच मा ॥ २३४ ॥
लेणें आणि भागारें । भागाराचि एक स्फुरे ।
का जेथें दुसरें । नाहींच म्हणौनी ॥ २३५ ॥
जळतरंगीं दोन्ही । जळावाचूनि नाहीं ।
म्हणौनी आन काहीं । नाहीं ना नोहे ॥ २३७ ॥
आत्मा दृश्यपणें दिसो । का द्रष्टा होऊनि असो ।
परी हा वाचूनि अतिसो । नाही येथें ॥ २४० ॥
गंगा गंगापणें वाहो । कीं सिंधु होऊनि राहो ।
परी पाणीपण नवलावो । न देखों की ॥ २४१ ॥
थिजावें कीं विघरावें । हें अप्रयोजक आघवें ।
घृतपण नव्हे । अनारिसें ॥ २४२ ॥
तैसें दृश्य का द्रष्टा । या दोनी दशा वांझटा ।
पाहता एकीकाष्ठां । स्फूर्तिमात्र तो ॥ २४४ ॥
कल्लोळी जळ घातलें । सोनेंन सोनें पाघुरलें ।
दिठीचे पाय गुंतले । दिठीसीचि ॥ २४७ ॥

---

१ जागच्या जागीं, आपल्या ठिकाणीं. २ दृश्य हें आत्म्याचें द्रष्टेपण व्यक्त करो वा न करो, हा दृश्यद्रष्टेपणा स्वयभू आहे. ३ यावांचून दुसरा. ४ दुसरा. ५ भेद. ६ कर्मा महत्वाचे. ७ व्यर्थ. ८ पराकाष्ठेनें, अतिशयित्वानें.

गूळ गुळें परिवडिलें[1] । मेरू सुवर्णें मढिलों[2] ।
कां ज्वाळा गुंडाळिला । अनळु जैसा ॥ २४९ ॥
येथें बोल्णें न साहे । जाणणें न समाये ।
अनुभव न लाहे । आगीं मिरवूं ॥ २५२ ॥
भलतैसा फाके । परी येकपणा न मुके ।
नाना सकोच तरी आसिकें[3] । हाचि आथी ॥ २५७ ॥
म्हणोनि इये आत्मलीळे । नाही आन काटाळे[4] ।
आता ययाचिया तुळे । हाचि यया ॥ २६६ ॥
सूर्य सूर्याचिएवढा । चंद्र चंद्राचि सागडा ।
ना दीपाचिया पडिपाडा । ऐसा दीपू ॥ २८८ ॥
प्रकाशू तो प्रकाश्य कीं । यासी न वचे, घेई चुकी ।
म्हणोनि जग असिकी । वस्तुप्रभा ॥ २८९ ॥
विभाति यस्य भासा । सर्वमिद हा ऐसा ।
श्रुति काय वायसां । ढेकर[5] देती ? ॥ २९० ॥ ( प्र० ७ )

## ५ आम्हीं ज्ञानाज्ञानातीत आहों !

तैसें आमुचेनि नावें । अज्ञानाचें ज्ञानही नव्हे ।
आम्हालागीं गुरुदेवें । आम्हींच[7] केलों ॥ १ ॥
आमुची करवे गोठी । ते जालीच नाहीं वार्क्सृष्टी[8] ।
आमुतें देखे दिठी । ते दिठीच नव्हे ॥ ५ ॥
किंबहुना श्रीनिवृत्ती । ठेविलों असों जये स्थिती ।
ते काय देऊं हातीं । वाचेचिया ? ॥ ८ ॥
अज्ञानाचा प्रवर्तु[9] । नाहीं जया गावाआतु ।

---

१ माखला. २ मढविला. ३ सगळा. ४ काटा, तुलना. ५ व्यर्थ. ६ आत्मतृप्तीचें उद्गार. ७ चित्स्वरूप. ८ शब्दरचना. वेद ' नेति नेति ' म्हणतात ९ प्रवेश, प्रवृत्ति.

तेथें ज्ञानाची तरी मातु । कोण जाणे ! ॥ १० ॥
रात्री म्हणोनि दिवे । पडती कीं लावावे ।
बांचूंनि सूर्यासवें । सिणणें होय ॥ ११ ॥
म्हणोनि अज्ञान नाहीं । तेथेंचि गेलें ज्ञानही ।
आतां निमेषोन्मेषां दोहीं । ठेली वाट ॥ १२ ॥
एवं ज्ञानाज्ञान दोनी । पोटीं सूनि अहनी ।
उदेला चिद्गगनीं । चिदादित्य हा ॥ १९ ॥ ( प्र० ८ )



---

१ वार्ता. २ पण सूर्य असताना दिवे लावले तर तो शीणच. ३ ज्ञान अज्ञान साक्षेप म्हणून. ४ उघडझापीला, ज्ञानाज्ञानाला, राहिला नाहीं. अवकाशच. ५ घालून.

# संतमंडळाचे अभंग.



## ज्ञानेश्वरांचा हरिपाठ.

१

देवाचिये द्वारीं उभा क्षणभरीं । तेणें मुक्ति चारी साधियेल्या ॥ १ ॥
हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा । पुण्याची गणना कोण करी [२] ॥ २ ॥
असोनि संसारी जिव्हे वेगु करी । वेदशास्त्र उभारी बाह्या [२] सदा ॥ ३ ॥
ज्ञानदेव म्हणे व्यासाचिये खुणें । द्वारकेचे राणे पाडवा-घरी ॥ ४ ॥

२

चहूं वेदीं जाण साहिशास्त्रीं कारण । अठराहि पुराणें हरिसी गातीं ॥ १ ॥
मंथुनी नवनीता [३] तैसें घे अनंता । वाया व्यर्थ कथा सांडी मार्गु ॥ २ ॥
एक हरी आत्मा जीवशिवसमा [४] । वायां तूं दुर्गमा [५] न घालीं मन ॥ ३ ॥
ज्ञानदेवा पाठ हरि हा वैकुंठ । भरला घनदाट हरि दिसे ॥ ४ ॥

३

त्रिगुण असार निर्गुण हें सार । सारासार [६] विचार हरिपाठ ॥ १ ॥
सगुण निर्गुण गुणाचें अगुण । हरीवीण मन व्यर्थ जाय ॥ २ ॥
अव्यक्त निराकार नाहीं त्या आकार । जेथोनी चराचर हरिसी भजे ॥ ३ ॥

१ सत्संग व गुरुसेवा हेंच देवाचें द्वार 'महत्सेवा द्वारमाहुर्विमुक्तेः' असे भागवतात वचन आहे. २ बाहु पसरून. ३ वेदशास्त्रपुराणाचे मथन करिता हरि हाच त्यातील सार आहे ४ पिंडीं व ब्रह्मांडीं जीव व शिव या उभय रूपानें नांदणारा एक हरिच आहे. ५ इतर कठिण साधनात. ६ सारासार विचार पाहता हरिभजन हेंच सार ठरतें.

ज्ञानदेवा ध्यानीं रामकृष्ण मनीं । अनत जन्मोनी पुण्य होय ॥ ४ ॥

४

भावेंवीण भक्ति भक्तीवीण मुक्ति । बळेंवीण शक्ति बोलों नये ॥ १ ॥
कैसेनि दैवत प्रसन्न त्वरीत । उगा राहें निवांत शिणसी वाया ॥ २ ॥
सायास करीसी प्रपच दिननिशीं । हरीसी न भजसी कोण्या गुणें ॥ ३ ॥
ज्ञानदेव म्हणे हरिजप करणें । तुटेल धरणें प्रपंचाचें ॥ ४ ॥

५

योगयागविधी येणें नोहे सिद्धी । वायाचि उपाधी दभधर्म ॥ १ ॥
भावेंवीण देव नकळे निःसदेह । गुरुविण अनुभव कैसा कळे ? ॥ २ ॥
तपेंविण दैवत दिधल्यावीण प्राप्त । गुजेवीण हित कोण सागे ?[1] ॥ ३ ॥
ज्ञानदेव सागे दृष्टांताची मात[2] । साधूचे सगतीं तरणोपाव ॥ ४ ॥

६

साधुबोध[3] झाला तो नुरोनियां ठेला । ठायींच मुराला अनुभव ॥ १ ॥
कापुराची वाती उजळली ज्योती । ठायींच समाप्ती झाली जैशी ॥ २ ॥
मोक्षरेखे[4] आला भाग्यें विनटला । साधूचा अंकिला हरिभक्त ॥ ३ ॥
ज्ञानदेवा गोडी सगती सज्जनीं । हरि दिसे जनी वनी आत्मतत्वी ॥ ४ ॥

७

पर्वताप्रमाणें पातक करणें । वज्रलेप होणें अभक्तासी ॥ १ ॥
नाहीं ज्यासी भक्ति तो पतित अभक्त । हरिसी न भजत दैवहत ! ॥२॥
अनंत वाचाळ बरळती बरळ । त्या कैसेनि गोपाळ पावे हरी ? ॥ ३ ॥
ज्ञानदेवा प्रमाण आत्मा हा निधान । सर्वां घटीपूर्ण एक नांदे ॥ ४ ॥

८

संतांचे सगती मनोमार्गगती । आकळावा श्रीपती येणें पथें ॥ १ ॥
रामकृष्ण वाचा भाव हा जीवाचा । आत्मा जो शिवाचा राम जप ॥२॥

१ सतगुरुचरणीं दृढ निष्ठा. २ अनुभवाची गोष्ट. ३ तत्वमसि ह्या महावाक्याचें यथार्थज्ञान ४ मोक्षाच्या भूमिकेवर.

एकतत्त्वनाम साधिती साधन । द्वैताचें बंधन न बाधिजे ॥ ३ ॥
नामामृतगोडी वैष्णवां लाधली । योगिया साधली जीवनकळा ॥ ४ ॥
सत्वर उच्चार प्रल्हादीं बिंबला । उद्धवा लाधला कृष्णदाता ॥ ५ ॥
ज्ञानदेव म्हणे नाम हें सुलभ । सर्वत्र दुर्लभ विरळा जाणे ॥ ६ ॥

९

विष्णूवीण जप व्यर्थ त्याचें ज्ञान । रामकृष्णी मन नाहीं ज्याचें ॥ १ ॥
उपजोनि करटा नेणे अद्वैतवाटा । रामकृष्णी पैठा कैसेनि होय ? ॥२ ॥
द्वैताची झाडेणी गुरुवीण ज्ञान । तया कैचें कीर्तन घडेल नामी ? ॥ ३ ॥
ज्ञानदेव म्हणे सगुण हे ध्यान । नामपाठ मौन प्रपचाचें ॥ ४ ॥

१०

त्रिवेणीसंगमीं नाना तीर्थें भ्रमी । चित्त नाहीं नामीं तरि तें व्यर्थ ॥ १ ॥
नामासी विन्मुख तो नर पापिया । हरिवीण धावया नपवे कोणी ॥ २ ॥
पुराणप्रसिद्ध बोलिले वाल्मीक । नामें तिन्ही लोक उद्धरती ॥ ३ ॥
ज्ञानदेव म्हणे नाम जपा हरीचें । परपरा त्याचें कुळ शुद्ध ॥ ४ ॥

११

हरिउच्चारणीं अनत पापराशी । जातील लयासी क्षणमात्रें ॥ १ ॥
तृण अग्निमेळें समरस झालें । तैसें नामें केलें जपतां हरी ॥ २ ॥
हरिउच्चारण मत्र हा अगाध । पळे भूतबाध भेणें तेथें ॥ ३ ॥
ज्ञानदेव म्हणे हरि माझा माझा समर्थ । न करवे अर्थ उपनिषदा ॥ ४ ॥

१२

तर्थिव्रतनियम भावेंवीण सिद्धि । वायाचि उपाधि करिसी जना ॥ १ ॥
भावबळें आकळें येऱ्हवीं नाकळे । करतळीं आंवळें तैसा हरी ॥ २ ॥
पारियाचा रवा घेता भूमीवरी । यत्न परोपरी साधन तैसें ॥ ३ ॥
ज्ञानदेव म्हणे निवृत्ति निर्गुण । दिधलें संपूर्ण माझ्या हाती ॥ ४ ॥

---

१ प्राप्त, स्थिर. २ निरास. ३ पांचभौतिकाची पीडा. ४ पाऱ्याचे कण.

१३

समाधी हरीची समसुखेंवीण । न साधेल जाण द्वैतबुद्धी ॥ १ ॥
बुद्धीचें वैभव अन्य नाहीं दुजें । एक्या केशीराजें सकळ सिद्धी ॥ २ ॥
ऋद्धिसिद्धिनिधी अवघीच उपाधी । जंव त्या परमानंदीं मन नाहीं ॥३॥
ज्ञानदेवीं रम्य रमले समाधान । हरीचें चिंतन सर्वकाळ ॥ ४ ॥

१४

नित्यसत्यामृत हरिपाठ ज्यासी । कळिकाळ त्यासी न पाहे दृष्टी ॥ १ ॥
रामकृष्ण उच्चार अनंतराशी तप । पापाचे कळप पळती पुढें ॥ २ ॥
हरि हरि हरि हा मंत्र शिवाचा । म्हणती जे वाचा तया मोक्ष ॥ ३ ॥
ज्ञानदेवा पाठ नारायणनाम । पाविजे उत्तम निजस्थान ॥ ४ ॥

१५

एकनाम हरी द्वैतनाम[2] दुरी । अद्वैतकुसरी विरळा जाणे ॥ १ ॥
समबुद्धि[3] घेता समान श्रीहरी । शमदमा वैरी[4] हरी झाला ॥ २ ॥
सर्वांघटी राम देहादेही एक । सूर्यप्रकाशक सहस्त्ररश्मीं ॥ ३ ॥
ज्ञानदेवा चित्ती हरिपाठनेमा । मागिलिया जन्मा मुक्त झालों ॥ ४ ॥

१६

हरिनाम जपे तो नर दुर्लभ । वाचेसी सुलभ रामकृष्ण ॥ १ ॥
रामकृष्णनामी उन्मनी साधिली । तयासी लाधली सकळसिद्धी ॥ २ ॥
सिद्धि बुद्धि धर्म हरिपाठीं आले । प्रपंची निवाले साधुसगें ॥ ३ ॥
ज्ञानदेवीं नाम रामकृष्णठसा । येणें दशदिशा आत्माराम ॥ ४ ॥

१७

हरिपाठ कीर्ति मुखें जरी गाय । पवित्रचि होय देह त्याचा ॥ १ ॥
तपाचे[5] सामर्थ्यें तपिन्नला अमृप । चिरंजीव कल्प वैकुंठीं नांदे ॥ २ ॥

---

१ तन्मयता, समरसता झाल्यावाचून. २ द्वैताच्या नामापासून दूर आहे. ३ हरिचैतन्य एक या साम्यबुद्धीनें. ४ शमादि साधनेंही तेथें खुटतात. ५ नामानुसधानरूप तपाच्या बळें.

मातृ पितृ भ्राता सगोत्र अपार । चतुर्भुज नर होऊन ठेले ॥ ३ ॥
ज्ञान गुरुगम्य ज्ञानदेवा लाधलें । निवृत्तीनें दिलें माझ्या हातीं ॥ ४ ॥

१८

हरिवंशपुराण हरिनामसंकीर्तन । हरिवीण सौजन्य नेणे कांही ॥ १ ॥
तया नरा लाधले वैकुंठ जोडलें । सकळही घडलें तीर्थाटण ॥ २ ॥
मनोमार्गें[2] गेला तो तेथें मुकला । हरिपाठी स्थिरावला तोचि धन्य ॥३॥
ज्ञानदेवा गोडी हरिनामाची जोडी । रामकृष्णी आवडी सर्वकाळ ॥४॥

१९

वेदशशास्त्रप्रमाण श्रुतीचें वचन । एक नारायण सार जपा ॥
जप तप कर्म हरीविण धर्म । वाउगाचि श्रम व्यर्थ जाय ॥ २ ॥
हरिपाठें गेले ते निवातचि ठेले । भ्रमर गुंतले सुमनकळिके ॥ ३ ॥
ज्ञानदेवीं मंत्र हरिनामाचें शस्त्र । यमें कुळगोत्र वर्जियेलें ॥ ४ ॥

२०

नामसंकीर्तन वैष्णवाची जोडी । पापें अनंत कोडी गेली त्याची ॥ १ ॥
अनंत जन्मांचें तप एक नाम । सर्व मार्ग सुगम हरिपाठ ॥ २ ॥
योगयागक्रिया धर्माधर्म[3] माया । गेले विलया हरिपाठें ॥ ३ ॥

२१

काळवेळ नाम उच्चारितां नाहीं । दोन्ही पक्ष पाहीं उद्धरती ॥ १ ॥
रामकृष्णनाम सर्व दोषां हरण । जडजीवां तारण हरि एक ॥ २ ॥
हरिनाम सार जिव्हा या नामाची । उपमा त्या दैवाची कोण वानीं? ॥३॥
ज्ञानदेवा सांग झाला नामपाठ । पूर्वजां वैकुंठमार्ग सोपा ॥ ४ ॥

२२

नित्यनेम नामीं ते प्राणी दुर्लभ । लक्ष्मीवल्लभ तयाजवळी ॥ १ ॥

---

१ प्रियतम २ मनाच्या मार्गें. ३ मागें 'ईश्वरशरणता' प्रकरणें पहावें.
४ आईबापाची कुळें, किंवा नाम गाणारा व ऐकणारा.

नारायणहरि नारायणहरि । भुक्ति मुक्ति चारी घरीं त्यांच्या ॥ २ ॥
हरिवीण जन्म तो नर्कचि पै जाणा । यमाचा पाहुणा प्राणी होय ॥३॥
ज्ञानदेव पुसे निवृत्तीसी चाड । गगनाहूनि वाड नाम आहे ॥ ४ ॥

२३

सात पांच तीन दशकाचा मेळा । एकतत्त्वीं कळा दावी हरी ॥ १ ॥
तैसें नव्हे नाम सर्व मार्गां वरिष्ठ । येथें कांही कष्ट नलगती ॥ २ ॥
अजपा जपणें उलट प्राणाचा । तेथेंही मनाचा निर्धारु असे ॥ ३ ॥
ज्ञानदेवा जिणें नामेंवीण व्यर्थ । रामकृष्णीं पथ क्रमीयेला ॥ ४ ॥

२४

जप तप कर्म क्रिया नेम धर्म । सर्वांघटीं राम भावशुद्ध ॥ १ ॥
न सोडी रे भावो टाकीं रे संदेहो । रामकृष्णीं टाहो नित्य फोडी ॥ २ ॥
जात वित्त गोत्र गोत कुळ शीळ मात । भजे का त्वरित भावनायुक्त॥३॥
ज्ञानदेवा ध्यानीं रामकृष्ण मनी । तेणें वैकुठभुवनी घर केलें ॥ ४ ॥

२५

जाणीव नेणीव भगवतीं नाही । उच्चारणीं पाहीं मोक्ष सदा ॥ १ ॥
नारायणहरी उच्चार नामाचा । तेथें कळिकाळाचा रीघ नाहीं ॥ २ ॥
तेथील प्रमाण नेणवे वेदांसी । तें जीवजंतूंसी केंवि कळे ॥ ३ ॥
ज्ञानदेवा फळ नारायणपाठ । सर्वत्र वैकुंठ केलें असे ॥ ४ ॥

२६

एकतत्त्व नाम नाप दृढ धरी मना । हरीसी करुणा येईल तुझी ॥ १ ॥
तें नाम सोपारें रामकृष्णगोविंद । वाचेशीं सद्गद जपे आधीं ॥ २ ॥
नामापरतें तत्त्व नाहीं रे अन्यथा । वाया आणिका पंथा जाशी झणी ॥३॥
ज्ञानदेवा मौन जपमाळ अंतरीं । धरोनी श्रीहरि जपे सदां ॥ ४ ॥

---

१ विश्व हे अनेक तत्वाचें आहे असें मतवादी म्हणतात, पण हीं सर्व तत्वें हरि निजरूपावर दाखवितो, तो तत्वाचें तत्व आहे. २ आठ प्रहरांत एकवीस हजार सहाशें वेळ सोहंजप सहज होत असतो.

२७

सर्वसुखगोडी सर्वशास्त्र निवडी । रिकामा अर्धघडी राहों नको ॥ १ ॥
लटिका व्यवहार सर्व हा संसार । वाया येरझार हरीवीण ॥ २ ॥
नाममंत्रजप कोटि जाईल पाप । कृष्णनामी संकल्प धरूनि राहें ॥३॥
निजवृत्ति काढी सर्व माया तोडी । इंद्रियांसवडी लपों नको ॥ ४ ॥
तीर्थव्रतीं भाव धरी रे करुणा । शांतिदयापाहुणा हरि करी ॥ ५ ॥
ज्ञानदेवा प्रमाण निवृत्तिदेवी ज्ञान । समाधिसजीवन हरिपाठ ॥ ६ ॥

---



## १ गोरक्षनाथांचीं पदें.

१

गुरुजी मैंतो एक निरंजन ध्यावूं ॥ ध्रु० ॥
दुःख न जानूं दरद ना जानूं ना कोइ बेद बुलावूं ।
सतगुरु बेद मिले अविनाशी वाहिको नाडि बतावूं ॥ १ ॥
गंगा न जावूं जमुना न जावूं न कोई तीरथ न्हावूं ।

---

१ मी निज–आत्माराम आहे एवढी वृत्ति घे व बाकीच्या मायेंतील सर्व वृत्ति सोड. २ हरिचिंतन हें समाधी देणारें आहे. ३ पीडा. ४ त्यालाच. ५ दाखवूं.

आडुसट तीरथ है घटभीतर वाहिमे मनमल न्हावू ॥ २ ॥
फूल ना तोडू फत्तर ना फोडू ना कोई झाड सतावू ।
बनबनकी मै लकडी ना तोडू ना कोई देवल जावू ॥३॥
कहे मार्छिदर गोरख बोले ज्योतमे ज्योत मिलावू ।
सत्गुरुजीके शरण गयेसे आवागमन[1] मिटावू ॥ ४ ॥

२

नामसे मिला[2] न कोई । नामसे मिला ॥ ध्रु० ॥
जोगी भूला जोग जुगतसे । उलटी[3] पवन चढाई ।
तपसी भूला तप भरोसे । व्यर्थहि देह जलाई[4] ॥ १ ॥
पंडित भूला बेदभरोसे । पूजा प्रतिमा सोही ।
दाता भूला दानभरोसे । कोट दरब[5] कर खोई ॥ २ ॥
खोर्जत[6] खोजत सद्गुरु मिल गये । सकल भरमणा[7] खोई ।
सरण मार्छिदर गोरख बोले । सद्गुरुमिल गये सोई ॥ ३ ॥

३

सुमिरन बिन गोता खावों गे ॥ ध्रु० ॥
ये ससार कागदकी पुतली । बुदलगे गलजावो गे ॥ १ ॥
ये ससार ओसका पानी । धूप लगे ढल जावो गे ॥ २ ॥
ये संसार बागरका कांटा । आग लगे जल जावो गे ॥ ३ ॥
ये ससार हाटका मेला । सांज पडे बिछड जावो गे ॥ ४ ॥
सुरत हमारी चढी गगनमों । अनुहत ढोल बजावों गे ॥ ५ ॥
कहे मछिंदर गोरख बोले । ज्योतमे ज्योत मिलावों गे ॥ ६ ॥

## २ गहिनीनाथांचे अभंग.

१

आकाश तडतडी मेरू हा कडाडी । तरी आत्मसुखगोडी सांडूं नये ॥१॥

---

१ येणें जाणें २ मिळाला भेटला नाहीं ३ सुषुम्नेत पवन चढवून. ४ जाळून टाकला. ५ द्रव्य खर्च केलें. ६ शोधतां शोधता ७ भ्रम दूर केला.

ऐसिया निर्धारीं जवळी आहे देव । न धरी संदेह अरे मना ॥ धु० ॥
वायु जरी सुटे ब्रह्मांड हें आटे । तरी आत्मनिष्ठे भंगों नेदी ॥ २ ॥
गहिनी म्हणे येथें जीव काय ऐसा । ऐसी पूर्णदशा आचरावी ॥ ३ ॥

२

दृष्टीचें जें आगर शून्याचें जें सार । तेंचि दशमद्वार जाण बापा ॥ १ ॥
शून्य निरशून्य त्याहिमाजी बीज । तयामाजी गुज गुरुवस्तु ॥ धु० ॥
जाणण्याचें मूळ अकुळाचें कूळ । अलभ्याचें स्थळ तया ठायीं ॥ २ ॥
गोरक्षप्रसादें लाधलिया सुखा । गहिनीचिया द्वीपा तारु आलें ॥ ३ ॥

३

लय लक्ष करा धारणेसी धरा । आवरोनी वारा[1] वरुते[2] पहा ॥ १ ॥
तयाचेनि बळें जिंकिजे कळिकाळा । घेईजे सोहळा आत्मत्वाचा ॥ धृ०॥
मग भय नाहीं गहिनी म्हणे तुज । निवृत्तीसी गुज सांगे कानीं ॥ २ ॥

## ३ निवृत्तिनाथांचे अभंग.

१

जनांसी तारक विठ्ठलचि एक । केलासे विवेक सनकादिकीं ॥ १ ॥
तें रूप घोळलें पंढरीस देखा । द्वैताची पै शाखा तोडियेली ॥ धु० ॥
उगवतें बिंब अद्वैत स्वयंभ । नाम हें सुलभ विठ्ठलराज ॥ ३ ॥
निवृत्तीचें गूज विठ्ठल सहज । गयनीराजें मज सांगितलें ॥ ४ ॥

२

परेसी परता पश्यंतिवरुता । मध्यमे तत्वता न कळे हरी ॥ १ ॥
तें हें कृष्णरूप गौळियाचें तप । यशोदेसमीप नंदाघरीं ॥ धृ० ॥
चोखट चोखाळ मनाचे मवाळ । कासवीचा[3] ढाळ जया नेत्री ॥ ३ ॥
निवृत्ती सर्वज्ञ गुरूची धारणा । ब्रह्मसनातनामाजी मन ॥ ४ ॥

---

१ वायु. २ वर. ३ ज्याच्या नेत्रांत कासवीचें पिलांवर असतें तसें विमल प्रेम आहे.

३

अव्यक्त आकार आकारलें रूप । प्रकाशस्वरूप बिंबलेसें ॥ १ ॥
तें रूप अव्यक्त कृष्णनाम निज । नाम अधोक्षज चतुर्भुज ॥ ध्रु० ॥
वर्णासी अव्यक्त वर्णरूप व्यक्त । भोगिती विरक्त नामपाठें ॥ २ ॥
निवृत्तीचें काज नाममत्र बीज । गयनी सहज तुष्टलासे ॥ ३ ॥

४

आदिनाथ उमाबीज प्रगटलें । मच्छिंद्रा लाधलें सहजस्थिती ॥ १ ॥
तेचि प्रेममुद्रा गोरक्षा दीधली । पूर्ण कृपा केली गयनीनाथा ॥ ध्रु० ॥
वैराग्यें तापला सप्रेमें निवाला । ठेवा जो लाधला शांतिसुख ॥ २ ॥
निर्द्वंद्व निःशंक विचरता मही । सुखानंद हृदयी स्थिर जाला ॥ ३ ॥
विरक्तीचें पात्र अन्वयाचें सुख । देऊनि सम्यक अनन्यता ॥ ४ ॥
निवृत्ति गयनी कृपा केली पूर्ण । कुळ हें पावन कृष्णनामें ॥ ५ ॥

५

एक देव आहे हा भाव पै सोपा । द्वैतरूप बापा पडसी नरकी ॥ १ ॥
द्वैत साडीं अद्वैत धरी । एक घरोघरीं हरी नांदे ॥ ध्रु० ॥
सबाह्य कोंदलें परिपूर्ण विश्वीं । तोचि अर्जुनासी दृष्ट जाला ॥ २ ॥
गयनिप्रसादें निवृत्तीसी बोधु । अवघाचि गोविंदु अवघ्या रूपीं ॥ ३ ॥

६

द्वैताचा दुकाळ अद्वैताच्या देशी । प्रपच उपवासी मेला रया ॥ १ ॥
नाहीं नाही चाड इद्रियांचें कोड । कृष्ण हेंचि वाड हृदयी आम्हा॥ध्रु०॥
देहाचा दिवटा अखड पै कळा । निरंतर सोहळा कळी नोहे ॥ २ ॥
निवृत्ति परम निरतर सम । सर्वांवटीं राम बिंबलासे ॥ ३ ॥

७

नाम मुखीं सदा तोचि पै भाग्याचा । तयासी यमाचा धाक नाहीं ॥१॥

---

१ खाद्य न मिळाल्यामुळें.

रामनाम हरि सर्वकाळ वसे । तेथेंचि विलसे हरि वसे ॥ ध्रु० ॥
हरिध्यान वसे अखंड पै सर्वदा । न पवे तो आपदा इये जनीं ॥ २ ॥
निवृत्तिसमता हरिभजन करी । सर्वत्र कामारी[1] ऋद्धिसिद्धी ॥ ३ ॥

८

निराकार वस्तु आकारासी आली । विश्रांती पै झाली विश्वजना ॥ १ ॥
भीवरासंगमीं निरंतर सम । तल्लीन ते ब्रह्म उभें असे ॥ ध्रु० ॥
पुडलीका ध्येय पुढतपुढती सोय । विठ्ठल हेंचि गाय सकीर्तनी ॥ २ ॥
निवृत्तिसंकीर्तन ब्रह्म हें सोज्ज्वळ । नाम हे रसाळ अनिर्वाच्य ॥ ३ ॥

९

भवसागरसार तरणोपाय सोपा । कृष्णनामें खेपा हरिली जना ॥ १ ॥
रामकृष्णमत्र जनासी उद्धार । आणिक साचार मार्ग नाही ॥ ध्रु० ॥
निवृत्तिधारणा गुरुचरण जाणा । ब्रह्माड या खुणा गुरुकृपा ॥ २ ॥

१०

म्हणवितो नदाचा बाळ यशोदेचा । आपण चौवाचातीत कृष्ण ॥ १ ॥
शब्दांसी नातुडे बुद्धीसी साकडें । तो सप्रेमें आतुडे स्मरतां नाम ॥धृ०॥
उपचाराऱ्या कोटी न पाहे परवडी । प्रेमळाचीं घोडी धोई अगें ॥ २ ॥
निवृत्तिचें तप फळलें अमूप । गयनीराजें दीप उजळला ॥ ३ ॥

११

विश्वामाजी अक्षर क्षरलें साचार । त्या रूपा आधार पुससी काई ?॥१॥
आपणाचि विश्व आपण विश्वेश । जेथें द्वेषाद्वेष मावळले ॥ धृ० ॥
निवृत्ति म्हणे तें रूप सतासमीप । ध्यातां आपेआप वोसंडत ॥ २ ॥

१२

मृगजळाभासलहरी अपार । हा प्रपंचपसारा उदरी जया ॥ १ ॥
तें रूप वैकुंठ कृष्णरूपें खेळे । गोपाळांचे लळे यमुनातटीं ॥ २ ॥

---

1 दासी, सेवक.

जाळूनि इंधन उजळल्या दीप्ती । अनंतस्वरूपी एक दिसे ॥ ३ ॥
निवृत्तिसागर ज्ञानार्क आगर । कृष्णाचि साचार बिंबलासे ॥ ४ ॥

१३

होउनिया ज्ञान अझुनि कां रे भ्रांति । न जाली विश्रांति मीपणाची॥१॥
सेवितां सन्निध जाऊनि राहता । तमांच नासता नोहे कांही ॥ २ ॥
सेवुनि अमृत चिंता मरणाची । कासयाला त्याची करितोसी ॥ ३ ॥
जालों मी साक्षी हेंही आता ग्रासी । सहजचि होसी पूर्णसुखी ॥ ४ ॥
ऐकरे ज्ञानिया सांडी हा मीभाव । मग तूंचि देव निवृत्ति म्हणे ॥ ५ ॥

१४

मनाचिया वृत्ति वळूनियां पाही । ज्ञानचक्षू ठायीं स्थिर करी ॥ १ ॥
सर्वसाक्षी होउनी राहावें आपण । ब्रह्म तें जाण स्वयमेव ॥ २ ॥
अनुदिनि तेथें आपणाचि रमता । देहाची ते वार्ता विसरोनी ॥ ३ ॥
जागृतिस्वप्नाचा विसर पडावा । सुषुप्तीच्या भावा मावळोनी ॥ ४ ॥
चौथे देहवृत्ति एकरूप राहे । दृश्यादृश्यरूप हारपोनी ॥ ५ ॥
निवृत्ति म्हणे माझ्या गुरूचें ठेवणें । दीधलें संपूर्ण गहिनीनाथें ॥ ६॥

१५

सर्वपणें नांदे अगाध पंढरी । भूमिवरी महा धर्मक्षेत्र ॥ १ ॥
ऐसे कोण्ही सांगा आलेनो संसारा । जावें पंढरपुरा विठ्ठलभेटी ॥ ध्रु० ॥
प्रत्यक्ष विष्णुमूर्ति वाट पाहे नित्य । उद्धरी पतित कोटयानकोटी ॥ २ ॥
निवृत्तिराज कळा जप मेघसांवळा । विठ्ठली जीवनकळा मुरालिया ॥३॥

## ४ ज्ञानेश्वरांचे अभंग.

१

रूप पाहतां लोचनी । सुख जालें वो साजणी ॥ १ ॥
तो हा विठ्ठल बरवा । तो हा माधव बरवा ॥ ध्रु० ॥
बहुता सुकृताची जोडी । म्हणुनी विठ्ठलीं आवडी ॥ २ ॥
सर्व सुखाचें आगरु । बापरखुमादेविवरु ॥ ३ ॥

२

सकळमंगळनिधी । श्रीविठ्ठलाचें नाम आधी ॥ १ ॥
म्हण कारे म्हण कारे जना । श्रीविठ्ठलाचें नाम वाचे ॥ ध्रु० ॥
पतीतपावन साचें । श्रीविठ्ठलाचें नाम वाचे ॥ २ ॥
बापरखमादेविवरु साचे । श्रीविठ्ठलाचें नाम वाचे ॥ ३ ॥

३

गोपाळारे तुझें ध्यान लागो मना ।
आनु न विसंबे हरि जगत्रयजीवना ॥ १ ॥
सोनियाचा दिवस आजि अमृतें पाहाला ।
नाम आठविता रूपीं प्रगट पै झाला ॥ ध्रु० ॥
तनुमनुशरण विनटलों तुझ्या पाई ।
रखुमादेविवरावाचूनि आनु नेणें काहीं ॥ २ ॥

४

सर्वदा सर्वसाक्षी तो । विश्वंभर 'खल्विद' तो गे बाई ॥ १ ॥
आनंदा आनंद तो । प्रबोधा प्रबोध तो गे बाई ॥ ध्रु० ॥
रखुमादेविवरु तो । विटेवरी उभा तो गे बाई ॥ २ ॥

५

त्रिभंगी देहुडा ठाण मांडुनिया राहे ।
कल्पद्रुमातळीं वेणु वाजवित आहे ॥ १ ॥
गोविंदु वो माये गोपाळु वो माये ।
सबाह्य अभ्यंतरीं अवघा परमानंदु वो ॥ ध्रु०॥
सावळें सगुण सकळा जीवाचें जीवन ।
घनानंदमूर्ति पाहता हारपलें मन ॥ २ ॥
शून्य स्थावर जंगम व्यापूनि राहिला अकळ ।
बापरखुमादेविवरु विठ्ठलु सकळ ॥ ३ ॥

---

१ दीड पायाचें ठाण, हातीं मुरली घेऊन उभे राहणाऱ्या कृष्णाचें ठाण.

६

तुज सगुण म्हणों कीं निर्गुण रे । सगुणनिर्गुण एकु गोविंदु रे ॥ १ ॥
अनुमानेना अनुमानेना । श्रुति नेति नेति म्हणती गोविंदु रे ॥ ध्रु० ॥
तुज स्थूळ म्हणो कीं सूक्ष्म रे । स्थूळ सूक्ष्म एकु गोविंदु रे ॥ २ ॥
तुज आकार म्हणों कीं निराकार रे। साकारु निराकारु एकु गोविंदुरे ॥३॥
तुज दृश्य म्हणों कीं अदृश्य रे । दृश्यअदृश्य एकु गोविंदु रे ॥ ४ ॥
निवृत्तिप्रसादें ज्ञानदेव बोले । बापरखुमादेविवरु विठ्ठलु रे ॥ ५ ॥

७

अवघाचि संसार सुखाचा करीन । आनदें भरीन तिन्ही लोक ॥ १ ॥
जाईन गे माये तया पंढरपुरा । भेटेन माहेरा आपुलिया ॥ धृ० ॥
सर्व सुकृताचें फळ मी लाहीन । क्षेम मी देईन पाडुरगीं ॥ २ ॥
बापरखुमादेविवरु विठ्ठलेशी भेटीं । आपुले सवसाटी करूनि ठेवा ॥ ३ ॥

८

माझे जिवीची आवडी । पढरपुरा नेईन गुढी ॥ १ ॥
पाडुरंगी मन रगलें । गोविंदाचें गुणी वेधलें ॥ धृ० ॥
जागृति स्वप्न सुषुप्ति नाठवे । पाहता रूप आनदीआनद साठवे ॥ २ ॥
बापरखुमादेविवर सगुण निर्गुण । रूप विटेवरी दाविली खूण ॥ ३ ॥

९

लक्ष लावुनी अंतरी । कृष्णा पाहती नरनारी ।
लावण्यसागरु हरि । परमानंदु ॥ १ ॥
छदें छंदें वेणु वाजे । त्रिभुवनी घनु गाजे ।
उतावेळ मन माझें । भेटावया ॥ ध्रु० ॥
ब्रह्मविद्येचा पुतळा । गाई राखतों गोंवळा ।
श्रुति नेणवे ते लीळा । वेदा सनकादिका ॥ २ ॥
भूतग्रामाचा परिसु । तापत्रयाचा करी नाशु ।
आड वरूनि गोपवेषु । वत्सें राखे ॥ ३ ॥

रासक्रीडा वृंदावनीं खेळे । इंदुवदनमेळें ।
उद्धरि यदुकुळें । कुळदीपक ॥ ४ ॥
निवृत्तिदासाचा दातारु । बापरखुमादेविवरु ।
भक्ता देतो अभयकरु । क्षणक्षणांमाजि ॥ ५ ॥

१०

तू माझा स्वामी मी तुझा रंक । पाहता न दिसे वेगळिक ॥ १ ॥
मीतूपण जाऊ दे दुरी । एकचि घोंगडें पाघरू हरी ॥ ध्रु० ॥
रखुमादेविवरा विठ्ठलराया । लागेन मीं पाया वेळोवेळां ॥ २ ॥

११

आजि सोनियाचा दिनु । वर्षे अमृताचा घनु ॥ १ ॥
हरी पाहिलारे हरी पाहिलारे । सबाह्यअभ्यतरीं अवघा व्यापक मुरारी ॥
दृढविटे मनमुळी । विराजित वनमाळी ॥ २ ॥
बरवा संतसमागमु । प्रगटला आत्मारामु ॥ ३ ॥
कृपासिंधु करुणाकर । बापरखुमादेवीवर ॥ ४ ॥

१२

इवलेंसें रोप लावियेलें द्वारीं । त्याचा वेलु गेला गगनावरी ॥ १ ॥
मोगरा फुलला मोगरा फुलला।फुलें वेंचिता अतिभारु कळियासि आला॥ध्रु०॥
मनाचिये गुती गुंफियेला शेला । बापरखुमादेविवर विठ्ठली अर्पिला ॥२॥

१३

देखिले तुमचे चरण । निवात राहिलें मन ॥
कासया त्यजीन प्राण । आपुलागे माये ॥ १ ॥
असेल वणीवरी आपुले माहेरी।मग तो श्रीहरि गीती गाईन गे माये॥ध्रु०॥
सकळही गोत माझें पढरिसी जाण।बापरखुमादेविवरा विठ्ठलाची आण॥२॥

१४

श्रीगुरुसारिखा असता पाठीराखा । इतराचा लेखा कोण करी ॥ १
राजयाची कांता काय भीक मागे । मनाचियाजोगें सिद्धि पावे ॥ ध्रु० ॥

कल्पतरुतळवटीं जो कोणी बैसला। काय वाणी त्याला सांगिजों जी ॥२॥
ज्ञानदेव म्हणे तरलों तरलों । साच उद्धरलों गुरुकृपें ॥ ३ ॥

१५

पूर्वजन्मी पाप केलें तें हें बहुत विस्तारलें ।
विषयसुख नाशिवत सेवितां तिमिर कोंदलें ।
चौऱ्याशी लक्षयोनी फिरता दुःख भोगिलें ।
ज्ञानदृष्टि हारपली दोन्ही नेत्र आंधळे ॥ १ ॥
धर्म जागो सदैवाचा जे बा परउपकारी ।
आधळ्या दृष्टिदाते त्याचें नाम मी उच्चारीं ॥ ध्रु० ॥
ससार दु.खमूळ चहूकडे इंगळ ।
विश्राति नाहीं कोठें रात्रदिवस तळमळ ।
कामक्रोधलोभशुनी पाठी लागलीं वोढाळ ।
कवणा आता शरण जाऊ दृष्टि देईल निर्मळ ॥ २ ॥
मातापिता बधुबहिणी कोणी न पवती निर्वाणीं ।
इष्टमित्र सज्जनसखे हे तों सुखाची माडणी ।
एकला मी दुःख भोगीं कुंभपाक जाचणी ।
तेथें कोणी सोडविना एका सद्‌गुरुवाचुनी ॥ ३ ॥
साधुसत मायबाप तिहीं दिलें कृपादान ।
पढरिये यात्रे नेले घडलें चद्रभागें स्नान ।
पुडलिकें वैद्यराजें पूर्वी साधिलें साधन ।
वैकुठींचें मूळपीठ डोळा त्याला तें अजन ॥ ४ ॥
कृष्णांजन एक वेळा डोळा घालिता अढळ ।
तिमिरदुःख गेलें सारें तुटलें भ्रांतिपडळ ।
श्रीगुरु निवृत्तिराजें मार्ग दाविला सोज्ज्वळ ।
बापरखुमादेविवर विठ्ठल दिनाचा दयाळ ॥ ५ ॥

१६

भजनापरिस साधन आणिक । कलियुगीं देख आन नाहीं ॥१॥
सर्वदेही भजन हेंचि निजज्ञान । मग मुक्तपण आपेआप ॥ २ ॥
मीपण मावळलें सद्भाव उजळले । सुखाचे सोहळे गुरुखूण ॥३॥
श्रीगुरुनिवृत्तिचरणप्रसादें । भजनीं आनंदे ज्ञानदेवा ॥ ४ ॥

१७

रामकृष्णनामें ये दोन्ही साजिरी । हृदयमंदिरी स्मरे का रे ॥ १॥
आपुली आपण करी सोडवण । संसारबंधन तोडी वेगीं ॥ ध्रु० ॥
ज्ञानदेवाध्यानी रामकृष्णमाळा । हृदयी जिव्हाळा श्रीमूर्ति रया ॥ २ ॥

१८

हरि आला वो ! हरि आला वो ! । संतसंगें ब्रह्मानंदु जाला वो ! ॥ध्रु०॥
हरि येथें वो ! हरि तेथें वो ! । हरिविण न दिसे रितें वो ॥ १ ॥
हरि आदी वो ! हरि अंती वो ! । हरि व्यापक सर्वाभूतीं वो ॥ २ ॥
हरि जाणा वो ! हरि वाना वो ! । बाप रखुमादेविवरु राणा वो ॥ ३ ॥

१९

परिमळाची धाव भ्रमर वोढी । तैसी तुझी गोडी लागो मज ॥ १ ॥
अविट गे माय विटेना । जवळी आहे परी भेटेना ॥ ध्रु० ॥
तृषा लागलीया जीवनातें वोढी । तैसी तुझी गोडी लागो या जीवा ॥२॥
बाप रखुमादेविवरु विठ्ठली आवडी । गोडियेसि गोडी मिळोनि गेली ॥३॥

२०

घरदार वोखटें त्यजूं म्हणसी तरी शरीरायेवढें जाड ।
मायबाप वोखटीं त्यजूं म्हणसी तरी अहंकारअविद्येचें कोड ।
बंधु सखे त्यजूं म्हणसी तरी कामक्रोधमदमत्सर अवघड ।
बहिणी पाठीच्या त्यजूं म्हणसी आशा तृष्णा माया अवघड रया ॥ १ ॥
त्यजिलें ते काय कासया म्हणिजे सांग पा ! मजपाशीं ऐसें ।

जयाभेणें तूं जासी वनांतरा तें तव तुजचिसरिसें रया ! ।। ध्रु० ।।
स्त्री चोखटी त्यजूं म्हणसी तरी कल्पनेयेवढी भोगती ।
पुत्रअपत्य त्यजू म्हणसी तरी इद्रियासी नाही निवृत्ती ।
सकळ गणगोत त्यजू म्हणसी तरी हे अष्टधाप्रकृति ।
अवघेचि त्यजू म्हणसी तरी मना नाही निजशांति रया ।। ३ ।।
अवघीचि तुजजवळी दुमदुमित असता वरिवरि मुंडिसि करिसि विटबना ।
सहजसतोषें असोनि जैसा तैसापरि तो सद्गुरु पावे खणा ।
आपुले आश्रमी स्वधर्मी असतां सर्वत्र ऐकुचि जाणा ।
बापरखुमादेविवरु विठ्ठलु इनुकियासाठीं नेईल वैकुंठभुवना ।। ४ ।।

२१

कां सांडिसी गृहाश्रम । का साडिसी क्रियाकर्म ।
कासया साडिसी कुळीचे धर्म । आहे तें वर्म वेगळेंचि ।। १ ।।
भस्मउधळण जटाभारु । अथवा उदास दिगबरु ।
न धरि लोकाचा आधारु । आहे तो विचारु वेगळाचि ।। २ ।।
जप तप अनुष्ठान । क्रियाकर्म यज्ञ दान ।
कासया इद्रिया बधन । आहे तें निधान वेगळेंचि ।। ३ ।।
वेदशास्त्र जाणीतले । आगमीं पूर्ण ज्ञान झालें ।
पुराणमात्र धांडोळिलें । आहे तें राहिलें वेगळेंचि ।। ४ ।।
शब्दब्रह्में होसी आगळा । म्हणसि न भिये कळिकाळा ।
बोधेंविण सुखसोहळा । आहे तो जिव्हाळा वेगळाचि ।। ५ ।।
याकारणें श्रीगुरुनाथु । जव मस्तकी न ठेवी हातु ।
निवृत्तिदास असे विनवितु । तंव निवांतु केवि होय ।। ६ ।।

२२

दीपदीपिका शशी तारा होतु का कोटीवरी रे ।
परि न सरे निशी नुगवे दिवसु दिनकरनाथेंविण जियापरी रे ।। १ ।।
नुद्धरिजे नुद्धरिजे नुद्धरिजे गोपाळेंविण नुद्धरिजे ।। ध्रु० ।।

नगर भ्रमतां जन्म जावो परि प्रवेशु एक्या द्वारें रे
तैसा यजिजो भजिजो पुजिजो परि उकलु नंदकुमरू रे ॥ २ ॥
सर्वावयवीं शरीर सांग परि विरहित एका जिवें रे ॥
तैसा धिक् तो श्रोता धिक् तो वक्ता जो वाळिला विठ्ठलदेवें रे ॥ ३ ॥
गळितशिर हें कलेवर रे उदकेंविण सरिता भयकर रे ॥
रविशशिविण अंबर तैसें हरिविण जिणें असार रे ॥ ४ ॥
शिखिपक्षीपत्रीं डोळे जेंवि अकाळ जळदपडळे रे ।
तैसीं गोकुळपाळकबाळेंविण कर्मे सकळें विफळें रे ॥ ५ ॥
यमनियमप्राणायामप्रत्याहार हे सकळ उपाय परि अपाय रे ।
जंव तमाळनीळ सांवळा हृदयीं ठाण माडुनि न राहे रे ॥ ६ ॥
मी उत्तम पैल हीनु-भूती द्वेषाद्वेष ठेले रे ।
केलेनि कर्मे उफगा निपजे सुख तें दुरी गेलें रे ॥ ७ ॥
आतां असोत हे भेदाभेद आम्ही असों एक्या बोधें रे ।
बाप रखुमादेवीवरविठ्ठलु निवृत्तिमुनिरायप्रसादें रे ॥ ८ ॥

२३

योगिया दुर्लभ तो म्यां देखिला सांजणी ॥
पाहाता पाहाता मना न पुरे धणी ॥ १ ॥
देखिला देखिला गे माये देवाचा देवो ।
फिटला संदेहो निमालें दुजेपण ॥ ध्रु० ॥
अनतवेषें अनंतरूपे देखिलें म्या त्यासी ।
रखुमादेविवरी खुण बाणली कैसी ॥ २ ॥

२४

सगुणाची शेज निर्गुणाची बाज । सांवळी विराजे कृष्णमूर्ति ॥ १ ॥
मन गेलें ध्यानी कृष्णाचि नयनीं । नित्यता पर्वणी कृष्णसुख ॥ ध्रु० ॥

---

१ सखी साजणें=सख्य. २ तृप्ती, तृप्ती होत नाहीं.

हृदयपरिवेरीं कृष्ण मनोमंदिरीं । आमुच्या माजघरीं कृष्ण बिंबे ॥२॥
निवृत्ति निघोटॅ ज्ञानदेवा वाट । नित्यता वैकुंठ कृष्णसुखें ॥ ३ ॥

२५

देवा तुज चुकलों गा । तेणें डोळां आलें पडळ ।
विषयग्रथीं गुतलोसें । तेणें होतसे विव्हळ ।
अध मंद दृष्टी झाली । गिळूं पाहे हा काळ ।
अवचितें दैवयोगें । निवृत्ति भेटला कृपाळ ॥ १ ॥
धर्म जागो निवृत्तीचा । तेणें फेडिलें पडळ ।
ज्ञानांचा निजबोधु । विज्ञानरूप सकळ ॥ ध्रु० ॥
तींहीं लोकीं विश्वरूप । दिव्य दृष्टी दिधली ।
द्वैत हें हारपलें । अद्वैतपणें माउली ।
उपदेशु निजब्रह्म । ज्ञानांजन साउली ।
चिद्रूपदीप पाहे । तेथें तनुमनु निवाली ॥ २ ॥
दान हेंचि आह्मां गोड । देहीं दृष्टी मुराली ।
देह हें हारपले । विदेहवृत्ति स्फुरली ।
विज्ञान हें प्रगटलें । ज्ञेयज्ञाता निमाली ।
दृश्य तें तदाकार । ममता तेथें बुडाली ॥ ३ ॥
प्रपचु हा नाहीं जाणा । एकाकार वृत्ति जाली ।
मी माझें हारपले । विषयाधया बोली ।
उपरती सद्‌गुरुबोधु । तेथें प्रकृति संचली ।
धर्ममार्गें शुद्धपथ । हातीं काठी दिधली ॥ ४ ॥

---

१ घरीं, गुप्तस्थानीं. 'तया ह्रदयाच्या परिवरीं' (ज्ञाने० ६-२८१).
२ मध्य घरीं, माज=मध्य, हृदयांत. ३ घनदाट, परिपूर्ण (विवेकसिंधु ३-१३).
४ 'शास्त्राचारें तेणें । ईश्वरचि येक पावणें । हें फुडें जें का जाणणें । तें तेथ ज्ञान ॥" व 'ध्यानबळें ईश्वरतत्वींच' मिळे तें विज्ञान. स्वानुभव, साक्षात्कार ह्म० विज्ञान. (ज्ञाने० १८-८४६ ते ८४८)

वेदमार्गें मुनी गेले । त्याच मार्गे चालिलों ।
न कळेची विषयाधा । म्हणोनि उघड बोलिलों ।
चालता धनुर्धरा । तरगाकारी हरलों ।
ज्ञानदेवो निवृत्तीचा । द्वैत अवघें निरसलों ॥ ६ ॥

२६

मन हें धालें मन हें धालें पूर्ण विठ्ठलचि झालें ।
अंतरबाह्य रगुनि गेलें विठ्ठलींच ॥ १ ॥
विठ्ठल म्हणतां हरलें पाप पदरीं आलें पुण्यमाप ।
झाला दिनाचा मायबाप विठ्ठलची ॥ ध्रु० ॥
विठ्ठल जळीस्थळीं भरला रिता ठाव नाही उरला ।
अजि म्यां दृष्टीनें पाहिला विठ्ठलची ॥ २ ॥
ऐसा भाव धरुनी मनी विठ्ठल आणिला निजध्यानी ।
अखंड वदो माझी वाणी विठ्ठलची ॥ ३ ॥
तो हा चंद्रभागे तीरा पुडलिकें दिधला थारा ।
बापरखुमादेवीवरा जडलें पायीं ॥४॥

२७

पांचासहित लयातीत जालिये वो ।
प्रेमभक्ति अनुसरले काळ्या रूपासी वो ॥ १ ॥
ठायीचाचि काळा अनादि बहु काळा ।
म्हणोनि वेदा चाळा लाविला गे माय ॥ ध्रु० ॥
बापरखुमादेवीवरें जन्मावेगळें पै केलें ।
म्हणोनि भाज जाले बाईये वो ॥ २ ॥

२८

आरंभी आवडी आदरें आलें नाम ।
तेणें सकळ सिद्धि जगीं जालें पूर्णकाम ॥ १ ॥

रामकृष्ण गोविंद गोपाळा ।
तूं मायमाउली जीवीचा जिव्हाळा ॥ ध्रु० ॥
तुझियेनि नामें सकळ संदेहो फिटला ।
बापरखुमादेवीवरा श्रीविठ्ठला ॥ २ ॥

२९

अष्टांगेयोगें न सिणिजे यमनियमनिरोध न कीजे रया ॥ १ ॥
वाचा गीत गाइजे वाचा गीत गाइजे ।
गातांगाता श्रवणीं ऐकिजे रया ॥ ध्रु० ॥
गीतछंदे अंग डोलिजे । लीलाविनोदें संसार तरिजे रया ॥ २ ॥
बापरखुमादेवीवरु विठ्ठलु नामें ।जोडे–हा उपावो कीजे रया ॥३॥

३०

अंडज जारज स्वेदज उद्भिज आटे । हरिनाम नाटे तें बरवें ॥ १ ॥
जें नाटे तें नाम चित्तीं । रखुमादेवीपति श्रीविठ्ठलाचें ॥ ध्रु० ॥
शरीर आटे संपत्ति आटे । हरिनाम नाटे तें बरवें ॥ २ ॥
बापरखुमादेवीवराचें नाम नाटे । युगें गेलीं परी उभा विटे ॥ ३ ॥

३१

सत्यज्ञानानंत गगनाचें प्रावर्ण । नाहीं रूप वर्ण गुण येथें ॥ १ ॥
तो हा रे श्रीहरी पाहिला डोळेभरी । पाहतें पाहणें दुरी सारोनियां॥ध्रु०॥
ज्ञानदेव ह्मणे ज्योतीची निजज्योती । ते हे उभी मूर्ती विटेवरी॥ २ ॥

३२

कोणाचें हें रूप देह हा कोणाचा । आत्माराम साचा सर्व जाणे॥१॥
मी तूं हा विचार विवेकें शोधावा । गोविंदु हा ध्यावा याच देहीं ॥ध्रु०॥

---

१ यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा, समाधि–हा अष्टांगयोग. २ यास लय आहे. ३ ' सत्य ज्ञानमनन्तं ब्रह्म ' अशी श्रुति आहे. ४ आकाशाचें आवरण. ५ त्रिपुटीरहित.

ध्येयध्याताध्यान त्रिपुटीवेगळा । सहस्त्रदळीं उगवला सूर्य जैसा ॥ २ ॥
ज्ञानदेव म्हणे नयनांतील रूपें । या नांव चित्पद तुह्मी जाणा ॥ ३ ॥

३३

पांडुरगकाती दिव्यतेज झळकती । रत्नकीळ[3] फाकती प्रभा ।
अगणित लावण्य तेज पुंजाळलें । न वर्णवे तेथीची शोभा ॥१॥
कानडा हो विठ्ठल कर्नाटकु । तेणें मज लावियेले वेधीं ।
खोळ[6] बुंथी घेउनि खुणेंचि पालवी । आळविल्या साधू नेदी ॥ध्रु०॥
शब्देवीण सवादु दुजेवीण अनुवादु । हें तंव कैसेंनि गमे ।
परेहीपरतें बोलणें खुटलें । वैखरी कैसेनि सांगे ॥ २ ॥
पायां पडू गेलों तव पाउलाचि न दिसे । उभाचि स्वयभू असे ।
समोर कीं पाटिमोरा न कळे । ठकेचि पडलें कैसे ॥ ३ ॥
क्षेमालागी जीव उतावेळ माझा । ह्मणउनि स्फुरताती बाहो ।
क्षेम देऊ गेले तव मीचि मी एकली । आसवला जीव राहो ॥ ४ ॥
बापरखुमादेवीवरु हृदयीचा जाणुनी । अनुभवु सौरसुं केला ।
दृष्टीचा डोळा पाहू गेलें । तंव भीतरीं[11] पालटु झाला ॥ ५ ॥

३४

सकळ नेणोनियां औनें[12] । एकला विठ्ठलुचि जाण ।

---

१ ब्रह्मरध्र, पक्षीं सहस्त्रदल असलेलें कमल. २ कृष्णाजन, डोळ्यात भरलेलें रूप हेंच चिन्मय अजन. ३ कीळ ह्म. कांति. ४ एकवटलें किंवा पसरलें. ५ आकळण्यास कठीण. ‘ आाणि जें प्रणवापैलीकडे । वैखरीसी जें कानडें ’ (ज्ञाने० १२–३१ ). ‘ हें परिसता जरी कानडें । तरी जाण पा पार्थ उघडें । श्रीकृष्ण-सुखाचेंचि रूपडें । वोललें गा (ज्ञाने० ६–१२०). ६ खोळ व बुथी ह्म० आच्छादन, घोंगडें. ७ बोलावतो. ८ ‘ उभा माझिये पाठीसी । ह्मणोनि पाठिमोरे ह्मणावें तुह्मासी । सन्मुख विन्मुख जगेसी न घडे तुज ।’ (ज्ञाने. ११–५३१) ९ स्तब्धता. (ज्ञाने०१८–१६००). १० प्रसाद, योग्यता. ११ आत. १२ अन्य, दुसरा.

पुढती पुढती मन । एकला विठ्ठलुचि जाण ॥ १ ॥
गुरुगम्य ही तयाची खूण । एकला विठ्ठलुचि जाण ।
बुझसी तरि तूचि निर्वाणे । एकला विठ्ठलुचि जाण ॥ २ ॥
हेचि भक्ति हेंचि ज्ञान । एकला विठ्ठलुचि जाण ।
बापरखुमादेवीवरा विठ्ठलाची आण । एकला विठ्ठलुचि जाण ॥३॥

३५

गुरु हा संतकुळीचा राजा । गुरु हा प्राणविसावा माझा ।
गुरुवीण देव दुजा । पाहतां नाहीं त्रैलोकीं ॥ १ ॥
गुरु हा सुखाचा सागरु । गुरु हा प्रेमाचा आगरु ।
गुरु हा धैर्याचा डोंगरु । कदाकाळीं डळमळीना ॥ २ ॥
गुरु हा वैराग्याचें मूळ । गुरु हा परब्रह्म केवळ ।
गुरु हा सोडवी तात्काळ । गाठी लिंगदेहाची ॥ ३ ॥
गुरु हा साधकासी साह्य । गुरु हा भक्तालागीं माय ।
गुरु हा कामधेनु गाय । भक्ताघरीं दुभतसे ॥ ४ ॥
गुरु हा घाली ज्ञानांजन । गुरु दाखवी निजधन ।
गुरु हा सौभाग्य देऊन । साधुबोध नांदवी ॥ ५ ॥
गुरु हा भक्तीचें मंडण । गुरु हा दुष्टाचें दंडण ।
गुरु हा पापाचें खंडण । नानापरी वारितसे ॥ ६ ॥
कायाकाशी गुरुउपदेशी । तारकमंत्र दिला आम्हांसी ।
बाप रखुमादेवीवरासी । ध्यान मानसी लागलें ॥ ७ ॥

३६

**मदालसेचा पुत्रास बोध.**

श्रीगुरु देवराया प्रणिपातु जो माझा ।

---

१ मोक्ष. 'तें परब्रह्म निर्वाण । जें आत्मविदाचें कारण' (ज्ञाने० ५-१४९)
२ वासनात्मक सूक्ष्मदेहाची गांठ, हृदयग्रंथि.

मनादि मूळ तूचि विश्वव्यापका बीजा ॥
ममाधी येईं पुत्रा स्वानंदाचिया भोजा ।
पालखी पहुडलीया नाशिवंत रे माया ॥ १ ॥
जाग रे पुत्रराया जाईं श्रीगुरु शरण ।
देह तृ व्यापिलासी चुकवीं जन्ममरण ।
गर्भवासु वोखटा रे तेथें दु ख दारुण ।
सावध होईं का रे गुरुपुत्र तू सुजाण ॥ ध्रु० ॥
मदालसा म्हणे पुत्रा ऐक बोलणें माझें ।
चौऱ्याशीं घरामाजीं मन व्याकुळ तुझें ॥
बहुत शिणतोसी पाहता या विषयासी ।
जाण हें स्वरूप येथें नाहीं बा दुजें ॥ २ ॥
साडीं रे साडी बाळा साडी ससारछदु ।
माशिया मोहळ रे रचियेला रे कदु ॥
झाडूनि आणिकीं नेला तयां फुकटाचि वेधु ।
तैसीपरि होईल तुज उपदेशें आनदु ॥ ३ ॥
सत्व हे रजतम तुज लाविती चाळा ।
कामक्रोधमदमत्सर तुज गोंविती खेळा ।
या सर्वे झणें जासी सुकुमारा रे बाळा ।
अपभ्रशीं[2] घालितील मुकशील सर्वस्वाला ॥ ४ ॥
कोसलीयानें[1] घर सुदृढ पै केलें ।
निर्गमु[3] न विचारितां तेणें सुख मानिलें ।
जालें रे तुज तैसें यातायाती भोगविलें ।
मोक्षद्वार चुकलासी दृढकर्म जोडिलें ॥ ५ ॥

---

१ आवडीनें, गोडीनें. २ प्रमादांत, नस्त्या फशांत, नाश. ‘म्हणूनि हा अपभ्रश । विषयसग’ ( ज्ञाने० २-११८ ). ३ बाहेर पडण्याचा मार्ग.

सर्पें पै दर्दूरें[1] धरियेला रे मुखी ।
तेणें ही रे माशी कैशी धरियेली पखीं ।
तेसा नव्हे ज्ञानयोगु आपआपणातें भक्षी ।
इंद्रियां घाली पाणी संसारीं होई रे सुखीं ॥ ६ ॥
पक्षिया पक्षिणी रे निरजनीं ये वनीं ।
पिलियाकारणें रे गेलीं चाराया दोन्ही ।
मोहोजाळें गुंतुनीं[2] रे प्राण दिधले टाकुनि ।
संसार दुर्घट हा विचारु पाहे परतुनी ॥ ७ ॥
जाणत्या उपदेशु, नेणें तो भ्रांती पडिला ।
तैसा नव्हे ज्ञानप्रकाशु ज्ञानदेवो अनुवादला ।
अनुभवी गुरुपुत्र तोचि स्वयें बुझाला ।
ऐकें त्या उद्धरणा गायक सहज उद्धरला ॥ ८ ॥

३७

नाम प्रल्हाद उच्चारी । तया सोडवी नरहरी ।
उचलूनि घेतला कडियेवरी । भक्तसुखें निवाला ॥ १ ॥
नाम बैरवयां बरवंट[3] । नाम पवित्र चोखटं[4] ।
नाम स्मरे नीलकंठ । निजसुखें निवाला ॥ २ ॥
जें धुरूसी आठवलें । तेचि उपमन्ये घोकिलें ।
तेंचि गजेंद्रा लाधलें । हित जालें तयाचें ॥ ३ ॥

---

१ बेडूक. ‘ साग पा महाफणी दर्दुरें । गिळिजे कायी ? ’ ( ज्ञा० २–१५ ) हाच मार्मिक दृष्टांत ज्ञानेश्वरींतही आला आहे. ‘ दर्दुर सापें गिळिजतु आहे उभा । कीं तो माशिया वेंटाळी जिभा । तैसें माझिये कवणें लोभा । वाढविती तृष्णा ? ’ ( ज्ञाने० ९–५१४ ). २ ही कपोतकपोतीची कथा भागवत स्क० ११ अ० ७ मध्यें पहावी. ३ उत्तमातलें उत्तम. ‘ जे येणेंमानें बरवट । आणि तैसेंचि अतिचोखट ( ज्ञाने० ६–१७१ ) ४ शुद्ध.

नाम स्मरे अजामेळ । महापातकी चांडाळ ।
नामें जाला सोज्वळ । आपणयासहित निवाला ॥ ४ ॥
वाटपाडा कोळिकु[1] । नाम स्मरे वाल्मीकु ।
नामें उद्धरिलें तिन्ही लोकु । आपणयासहित निवाला ॥
ऐसें अनंत अपार । नामें तरले चराचर ।
नाम पवित्र आणि परिकर[2] । रखुमादेवीवराचें ॥

३८

संत भेटती आजी मज । तेणें जाऽगें चतुर्भुज ।
दोनी भुजा स्थूळीं सहज । दोनी सूक्ष्मीं वाढल्या ॥ १ ॥
आलिंगनें सुख वाटे । प्रेमें चिदानंद गोठे[3] ।
हर्षे ब्रह्मांड उतटे[4] । समूळ उठे[5] मीपण ॥ २ ॥
या संतांसी भेटतां । हरे संसाराची व्यथा ।
पुढतींपुढती माथा । अखंडित ठेवीन ॥ ३ ॥
या संतांचें देणें । कल्पतरूहूनि दुणें[6] ।
परिसापरिस अगाध देणें । चिंतामणि ठेंगणा ॥ ४ ॥
या संतांपरिस उदार । त्रिभुवनीं नाहीं थोर ।
मायबाप सहोदर । इष्टमित्र सोयरे ॥ ५ ॥
कृपाकटाक्षें न्याहाळिलें । आपुल्या पदीं बैसविलें ।
बापरखुमादेवीवरु विठ्ठलें । भक्ता दिधलें वरदान ॥ ६ ॥

३९

पूर्वजन्मीं सुकृतें थोर केली । ती मज आजि फळासि आली ॥ १ ॥
परमानंदु आजि मानसी । भेटी जाली या संतासी ॥ ध्रु० ॥

---

१ वाटमाऱ्या वाल्हा कोळी. २ सुंदर, गोड. ३ सघन, घट्ट–होणें. ४ उसळणें. ५ निघून जाई. ६ दुप्पट.

मायबाप बंधु सखे सोयरे । यांतें भेटावया मन न धरे[1] ॥ २ ॥
एक एका तीर्थांहुनि आगळें । तयामाजीं परब्रह्म सावळें ॥ ३ ॥
निर्धनासि धनलाभ जाला । जैसा अचेतनीं प्राण प्रगटला ॥ ४ ॥
वत्स विघंडल्या धेनु भेटली । जैसी कुरंगिणी पाडसा मीनली ॥ ५॥
हे पीयूषापरतें गोड वाटत । पंढरीरायाचे भक्त भेटत ॥ ६ ॥
बापरखुमादेवीवर विठ्ठलें । संत भेटता भवदुःख फिटलें ॥ ७ ॥

४०

पडिलें दूरदेशीं मज आठवे मानसीं ।
नको नको हा वियोग कष्ट होताती जिवासी ॥ १ ॥
दिनु तैसी रजनी मज जाली गे माये ।
अवस्था लावुनि गेला अझुनी का नये ॥ २ ॥
गरुडवाहना गंभीरा येईं गा दातारा ।
बाप रखुमादेवीवरा श्रीविठ्ठला ॥ ३ ॥

४१

आजि देखिलें रे । आजि देखिलें रे ॥ १ ॥
सबाह्य अभ्यंतरीं । अवघा व्यापकु मुरारी ॥ २ ॥
दृढ विटे मन मुळीं । विराजित वनमाळी ॥ ३ ॥
आजि सोनियाचा दिनु । वरि अमृतातें वरुषे घनु ॥ ४ ॥
बरवा संतसमागमु । प्रगटला आत्मारामु ॥ ५ ॥
बापरखुमादेवीवरु । कृपासिंधु करुणाकरु ॥ ६ ॥

४२

गुजगुंजित रूप सावळें सगुण । अनुभविता मन वेडें होय ॥ १ ॥
भ्रमरगुंफा ब्रह्मरंध्र ते सुरेख । पहाता कौतुक त्रैलोकीं ॥ २ ॥

---

१ आवरत नाहीं, अनावर होतें. २ श्रेष्ठ. ३ वियोग झाला असतां. ४ सुखाचा. ५ मेघ. ६ बाळसेदार, गुबगुबित.

आनंद स्वरूप प्रसिद्ध देखिले । निजरूप संचलें सर्वां ठायीं ॥ ३ ॥
ज्ञानदेव म्हणे या सुखाची गोडी । अनुभवाची आवडी सेवीं रया ॥ ४ ॥

४३

चैतन्य चोरुनी नेलें । चित्त माझें सर्वे गेलें ।
पाहें तव तंव तन्मय जालें गे माये ॥ १ ॥
देवें नवल केलें मन माझें मोहिलें ।
विसरू[1] तो आठवू जाला गे माये ॥ २ ॥
यासि जाणावयालागीं अनुहतें[2] पाहे ।
तव त्रिभुवन तन्मय जालें गे माये ॥ ३ ॥
बापरखुमादेवीवरें विठ्ठलरायें ।
माझें सबाह्याभ्यांतर व्यापिलें गे माये ॥ ४ ॥

४४

मलयानिळ शीतळु पालवी[3] नये गाळू ।
सुमनाचा परिमळु गुफिता नये ॥ १ ॥
तैसा जाणा सर्वेश्वरु म्हणों नये सान थोरु ।
याच्या स्वरूपाचा निर्धारु कवण जाणे ॥ ध्रु० ॥
मोतियाचें पाणी भरू नये वो राजणी ।
गगनासी गवसणी[4] घालितां नये ॥ २ ॥
डोळियातील बाहुली करू नये वेगळी ।
धावोनि अचळीं धरिता नये ॥ ३ ॥
विठ्ठलरखुमाईचे भाडणी कोण करी बुझावणीं ।
तया विठ्ठलचरणी ज्ञानदेवो ॥ ४ ॥

---

१ विस्मरणच स्मरण झाले, विसरांत आठव झाला. २ योगसाधनानें दश-नादांचा ध्वनि ऐकू येतो तो. अनुहत किंवा अनाहत ध्वनि ह्म. सोहंध्वनि. ‘ अनुहताचा हळरु गासी ’ [ ज्ञाने० १२–७ ]. ३ पदरांत. ४ आच्छादन.

४५

तू तों माझें मी तों तुझें । ऐक्य जालें तेथें कैंचं दुजें ॥ १ ॥
तू तो मी गा मी तो तू गा । अज्ञानें बापुडी नेणती पै गा ॥२॥
निर्गुण होतें तें गुणासि आलें । अज्ञान निरसूनि एकाचि जालें ॥३॥
ज्ञानदेव म्हणे परतूनि पाही । जीवाचा जीवनु कवणे ठायी ॥ ४ ॥

४६

देव करी तरि काय न होई । दगडाचिये नंई तरिजेल ॥ १ ॥
सूर्यकिरणावरी मुंगियाच्या हारी । अग्निचे पाठारी पीक होय ॥२॥
फुटतील पाय चालतील भिंती । मेरु मशक येती समतुका ॥ ३ ॥
ज्ञानदेव म्हणे अघटित घडे । गुरुकृपें जोडे परब्रह्म ॥४॥

४७

आदिनाथें बीज सांगितलें कानी । सोहं हे शिरैंणी कैवल्याची ॥ १ ॥
मच्छेंद्र गोरक्ष पावले या सुखा । उजळिल्या आशंका ज्ञानाचिया ॥ २ ॥
निवृत्तीनें गूज स्वतंत्र ओतिलें । अपार पावले सिद्धपथें ॥३॥
सोहं या मंत्राचा वेदाचा गंव्हर । म्हणे ज्ञानेश्वर राजयोगी ॥४॥

४८

आता याजपरतें उरलें नाही काहीं । देहींच विदेही होऊनि ठेले ॥ १ ॥
आमुचे आम्ही देव आमुचे आम्ही भक्त । आमुचे आम्ही मुक्त एकविध॥
आमुचे आम्ही ज्ञान आमुचे आम्ही ध्यान । सोहंरश्मी खूण हातां आली३
ज्ञानदेव म्हणे निर्गुण निरंजन । मनाचे मोहन मूर्तिमाजी ॥ ४ ॥

४९

देव पूजूं गेलों ठेवुनिया भाव । तंव जालों देव स्वत सिद्ध ॥ १ ॥
नाठवेचि कांहीं देवभक्तपण । सागरीं लवण मेळवीजे ॥ २ ॥

---

१ नदी. २ सारख्या तुलनेस. ३ आवड ४ गुहा.

बाहेरीभीतरी देव दिसताहे । द्वैत न साहे सर्वथैव ॥ ३ ॥
चराचर रूप देवचि पै जाला । लय होऊनि ठेला आत्मरूपी ॥ ४ ॥
नाही आवाहन कैचें विसर्जन । स्वरूपींच लीन ज्ञानदेवो ॥ ५ ॥

५०

स्वप्नीच्या घायें विवेळे साचे । चेइलियेवरी म्हणे मी न वचे ॥ १ ॥
जन तैसे माया भुलले । आपुले हित चुकले ॥ ध्रु० ॥
आपी आप असे । मी काय जालोंसे लोका पुसे ॥ २ ॥
बापरखुमादेवीवरु विठ्ठलें । गुरुमुखें खुणा उगविलें ॥ ३ ॥

५१

चित्री सूर्यबिंब काढू येइल चांग । प्रकाशाचें अंग काढितां नये ॥१॥
सन्यासाचें सोंग आणू येइल सांग । अनुभवाचें अंग आणिता नये ॥२॥
ब्रह्मज्ञान मुखें बोलूं येइल सांग । वैराग्याचें अंग आणिता नये ॥ ३ ॥
व्युत्पत्तीचें बळें कवित्व करिसी चांग । प्रसादाचें अंग आणिता नये ॥४॥
ज्ञानदेव म्हणे गुरुकृपा सांग । तरीच हे भाग्य येइल हातां ॥ ५ ॥

५२

**गौळण ( बालभाषा )**

काय थागू तूतें बाई[1] । काय थागू तूतें ॥ ध्रु० ॥
जात होते पानिया तेथें भेतला सावला ।
दोइबल तोपी मयुलपिछाची खाद्यावलि कांबला ॥ काय० ॥ १ ॥
घुलगें माजें फुतलें मग मी ललत बैसले ।
कुनिकुन आला सालगपानी मला पोतासी धलिले ॥ काय० ॥ २ ॥
मला पोतासी धलिले सुख मोथें वातलें ।
निवलतीचे कलपेकलुनी ज्ञानदेवा लाधलें ॥ काय० ॥ ३ ॥

---

१ बरळतों. २ चेव किंवा जाग आल्यावर. ' स्वप्नीचिया घाया । औषध चेवोचि धनंजया '.

५३

**घोंगडी.**

कानोबा तुझी घोंगडी चांगली । आम्हासी का दिली वांगली ॥ ध्रु० ॥
स्वगत सच्चिदानंदें मिळोनि शुद्धसत्वगुणें विणलीरे ।
षड्गुण गोंडे रत्नजडित तुज श्यामसुंदरा शोभली रे ॥ १ ॥
कामकर्मअविद्यात्रिगुणपंचभुतानी विणली रे ।
रक्तरेतदुर्गंधीजतूनरकमुतानें भरलीरे ॥ २ ॥
षडविकारषडवैरी मिळोनि तापत्रयानें विणली रे ॥
नवांठायी फाटुनी गेली ती त्वा आम्हासि दिधली रे ॥ ३ ॥
ऋषि मुनि ध्यातां मुखिं नाम गाता संदेहवृत्ती विरली रे ।
बापरखुमादेवीवर विठ्ठले ! त्वत्पदी वृत्ति मुरली रे ॥ ४ ॥

## ५ सोपानदेवांचें अभंग.

१

चलारे वैष्णव हो जाऊ पंढरियेसी ।
प्रेमामृतखुण मागों त्या विठ्ठलासी ॥ १ ॥
चालिले गोपाळ वाती वाकुलियां ।

---

१ कान्हा, कन्हया, कान्होबा, कृष्णा. २ देह. ३ एकनाथ चतुःश्लोकी भागवतांत म्हणतात 'भगवद्देह चैतन्यघन । तेथें वसेना देहाभिमान । यालागीं करिता त्याचे भजन । अज्ञानजन उद्धरती.' ४ वाईट. ५ स्वरूपगत. ६ जीवाचा देह असत्, जड व दुःखरूप असतो, त्याच्या अपेक्षेनें देवाचा देह सत्, चित् व आनंद स्वरूप आहे ७ 'यश श्री औदार्य । ज्ञान वैराग्य ऐश्वर्य ' हे भगवताचे षड्गुण. ( ज्ञाने० ६–३७ ), औदार्य ह्य. धर्म. ८ आमची घोंगडी. ९ 'नवद्वारे पुरे देही ' [ गीता ५–१३ ] कर्मेंद्रियें व ज्ञानेंद्रियें. रसना दोहीकडे असल्यामुळें एकच धरिता इंद्रियें नऊच होतात. १० वेडावणे दाखवितात (ए व. वाकुली). 'वडिलांचिया क्रिया । देखोनि वाती वाकुलिया' (ज्ञाने० १७–९४). 'सुख संपत्ती जोड लिया । मग स्वर्गा वाये वांकुलिया ' ( ज्ञा० ७–१९० ). वांकुलिया वाये ( तृतीयेचें एकवचन ) व वाती ( तृतीयेचें अनेक वचन ).

भरले प्रेमरसें मग ते वाजविती टाळिया ॥ ध्रु० ॥
दिंड्या गरुडटके मृदंगाचे नाद ।
गाताती विठ्ठलनाम करिताती आल्हाद ॥ ३ ॥
पावले पंढरी भीमा देखियेली दृष्टी ।
वैष्णवाचा गजरु आनंदें हेलांवली सृष्टी ॥ ४ ॥
गजरु गोपाळाचा श्रवणी पडियेला ।
शंखचक्र करी विठ्ठल सामोरा आला ॥ ५ ॥
कासवदृष्टी न्याहाळी रंगी नाचतु पै उगला ।
सोपान म्हणे आम्ही वाळवंटी केला काला ॥ ६ ॥

२

मना आधीं मुंडी वासनेतें दंडी । विठ्ठल ब्रह्मांडी एक आहे ॥ १ ॥
मन हें सोवळें सदा शुची करी । तुज निरंतरी हरी पावे ॥ २ ॥
विवेकवैराग्य ज्ञानाचे पै भाग्य । सकल आरोग्य हरि देखा ॥ ३ ॥
सोपान म्हणे मी सलगीचा सोवळा । नित्य वेळोवेळा स्मरे हरि ॥ ४ ॥

३

पृथिवी सोवळी आकाश सोवळें । मन हें वोवळें अभक्ताचें ॥ १ ॥
ब्रह्म हें सोवळें न देखों वोवळें । असों खेळीमेळी इयें जनीं ॥ २ ॥
ब्रह्मांड पंढरी सोवळी हे खरी । तारिते निर्धारीं एकानामें ॥ ३ ॥
सोपान अखंड सोवळा प्रचंड । न बोले वितंड हरीवीणें ॥ ४ ॥

---

१ डोलली, हालली, आंदोळली हेलावा, हेलावे [ नाम ]. ' पूर्णसिंधु हेलावे । फुटती जैसे ' [ ज्ञाने० १३-१०२ ] २ कासवीला स्तन नसतात, ती आपल्या पिलांना प्रेमाच्या दृष्टीने पोसते. कूर्मदृष्टि ह्म० अतिप्रेमाची दृष्टि. ' डोळया प्रियाची भेटी । का पिलियां कूर्मीची दिठी ' [ ज्ञाने० १६-१७० ] ३ सोवळें-वोवळें हें ज्ञानेश्वराच्या वेळीं होतेंच ' ' अग्नि ह्मणों येत आहे वोविळा ' [ ज्ञाने० १०-२०२ ]

४

राम सर्वोत्तम या नामें निखळें । जन हे सकळ दिसताहे ॥ १ ॥
भिन्न नाही दुजें सर्व आत्मराज । नाचताती भोज योगिराज ॥ २ ॥
माता पिता देव गृह दारा जन । सर्व जनार्दन सर्वारूपी ॥ ३ ॥
सोपान खेचर ब्रह्म माजिवेडे । ब्रह्माडाएवढें आत्माराम ॥ ४ ॥

५

आपरूप हरी आपणचि देव । आपणाचि भाव सर्व जाला ॥ १ ॥
सर्व हरी हरी बाह्य अभ्यतरीं । एक चराचरी आत्माराम ॥ २ ॥
सर्व काळ सम नाही तेथें विषम । आपणाचि राम सर्वज्योती ॥ ३ ॥
सोपान तिष्ठत रामनामी लीन । मन तेथें मौन्य एकपणें ॥ ४ ॥

६

ज्या रूपाकारणें उपवास पा[३]रणें । ध्येय ध्यान धारणें ध्याती मौनी ॥१॥
ते रूप पढरी पुंडलिकाचें द्वारी । ध्याति वेद चारी श्रुतिसहित ॥ २ ॥
त्या रूपें वेधलें मन माझें मोहिलें । न करी काहीं केलें काय करू ॥३॥
सोपान अढळ मन मोहिला गोपाळ । त्या रूपा वाचाळ जिव्हा झाली ॥

७

मनाचे मवाळ हरिरूप चिंतिती । रामकृष्णमूर्ति नित्य कथा ॥ १ ॥
रामकृष्णध्यान सदा पै सर्वदा । न पवेल आपदा नाना योनी ॥ ध्रु. ॥
हरिध्यान जप मुक्ति पै अनत । जीव शिवीं रत सर्वकाळ ॥ ३ ॥
सोपान प्रेमाचा आनद हरीचा । तुटला मोहाचा मोहपाश ॥ ४ ॥

८

गोपाळ अच्युत हा नाममहिमा । नित्यता पूर्णिमा आम्हां देहीं ॥ १ ॥
रामकृष्ण नाम हा जप परम । ऐसा नित्यनेम सारू रया ॥ ध्रु २ ॥

---

१ शुद्ध. 'हा जगडबर निखळ' [ ज्ञा० १७–७२ ]. २ मध्यें. ३ व्रतातीं भोजन. उपवास–पारणें हेंही तेव्हा होतेंच. 'सहजें ब्रह्मरसाचें पारणें । केलें अर्जुनालागीं नारायणें' [ ज्ञाने० अ० ६–२ ].

वासना वोढाळ नेघों पै बरळे । नित्यता अढळ गोपाळ सेवू ॥ ३ ॥
सोपान सार जपतुसे नाम । दिननिशी नेम हृदयातु ॥ ४ ॥

९

दुजेपणी ठाव द्वैत तें फेडिलें । अद्वैत बिंबलें तेजोमय ॥ १ ॥
तेजाकार दिशा बिंबी बिंब एक । निवृत्तीनें चोख दाखविलें ॥ ध्रु. २ ॥
निमाली वासना बुडाली भावना । गेली ते कल्पना ठाव नाही ॥ ३ ॥
सोपान नैश्वर परब्रह्म साचार । सेवितु अपार नामघोषें ॥ ४ ॥

## ६. मुक्ताबाईचे अभंग.

१

प्रकृति निर्गुण प्रकृति सगुण । दीपें दीप पूर्ण एकतत्वें ॥ १ ॥
देखिलेगे माय पंढरिपाटणीं । पुडलिकाअंगणीं विठ्ठलराज ॥ ध्रु. ॥
विज्ञानेंसी तेज सज्ञानेंसि निज । निर्गुणेंसी चोज केलें मये ॥ ३ ॥
मुक्ताई तारक सम्यक विठ्ठल । निवृत्तीनें चोखाळ दाखविले ॥ ४ ॥

२

अवघाचि संसार केला आम्ही गोड । झाडे आणि झूड ब्रह्मरूप ॥
माता आणि पिता गण आणि गोत । कन्या आणि सुत ब्रह्मरूप ॥
वापी कूप सिंधू आणि सरोवर । दरे आणि खोरे ब्रह्मरूप ॥
हत्ती आणि घोडे बैल आणि रेडे । मुगी आणि माकुडें ब्रह्मरूप ॥
आनदाचे लेणें मुक्ताबाई ल्याली । पालवू लागली चागयासी ॥

३

साडी ते माडी माडी ते साडी । साडणें माडणें दोन्ही साडीं ॥ १ ॥
सोहं शून्य बुझा रे भाई । सागते ऐकते दोन्हीही नाहीं ॥ २ ॥
मीं ते काई माझे ते कायी । परियेसी चागया बोले मुक्ताई ॥ ३ ॥

---

१ ओढ लावणारी, उनाड ( ज्ञाने० ११-५४० ). २ चावळणारी.

४

परब्रह्मी चित्त निरंतर धदा । तया नाही कदा गर्भवास ॥ १ ॥
उपजोनी जनी धन्य ते योनी । चित्त नारायणी मुक्तलग ॥ ध्रु० ॥
अव्यक्ती पै व्यक्ति चित्तासि अनुभव । सर्व सर्वी देव भरला दिसे ॥ २ ॥
ज्ञेय ज्ञाता ज्ञान उन्मनी विज्ञान । चित्त नारायण झालें त्याचें ॥ ३ ॥
आदि अंती हरि सर्व त्याचा जाला । परतोनि अबोला प्रपचेसी ॥ ५ ॥
मुक्ताईचें चित्त निरंतर मुक्त । हरि हेंचि संचित आम्हाघरी ॥ ६ ॥

५

निर्गुणाची सेज सगुणाची बाज । तेथें केशीराज पैहुडले ॥ १ ॥
कैसें याचें करणें दिवसा चांदिणें । सावळें उटणें एकतत्त्वें ॥ ध्रु० ॥
नाहीं या ममता अवघीच समता । आदि अंतु बिंबता नलगे वेळू ॥ ३ ॥
मुक्ताई सघन सर्वत्र नारायण । जीवशीव संपूर्ण एकतत्त्वें ॥ ४ ॥

६

नाही सुखदुःख पापपुण्य नाही । नाही कर्मधर्म कल्पना नाही ॥ १ ॥
नाही मोक्ष ना भवबंधन नाहीं ॥ ध्रु० ॥
म्हणे वटेश्वरा ब्रह्म नाही । सहजसिद्ध बोले मुक्ताई ॥ ३ ॥

७

निर्गुणाचे डाहाळी पाळणा लाविला । तेथें सुत पहुडला मुक्ताईचा ॥१॥
निज निज बाळा न करी पै आळी । अनुहात टाळी वाजविते ॥ ध्रु० ॥
तेथें निद्रा ना जागृति भोगीं पै उन्मनी । लक्ष तो भेदुनि निजणा तो ३
निभ्रांत पाळी पाळणा विणवुनी । मन हे बांधोनि पवनदोरा ॥ ४ ॥
एकवीससहस्त्रसहाशेंवेळा बाळा । तोही डोळा स्थिर करीं ॥ ५ ॥
निद्रा ना जागृतिं निजसी काई । परियेसी[4] चांगया बोले मुक्ताबाई ॥६॥

---

१ मोन ' ब्रह्माचा अबोला फिटावा ' ( ज्ञाने० १७–३३२ ). २ निजले. ३ हट. ४ ऐक.

८

भावभक्ति करुनी वैराग्य जोडसी । तरी तू पावसी ब्रह्मसुख ॥ १ ॥
ज्ञानतत्वीं करीं करी हा विचार । निर्गुणीं आकार निरामय ॥ ध्रु० ॥
चांग्या सोय धरी ज्ञानवटेश्वरी । मुक्ताई जिव्हारी बोध करा ॥ ३ ॥

९

निवृत्तीनें दिली शक्ति । चित्त पावलें विश्रांति ॥ १ ॥
विसाविया आलें मन । मन जाहले उन्मन ॥ २ ॥
धन्य जीविताची थोरी । एकाविध चराचरी ॥ ३ ॥
भास मावळला ठायीं । सुखी झाली मुक्ताबाई ॥ ४ ॥

१०

आत्मरूपीं पडली दिठी । चांगया पाहे सर्व सृष्टी ॥ १ ॥
चर्मचक्षूनें न लक्षी । ज्ञानदृष्टीनें परीक्षी ॥ २ ॥
सहजासहजी लाभ झाला । मोल घेया कोण उरला ॥ ३ ॥
सरली हातवटी खेप । केणें घेतलें अमूप ॥ ४ ॥
मुक्ताईची अंतरकळा । कळा विरुनि त्रिकळा ॥ ५ ॥

११

विरक्त म्हणवी आणि इच्छेचा पाइकू । तयाचा विवेकु जाळी परता ॥१॥
षट्शास्त्रवक्ता आणि वितंडवादकू । तयाचा विवेकु जाळी परता ॥ २ ॥
योगिया म्हणवी आणि इंद्रियाचा रंकू । तयाचा विवेकु जाळी परता ॥३॥
मुक्ताई म्हणे ज्याचा परमार्थ माइकु । तयाचा विवेकु जाळी परता ॥४॥

**ताटी उघडा ज्ञानेश्वरा !**

१२

योगी पावन मनाचा । साही अपराध जनाचा ॥ १ ॥
विश्व रागें झालें वन्ही । संतें मुखें व्हावें पाणी ॥ २ ॥

---

1 माल जिन्नस.

शब्दशास्त्रें झाले क्लेश । सतीं मानावा उपदेश ॥ ३ ॥
विश्वपट ब्रह्मदोरा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥ ४ ॥

१३

सत तेचि जाणा जगी । दया क्षमा ज्याचे अगीं ॥ १ ॥
लोभ अहता नये मना । जगी विरक्त तेचि जाणा ॥ २ ॥
इहपरलोकीं सुखी । शुद्धज्ञान ज्याचे मुखी ॥ ३ ॥
मिथ्या कल्पना मागें सारा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥ ४ ॥

१४

एक आपण साधु झाले । येर कोण वाया गेले ? ॥ १ ॥
उठे विकार ब्रह्मीं मूळ । अवघे मायेचे गाबाळ ॥ २ ॥
माया समूळ नुरे जेव्हा । विश्व ब्रह्म होइल तेव्हा ॥ ३ ॥
ऐसा उमज आदिअती । मग सुखी व्हावे सतीं ॥ ४ ॥
चिता क्रोव मागे सारा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥ ५ ॥

१५

ब्रह्म जैसें तैशापरी । आह्मा वडील भूतें सारीं ॥ १ ॥
अहो क्रोधें यावे कोठें । अवघे आपण निघोटे ॥ २ ॥
जीभ दातानी चाविली । कोणें बत्तीशी तोडिली ? ॥ ३ ॥
मन मारुनि उन्मन करा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥ ४ ॥

१६

शुद्ध ज्याचा भाव झाला । दुरी नाही देव त्याला ॥ १ ॥
अवघी साधनहातवटी । मोलें मिळत नाहीं हाटीं ॥ २ ॥
कोणी कोणा शिकवावे । सार साधूनिया घ्यावें ॥ ३ ॥
लडीवाळ मुक्ताबाई । जीव मुद्ल ठायीचे ठायीं ॥ ४ ॥
तुम्ही तरुनि विश्व तारा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥ ५ ॥

## १२. झोक्यावरील ओव्या

१७

पहिली माझी ओवी । परतूनि पाहिलें । दृष्टीनें देखिलें । निजरूप ॥ १ ॥
दुसरी माझी ओवी । दुजें नाही मनी । लक्ष तुझें चरणी । लागीयेलें ॥२॥
तिसरी माझी ओवी । श्रीसरूपता । हात तुझा माथा । सद्‌गुरुनाथा ॥३ ॥
चवथी माझी ओवी । शून्य जेथें आटे । वस्तु घन दाटे । मागेंपुढें ॥४ ॥
पाचवी माझी ओवी । पांच ही अणुआराचीं[1] । पचवीसीयाचा । रीघ नाही
सहावी माझी ओवी । सादृश्य देखणें । वरकड बोलणें फोल जालें ॥ ६ ॥
सातवी माझी ओवी । साच वाटे मनी । अंतरीच्या खुणी । काय सांगू ७।
आठवी माझी ओवी । आठव नाही जरा । निर्गुण सोयरा । पर्णियेला ८
नववी माझी ओवी । नादू जे लागले । परपुरुषा रतलें । जीवेभावें ॥ ९ ॥
दहावी माझी ओवी । वालें माझें मन । डोळा दिसे ऊन । रात्रीमाजी १०
ह्मणे मुक्ताबाई । निवृत्तीचे देणें । योगियाचे खूणें । योगी जाणें ॥ ११ ॥

१८

पैल पैलें[2] ते काहीं नाही । तेचि तू गा पाही आपणिया ॥ १ ॥
आम्हां नाम नाही आम्हा रूप नाही । नामरूप नाही तेचि आम्ही ॥२॥
मुक्ताबाई म्हणे चांगया तू बुझ । अंतरीचें गुज सांगितलें ॥ ३ ॥

१९

वेदश्रुति ठक[3] पाडियेलें वाचा । तेथें कोण पाड तुझा बाळाचा ॥१ ॥
काहीं बोलसी तरी अबोलणें बोल । बोल बोलसी तरी तितुके फोल ॥२॥
अनिर्वाच्य ब्रह्म बोलवे बोलणी । बोलू म्हणता बोलणी लाजू जाय ॥३॥
बोलणें न बोलणें वटेश्वरी गुज । मुक्ताबाई ह्मणे चांगया तू बुझ ॥४॥

---

१ बारीक चाराचुरा अणुआर. पंचभूतें हा विश्वांतला अणुआर आहे. (ज्ञाने.१८-३६) २ पर, पलीकडचें ३ मौन.

## ७ चांगदेव ( चांगा वटेश्वर )

१

आनदवनी भ्रमर होता । झुकारें उडाला गेला केउता ॥ १ ॥
नाम नाहीं रूप नाही । पाहू गेलों तव काहीच नाही ॥ ध्रु० ॥
रुझी राहिली शब्द निमाला । वटेश्वरीं चागा विस्मित जाला॥२॥

२

आकाशी मूळ पाताळी डाहाळी । विस्तारला वृक्ष गेला पाल्हाळी ॥ २ ॥
साउलीये बैसा साऊलिये बैसा । साउलिये बैसा बाइयानो ॥ ध्रु० ॥
असें ते मूळ नसे तें डहाळ । अविवेक गव्हार जात पाल्हाळ ॥ २ ॥
सोह साउलिये चागा जो बैसला । आत्मा तो निवाला आपेआप ॥

३

भावें जोडली सहजभाक्ति । भक्तिनें निमालिया ज्ञाननिवृत्ति ॥१॥
ते पाही शुद्ध चैतन्य । निजानदी निजधाम ॥ ध्रु० ॥
चांगा म्हणे प्रेमाचें प्रेम जी । वटेश्वरी जालें पान जी ॥ २ ॥

४

शून्य तें मूळी शून्य ते डाळी । विस्तारला वृक्ष गेला पाल्हाळी ॥१॥
साउलिये बैसा साउलिये बैसा । साउलिये बैसा उन्मनींये ॥ ध्रु० ॥
वटेश्वर चागा साउलिये बैसला । आत्मा सतोषला आपेआप ॥ २ ॥

५

चागयाचें वऱ्हाड मुक्ताईनें केलें । मूळ जें फेडिलें जन्मातरीचें ॥ १ ॥
आजवर होतो भाजियलें हाड । नाचे सतापुढें स्फुदेस्फुदें ॥ ध्रु० ॥
चौदाशतें जाली बुद्धि माझी गेली । सोय दाखविली मुक्ताईनें ॥ २ ॥
धन्य निवृत्तिदेव धन्य सोपानदेव । परब्रह्म ठेव दाखविली ॥ ३ ॥
धन्य ज्ञानदेव धन्य मुक्ताबाई । चांगा त्पणे आईपोटीं आलों॥ ४ ॥

६

फुल नाही तेथें फळ चिंतिसी कायी । शून्य तेथें आकार पाहसील कायी॥१॥

रूप सांडी मना रूप सांडी । अखंड ध्यायी सोहंशब्दीं ॥ ध्रु० ॥
तत्त्वाचा विचारु महातटी पाही । चांगा ह्मणे वटेश्वरा ध्यायी ॥ २ ॥

७

चांगा निर्मोनिया चांगा पै जाला । जेंगटाचें नादें जेंगटी सामावला ॥१॥
नादु पै नाहीं बिंदु पै नाहीं । सोहंशब्दीं पाहीं चिदानंदु ॥ ध्रु० ॥
चांगा होता तो वटेश्वरु जाला । हा शब्दभेद भेदोनिया गेला ॥

८

साकारलें ब्रह्म रूपासी आलें । आंत बाहेर विश्व एक फुललें ॥ १ ॥
भेदाचि नाहीं तेथें भेदसी कायी । वटेश्वरसुता बोले मुक्ताई ॥ २ ॥
सांगेन सुता बोलूं नको कांहीं । आपुलें मानुनी निज तेंचि होई ॥३॥
चांगा बाळ वटेश्वरी खेळत । मुक्ताबाई कवळ असे देत ॥ ४ ॥



९

आपुलें म्हणविसी यातीभेद तो काय करिसी ।
अजामीळ गणिकेसी उद्धरिलें ॥ १ ॥
अंतरींचें नेणसी वाचा तें काय करिसी ।
पाषाणपशूसी उद्धरिलें ॥ २ ॥
भक्तीचा वेडा न म्हणे साना थोर ।
उपमन्यु धुरु उद्धरिले ॥ ३ ॥
पतीतपातकी भोगीया समदृष्टी ।
नामें सकळ सृष्टी उद्धरिली ॥ ४ ॥

चांगा म्हणे ते नाम आपण ध्यान करणें ।
आपण वटेश्वरी भेदु नाहीं ॥ ५ ॥

१०

कारिसंवाणी न व्हावा । सेखीं दीनवदन न दिसावा ।
मातें कोणी नेणे । सेखी तुमतें लाजिरवाणें ॥ ध्रु० ॥
जया तयापरी तुझाचि पै गा । विनवी चागा वटेश्वरा लीलिंगा ॥२॥

## चांगा वटेश्वराच्या आरत्या.

१

वटेश्वरु देवो तारकु माझा । दैवाची उजरी दिनकरु शोभा ।
आदिअतीं सोम झळकत नभा । तैसी तप्तीतीरीं साधुसताची सभा ॥१॥
जय जय आरती येथे प्रेमाच्या धारा । वर्षत अमृतराज गेला सागरा ॥ध्रु०॥
येथींचे उद्गार न समाती देही । उन्मळीत थडी गेली ज्ञानडोही ।
पाठी ना पोट आदिअतु नाही । त्रिकाळ गर्जती साधुसत पाहीं ॥ २ ॥
येथ मुक्ताई तारु चागला पोहणारु । गेला पैलथडीये केला उतारु ।
वटेश्वरी गर्जता नाही आपपरु । सोपाना आलगी विसोबा खेचरु ॥ ३ ॥
साधुसता वीरी गर्जता अबर । टाळश्रुती गरुडउटके याचे भार ।
जय जय शकरा कोंदाटलें महाद्वार । लोळती सनकादीक सेविती ब्रह्म अपार
सावुसताचरणी ब्रीदाचा तोडरु । कळिकाळा रिघु नाहीं नामाचा गजरु ।
शूद्रसेन घरटी फिरे अवसरु । चागा म्हणे अघवा जाला वटेश्वरु ॥ ५ ॥

२

तप्तीतीरी देव प्रगट जाला ।——। आता विवेक तारावया आला ।
प्रगटली मूर्ति आनद जाला ॥ १ ॥ जय जय आरती जय वटेश्वरा ।
निराकार साकार तूंचि शंकरा । सद्भावें आरती तुज परात्परा ।
भक्त तारावया कर्पूरगौरा ॥ ध्रु० ॥

---

1 कार्श्य ' रोड.

ज्ञानदेव माउली भेटें आम्हा । तोडिले भवदोष ससारश्रमा ।
मुक्ताई अंजन तिनें दाविलें ब्रह्मा । निश्चया निश्चित जालों निष्कामा ॥२॥
अमृतशर्करा लावूनी वोठी । तै साधुचरणी पडली समदृष्टी ।
लय लक्ष गेले ते प्रेमाच्या पोटी । त्राहे न विसंबे आता धूर्जटी ॥ ३ ॥
धन्य वटेश्वर धन्य मुक्ताबाई । धन्य नामदेव ज्ञानदेव पाही ।
नित्यनेम चालता आरती सोई । प्रकाशी प्रकाश सोहदीप हृदयी ॥ ४ ॥
बाविस जन्म जाणें भक्तिचें मुख । तेचि प्रेमें आम्हा केलें सन्मूख ।
मुक्ताईप्रसादें चागावटेश्वरी ऐक्य । ओवाळित पचारति चाग्या लय लक्ष ॥५॥

## ज्ञानेश्वरांचा चांगदेवास बोध

स्वास्ति श्रीवटेशु । जो लपोनि जगदाभासु ।
दावी–मग ग्रासु । प्रगटला करी ॥ १ ॥
प्रगटे तव तव न दिसे । लपे तव तव आभासे ।
प्रगट ना लपाला असे । न खोभता[1] जो ॥ २ ॥
बहु जव जव होये । तव तव काहीच न होये ।
काही नेहोनि[2] आहे । अववाचि जो ॥ ३ ॥
सोनें सोनेपणा उणें । न येताचि झालें लेणें ।
तेंवि न वेंचता जग होणें । अगें जया ॥ ४ ॥
कल्लोळकचुक । न फेडिता उघडें उदक ।
तेंवी जगेंमी सम्यक्–। स्वरुप जो ॥ ५ ॥
परमाणूचिया मांदियाँ[3] । पृथ्वीपणें न वचेचि वाया ।
तेंवि विश्वस्फूर्ति इया । झाकवेना जो ॥ ६ ॥
कळांचेनि पाघुरणें । चद्रमा हारपो नेणें ।
का वन्हि दीपपणें । आँन[4] नोहे ॥ ७ ॥
म्हणोनि अविद्यानिमित्तें । दृश्य द्रष्टत्व वर्ते ।

---

1 क्षोभता, क्षोभ पावणारा. २ न होता. ३ अनेक कण. ४ अन्य, वेगळा.

तें मी नेणें आइतें । ऐसेंचि असे ॥ ८ ॥
जेंवि नाममात्र लुगडें । येऱ्हवी सूतचि तें उघडें ।
का माती मृद्भाडें । जयापरी ॥ ९ ॥
तेंवि द्रष्टादृश्यदशे-। अतीत दृङ्मात्र जें असे ।
तेंचि द्रष्टादृश्यमिसें । केवळ होय ॥ १० ॥
अलंकार येणें नामें । असिजे निखिळ हेमें ।
नाना अवयवसभ्रमें । अवयविया जेंवि ॥ ११ ॥
दृश्याचें जालेपणें । दृष्टि द्रष्टृत्व होणें ।
पुढती तें गेलिया जाणें । तैसेंचि दोनी ॥ १२ ॥
दर्पणाऱ्या आधीं शेखीं । मुख असताचि असे मुखीं ।
माजी दर्पण-अवलोकीं । आन काही होय ? ॥ १३ ॥
एव एकाचि जाली ती होती । तिन्ही गेलिया एकचि व्यक्ती ।
तरी तिन्ही भ्राति । एकपण साच ॥ १४ ॥
तया पुत्र तू वटेश्वराचा । रवा जैसा कापुराचा ।
तुज मज आपणयाचा । बोल ऐकें ॥ १५ ॥
सखया ! तुझेनि उद्देगें । भेटावया जीव उल्हासे ।
की सिद्धभेटी विसकुसे । ऐसिया बिहे ॥ १६ ॥
लवण पाणियाचा थावो । माजीं रिघोनि गेलें पाहो ।
तव तेंचि नाही मा काय घेवों । माप जळा ॥ १७ ॥
तैसें तुज मज आत्मयातें पाही । देखों गेलिया मीचि नाहीं ।
तेथें तू कैचा काहीं । कल्पावयाजोगा ? ॥ १८ ॥
उपजता गोठी । न फुटतां दिठी ।
मीतूवीण भेटी । माझी तुझी ॥ १९ ॥
जालिया प्रळयीं एकार्णव । अपार पाणियाची धाव ।

1 वस्त्र.

गिळी आपुला उगव । तैसें करी ॥ २० ॥
ज्ञानदेव म्हणे नामरूपें–। वीण तुझें साच आहे आपणपें ।
तें स्वानदजीवन पे । मुखिया होई ॥ २१ ॥ ( चागदेवपासष्टी )

## ८ विसोबा खेचर.

१

आधी चैतन्यें आपैतें[1] करी । मग सचरे तारुण्यवनी ।
कामक्रोध तुज देखोनी । जाती पळोनी बारा वाटा ॥ १ ॥
तुजपाठी कोण धावे । कवण टाकी कवण पावे ।
कामक्रोधें जग मोहावें । कासया शिरवावे पोटी पाये ॥ २ ॥
मायामोहजाळी तुटैल पळ । नाही गरळ[2] मा कैचा व्याळ ।
कारे स्मरतोसी गोपाळ । मिथ्या व्याकुळ काजेवीण ॥ ३ ॥
वैराग्यें दृढ होई निरुतां[3] । परस्त्री तितुकी मानी माता ।
कासया भीतोसी चपेटघातों[4] । विषयानिमित्ता अल्पासाठी ॥ ४ ॥
धर्माचेनि मार्गें रिघाला कर्ण । सिभ्रु चक्रवर्ती जाला जीमूतवाहन ।
तयामाजी साग नाडला कोण । लटिकी झकवण का बोलतोसी ॥
मग धणीवेरी धावा पोकारीजे[5] । काय रे सागों शाहाणपण तुझें ।
खेचरविसा म्हणे । अरे नामया ॥ ५ ॥

२

मुळु[6] वदनाचा आगळू[7] हाताचा । उधार्नु[8] नेत्राचा स्वामी माझा ॥ १ ॥
मुगुट जयाचा केवल्याआगळे[9] काटी । पइंतृ[10] तळवटी चरण ज्याचे ॥२॥

---

१ वश, स्वाधीन, हस्तगत ‘ इद्रियें आपैती होती । जयाचें ह्मणितलें करिती ( ज्ञाने० २–३०२ ) ‘ ज्ञानही आपैतें होईल ’ ( ज्ञाने० १५–३९१ ) २विष. ३ नि:सशय. ४ चापट, थापटणे, काळाचा चपेट. ५ पोटभर हाका माराव्यात, आळवावे. ६ पाच तोडांचा. ७ दहा हातांचा. ८ तीन नेत्राचा, त्रिनेत्र शिव. ९ एकागळे वीस ( काटी ) ह्म० एकवीस (स्वर्ग). १० सात, सत्त ( पाताळ ).

पोर्कू ते भागले शेली[२] वेडावले । अगुळुमगी[३] झाले थकित रया ॥३॥
ढकारूवैंदनाचा[४] आला वर्णावया । जिव्हा चिरलिया न कळे त्यासी ॥४॥
सद्भावें शरण आवारु[५] जोडुनी । खेचरविसा चरणी विनटला ॥ ५ ॥

३

जळ स्थळ काष्ठ पाषाणु । पिंडब्रह्मांड अनुरेणु[६] ।
सर्वस्वें आपणु । साक्ष असे ॥ १ ॥
हें जाणोनिया यापरतें । जाणे आपआपणियातें ।
खेचर म्हणे नामयातें । अवघाचि देव ॥ ध्रु० ॥
श्रवणी सांगितली मात । मस्तकी ठेविला हात ।
पदेंपिंडविवर्जित । केला नामा ॥
खेचर विसा । प्रेमाचा हो पिसा ॥
तेणें नामा कैसा । उपदेशिला ॥
सांगितलें गूज । दाखविलें निज ॥
पाल्हाळी हो तुज ।काय चाड ॥

---

१ चार ( वेद ) २ सहा (शास्त्रें) ३ अठरा (पुराणे). ४ सहस्र वदनाचा (शेष) ५ दोन (हात) ६ 'अणोरणीयान् महतो महीयान्'. २ पद, ब्रह्मपद, परमात्मा. पिंड ह्म० शरीरास मी म्हणणारा जीव, पिंडजन ह्म० जीवसृष्टि. ' तैसें होय शरीर । तै ह्मणिजे खेचर । हें पद होतां चमत्कार । पिंडंजनीं ' ( ज्ञाने० ६-२९६ ) कुंडलिनीचें तेज प्रकट होऊन ती वायुरूप होते तेव्हां योग्याचा देह सावयव असला तरी देह जणु काय वायूचाच होतो असें सांगून ज्ञानोबाराय वरील ओवींत म्हणतात: असें शरीर होतें तेव्हां त्यास खेचर म्हणतात. असें पद मिळणें हा देहधारी लोकांत मोठा चमत्कार मानला जातो. ह्या ओव्या पाहतांना ज्ञानोबारायांनीच विसोबास खेचर ही थोर पदवी दिली असावी असें मनात आलें. तात्पर्य पद ह्म० ब्रह्म व पिंड ह्म० जीव. पदपिंडविवर्जित ह्म० जीवभाव व ब्रह्मभाव दोनी जाऊन केवल ब्रह्म होणें. ' ते गुरुशिष्यांची गोठीं । पिंडापदांची गांठी ' ( ज्ञाने० ३-२७२ ).

खेचर म्हणे मज । ज्ञानराज गुरु ।
तेणें अगोचरु । नामा केला ॥

४

माझी मूळपीठिका सोपान सद्गुरु । तेणें माथा करु ठेवियेला ॥ १ ॥
त्याचे कृपेंकरून मीपणा ठकलों । देहेभावा गेलों विसरूनिया ॥ २ ॥
चागयाचा अगीकार मुक्ताईनें केला । सोपान बोळला मजवरी ॥ ३ ॥
जन्ममरणाचें भय नाही आता । खेचरी तत्वता मुद्रा दिली ॥ ४ ॥
जिकडे पाहे तिकडे आनद भरला । खेचर सामावला तयामाजी ॥ ५ ॥

५

पर्वतप्राय पापराशी होती दग्ध । वाचेसी मुकुद उच्चारिता ॥ १ ॥
अच्युत श्रीहरी केशव नरहरी । माधव हरिहरी रामकृष्ण ॥ २ ॥
नामासी साधन करिसील पूर्ण । तै प्रपचाचें भान उरों नेदी ॥ ३ ॥
उदासीन वृत्ती आचरावें कर्म । नाही देहधर्म गुणमाया ॥ ४ ॥
ऐसा हा अनकळित मार्ग साधे तुज। खेचरविसा गुज सागे नाम्या ॥५॥

६

भवजलधि अगाध तरावया दुस्तर । रचिलें पढरपूर चद्रभागीं ॥ १ ॥
तारू पढरिनाथ मोलेविणें उतरतु । उमगला असे तिष्ठतु वाट पाहे ॥२॥
बुडत्याचें भय नाही गा सवसारी । कलिमाजी पढरी नाव थोर ॥ ३ ।
रावरक दोनी बैसवोनी वरी । उतरतु पैलतीरी भरवसेनी ॥ ४ ॥
पक्षी कीट गुल्म कितीएक तारिले । खेचरविसा तारिले पुडलीकें ॥५॥

७

तुझें निजगुज तुजपासी आहे । विचारूनि पाहे मनामाजीं ॥

---

१ क्लशरहित 'त तुज अनायासें अनकळित जोडिली असे' (ज्ञाने० २-१० ). २ मोल न घेतां. " देवा माझें मन करोनी स्वाधीन । निमोळी स्वार्थपण भोगसी ना ॥ फुकाचा कामारा बोळगे निरतर । न घाली तुज भार कल्पनेचा " ( नामदेव ). मोलेवीण, निमोळी, निमोली.

विवेक वैराग्य शोधूनिया पाहे । तेणे तुज होये ब्रह्मप्राप्ती ॥
ज्ञानाचा प्रकार सहजचि जाला । आहे भाव गेला गळोनिया ॥
खेचरविसा जेथें ओंकार निमाला । सहजचि जाला ब्रह्ममूर्ती ॥

## ९ नामदेव.

१

तिन्ही देव जैसे परब्रह्मीचे ठसे । जगी सूर्य जैसे प्रकटले ॥ १ ॥
धन्य तो निवृत्ति धन्य तो सोपान । धन्य तो निधान ज्ञानदेव ॥ २ ॥
उपजता ज्ञानी हें वर्म जाणोनी । आले लोटांगणी चांगदेव ॥ ३ ॥
सोहंसुकृताच्या सोडोनिया गांठी । केलीसे मराठी गीतादेवी ॥ ४ ॥
नामा म्हणे सर्व सुकृत लाहिजे । एक वेळा जाईजे अलकापुरा ॥५॥

२

ज्ञानराज माझी योग्याची माउली । जेणे निगमवेल्ही[1] प्रकट केली ॥ १ ॥
गीता–अलंकार नाम ज्ञानेश्वरी । ब्रह्मानंदलहरी प्रगट केली ॥ २ ॥
अध्यात्मविद्येचें दाविलेंसें रूप । चैतन्याचा दीप उजळला ॥ ३ ॥
नामा म्हणे ग्रंथश्रेष्ठ ज्ञानदेवी । एक तरी ओवी अनुभवावी ॥ ४ ॥

३

वेदाचें पै सार निर्मिली ती गीता । तिचा अर्थ चित्ती असो द्यावा ॥ १ ॥
संस्कृत भाषा जगासी कळेना । म्हणुनि नारायणा दया आली ॥ २ ॥
देवांजीनें त्वरें घेतला अवतार[2] । म्हणती ज्ञानेश्वर तयालागी ॥ ३ ॥
गीता शोधोनीया अर्थ जो काढिला । ग्रंथ आरंभिला ज्ञानेश्वरी ॥ ४ ॥
ज्ञानेश्वरी ग्रंथ साराहूनि सार । फोडिलें भांडार वैकुंठीचें ॥ ५ ॥
नामा म्हणे माझा ज्ञानराज प्राण । तयाचे चरण वंदीन मी ॥ ६ ॥

४

आह्मा सांपडलें वर्म । करूं भागवतधर्म ॥ १ ॥

---

१ वेदाची वेल. २ ज्ञानेश्वर हा महाविष्णूचा अवतार.

अवतार हा भेटला । बोलू चालू विसरला ॥ २ ॥
अरे ! हा भावाचा लपट । सांडुनि आलासे वैकुंठ ॥ ३ ॥
संतसंगती साधावा । धरूनि हृदयीं बांधावा ॥ ४ ॥
नामा म्हणे केउता जाय । आमुचे गळां त्याचे पाय[2] ॥ ५ ॥

५

नाशवंत देतां ब्रह्म येईल हातां । ऐसी ज्याची कथा पुराणांत ॥ १ ॥
सद्‌गुरूचे पायीं देहासी अर्पितां । तात्काळ मुक्तता हाता येते ॥ ध्रु० ॥
माया देवोनिया ब्रह्म घ्यावें हातीं । ऐशा गुरूप्रति कां भजाना ॥ ३ ॥
नामा म्हणे गुरुपायीं लाभ आहे । मोक्ष तोही पाहें दास होतो ॥ ४ ॥

६

सद्‌गुरुसारिखा सोइरा जिवलग । तोडिला उद्वेग संसारीचा ॥ ॥१ ॥
काय उतराई होऊं कवण्यागुणें । जन्मा नाहीं येणें ऐसें केलें ॥ ध्रु० ॥
माझें सुख मज दाखविलें डोळां । दिधली प्रेमकळा नाममुद्रा ॥ २ ॥
डोळियाचा डोळा उघडिला जेणें । लेवविलें लेणें आनंदाचें ॥ ३ ॥
नामा म्हणे निकी सांपडली सोय । न विसंबें पाय खेचराचे ॥ ४ ॥

७

सद्‌गुरूचे पाय जीवें न विसंबावे । मन वळवावें वृत्तीसहित ॥ १ ॥
डोळियाचे डोळे उघडिले जेणें । आनंदाचें लेणें लेवविलें ॥ ध्रु० ॥
जन्ममरणाचें फेडिलें सांकडें । कैवल्याचि[3] पुढें दाखविलें ॥ ३ ॥
मोहरले[4] तरु पुष्पफळभारें । तेचि निराकार सनकादिक ॥ ४ ॥
नामा म्हणे स्वामी खेचरमाउली । कृपेची साउली केली मज ॥ ५ ॥

८

माझें मन पाहें कसून । चित्त न ढळे तुजपासून ॥ १ ॥

---

१ विठ्ठल. २ त्याचे चरण आम्ही कंठीं दृढ धरिले आहेत. ३ परमात्मा, मोक्ष. ४ वृक्षांना मोहर आला, विकसले.

मजवरी घाली घण । परी मी न सोडीं चरण ॥ ध्रु० ॥
मान कापून देईन शीर । पाहें कृपण कीं उदार ॥ ३ ॥
नामा म्हणे खेचर माय । आम्हा तारक तुझे पाय ॥ ४ ॥

९

कृष्णभक्तिवीण तरला आहे कोण । द्यावा निवडोन एक तरी ॥ १ ॥
कार्यकारण हा लटिकाचि श्रम । न कळोनिया वर्म वाया गेले ॥ ध्रु० ॥
नामा म्हणे माझी खेचरमाउली । विठोनें दाविली वाट मज ॥ ३ ॥

१०

देशी परदेशी झालों तुजवीण । माझे समाधान कोण करी ॥ १ ॥
चातक[1]चकोरापरी पाहें वास । तू का हो उदास पांडुरंगा ॥ ध्रु० ॥
नामा म्हणे चित्त देई माझ्या बोला । जीव तो उलला निघो पाहें ॥ ३ ॥

११

काय गुणदोष माझे विचारिसी । आहें मी तों राशी अपराधाची ॥ १ ॥
अंगुष्ठापासोनी मस्तकापर्यंत । अखंड दुश्चित आचरलों ॥ ध्रु० ॥
स्वप्नीं देवा तुझी नाही घडली भक्ति । पुससी विरक्ति कोठूनिया ॥ ३ ॥
तूंचि माझा गुरु तूंचि तारी स्वामी । सकळ—अंतर्यामी गाऊं तुज ॥४॥
नामा म्हणे माझें चुकवी जन्ममरण । नको करूं शीण पांडुरंगा ॥ ५ ॥

१२

समर्थाचें बाळ पाघरे वाकळें[2] । हासती सकळ लाज कोणा ॥ १ ॥
देव असता दैन्य उरे कैचें बापा आम्हासि तू का पा विसरलासि ॥ध्रु०॥
ऐसा तू अविनाश त्रिभुवनीचा राजा । नामा म्हणे माझा तूंचि स्वामी ३॥

१३

भोगावरी आम्हीं घातिला पाषाण । मरणा मरण आणियेलें ॥ ४ ॥

---

१ चातक मेघाची व चकोर चद्राची तसा मी तुझी अनन्यत्वें वाट पाहत आहे २ रगटें

नाहीं यासी पतन न होय बंधन । नित्य हेंचि स्नान रामनामीं ॥ ध्रु० ॥
नामा म्हणे भाव सर्वांभूती करा । आणिक पसारा घालूं नका ॥ ३ ॥

१४

तूं माझी माऊली मी वो तुझा तान्हा । पाजी प्रेमपान्हा पांडुरंगे ॥१॥
तूं माझी गाउली मी तुझें वांसरूं । नको पान्हा चोरूं पांडुरंगे ॥ ध्रु० ॥
तूं माझी हरिणी मी तूझें पाडस । तोडीं भवपाश पांडुरंगे ॥ ३ ॥
तूं माझी पक्षिणी मी तुझें अंडज । चारा घालीं मज पांडुरंगे ॥ ४ ॥
नामा म्हणे होसी भक्तीचा वल्लभ । मागेंपुढें उभा सांभाळिसी ॥ ५ ॥

१५

डोळे शिणले पाहतां वांटुली[1] । अवस्था[2] दाटली हृदयामाजी ॥ १ ॥
तूं माझी जननी मराैमिये[3] सांगातिणी । विठ्ठले धांवोनि देई क्षेम ॥ ध्रु० ॥
तूं माझी पक्षिणी मी तुझें अंडज । क्षुधें पीडिलों मज विसरलीसी ॥ ३ ॥
तूं माझी कुरंगी मी तुझें पाडस । गुंता भवपाश तोडीं माझा ॥ ४ ॥
तूं माझी माउली मी तूझी तान्हुली । वोरैमें[4] वो घाली प्रेमपान्हा ॥ ५ ॥
नामा म्हणे आस पुरवावी माझी । तान्हुलया पाजीं प्रेमपान्हा ॥ ६ ॥

१६

उडाली पक्षिणी गेली अंतराळीं । चित्त बाळाजवळी ठेवूनिया ॥ १ ॥
तैसें माझें मन राहो का ईश्वरीं । मग सुखें संसारी असेन का ॥ध्रु०॥
धेनु चरे वनीं वत्स असे घरीं । चित्त वत्सावरी ठेवुनि फिरे ॥ ३ ॥
दुडीवरी दुडी[5] सखिसी गोष्टी करी । चित्त दुडीवरी ठेवूनिया ॥ ४॥
विष्णुदास नामा विनवि परोपरी । हें प्रेम श्रीहरी द्यावें मज ॥ ५ ॥

---

१ वाट. २ भेटावयाची उत्कंठा, तळमळ ३ श्रेष्ठ मैत्रीण ४ अत्यंत प्रीतीनें 'जैसी भुलली वोरमें । माय बोले बाळोद्देशें' ( ज्ञाने० १३–१३२८ ). ५ घागर, हांडा

१७

तू अवकाश मी भूमिका । तू लिंग मी साळुंकी[1] ।
तू समुद्र मी चंद्रिका । स्वयें दोन्ही ॥ १ ॥
तूं वृंदावन मी चिरी[2] । तू तुळशी मी मंजरी ।
तू पावा मी मोहरी[3] । स्वयें दोन्ही ॥ ध्रु० ॥
तू चांद मी चांदणी । तू नाग मी पद्मिणी ।
तू कृष्ण मी रुक्मिणी । स्वये दोन्ही ॥ ३ ॥
तू नदी मी थडी । तू तारू मी सांगडी ।
तू धनुष्य मी भातोडी । स्वयें दोन्ही ॥ ४ ॥
तू वेद मी स्तविता । तू शास्त्र मी गीता ।
तू गंध मी अक्षता । स्वयें दोन्ही ॥ ५ ॥
नामा म्हणे पुरुषोत्तमा । स्वयें जडलों तुझ्या प्रेमा ।
मी कुडी तूं आत्मा । स्वयें दोन्ही ॥ ६ ॥

१८

बोलूं ऐसे बोल । जेणें बोलें विठ्ठल डोले ॥ १ ॥
प्रेम सर्वांगाचें ठायीं । वाचे विठ्ठल रखुमाई ॥ ध्रु० ॥
नाचूं कीर्तनाचे रंगीं । ज्ञानदीप लावूं जगीं ॥ ३ ॥
परेहूंनि[4] परतें घर । तेथें राहूं निरंतर ।
सर्वसत्ता आली हाता । नामयाचा खेचर दाता ॥ ४ ॥

१९

तुझें प्रेम माझे हृदया आवडी । चरण मी न सोडी पांडुरंगा ॥ १ ॥
काशासाठीं शीण थोडक्याकारणें । काय तुज उणें होय देवा ॥ ध्रु० ॥
चंद्र चकोराचा पुरवी सोहळा । काय त्याच्या कळा न्यून होती ॥ ३ ॥

---

१ लिंगाची बाटोळी बैठक. २ दगड, पाषाण ३ अभिमुखता ४ परावाणीच्या पलीकडे.

नामा म्हणे मज अनाथा सांभाळी । हृदयकमळीं स्थिर राहे ॥ ४ ॥

२०

वारवार काय विनवावें आता । समजावें चित्ता आपुलीया ॥ १ ॥
तूं काय म्हणसी कटाळेल हाचि । जाईल उगाचि उठोनिया ॥ध्रु०॥
मजलागीं देवा जासी चुकवोनी । आणिन धरोनि तुजलागी ॥ ३ ॥
दृढभक्तिभाव प्रेमाचा हा दोरा । बाधीन सत्वर तुझे पायीं ॥ ४ ॥
नामा म्हणे बोल काय विठो आता । भेटावें सर्वथा यात बरें ॥ ५ ॥

२१

जयवत असो लक्ष्मीचा चूडा । धावत दुडदुडा त्वा बा यावें ॥ १ ॥
बैसावयालागी नको घेऊ घोडा । धावत दुडदुडा त्वा बा यावें ॥ ध्रु०॥
अडखळूनि पडसी नको घालूं जोडा । धावत दुडदुडा त्वा बा यावें ॥३॥
येथें येतेवेळीं आळस तुम्ही सोडा । त्याला बाहे[3] वेडा नामदेव ॥ ५ ॥

२२

केधवा भेटसी माझिया जिवलगा । येगा पांडुरगा मायबापा ॥ १ ॥
आशा धरूनि पोटीं दिवस लेखी बोटीं । प्राण ठेऊनि कंठीं वाट पाहे ॥
चित्त निरतर ठेउनी महाद्वारीं । अखड पढरी हृदयीं वसे ॥ ३ ॥
श्रीमुख साजिरें कुडलें गोमटी । तेथें माझी दृष्टी बैसलीसे ॥ ४ ॥
आँसवे[4] दाटूनि पसरूनि बाहे[5] । नामा वाट पाहे विठलाचि ॥ ५ ॥

२३

देह जावो अथवा राहो । पांडुरगीं दृढ भावो ॥ १ ॥
चरण न सोडी सर्वथा । तुझी आण पढरीनाथा ॥ २ ॥

---

१ 'प्रणयरशनया धृताङ्घ्रिपद्म.' ( भागवत स्कंध ११–२–५६ ). हाच भागवताचा चरण 'प्रेमसूत्रदोरी । नेतो तिकडे जातो हरी' याप्रमाणे तुकोबांच्या वाणींतही उतरला आहे. २ कंकण लक्ष्मीपति विष्णु हाच बालकृष्ण –विठ्ठल. ३ बोलावतो. ४ अश्रु. ५ बाहु.

वदनीं तुझें मंगळनाम । हृदयीं अखंडित प्रेम ॥ ३ ॥
नामा ह्मणे केशवराजा । केला नेम चालवी माझा ॥ ५ ॥

२४

बरवेपणी बरवा बाप हा मदनाचा । तो स्वामी आमुचा पांडुरंग ॥ १ ॥
चतुरपणें चतुर पिता हा ब्रह्मयाचा । तो स्वामी आमुचा पांडुरंग ॥२॥
पवित्रपणें पवित्र बाप हा गंगेचा । तो स्वामी आमुचा पांडुरंग ॥ ३ ॥
समर्थपणे समर्थ राजा त्रैलोक्याच्या । तो स्वामी आमुचा पांडुरंग ॥ ४ ॥
उदारपणें उदार कांत जो लक्ष्मियेचा । तो स्वामी आमुचा पांडुरंग ॥५॥
झुंझारपणें झुंजार बाप बळियाचा । तो स्वामी आमुचा पांडुरंग ॥ ६ ॥
नामा ह्मणे विठो बाप हा विश्वाचा । तो स्वामी आमुचा पांडुरंग ॥ ७ ॥

२५

तुझिया सत्तेनें वेदासी बोलणें । सूर्यासी चालणें तुझिया सत्ते ॥ १ ॥
ऐसा तूं समर्थ ब्रह्मांडाचा धणी । वर्म हें जाणोनी शरण आलों ॥ २ ॥
मेघानी वर्षावें पर्वती बैसावें । वायूनें हिंडावें सत्ता तुझी ॥ ३ ॥
नामा म्हणे तुजवीण न हाले साचार । प्रभू तूं निर्धार पांडुरंगा ॥ ४ ॥

२६

येवढा वेळ कां लाविला । कोण्या भक्तानें गोंविला ? ॥ १ ॥
झडकरि येई गा विठ्ठला । कंठ आळविता सोकला ॥ २ ॥
वाट पाहतों दाही दिशा । पोटीं धरूनिया आशा ॥ ३ ॥
कधीं येइल हरी माझा । आलिंगीन चहू भुजा ॥ ४ ॥
नामा गहिवरें दाटला । पूर धरणिये लोटला ॥ ५ ॥

---

१ ह्या सुंदर अभंगांत ज्ञानेश्वरीतील पुढील ओव्यांच प्रतिबिंबित आहेत "आकाशें सर्वत्र बसावें । वायूनें नावभरी उगें नसावें । पावकें दाहावें । वर्षावें जळें ॥ २८१ ॥ पर्वतीं बैसका न सडावी । समुद्रीं रेखा नोलांडावी । पृथ्वीया भूतें वाहावीं । हे आज्ञा माझी ॥ २८२ ॥ म्या बोलविल्या वेद बोले । म्यां चालविल्या सूर्य चाले" । (अ० ९)

२७

आम्हां कीर्तन कुळवाडी । आणिक नाहीं उदीमजोडी ॥ १ ॥
वाचा पिकली पिकली । हरिनामाची वैरो झाली ॥ २ ॥
एकादशीचे दिवशीं । झाल्या कैवल्याच्या राशी ॥ ३ ॥
संत म्हणती नामा आला । हरिनामाचा सुकाळ जाला ॥ ४ ॥

२८

सुखालागीं जरि करिसि तळमळ । तरि तूं पंढरिसी जाय एकवेळ ॥ १ ॥
मग तूं अवघाची सुखरूप होसी । जन्मोजन्मींचें दुःख विसरसी ॥ २ ॥
चंद्रभागेचें करीताचि स्नान । तुझे दोष पळतील रानोरान ॥ ३ ॥
लोटांगण घालोनि महाद्वारीं । कान धरोनि नाचे गरुडपारीं ॥ ४ ॥
नामा ह्मणे ऊपमा काय द्यावी । माझ्या विठोबाची इडापिडा जावी ॥५॥

२९

पंढरीचें सुख जिहीं अनुभविलें । भावें अनुसरले विठ्ठलपायीं ॥ १ ॥
कायावाचामन रंगलें चरणीं । धरियेला मनीं पांडुरंग ॥ २ ॥
नामाचेनि बळें उडविलीं साधनें । तोडिलीं बंधनें संसाराचीं ॥ ३ ॥
मुक्तिपद कोणी नेघे फुकासाठीं । हिंडे वाळवंटीं दीनरूप ॥ ४ ॥
हर्षे निर्भर नामा नाचे महाद्वारीं । कीर्ति चराचरीं वर्णीतसे ॥ ५ ॥

३०

श्रीधरा अनंता गोविंदा केशवा । मुकुंदा माधवा नारायणा ॥ १ ॥
देवकीतनया गोपिकारमणा । भक्तउद्धरणा केशीराजा ॥ २ ॥
मकरकुंडलें श्रवणीं शोभती । एकावळी दीप्ती सृष्टी शोभे ॥ ३ ॥
नामा म्हणे तुझा न कळेचि पार । भजे निरंतर भक्तजन ॥ ४ ॥

---

१ अन्नसामग्री । लयलूट. २ एकपदरी माळेची कांति 'मोतियें मिळोनि बहुवें । एकावळीचा पाड आहे' (ज्ञाने० १८—५६)

३१

सताची विश्रांती ज्ञानियांचें गुज । मुक्तीचें हें बीज मोक्षदानी ॥ १ ॥
कृष्णा विष्णु हरी मुकुद मुरारी । अच्युता नरहरी नारायणा ॥ २ ॥
गोवर्धनधर गोपीमनोहर । भक्तकरुणाकर पांडुरगा ॥ ३ ॥
तूंचि हें सकळ आदिमध्यअतीं । निजसुखसपत्ती सज्जनाची ॥ ४ ॥
तूंचि माझा श्रोता तूंचि माझा वक्ता । तूंचि घेता देता प्रेमसुख ॥ ५ ॥
विष्णुदास नामा विनवी पुरुषोत्तमा । सोडवी भवभ्रमापासोनिया ॥ ६ ॥

३२

आह्मी विठोबाचे दूत । यम आणू शरणागत ॥ १ ॥
मुखें नाम हातें टाळी । महापापा करू होळी ॥ २ ॥
मुखी हरिनामाचा घोष । कुभपाक पाडू ओस ॥ ३ ॥
एवढा प्रताप हरिनामाचा । रीघ नव्हे कळिकाळाचा ॥ ४ ॥
ऐसा नामा यशवत । विठोबाचा शरणागत ॥ ५ ॥

३३

हाती विणा मुखी हरी । गाये राउळाभीतरी ॥ १ ॥
तहानभूक हारपली । छद लागला विठ्ठलीं ॥ २ ॥
स्त्रीपुत्र बापमाय । याचा आठव न होय ॥ ३ ॥
देहभाव विसरला । छंद हरीचा लागला ॥ ४ ॥
नामा म्हणे हेंचि देई । तुझे पाय माझे डोयी ॥ ५ ॥

३४

पाहतां तुझे चरण हरली भवव्यथा । पुढती एक चिंता वाटतसे ॥ १ ॥
झणीं मुक्तिपद देसी पांडुरंगा । मग या सतसगा कोठें पाहू ॥ ध्रु० ॥
मग हे पढरी आनंदसोहळा । कवणाचे डोळा पाहू देवा ॥ ३ ॥
मग हे हरिकथा अमृतसजीवनी । कवणाचे श्रवणी ऐकों देवा ॥ ४ ॥

---

१ देवळांत २ कदाचित. झणी देशीं ह्म० देऊ नकोस.

नामा म्हणे मज पंढरीची सोय । अनंतजन्म होय याचिलागीं ॥ ५ ॥

३५

भेटिलागिं माझा फुटतसे प्राण । कायावाचामनें जीवेंभावें ॥ १ ॥
जया देखें तया पुसे हेचि मात । कै मज अनंत बोलवील ॥ २ ॥
संतसमागमें दसरादिवाळी । ठेवूनि निढळी वाहे सदा ॥ ३ ॥
सखे पंढरीसी येती वारकरी । आर्त निरंतरी त्याचे पायीं ॥ ४ ॥
नामा म्हणे ऐसें करी दंडवत । आमुचे पुनीत मायबापा ॥ ५ ॥

३६

झणीं दृष्टि लागे तुझ्या सगुणरूपा । जेणें माझ्या मना बोध केला ॥ १ ॥
अनंता जन्मींचें विसरलो दुःख । पाहतां तुझें मुख पांडुरंगा ॥ ध्रु० ॥
योगियान्च्या ध्यानी ध्यातां नातुडसी । तो तूं आम्हांपाशीं मागेंपुढें ॥ ३ ॥
नामा म्हणें जीवें करीन निंबलोणें । विटेसहित चरण ओंवाळीन ॥ ४ ॥

३७

आम्हा वैष्णवाचा कुळधर्म कुळींचा । विश्वास नामाचा सर्वभावें ॥ १ ॥
तरी त्याचे दास म्हणतां श्लाघिजे । निर्वासना कीजे चित्त आधीं ॥ ध्रु० ॥
गाऊं नाचों आम्हीं आनंदें कीर्तनीं । भक्तिमुक्ति दोन्हीं भोगूं देवा ॥ ३ ॥
वृत्तिसहित मन बुडे प्रेमडोही । नाठवती देहीं देहभाव ॥ ४ ॥
सगुणीं निर्गुणी एकचि आवडी । मनें दिली बुडी चिदाकाशी ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा ऐसी मज सेवा । द्यावी जी केशवा जन्मोजन्मीं ॥ ६ ॥

३८

पंढरीचा वास चंद्रभागे स्नान । आणिक दर्शन विठोबाचें ॥ १ ॥
हेंचि घडो मज जन्मजन्मांतरी । मागणें श्रीहरी नाहीं दुजें ॥ ध्रु० ॥
मुखीं नाम सदा संतांचें दर्शन । जनीजनार्दन ऐसा भाव ॥ २ ॥

---

१ कपाळ, मस्तक. २ आर्तता, उत्कंठा ३ सांपडत नाहींस. ४ ओंवाळून सांडीन.

नामा म्हणे तुझें नित्य महाद्वारीं । कीर्तन गजरीं सप्रेमाचें ॥ ३ ॥

४०

त्वरें धावोनिया आलासे गोविंद । सावध सावध नामदेवा ॥ १ ॥
रुसलासे नामा देवासी न बोले । करें कुर्वाळिलें वदन तेव्हा ॥ २ ॥
समजावूनि देवें धरिला पोटासी । बोलें मजपाशी नामदेवा ॥ ३ ॥
नामा म्हणे देवा उशीर का केला । किंवा माझा आला तुला राग ॥ ४ ॥

४१

आला वैष्णवाचा मेळ । पळाला कळिकाळ ॥ १ ॥
आले आले हरिदास । कळिकाळावरि घालुनि कास ॥ ध्रु० ॥
कलमक्षा ( कल्मषा[2] ) पडला धाक । ते पळाली देउनि हाक॥२॥
पैल नामा केशवाचा । सवें मेळु वैष्णवाचा ॥ ३ ॥

४२

निर्गुणींचें वैभव आलें भक्तिमिषें । तें हें विठ्ठलवेषें ठसावलें ॥ १ ॥
बरविया बरवें पाहता नित्य नवे । हृदयी ध्याता निवे त्रिविधताप॥ध्रु०॥
चोविसां[3]वेगळें सहस्रा[4]आँगळें । निर्गुण निराळें शुद्धबुद्ध ॥ ३ ॥
वेदा मौन पडे श्रतीसी कानडें[5] । वर्णिता कुवाडें[6] पुराणासी ॥ ४ ॥

---

१ " तंव तुझे नामचि आह्मा आवडे । वरी भेटी होय आणि जवळिक जोडे । पाठीं गोठी सागसी सुरवाडें । आनदाचेनि ॥ २०० ॥ आता हें सुख कायिसयासारिखें ? " ( ज्ञाने० अ. १० ). २ पापें. ३ चोविस तत्वाहून निराळे साख्यशास्त्राप्रमाणे प्रकृति आदिकरून जीं चोवीस तत्वें आहेत त्यापलीकडचा पुरुष. 'तू परमदैवत तिहीं देवा । तू पुरुष जी पचविसावा । दिव्य तू प्रकृतिभावा-। पैलीकडील' ( ज्ञाने० १०-१५० ). ४ अनत नामापलीकडचें, नामातीत, श्रेष्ठ ५ वर्णावयास कठिण, दुर्लभ. ६ गूढ कठिण. 'जें मना आकळिता कुवाडें । जे बुद्धीसी नातुडे' ( ज्ञाने० ५-६७ ).

भावाचें आळुकें भुललें भक्तिसुखें । दिधलें पुंडलीकें साधूनिया ॥ ५ ॥
नामा म्हणे आम्हा अनाथालागुनी । निडारले नयनी वाट पाहे ॥ ६ ॥

४३

वेदासी कानडा श्रुतीसी कानडा । विठ्ठल उघडा पंढरीये ॥ १ ॥
नाम बरवें रूप बरवें । दर्शन बरवें कानडीयाचें ॥ ध्रु० ॥
नामा म्हणे तुझें अवघेंचि बरवें । त्याहूनि बरवें प्रेम तुझें ॥ ३ ॥

४४

साराचेंही सार भक्तीचें भांडार । नाम निरंतर गाता वाचे ॥ १ ॥
कासया करावें आणिक साधन । नामाविण क्षण जाऊं नेदी ॥ ध्रु० ॥
दयाशांतिक्षमा हेंचि पै भूषण । नामसंकीर्तन अहर्निशी ॥ ३ ॥
नामा म्हणे जप अखंड नामाचा । काळ हा सुखाचा सदोदित ॥ ४ ॥

४५

ज्ञान व्हावें आधीं ओळखावें नावा । मग जावें गावा तयाचिया ॥ १ ॥
या नामाचें मूळ त्यामाजी जो धाला । प्रपंचाचा घाला मग नाहीं ॥ध्रु०॥
नाम गावें प्रपंच सर्व आहे नाम । ब्रह्मानंदें प्रेम घनदाट ॥ ३ ॥
नामदेव म्हणे नंदाचिया घरीं । होता एक हरि दुजें नाम ॥ ४ ॥

४६

आपुली पदवी सेवकासी द्यावी । तो एक गोसावी पांडुरंग ॥ १ ॥
भावाचा आळुका भुलला भक्तिसुखा । सांपडला फुका नामासाठीं ॥ध्रु०॥
प्रेमाचा जिव्हाळा नामाची आवडी । क्षण एक न सोडी संग त्याचा॥३॥
नामा म्हणे आम्हा दीनांचें माहेर । तो एक उदार पांडुरंग ॥ ४ ॥

४७

माझें मनोरथ पूर्ण कीजे देवा । केशवा माधवा नारायणा ॥ १ ॥
नाहीं नाहीं मज आणिक सोयरा । न करीं अव्हेरा पांडुरंगा ॥ ध्रु० ॥

---

१ आशाळभूत, भुकेलेले ( आळुकी ह्म० आवड ) २ पूर्ण उघडलेल्या (निडार=पक्वता. )

अनाथाचा नाथ होसी तू दयाळा । किती वेळवेळ प्रार्थूं आतां ॥ २ ॥
नामा म्हणे जीव होतो कासावीस । केली तुझी आस आता बरी ॥ ३ ॥

४८

तुवा येथें यावें कीं मज तेथें न्यावें । खती माझ्या जीवें मांडियेली ॥१॥
माझे तुजवीण येथें नाही कोणी । विचारावें मनी पांडुरंगा ॥ ॥२॥
नामा म्हणे वेगी यावें करुणाघना । जातो माझा प्राण तुजलागीं ॥३॥

४९

अमृताहूनि गोड नाम तुझें देवा । मन माझे केशवा का बा नेघे ॥ ॥१॥
सांग पंढरीराया काय करूं यासी । का रूप ध्यानासी नये तुझें ॥ध्रु०॥
कीर्तनी बैसतां निद्रे जागविलें । मन माझें गुंतलें विषयसुखा ॥ २ ॥
हरिदास गर्जति हरिनामाच्या कीर्ति । नये माझ्या चित्ती नामा म्हणे ॥३॥

५०

अपत्याचें हित कीजे त्या जनकें । जरी वेडें मुकें झालें देवा ॥ १ ॥
तैसें मी पोसेणें[1] तुझें जिवलग । अंतरीचें सांग गुज कांही ॥ ध्रु० ॥
राखीन मी नाव तुझें सर्वभावें । चित्त वित्त जीव देईन पायी ॥ २ ॥
जरी देवा हीन म्हणशील मज । नामा म्हणे लाज येईल कोणा ? ॥३॥

५१

तुझें रूप माझ्या दाखवीं मनातें । मग तुझ्या चरणातें न विसंबें ॥ १ ॥
कां मज शिणविशी थोडियाकारणें । काय तुझें उणें होईल देवा ध्रु० ॥
चातकाची तहान पुरवी जळधर । काय त्याचे सरे थोरपण ॥ ॥२॥
चंद्र चकोराचा पुरवी सोहळा । काय त्याच्या कळा न्यून होती ॥ ३ ॥
कूर्मी अवलोकी आपुलिया बाळा । काय तिच्या डोळा दृष्टि नासे ॥४॥
नामा म्हणे देवा तुझाची भरवसा । अनाथा कोंवसा[2] होसी तूंचि ॥५॥

---

१ पोसलेला, वाढविलेला. २ आधार.

५२

संसारसागरीं पडिलों महापुरीं । सोडवण करी देवराया ॥१॥
नामाची सागडी देऊनिया मातें । वैकुंठावरुतें नेउनी घाली ॥ २ ॥
कामक्रोधमगर करिती माझा ग्रास । झणी तूं उदास होसी देवा ॥ ३ ॥
नामा म्हणे झणीं मोकलिसी[1] मातें । नाम तुझें सरतें धरिलें एक ॥ ४ ॥

५३

पतीत पावन नाम ऐकुनी आलों मी दारा ।
पतीतपावन न होसि म्हणुनी जातों माघारा ॥ १ ॥
घेसी तेव्हा देसी ऐसा असशी ऊदार ।
काय देवा रोधूं तुमचें कृपणाचें दार ॥ २ ॥
उच्छिष्टाचें शीत देवा [1] न टाकिसी बाहेरीं ।
कोणी दिधली देवा एवढी भूपणाची थोरी ॥ ३ ॥
सोडी देवा ब्रीद आता नव्हसी अभिमानी ।
पतीतपावन नाम तुजला ठेवियले कोणी ॥ ४ ॥
नामा म्हणे देवा तुझें नलगे मज काहीं ।
प्रेम असों द्या हृदयीं तुमचे आठवीन पाईं[2] ॥ ५ ॥

५४

आम्हीं शरणागती केलासे सरता । येऱ्हवीं अनंता कोण जाणे ॥ १ ॥
वेदशास्त्रपुराणीं उबगोनी[3] सांडिलासी । तो आम्ही धरलासी हृदयकमळीं २
चतुरशिरोमणी अहो केशिराजा । अंगीकार तुझा केला आम्हीं ॥ ३ ॥
सहस्रैकनामीं झालासी संपन्न । तरी हेही भूषण आमुचेनचि[4] ॥ ४ ॥
येऱ्हवीं त्या नामाची कोण जाणे सीमा । पाहे मेघश्यामा विचारोनि ॥५॥
होतासी क्षीरसागरीं अनाथाचेपरी । लक्ष्मी तेथें करी चरणसेवा ॥ ६ ॥
तेही तंव जाण आमुची जननी । तूं तिये वाचोनि शोभसी कैसा ॥ ७ ॥

---

१ मोकलूं नकोस, त्यागूं नकोस. २ पाय. ३ कटाळून. ४ आमुच्यामुळेंच.

तुज नाही नाम रूप जाति कुळ । अनादीचें मूळ ह्मणती तुज ॥ ८ ॥
आह्मीं भक्त तरी तू भक्तवत्सल । ऐसा प्रगट बोल जगामाजी ॥ ९ ॥
ऐसी आमुचेनि भोगिसी थोरीवें । आमुचा जीवभाव तुझे पायीं ॥ १० ॥
नामा म्हणे केशवा जरी होसी जाणता । तरी या बोला उचिता चित्त देईं

५५

प्रीति नाही रायें वर्जियेली काता । परी तिची सत्ता जगावरी ॥ १ ॥
तैसे दभधारी तरी तुझे भक्त । घालू यमदूत पायातळीं ॥ ध्रु० ॥
रायाचा तो पुत्र अपराधी देखा । तो काय आणिका दडवेल ॥ २ ॥
बहात्तर खोडी देवमण[1] कठीं । आह्मा जगजेठी नामा म्हणे ॥ ३ ॥

५६

घे रे घे रे नामा दिलें माझें प्रेम । घोकी माझें नाम सर्वकाळ ॥ १ ॥
शिरावरी हात ठेवितसे माझा । अभिमान तुझा गेला ह्मणुनी ॥ २ ॥
भक्तिसुख देवें दिलें नामयाते । नामा परमामृते तृप्त झाला ॥ ३ ॥
नामा म्हणे देवा झालों मी पावन । माझे तुजवीण कोण आहे ॥ ४ ॥

५७

अवघी हे पढरी सुखाची वोवरी[3] । अवघा घरोघरीं ब्रह्मानद ॥ १ ॥
अवघा हा विठ्ठल सुखाचाचि आहे । अनुसरे तो लाहे सर्वसुख ॥ २ ॥
पाहावा अवघा नयनीं ऐकावा श्रवणी । अवघ्या ध्यावा ध्यानी अवघ्या मनें ३
अवघिये आवडी अवघा गावा गीती । अवघा सर्वाभूतीं तोचि आहे ॥ ४ ॥
अवघा हा जाणावा अवघा हा मानावा । अवघा वाखाणावा अवघी वाचा ५
अवघा वोळखोनि अवघा गिळिजे मनें । अवघा हाचि होणें म्हणे नामा ६

५८

विठ्ठल विठ्ठल म्हणा उघडा मत्र जाणा । कळिकाळ अंकणा[4] होइल तुह्मा १

---

१ मोठेपण. २ घोड्यांत पुष्कळ दोष असले तरी एक देवमणि ह्म०मानेवर तुरा असेल तर तो उत्तम शुभशकुनी समजतात. ३ खोली, कोठडी. ४ अकित; दास.

वेदाचें हें सार शास्त्राचें गव्हर । तें जाणा अक्षर विठ्ठल नाम ॥ ध्रृ० ॥
न करावें खडन अखड उच्चारण । देशकालवर्तमान नाहीं येथ ॥ २ ॥
जिवींचें निजगुज मुक्तीचें तें बीज । नामा म्हणे मज सापडलें ॥ ३ ॥

५९

पढरीस जावें जीवन्मुक्त व्हावें । विठ्ठला भेटावें जीवलगा ॥ १ ॥
कायावाचामन चरणी ठेवावें । प्रेमसुख घ्यावें सर्वकाळ ॥ २ ॥
सुखाचे साजिरें श्रीमुख पहावे । जावें उतरावें निबलोण ॥ ३ ॥
बाहेरीं भीतरीं कैवल्य आघवें । वाचे न बोलवे ब्रह्मानद ॥ ४ ॥
चिरजीव नामा कंठी धरी प्राण । करी तुझें ध्यान रात्रदिवस ॥ ५ ॥

६०

सावळी श्रीमूर्ती हृदयी बिबली । तरी पालटली देहबुद्धि ॥ १ ॥
धन्य माझा जन्म धन्य माझा भाव । ध्यानी केशीराव नादतसे ॥ २ ॥
आशा तृष्णा कैशा मावळल्या देही । बुडोनिया पायीं ठेले चित्त ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐशी विश्रांति पै झाली । हृदयी न्याहाळी केशीराज ॥ ४ ॥

६१

तुझ्या चरणीं माझ्या मनें दिली बुडी । इद्रियें बापुडीं वेडावलीं ॥ १ ॥
आता विषयसुख जाणावें कवणे । जाणोनी भोगणे कवणें स्वामी ॥ २ ॥
देह सहजस्थिती राहिला निष्काम । हृदयी सदा प्रेम वोसडत ॥ ३ ॥
नामा म्हणे केशवा भक्तजनवत्सला । क्षण जीवावेगळा न करी तुज ॥४॥

६२

कस्तुरीचा टिळा रेखिला कपाळी । तेणें ते शोभली मूर्ती बरी ॥ १ ॥
बरवा बरवा विठ्ठल गे बाई । वर्णावया साही शिणताती ॥ २ ॥
श्रीवत्सलाछन वैजयती गळा । नेसला पाटोळा तेजःपुज ॥ ३ ॥
पाउलें समान विटेवरी नीट । नामा म्हणे भेट द्यावी त्याची ॥ ४ ॥

६३

ब्रह्म अविनाश आनदघन । याहूनि चरण गोड तुझें ॥ १ ॥
ते जीवें न सोडी अगा पढरिनाथा । जाणसी तत्वतां हृदय माझें ॥ २ ॥
परात्पर वस्तु जे का अपरपार । तियेचा साक्षात्कार पाय तुझें ॥ ३ ॥
सच्चिदानदघन जेथें हरपलें मन । त्याहूनि चरण गोड तुझें ॥ ४ ॥
नामा म्हणे तुझीं पाउले सकुमार । तें माझें माहेर त्रिटेवरी ॥ ५ ॥

६४

तुझे चरण देखोनी हरली भवव्यथा । पुढती एक चिंता वाटे थोर ॥१॥
झणी मज मुक्ति देसी पाडुरगा । मग मी तव सगा केवीं मिळे ॥२॥
पढरीचा आनद हा सुखाचा सोहळा । कवणाचिया डोळा पाहू जाऊं ३
तुझ्या कथा मज अमृतसजीवनी । कवणाच्या श्रवणी ऐकों देवा ॥ ४ ॥
म्हणोनि माझ्या जीवा वाटे जडभारी । उदास मुरारी करिसी झणी॥५॥
नामा म्हणे मज तुझी चरणसेवा । जन्मोजन्मी देवा द्यावी मज ॥ ६ ॥

६५

बाहेरी भीतरी तुजचि मी देखे । चित्त तेणें सुखें वेडावलें ॥ १ ॥
सतसगें मज पालट हा झाला । पाहता विठ्ठला रूप तुझें ॥धृ० ॥
मीपणासहित आनदीं बुडालें । न निघे काही केलें चित्त माझें ॥ २ ॥
नामा म्हणे एक उरलीसे वासना । स्वामीसेवकपणा देईं देवा ॥ ३ ॥

६६

हेंचि देवापे मागत । चरणसेवा अखडित ॥ १ ॥
वास व्हावा पढरीचा । सदा संग हरिदासाचा ॥ २ ॥
जन्म हो का भलते याती । परि मी न चुकें तुझी भक्ती ॥ ३ ॥
नामा म्हणे कमलापती । हेंचि द्यावें पुढतीपुढती ॥ ४ ॥

६७

तुझें नित्य सुख घ्यावें येणें मनें । असावें संधानें चरणाचेनि ॥ १ ॥

वासनेविरहित होउनि एकवट । असावें निकट संतसंगें ।। २ ।।
ऐशी मज कृपा करी गा विठ्ठला । म्हणविसी आपुला दास जरी ।। ३ ।।
श्रवणी तुझें नाम ऐकावें आवडी । चित्तें देउनि बुडी प्रेमडोही ।। ४ ।।
नयनीं तुझें रूप देखावें सर्वत्र । व्हावे भूतमात्र सखे माझे ।। ५ ।।
वदनी तुझें नाम गावें निर्विकल्प । धरोनि तुझें रूप हृदयकमळीं ।। ६ ।।
काया संतापायीं जावी लोटांगणीं । तें भाग्य अनुदिनी देई बापा ।। ७ ।।
हेचि माझें व्रत हेचि तपतीर्थ । करावें दास्यत्व संताचें हें ।। ८ ।।
अनुदिनीं व्हावा संताचा हा संग । असावा अनुराग कीर्तनाचा ।। ९ ।।
मानाचा मज ओस अपमानीं उल्हास । देई तुझा ध्यास सर्वकाळ ।।१०।।
नामा म्हणे विठो तरीच शरणागत । नाहीतरी पतित म्हणती मज ।।११।।

६८

तूं माय माउली म्हणोनि आस केली । विठ्ठले पाहिली वाट तुझी ।।१।।
मज कां मोकलिलें कवणा निरविलें । कठीण कसें झालें हृदय तुझें ।।२।।
तुजवीण जिवलग मज कोण होईल । तो माझें जाणेल जडभारी ।।३।।
आम्ही अपराधी तुझें शरणागत । तुजविण माझें हित कोण करी ।।४।।
करुणाकल्लोळ वाणी अमृतसंजीवनी । चिंतिल्या निर्वाणी पाव वेगें ।।५।।
नामा म्हणे तुजवीण झालों परदेशी । केव्हा सांभाळिसी अनाथनाथा ६

६९

पाहूं द्यारे मज विठोबाचें मुख । लागलीसे भूक माझे डोळा ।। १ ।।
कस्तूरीकुंकुम भरोनिया ताटीं । आगी बरवी उटी गोपाळाऱ्या ।। २ ।।
जाई जुई पुष्पें गुंफोनिया माळा । घालूं घननीळा आवडीनें ।। ३ ।।
नामा ह्मणे विठो पंढरीचा राणा । डोळिया पारणा होत असे ।। ४ ।।

७०

विठ्ठल विसावा सुखाची साउली । प्रेम पान्हा घाली भक्तावरी ।। १ ।।
दाखवीं चरण दाखवीं चरण । दाखवी चरण नारायणा ।। २ ।।
विठ्ठल आचार विठ्ठल विचार । दावीं निरंतर पाय आतां ।। ३ ।।

नामा ह्मणे नित्य बुडालों ससारी । धावोनिया धरीं हातीं मज ॥ ४ ॥

७१

अवघाचि संसार सुखाचा करीन । अवघ्याभावें धरिन विठ्ठल एक ॥१॥
अवघा शीणभाग हिरोनि घेईल । अवघेंचि तोडील मायापाश ॥ २ ॥
अवघा जीवलग हा पै होईल । अवघा हा वेईल भार माथा ॥ ३ ॥
अवघा त्रिविधताप क्षणें मालवील । अवघा चालवील योगक्षेम ॥ ४ ॥
अवघ्या ससाराचे बसणें मोडील । अवघेंचि तोडील मायाजाळ ॥ ५ ॥
नामा म्हणे अवघी सोडा मिथ्या भ्राति । विठ्ठलेवीण विश्राति नाही कोठें६

७२

पढरीचा देव बहुत कोंवळा । सगुण सावळा सारथि हा ॥ १ ॥
सारथि सर्वाचा साक्षीभूत असे । सकटी सायासें गजेद्रासी ॥ २ ॥
गजेंद्रासी रक्षी गणिका उद्धरी । भिल्लीचे करी फळें भक्षी ॥ ३ ॥
भक्षी सुदाम्याचे पोहे मुष्टिभरी । नामा म्हणे हरी गोड मानी ॥ ४ ॥

७३

सत्यासकल्पाचा वर्ता जो विश्वाचा । अनाथ जीवाचा मायबाप ॥ १ ॥
पुडलीके तया आणिलें रगणी । कटावरी पाणि ठेवूनिया ॥ २ ॥
अणुरेणुमाजी व्यापूनि राहिला । नानात्व जाहला एकलाचि ॥ ३ ॥
नामा म्हणे वेद ज्यालागी बोभाट । जोडोनिया पाय उभा ठाके ॥ ४ ॥

७४

काय वाणू आता पायाचा महिमा । जेथें झाली सीमा बोलायाची ॥१॥
विठोबाचे पाय आठविता मनी । गेलें हरपोनी भवभय ॥ २ ॥
पाय नारदानें हृदयीं धरता । ब्रह्मार्डी मान्यता झाली त्याची ॥ ३ ॥
सनकादिकांलागी पाय वजकवच । ब्रह्मादि देवास पद जेणें ॥ ४ ॥
लागताचि पाय शिळा दिव्य झाली । पाषाण तारिले उदकावरी ॥ ५ ॥

---

१ बोलणे=मोठ्यानें हाक मारणें.

पाय ते रमेचें सौभाग्य साजिरें । योगीऋषीश्वर थोर जेणें ॥ ६ ॥
नामा म्हणे मनीं पाय सर्वकाळ । म्हणोनि सुकाळ आनंदाचा ॥ ७ ॥

७५

भक्तिप्रतापें मी पावलों मी सुपथ । सफळ निश्चित परमार्थ ॥ १ ॥
देव सर्वांभूतीं असतां प्रगट । निर्वाणीं चोखट भक्ति जाण॥ ध्रु० ॥
धरूनिया मनीं जपसील नाम । तेणें निजधाम पावसील ॥
जप तप ध्यान नलगे साधन । भक्ति ते कारण नामा म्हणे ॥

७६

देहुडा चरणीं वाजवितो वेणु । गोपिकारमणु स्वामी माझा ॥ १ ॥
देखिला गे माय यमुनेचे तीरीं । हात खांद्यावरी राधिकेच्या ॥ २ ॥
गुंजावर्ण डोळे शिरीं बाबरझोटी । मयूरपिच्छ वेष्टी शोभतसे ॥ ३ ॥
सगुण मेघश्याम लावण्यसुंदर । नामया दातार केशवराज ॥ ४ ॥

७७

कोटिसूर्यप्रभादीप्ति । गगनीं झळकली अवचितीं ॥ १ ॥
संत नामया सांगती । पैल आला कमळापति ॥ ध्रु० ॥
वत्सालागीं जैसी धेनु । तैसा धांवे जगज्जीवनु ॥ २ ॥
गरुडाचे धुंदुर्वाती । दाही दिशा आक्रंदती ॥ ३ ॥
हरिकंठींची सुमनमाळा । सुटोनि आली भूमंडळा ॥ ४ ॥
सवें चाले सुदर्शन । भक्त कराया रक्षण ॥ ५ ॥
उचलोनि दोन्ही बाही । नामा धरिला हृदयीं ॥ ६ ॥

७८

शिव हालाहलें तापला । तोही नामें शीतळ झाला ॥ १ ॥
नाम पावन पावन । याहूनि पवित्र आहे कोण ॥ ध्रु० ॥

---

१ अखेरीस उपयोगी पडणारी उत्तम भक्तिच होय. २ हेतु, साध्य. ३ भयकर मोकळे केंस. ४ झंझावात, वादळ आणि पाऊस, वेगाचें उड्डाण.

शिवासी नामाचा आधार । केला कळिकाळ किंकर ॥ २ ॥
मरण झालें काशीपुरीं । तेथें नामचि उद्धारी ॥ ३ ॥
अठरा पुराणांच्या पोटीं । नामेंविण नाहीं गोठी ॥ ४ ॥
नामा म्हणे अवघीं चोरें । एक हरिनाम सोइरें ॥ ५ ॥

७९.

नामें सदा शुद्धि प्राणिया होतसे । नामापाशीं असे भक्तिमुक्ति ॥ १ ॥
नामाऐसें सोपें नाहीं त्रिभुवनीं । नाम संजीवनीं[1] साधकासी ॥ ध्रु० ॥
नामें भक्ति जोडे नामें कीर्ति वाढे । नामें सदा चढे मोक्ष हाता ॥ २ ॥
यज्ञदानतप नामें आली हाता । नामें सर्व सत्ता प्राप्त होय ॥ ३ ॥
नामा म्हणे सदा नाम ज्याचे मुखीं । नाहीं त्याच्या तुकीं[2] दुजा कोणी ॥४॥

८०

लपलासी तरी नाम कैसें नेसी । आम्हीं अहर्निशीं नाम गाऊ ॥ १ ॥
आम्हापासूनिया जाता नये तुज । तें हें वर्म बीज नाम घोकूं ॥ ध्रु० ॥
आम्हासी तो तुझें नामचि पाहिजे । मग भेटी सहजें देणें लागे ॥ २ ॥
भोळीं भक्तें आम्ही चुकलों होतों वर्म । सांपडलें नाम नामयासी ॥ ३ ॥

८१

धन्य तोचि जगीं जाणा राजयोगी । जेणें पांडुरंगीं ठेविला भावो ॥ १ ॥
संकल्पविकल्पशून्य करोनि मन । हृदयीं धरिले चरण विठोबाचे ॥ २ ॥
कोटीकुळें एका क्षणेंचि पावन । जेणें केलें स्नान चंद्रभागे ॥ ३ ॥
महापापराशी त्याच्या झाल्या होळी । वाजविली टाळी विठ्ठलनामें ॥ ४ ॥
नामा म्हणे धन्य धन्य ते संसारी । चालविती वारी पंढरीची ॥ ५ ॥

---

१ मृतास उठविणारी अमृतसंजीवनीची वेल 'जरी परमाणूएवढें संजीमूळ जोडे' (ज्ञाने० १३–८३७). २ तुलनेला, बरोबरीला. 'मजसी तुकितां तुका। तुटी नाहीं' (ज्ञाने० ९–४४९).

८२

अवघी हे पंढरी सुखाची मांदुसे । माझा स्वप्रकाश रत्न हरी ॥ १ ॥
धन्य संतजन तेथींचे पारखी । ज्या झाली ओळखी विठ्ठलनामीं ॥ २ ॥
अनुभवुनी चित्तीं पाहिलें विवेकें । धरिलें पुंडलिकें हृदयकमळीं ॥ ३ ॥
त्रिभुवनखेळण प्रेमाचें कोंदण । करोनि भूषण भोगितसे ॥ ४ ॥
युगें गेलीं परी पालटचि नाहीं । नित्य शुद्ध पाहीं तेजःपुंज ॥ ५ ॥
पाहतां नित्य नवें ध्यातां चित्त निवे । ह्मणोनि नामा जीवें विसंबेना ॥ ६ ॥

८३

संतांच्या चरणा द्यावें आलिंगन । जीवें निंबलोण उतरावें ॥ १ ॥
तेथे तूं निश्चळ राहें माझ्या मना । मग तुज यातना न होती कांहीं ॥
संताचे द्वारींचा होईं द्वारपाळ । तुटे मायाजाळ मोहपाश ॥ ३ ॥
संताचे प्रसाद सेविसीं उरले । आयुष्य सरलें दुणावेल ॥ ४ ॥
नामा म्हणे संत आहेत कृपासिंधु । देती भक्तिबोधु प्रेमसुख ॥ ५ ॥

८४

संतचरणरज लागतां सहज । वासनेचें बीज जळोनि जाय ॥ १ ॥
मग रामनामीं उपजे आवडी । सुख घडोघडीं वाढों लागे ॥ २ ॥
भेदभ्रम आटे आशापाश तुटे । विश्रांति हे भेटे संतसंगें ॥ ३ ॥
प्रेमें कंठ दाटे आनंदें पूर लोटे । हृदयीं प्रगटे रामरूप ॥ ४ ॥
नामा म्हणे सोपें साधन गोमटें । साधें ज्या उत्कटें पूर्वपुण्यें ॥ ५ ॥

८५

पुंडलिकें रचिली पेंठ । संत ग्राहिकं[3] चोखट ॥ १ ॥
प्रेमसाखरा वांटिती । नेघे त्याचे तोंडीं माती ॥ २ ॥
समतेचे फणसगरे । आंबे पिकले पडिभरे[4] ॥ ३ ॥
नामद्राक्षांचे घड । अपाररसीं आले गोड ॥ ४ ॥

---

१ पेटी. २ परीक्षक, ३ घेणारे, गिऱ्हाईक. ४ अतिशय.

नामा म्हणे भावें ध्यावें । अभक्ताचे मढें जावे ॥ ५ ॥

८८

ब्रह्ममूर्ति संत जगीं अवतरले । उद्धराया आले दीनजना ॥ १ ॥
ब्रह्मादिक त्यांचे वंदिती पायवणी[1] । नाम घे वदनीं दोष जाती ॥ ध्रु० ॥
हो का दुराचारी विषयीं आसक्त । संतकृपें त्वरित उद्धरतो ॥ ३ ॥
अखंडित नामा त्यांची वाट[2] पाहे । निशिदिनीं ध्याये सत्संगती ॥ ४ ॥

८९

आकल्प आयुष्य व्हावें तया कुळा । माझिया सकळा हरिच्या दासा॥१॥
कल्पनेची बाधा न हो कोणेकाळीं । हे संतमंडळी सुखी असो ॥ ध्रु० ॥
अहंकाराचा वारा न लागो राजसा । माझ्या विष्णुदासा भाविकांसी ॥३॥
नामा म्हणे तया असावें कल्याण । ज्यामुखीं निधान पांडुरंग ॥ ४ ॥

९०

तत्त्व[3] पुसावया गेलों वेदज्ञानी । तंव भरले त्यापासीं विधिनिषेध ।
तया समाधान नुमजे कोणेकाळीं । अहंकार बळी झाला तेथें ॥ १ ॥
म्हणोनि तुझें नाम धरिलें सर्वभावें । उचित करावें पांडुरंगा ॥ ध्रु० ॥
स्वरूप पुसावया गेलों शास्त्रज्ञासी । तंव भरले तयापाशीं भेदाभेद ।
एकएकाच्या न मिळती मतासी । भ्रांत गर्वराशी भुलले सदा ॥ २ ॥
पुराणिकांसि पुसूं स्वरूपाची स्थिति । तंव त्यांसी विश्रांति नाहीं कोठें ।
विषयीं ठेवुनि मन सांगती ब्रह्मज्ञान । तेथें समाधान नुपजे कदा ॥ ३ ॥
हरिदासांसी पुसों भक्तीचा उपाय । तंव तयापाशीं भाव नाहीं कोठे ।
वाचेनें सांगती नामाचा बडिवार । विषयीं पडिभर[4] सदाकाळीं ॥ ८ ॥
ऐसें विचारितां बहुत भागलों । म्हणोनि शरण आलों पांडुरंगा ।

---

१ पायाचे तीर्थ ‘ मान करिती तिन्ही लोक । पायवणिया ’ ( ज्ञाने० १२–२१५ ) २ वाट, मार्ग. ३ ह्याच अर्थाचा तुकोबाचा ‘ज्ञानियाचे घरीं चोजविता देव’ हा अभंग पहा. ४ आवड, प्रीति.

भयाभीत झालों संसार करितां । नामा म्हणे आतां तारीं मज ॥ ५ ॥

९१

आलेनो संसारा सोडवणें करा । शरण जा उदारा पांडुरंगा ॥ १ ॥
प्रपंच न सरे कदा कल्पकोडी । वासनेची बेडी पडे पायीं ॥ ध्रु० ॥
व्यर्थ मायादेवी गर्भवासीं गोंवी । नश्वर भोगवी नानायोनी ॥ २ ॥
नामा म्हणे पाहा विचारूनि मनीं । स्मरावा निर्वाणीं पांडुरंग ॥ ३ ॥

९२

काय करूनि तीर्थाटणें । मन भरिलें अवगुणें ॥ १ ॥
काय करावें तें तप । चित्तीं नाहीं अनुताप ॥ २ ॥
मनःसंकल्पाचीं पापें । न जाती तीर्थाचेनि बापें ॥ ३ ॥
नामा म्हणे सर्व सोपें । पाप जाय अनुतापें ॥ ४ ॥

९३

गुळ गोड न लगे म्हणावा । तैसा देव न लगे वानावा ॥ १ ॥
सेवी तोचि चवी जाणें । येरा सांगतां लाजिरवाणें ॥ ध्रु० ॥
नामा म्हणे या खुणा । तुम्ही ओळखा पंढरिराणा ॥ २ ॥

९४

न पढावे वेद नको शास्त्रबोध । नामाचे प्रबंध पाठ करा ॥ १ ॥
नव्हे ब्रह्मज्ञान न होय वैराग्य । मायाभक्तिभाग्य संतसंगें ॥ ध्रु० ॥
येर क्रियाकर्म करितां हो कली–। माजि कोण बळी तरले सांगा ॥ २ ॥
नामा म्हणे मज सांगितलें संतीं । यापरती विश्रांति आणिक नाहीं ॥३॥

९५

बोलवैरी बोलती । श्रुति वाग्वणिती ।
हरि पाविजे ती गति । वेगळी असे ॥ १ ॥
तुज न पवे गा तें वर्म । हरिशब्द एकचि ब्रह्म ।

१ गुतविणें ( गोंवणें ). २ पश्चात्ताप हेच तप. ३ तोंड भरून, पुष्कळ शब्द.

पाविजे तें मर्म । वेगळें असे ॥ ध्रु० ॥
एक जाणीव खटपट । करिती ते सैराट ।
हरि पाविजे ती वाट । वेगळी असे ॥ २ ॥
एक आहेत तार्किक । चार्वाकादि वादक ।
हरि पाविजे तें सुख । वेगळें असें ॥ ३ ॥
एक चातुर्यवक्ते । व्युत्पन्न कवित्वें ।
सता रजविते । लोकाचारी ॥ ४ ॥
जिहीं तुज जाणितलें । तिहीं मौनें धरिलें ।
नामा म्हणे ते पावले । भक्तियोगें ॥ ५ ॥

९६

माझिया मनें मज उपदेश केला । तो मज बिंबला हृदयकमळीं ॥ १ ॥
निर्वाणींचीं एक सागितली खूण । कैवल्य चरण केशवाचे ॥ ध्रु० ॥
वेदशास्त्र श्रुति आणीक पुराणे । पढोनि जाणणें हेंचि सत्य ॥ २ ॥
क्रियाकर्मधर्म करणें ज्याकारणें । ते खूण निर्वाण चरण हेचि ॥ ३ ॥
जपतप अनुष्ठान करोनि साधन । प्रत्यक्ष विधान चरण हेचि ॥ ४ ॥
नामा म्हणें मज कळलें अनुभवें । न विसबें जीवें चरण तुझें ॥ ५ ॥

९७

ब्रह्मांड जयाच्या पोटीं साठवलें । तेंचि साकारलें ध्रुवापाशीं ॥ १ ॥
कैसें नें बोलावें कैसें तें वानावें । वेदासही ठावें नोहे जें का ॥ ध्रु० ॥
नीलोत्पल रवि गगनाही हिणावी । ऐसी शोभा दावी इंद्रनीळ ॥ २ ॥
मरगजालागी जोडलें सौरभ्य । आनंदाचे कोंब चारी भुजा ॥ ३ ॥
मुगुटकुडलें सर्वांगीं भूषण । लेणियासी लेणें अगाचिया ॥ ४ ॥
कस्तुरी कपाळीं रेखलीसे भाळीं । उटी तें पिवळी सर्वांगासी ॥ ५ ॥
इंद्रधनुष्याची माडणी मेघाची । माळ वैजयतीची गळां रुळे ॥ ६

१ अ०ासव्हा २ 'मौन गा तुझें राशीनाव (ज्ञाने० १७-१५). ३ शेवटची.

सायुज्य सुदर शोभताती कर । प्रभा ते अपार कोंदाटली ॥ ७ ॥
अभयहस्त एक पुढें तुकावला । आपुल्या भक्ताला साभाळाया ॥ ८ ॥
गोजिरी गोमटी ध्यानी उभी ठेली । नामया माउली माथा ठेवी ॥ ९ ॥

९८

पापाचें सचित देहासी दडण । तुज नारायणा बोल नाही ॥१॥
सुख अथवा दु ख भोगणें देहासी । सोस वासनेसी वाउगाचि ॥
पेरी कडु जिरें इच्छी अमृतफळ । अर्कवृक्षा केळीं कोंवि येती॥२॥
मुसळाचें धनु न होय सर्वथा । पाषाण पिळिता रस कैसा ॥३॥
नामदेव म्हणे देवा का रुमावे । मनाला पुसावें आपुलिया ॥४॥

९९

देहाचें ममत्व नाही जों तुटलें । विषयीं विटलें मन नाही ॥ १ ॥
तव नित्य सुख कैसेंनि आतुडे । नेणती बापुडे प्रेमसुख ॥ध्रु०॥
मीच एक भक्त मीच एक मुक्त । म्हणवी पतित दुराचारी ॥२॥
नामा म्हणे तुझे कृपेविण देवा । केविं जोडे ठेवा विश्रांतीचा ॥३

१००

संसारसागर भरला दुस्तर । विवेकी पोहणार विरळा सत ॥ १ ॥
कामाचिया लाटा अगीं आदळती । नेणों गेले किती पोहोनिया ॥ २ ॥
भ्रम हा भोंवरा फिरवी गरगरा । एक पडिले घरा चौऱ्याशींन्या ॥ ३ ॥
नावाड्या विठ्ठल भवसिंधुतारू । भक्ता पैलपारु उतरितो ॥ ४ ॥
नामा म्हणे नाम स्मरा श्रीरामाचें । भय कळिकाळाचें नाहीं तुम्हां ॥ ५ ॥

१०१

ऐका कलियुगीचा आचार । अधर्मपर झाले नर ॥ १ ॥

---

१ तुकावला, तुकियला ह्म० हालविला 'येरे माथा तुकियेला' (ज्ञाने० १८-२९० ) २ कडु फळ देणारा वृक्ष, रुई. 'यमाश्रित्य न विश्राम क्षुधार्ता यान्ति सेवकाः। सोऽर्कवन्नृपतिस्त्याज्यः सदापुष्पफलोऽपि सन्' (पचतत्र १-५१ ). ३ सांठा. ४ दुस्तर मायानदीचें वर्णन मागें पृ १७९ वर पहा.

पलंगी बैसवोनि राणी । मातेहातीं आणवी पाणी ॥ २ ॥
स्त्रिये अलंकारभूषण । माता वळीतसे शेण ॥ ३ ॥
स्त्रिये पाटावाची साडी । माता नेसे चिंध्यालुगडी ॥ ४ ॥
सामुसासऱ्या योग्य मान । मायबापा न घाली अन्न ॥ ५ ॥
म्हणे विष्णुदास नामा । ऐसा कळियुगीचा महिमा ॥ ६ ॥

१०२

एकतत्व हरि निर्धार तू धरी । प्रपंचबोहेरी एका नामें ॥ १ ॥
अच्युत गोविंद परमानंद छंद । नित्य तो आल्हाद हरिनामीं॥२॥
ऐसा तू विनटे हरिनामपाठे । जाशील वैकुंठे नवरता ॥ ३ ॥
नामा म्हणे तत्व नाम गोविंदाचे । हेंचि धरीं साचे येर वृथा ॥४॥

१ स्वप्न.

देहमंदिराभीतरी । शेजे सूदलौं श्रीहरी ।
निद्रा उन्मनीचे भरीं । तैं म्या स्वप्न देखिलें ॥ १ ॥
स्वप्नीं भुलले बाई । मागिल नाठवेचि काई ।
जीव परवस्तूंच्या ठाई । तनुमनें आटला ॥ २ ॥
स्वप्न सांगू कोणापासीं । विवेक करिती तयासीं ।
हे कोडें अज्ञानासी । संतावाचुनी नुगवे ॥३॥
ध्यानीं पहुडला सांवळा । जवळी नारी बारासोळा ।
विंजणें करिती सकळा । सोहंशब्द जागरणी ॥ ४ ॥
धिं धिं तुरे वाजती । अनुहातध्वनी गर्जती ।
तेथें निद्रा ना सुषुप्ति । चंद्रसूर्य मावळले ॥५ ॥
मनपवना नाहीं भेद । तया ठायीं हा गोविंद ।
तेथें खुंटला अनुवाद । वेदश्रुती आटल्या ॥ ६ ॥

---

१ रेशमी २ भस्म, राख, रागोळी ३ निजला ४ परब्रह्मीं ५ सूर्यचंद्र-कला, इडापिंगळा ६ पख्याचा वारा. ७ तुर्य, वाद्यविशेष.

म्हणे विष्णुदास नामा । जन्ममरण नाही आम्हा ।
कृपा केली मेघश्यामा । सतसंगें तारिलो ॥ ७ ॥

२ बोबड्याचा रुसवा.

कुतन्यां[1] थमाल ले थमाल आपल्या गाई[2] ।
आम्ही आपुल्या घलासि जातों भाई ॥ ध्रु० ॥
तुम्ही थोलल्या पातलाचे लेक ।
मला म्हनता ले जाई गाई लाख ॥
तुह्मामधें मी गलिब आहे येक ।
किति मी धावू ले काता लागला पाई ॥ कुतन्या० ॥ १ ॥
काळी पिवली ले गाय आहे तान्हेली[3] ।
या या गवल्याची धवली गाय पलाली[4] ॥
मदला देखुनि तो गवली हाका माली ।
काथीकाबली[5] हिसकुनि घेतली साली ॥ कुतन्या० ॥ २ ॥
काल बलाचि ले बलाचि खलवस[6] केला ।
तुम्हि सत्वानी फाल फाल घेतला ॥
मी गलीब म्हनुनि ले मजसि थोलका दिला ।
तू म्हनसिल ले याला कलत नाही ॥ कुतन्या० ॥ ३ ॥

---

१ ह्या पदाचा सरळ कथापर अर्थ आहे तो उघडच आहे रहस्यार्थ विचारानें पहावा २ गायी, पक्षी इद्रियें व इद्रियवृत्ति ३ काळी गाय–तामसवृत्ति, पिवळी (किंवा तांबडी) गाय–राजसवृत्ति व ढवळी गाय–सात्विकवृत्ति आपण देवाला दुर्वाचे किंवा बेलाचें त्रिदळ वाहतो यात देवाला त्रिविधवृत्ति अर्पण करून गुणातीत होण्याचाच हेतु असतो ' गळ्यात तीनपदरी जानवे घालतो तें त्रिगुणानी आपण बाधलें आहोत व तीनही गुणाचा आदिअत ब्रह्मगांठींत असतो याच्या स्मरणार्थच होय ' ' थमाल आपुल्या गाई ' म्हणून इद्रियें व इद्रियवृत्ति देवाच्या स्वाधीन करणें हीच शरणागति होय ४ विषयांकडे सतत धाव घेणारी. ५ ढवळ्या गाईचा मालक विष्णु ६ आत्मसुखाचा किंवा भक्तिसुखाचा आनंद.

कृष्ण म्हणे रे ' उगा राहे बोबडया ' ।
तुझ्या गाई रे मीच वळवितो गडया ॥
नाहिं तरि धाडिन रे गोपाळान्या जोडयों' ।
नामा म्हणे रे गोष्ट रोकडि रे भाई । रो पाहीं ॥ कुतन्या॥४॥

**२ नामदेवाचा खेळिया.**

नव्हतच कैस झाल रे खेळिया ! नाही तेंच दिमू लागल रे ॥ ध्रु० ॥
अरूप होत तें रुपासि आल, जीवशिव नाव पावलं रे ।
आपुली आवडी धरूनि पोटी, आपआपणातें व्याल रे ॥
झोपन्याकारण बायेको केली, तिन हें पोट वाढवील रे ।
एक अगीं त्रिविधा होउनि सर्वहि, भूतभौतिक दाविल रे ॥ नव्हतच ॥१
ब्राह्मणाच पोर एक भ्याल रे खेळिया, बारा वर्षे लपाल रे ।
कापत कापत बाहेर आल, नागवच पळून गेल रे ॥
सातोंडया सब्याच बालक, त्यान बालकपण आथिल रे ।
खेळता खेळता चकीत चकल कपाटे फोडुनि गेल रे ॥ नव्हतच २ ॥
खेळियामाजि हनुम्या बळकट, न पडेचि कामव्यसना रे ।
काम नाहीं तेथें क्रोधचि कैचा, तेथें कैचे भांडणार रे ।
दहातोंड्याचे पोरें मारिलें, राम्या गड्याचा गडिपणा रे ॥
अहिरावण महिरावण मारुनि तेणें, समूळ बुडवि रावणा रे ॥ नव्हतंच ३
ब्रह्मयाच पोर एक नाऱ्यो रे खेळिया, हिंडतो त्रिभुवना रे ।
कुटाळकि करुनी जग भाडवी, साधू म्हणवि आपणा रे ॥

---

१ देवाचे सवगडी सत २ खरी. देव स्वत' कृपा करून किंवा संताची संगति देऊन भक्ताकडून इंद्रियजय करवितात. ३ ' स' अकामयत बहु स्याम् ' या श्रुतीचा हा अनुवाद आहे ४ माया ५ अनंत ब्रह्माडरूप. ६ शुकाचार्य. ७ मायेचें दर्शन नको म्हणून आईच्या उदरातच होतें. ८ देवसेनापति स्कंध. ९ ब्रह्मरध. १० रावणपुत्र. ११ नारद.

गंगागिरजा भांडण लावुनि सर्व्यासि धाडिलें वना रे ।
खेळे[1] खेळे परि डावीं न सापडे, ऐसा तो खेळिया शाहणा रे ॥ नव्ह ॥४॥
यादवाचं पोर एक गोपाळ्या भला त्यानं, अनंत खेळ खेळला रे ।
लहान थोर यानं अवघेच मारुन, डावच मोडुन गेला रे ॥
पांडवाचं पोर एक धर्म्या गडि त्यानं, श्यामकर्ण वारु सोडिला रे ।
संतसाधुऋषिमुनि अवघेहि थकले, भक्तिमार्ग त्यान दाविला रे ॥न.५॥
मछिंद्राचं पोर एक[3] खेळिया शहाणा त्यान, निरंजनि खेळ खेळला रे ॥
आपआपणाचा शोध करुनिया, आपण निराळा राहिला रे ॥
त्रिकूट[4] भेदुनि श्रीहाट रोधुनि, गोल्हाट[6]गड घेतला रे
विष्णुदास नामा म्हणे पहा संत हो, विचारून देहाला रे ॥ ६ ॥

## ४ ज्ञान-देव आणि नाम-देव यांचा सांगात.

१०६

नामयाचे भेटी ज्ञानदेव आले । लोटांगण घातलें नामदेवें ॥ १ ॥
देउनी आलिंगन प्रीतीच्या पडिभारें । पूजिले आदरें यथाविधी ॥ २ ॥
नामदेव म्हणे ' सफळ माझें जिणें । स्वामीच्या दर्शनें धन्य जालों ॥ ३ ॥
संसारीं आसक्त मायामोहें रत । तापत्रयसंतप्त झाले जीव ॥ ४ ॥

१ शंकरास २ खेळ खेळून डावांत न सांपडणारा तो खेळिया शाहणा खरा. ३ गोरक्षनाथ. ४ त्रिकूट म्हणजे इडा, पिंगला व सुषुम्ना या तिहींचा ऐक्यभाव. ५ श्रीहाट म्हणजे शक्तीचा बाजार त्याचें स्थान टाळवेवर बोट फिरविल्यानें शरीरस्थ वायूवर फेरफार होऊन टाळवेचा मुख्य बिंदु ठरतो. त्या बिंदूच्या जागीं सर्व शरीराची ज्ञानशक्ति राहते म्हणून त्यास श्रीहाट अशी संज्ञा आहे, यालाच ब्रह्मरंध्र किंवा सहस्रदलकमल म्हणतात ६ गोल्हाट म्हणजे छातीच्या आतील पोकळींत जो उलटा प्राण आहे, त्या प्राणातील ज्ञानवृत्तीला इंद्रियांवाचून स्वताच्या स्वरूपाचा यथार्थ बोध होत नाहीं, अशा त्या प्राणवायु राहण्याच्या ठिकाणास गोल्हाट म्हणतात; औदर्यपीठावरचें स्थान.

ऐसिया पतिताचा करावा उद्धार । यालागीं अवतार तुमचा जगी ॥५॥
मी एक दीनु मूढ मतिहीनु । चरणाचा रजरेणु संताचिया ' ॥ ६ ॥
नामा म्हणे 'तुमच्या चरणाचा आधार । ठाकीन पैलपार भवनदीचा'॥७॥

१०७

ज्ञानदेव ह्मणे ' तू भक्तशिरोमणी । जोडिले जन्मोनी केशवचरण ॥ १ ॥
प्रेमसुखगोडी तुजचि फावली । वासना मावळली समूळ तूझी ॥ २ ॥
भूतळींचीं तीर्थी पहावया नयनी । असे आर्त मनी विष्णुदासा ॥ ३ ॥
तुझिये सगतींचें नित्य सुख घ्यावें । सार्थक करावें ससाराचें' ॥ ४॥
ज्ञानदेव ह्मणे 'पुरवी मनोरथ । करावें मुहूर्त प्रयाणासी ' ॥ ५ ॥
नामा ह्मणे 'तुह्मी पुसावें विठ्ठला । देता आज्ञा मला मी ही येतों' ॥ ६ ॥

१०८

ज्ञानदेव ह्मणे ' भला भक्तराज । कळलें गौप्यगुज सर्व तुझें ॥ १ ॥
धीर आणि चतुर सर्वस्वें उदार । साजे तुज अविकार प्रेमभक्ती ॥ २ ॥
धन्य तू ससारीं भक्तभावशीळ । साधिलें त्वा केवळ प्रेमसुख ' ॥ ३ ॥
हासोनी पढरीनाथ पाहे नाम्याकडे । ह्मणे ' नवल केवढें भाग्य तुझे ॥४॥
प्रत्यक्ष परब्रह्ममूर्ती ज्ञानेश्वर । करीतसे आदर सगतीचा ॥ ५ ॥
जावें स्वास्तिक्षेम यावे शीघ्रवत । करावें स्वहित कळेल तैसें ॥ ६ ॥
हे कृपेचें पोसणें माझें आवडतें । क्षण जीवापरतें न करीं कदा' ॥ ७ ॥
पुडलिकाचे चरण वदूनिया नामा । उतरले भीमा पैलतीरी ॥ ८ ॥

१०९

तीर्थयात्रेप्रती बोळविला नामा । आले निजधामा देवरावो ॥ १ ॥
ह्मणे ' वाटे जडभारी नाम्याच्या वियोगें । दाटलें उद्वेगें चित्त माझें ॥२॥
माझे भक्त मज अनुसरले चित्तें । त्याहूनी पाढियतें मज आणिक नाही ३
व्यक्तीस येणें मज तयाचिये आवडी । युगायुगीं प्रौढी हेचि मिरवी ४
ते माझे आश्रम मी त्याचा विश्राम । जिहीं रूपनाम केलें मज ॥ ५ ॥

त्याचें गुजगौप्य मीचि एक जाणे । माझी प्रेमखूण कळली तया ॥ ६ ॥
आपुलियाचि किरणें विराजे गभस्ती । परी किरण न होती आन जेवीं
तैसे माझे दास मजमाजी उदास । असती समरस दुजेनवीण ॥ ८ ॥
मी तों भक्तरूप भक्त माझें स्वरूप । प्रभा आणि दीप जयापरी' ॥ ९ ॥
ह्मणे 'नाम्यापुढें मज दुजें नावडे' । सांगे भक्तापुढें केशिराजु ॥ १० ॥

११०

सुखरूप दोघे चालताती मार्गीं । परी चित्त पांडुरंगीं नामयाचें ॥ १ ॥
क्षणक्षणा वास परतोनी पाहे । वियोग न साहे पंढरीचा ॥ २ ॥
'फुटोनी हृदय होती दोनी भाग । मज बहु उद्वेग वाटताती ॥ ३ ॥
तूं माझी जननी तूं माझा जनिता । तूं बंधु चुलता पंढरिराया ॥ ४ ॥
तूंचि माझें व्रत तूंचि माझें तीर्थ । तूंचि धर्मअर्थकाम देवा' ॥ ५ ॥
नामा ह्मणे आपुलें अनाथा सांभाळीं । येउनि हृदयकमळीं राहें माझ्या'६

१११

ज्ञानदेव म्हणे ' परियेसी विष्णुदासा । तूं सुखसंतोषा पात्र होसी ॥ १ ॥
प्रेमाचा जिव्हाळा तुझ्या हृदयीं आला । तूं का वेळोवेळां खंती करिसी २
व्यापकु विठ्ठलु आहे सर्वदेशीं । जरी सांडोनिया पाहसी भेदभ्रमु ॥ ३ ॥
जें अव्यक्त अक्षर देशकाळरहित । ज्ञानी उपासीत सोहंभावें ॥ ४ ॥
इंद्रियांसहित आवरोनी चित्त । भोगिती अद्वैत नित्यसुख ॥ ५ ॥
सर्वगत संपूर्ण सर्वकाळ असणें । होणें आणि जाणें नाहीं जया ॥ ६ ॥
तें तुजमाझारी तूं तयाभीतरीं । अनुभवीं निर्धारीं ठेवुनि मना' ॥ ७ ॥
नामा ह्मणे ' माझा सुखाचा विसांवा । आवडे या जीवा पंढरिरावो !' ८

११२

नित्यानंदभरित क्रमताती मार्गु । हृदयीं अनुरागु आवडीचा ॥ १ ॥
प्रेमें वोसंडत करिती स्वहितगोष्टी । दाविती कसोटी अनुभवाची ॥ २ ॥
ज्ञानदेव ह्मणे ' परियेसी नामया । अद्वैत–आत्मया प्रेममूर्ती ॥ ३ ॥

भक्तिभावें तुवा जोडिलें अविनाश । साग पा सेविला सुमार्ग कैचा ? ४
कैसा तो साधावा साग भजनविधि । कैसी मनबुद्धि सत्वशील '॥ ५ ॥
परिसोनी गोष्टी घाली चरणा मिठी । दाटलासे कठीं सद्गदीत ॥ ६ ॥
'कृपेचें पोसणे मी पढरिरायाचें । येवढें भाग्य कैचें मज जाणिवेचें ॥७॥
भानूसी देखणें करिजे अनुतेजें । तैसें ज्ञान माझें स्वामीप्रती ॥ ८ ॥
नामसकीर्तन मज वाटे गोड । येर तें काबाड वायावीण ॥ ९ ॥
नमन ते नम्रता न देखे गुणदोष । अतरीं प्रकाश आनदाचा ॥ १० ॥
ध्यान तया नाव निर्विकार निकें । जें विश्वीं माझ्या देखे विठोबासी ११
किटकी भ्रूकुटिये जैसें अनुसधाना । निकें निजध्यासन एकविध ॥१२॥
सर्वभावें एक विठ्ठलचि ध्याये । सर्वाभूती पाहे रूप त्याचें ॥ १३ ॥
सर्वांहूनि निराळा रजतमावेगळा । भोगी प्रेमकळा तेचि भक्ती ॥१४॥
सत्वाचा सुभटु अखड एकटु । वैराग्य उद्भटु एकनिष्ठा ॥ १५ ॥
अनुरागें गोविंद ध्यायिजे एकाती । यापरती विश्राती आणिक नाहीं '१६
नामा ह्मणे 'हेंही बोलविलें तेणें । उदारें सर्वज्ञें पाडुरगें '॥ १७ ॥

### ५ कांकडआरती

उठा उठा हो साधक साधा आपुलालें हित ।
गेला गेला हा नरदेह मग कैचा भगवत ॥ १ ॥
उठा उठा हो वेगेसी चला जाऊ राउळासी ।
जळतिल पातकाच्या राशी काकडआरती पाहोनी ॥ धृ० ॥
जागे करा रुक्मिणीवरा देव आहे निदसुरा ।
वेगें निबलोण करा । दृष्ट होईल म्हणउनिया ॥ २ ॥
उठोनिया हो पाहटे पहा विठ्ठल उभा विटे ।
चरण तयाचे गोमटे अमृतदृष्टी अवलोका ॥ ३ ॥
पुढें वाजत्रीं वाजती ढोलदमामा गर्जती ।
होते काकडआरती पाडुरगरायाची ॥ ४ ॥
सिंहनाद शख भेरी गजर होतो महाद्वारीं ।

केशवराज विटेवरी नामा चरण वंदितो ॥ ५ ॥

## ६ आरती विठ्ठलाची.

युगें अठ्ठावीस विटेवरी उभा । वामांगीं रखुमाई दिसे दिव्यशोभा ।
पुंडलिकाभेटी परब्रह्म आलें गा । चरणी वाहे भीमा उद्धरी जगा ॥ १ ॥
जयदेव जयदेव जय पांडुरंगा । रखुमाईवल्लभा पावे जिवलगा ॥ ध्रु० ॥
तुळशीमाळा गळां कर ठेवुनि कटीं । कांसे पीतांबर कस्तुरि लल्लाटीं ।
देव सुरवर नित्य येती भेटी । गरुड हनुमंत पुढें उभे राहती ॥ २ ॥
आषाढी कार्तीकीं भक्तजन येती । चंद्रभागेमाजी स्नान जे करिती ।
दर्शनहेळामात्रें तया होय मुक्ती । केशवासी नामदेव भावें ओवाळिती ॥३॥

---

घालिन लोटांगण वंदिन चरण । डोळ्यांनिं पाहिन रूप तुझें ।
प्रेमें आलिंगिन आनंदें पूजिन । भावें ओवाळिन म्हणे नामा ॥

---

## ७ आरती संतांची.

निवृत्ति सोपान मजमाजी असे । ज्ञानदेव मुक्ताई ज्योति प्रकाशे ।
वटेश्वर चांगा भक्तिचें पिसें । तेंचि प्रेमसुख साधु सौरसें ॥ १ ॥
जय जय आरति जय साधुसंता । सद्‌गुरुप्रसादें केशवनाथा ॥ ध्रु० ॥
चंद्रीं चंद्रावरि अमृताचे पाझर । तैसें साधुप्रेमओघनिर्झर ।
तेथेंचि उपमा गंगासागर । मी तू दोन्ही नाहीं क्षीरसिंधु थोर ॥ २ ॥
जाई जुई मालती रुंजी भ्रमरा । वेधलें समसुखा स्वयें अभ्यंतरा ।
पौर्णिमे पूर्णबोधप्राप्ति चकोरा । कां दृष्टादृष्टीजीवन कूर्मी निर्धारा ॥ ३ ॥
सप्रेमें लहरी तेथें अकरावें नाहीं । परतोनिया सुख मूळबिंदु पाही ॥
सद्गुरुप्रसादें ऐसी आरति हे पाही ।........ ॥ ४ ॥
ऐशा उपमा उपपत्ति सांगो मी किती । आरतिप्रेम नेणती ते मूढ मदमति ।
नित्यनेमें चालतां हरिहर स्मरति । विष्णुदास नामा करितसे विनति ॥५॥

## १० नामदेवपुत्र नारा.

१

देवा माझे मीपण ठेवीं आपुले चरणीं । घालीं माझे मनीं रूप तुझें ॥ १॥
मग मी लोकाचारी असेन वर्ततां । राहीन चिंतिता चरण तुझें ॥ २ ॥
चंदनाची वृत्ती वेधले तरुवर । सबाह्य अभ्यतर काय झालें ॥ ३ ॥
सरिता सिंधूसी मिळोनि हरपली । सागरचि झाली एकसरें ॥ ४ ॥
लवण जळाचे प्रवृत्ति जैसे । ऐक्यभावें न दिसे वेगळें काहीं ॥ ५ ॥
नारा म्हणे शरण आलों केशीराजा । ऐसा भाव माझा करीं गा वेगीं ॥६॥

२

माझ्या विठोबाचें श्रीमुख साजिरें । झळकती कुडलें मनोहर ॥ १ ॥
मना ! तें तू आठवी आसनीं शयनी । भोगिसी उन्मनीं सहजसुख ॥२॥
गगनी असो पै न येतो मार्तंडु । तैसें तू अखडु करी ध्यान ॥ ३ ॥
कमलकळिके जैसा भ्रमर आसक्त । तैसा तू निश्चित राहें चरणीं ॥ ४ ॥
जैसा का सबधु जीवनजलचरें । येणेंचि निर्धारें दृढ धरीं ॥ ५ ॥
नारा म्हणे माझ्या बापाचें साधन । सापडली खूण अतरींची ॥ ६ ॥

३

आम्हां व्रत एकादशी । देव केशव तीर्थ तुळसी ॥ १ ॥
आणिक नेणों बा साधन । आमचा विषय हरिकीर्तन ॥ २ ॥
सतसगती निरतर । प्रेमधन हें भाडार ॥ ३ ॥
विनवी विष्णुदासाचा नारा । आमुची ऐसी परपरा ॥ ४ ॥

---

## ११ नामदेवपुत्र विठा.

१

हरिनामाचा ध्वनि ऐकोनि श्रवणीं । जाईन लोटागणीं तेथवरी ॥ १ ॥
माझे सखे अवघे वैष्णवजन । त्यांचें मज दर्शन कै होईल ॥ २ ॥

एक उभे गाती एक बैसुनी ऐकती । हृदयीं आलिंगिती गोपीनाथ ॥३॥
ऐशियाचे संगतीं आहे बाप माझा । विनवितो विठा सहजा नामयाचा ॥४॥

२

जननी बाळकांचें जीवन । जरी ते नेणे भूकतहान ॥ १ ॥
तरी तें काशानें वाचती । विचारावें कमळापती ॥ ध्रु० ॥
वत्सालागी तान्ही । लागू नेदी आपुल्या स्तनी ॥ २ ॥
कूर्मी आपुलिया बाळा । नावलोकीं वेळोवेळां ॥ ३ ॥
विठा म्हणे जगज्जीवना । आतां नुपेक्षावें दीना ॥ ४ ॥

३

ऐसें सुख कोठें आहे । मुक्ति मागोनि करिसी काये ॥ १ ॥
साडोनि पढरीची वारी । मोक्ष मागे तो भिकारी ॥ २ ॥
साडोनी वाळुवट । का बा इच्छिसी वैकुठ ॥ ३ ॥
मुखी कवळ काल्याचे । ऐसे वैकुठी बा कैंचे ॥ ४ ॥
नामयाचा विठा खेळे । बाप नामाचे माझें भोळें ॥ ५ ॥

४

बरवें बरवें वाळुवट । काय इच्छिसी वैकुठ ॥ १ ॥
हें सुख तेथें नाही । मुक्ति घेउनी करिसी काई ॥ २ ॥
म्हणे नामयाचा विठा । बापा जाऊ नको वैकुठा ॥ ३ ॥

५

जैसा आबा वर्षत पाडी । तैसी धरीं गोडी कीर्तनाची ॥ १ ॥
न करी धातमात न लवी वेळू । तेणें हा गोपाळू अतरेल ॥ ध्रु० ॥
दुधावरील साय मवेसी गोडी । तैसी धरीं आवडी रामनामीं ॥ २ ॥
जतीचा साठा तो वैष्णव लाठा । म्हणतसे विठा नामयाचा ॥ ३ ॥

६

माझ्या पितयाची जोडी । चाळीस लक्ष चौऱ्याण्णव कोडी ॥

त्यामाजी फुटकी कवडी । तुज मी न सोडी विठ्ठला ! ॥ १ ॥
माझ दे माझ्या बाच दे ॥ धृ० ॥
केळफाट की बोरफाट । नामयाच विठ पिसाळल ॥ २ ॥

---

## १२ जनाबाई.

१

गोणाई राजाई दोघी सासूसुना । दामा नामा जाण बाप लेक ॥ १ ॥
नारा माहदा गोंदा विठा चौघे पुत्र । जन्मले पवित्र त्याचे वशीं ॥ २ ॥
लाडाई गोडाई येसा साखराई । चौघी सुना पाही नामयाच्या ॥ ३ ॥
लिंबाई ते लेकी आऊबाई बहीणी । दासी वेडी जनी नामयाची ॥ ४ ॥

२

पाय जोडुनि विटेवरी । कर ठेवुनि कटीवरी ॥ १ ॥
रूप सावळें सुदर । कानी कुडलें मकराकार ॥ २ ॥
गळा वैजयती माळा । तो हा मदनाचा पुतळा ॥ ३ ॥
गरुड सन्मुख उभा । जनी ह्मणे धन्य शोभा ॥ ४ ॥

३

नाम फुकट चोखट । नाम घेता नये वीट ॥ १ ॥
जडशिळा ज्या सागरीं । आत्माराम नामें तारी ॥ धृ० ॥
पुत्रभावें स्मरण केलें । तया वैकुठासी नेलें ॥ ३ ॥
नाममहिमा जनी जाणे । ध्याता विठ्ठलचि होणें ॥ ४ ॥

४

पुडलिक भक्त बळी । विठो आणिला भूतळीं ॥ १ ॥

---

१ भगवताच्या गळ्यातील माळ. हिच्यात पचतत्वनिदर्शक पचरत्नें असतात. हिरा–आकाश, माणिक–अग्नि, पुष्कराज–वायु, मोतीं–जल व नीळ–पृथ्वी. देव पचभूतात्मक सृष्टीला लीलेने वागवितात हा भाव. २ प्रबळ, बळवत.

अनंत अवतार केवळ । उभा विटेवरी सकळ ॥ ध्रु० ॥
वसुदेवा न कळे पार । नाम्यासवें जेवी फार ॥ ३ ॥
भक्तभावार्थें विकला । दासीजनीला आनद झाला ॥ ४ ॥

५

वैकुठीचा हरी । तान्हा यशोदेच्या घरीं ॥ १ ॥
रागतसे हा आगणीं । माथा जावळाची वेणी ॥ २ ॥
पायीं पैंजण आणि वाळे । हातीं नवनीताचे गोळे ॥ ३ ॥
धन्य धन्य यशोदामाय । दासी जनी वदी पाय ॥ ४ ॥

६

विठो माझा लेंकुरवाळा । सगें लेंकुराचा मेळा ॥ ध्रु० ॥
निवृत्ती हा खाद्यावरी । सोपानाचा हात धरी ॥ १ ॥
पुढें चाले ज्ञानेश्वर । मागें मुक्ताई सुदर ॥ २ ॥
गोरा कुभार माडीवरी । चोखा जीवा बरोबरी ॥ ३ ॥
बका कडियेवरी । नामा करांगुळी धरी ॥ ४ ॥
जनी म्हणे गोपाळा । करी भक्ताचा सोहळा ॥ ५ ॥

७

गगा गेली सिंधूपासी । त्याणें अव्हेरिलें तिसी ॥ १ ॥
तरी तें सागावे कवणाला । ऐसें बोलें गा विठ्ठला ॥ ध्रु० ॥
जळ काय जळचरा ? । माता अव्हेरी लेंकुरा ? ॥ २ ॥
जनी म्हणे शरण आले । अव्हेरिता ब्रीद गेलें ॥ ३ ॥

८

का गा न येसी विठ्ठला । ऐसा कोण दोष मला ॥ १ ॥
माय बाप तूचि धणी । मला साभाळीं निर्वाणीं ॥ ध्रु० ॥
त्वा ब्रा उद्धरिले थोर । तेथें कोण मी पामर ॥ २ ॥
दीनानाथा दीनबधू । जनी म्हणे कृपासिंधू ॥ ३ ॥

९

आधीं घेतलें पदरीं । आतां न धरावें दुरी ॥ १ ॥
तुम्हा थोराचें उचितें । हेंचि काय सागूं तूतें ॥ ध्रु० ॥
अहो ब्रह्मयाच्या ताता । सखया लक्ष्मीच्या काना ॥ २ ॥
दयेच्या सागरा । जनी म्हणे अमरेश्वरा ॥ ३ ॥

१०

आम्ही जावें कवणा ठाया । न बोलसी पढरीराया ॥ १ ॥
सरिता गेली सिंधूपाशी । जरि तो ठाव नेदे तिसी ॥ ध्रु० ॥
जळ कोपलें जळचरासी । माता नेघे बाळकासी ॥ २ ॥
म्हणे जनी आले शरण । जरि त्वा धरिलेसे मौन्य ॥ ३ ॥

११

सख्या पढरीच्या राया । घडे दडवत पायां ॥ १ ॥
ऐसें करीं अखडित । शुद्धप्रेम शुद्धचित्त ॥ ध्रु० ॥
वेध माझ्या चित्ता । हाचि लागो पंढरिनाथा ॥ २ ॥
जावें ओंवाळुनी । जन्मोजन्मीं म्हणे जनी ॥ ३ ॥

१२

रुक्मिणीच्या कुंका । सुरा असुरा प्रिय लोकां ॥ १ ॥
तू धांव माझे आई । सखे साजणी विठाबाई ॥ ध्रु० ॥
शिवाचिया जपा । मदनताता बा निष्पापा ॥ २ ॥
दयेच्या सागरा । म्हणे जनी अमरेश्वरा ॥ ३ ॥

१३

येग येग विठाबाई । माझे पढरीचे आई ॥ १ ॥
भीमा आणि चद्रभागा । तुझ्या चरणीच्या गगा ॥ ध्रु० ॥
इतुक्यासहित त्वा बा यावें । माझे रगणीं नाचावें ॥ २ ॥
माझा रग तुझे गुणीं । म्हणे नामयाची जनी ॥ ३ ॥

१४

जनी डोईनें गांजली । विठाबाई धाविन्नली ॥ १ ॥
देव हातें बुचडा सोडी । उवा मारितसे तांतडी ॥ ध्रु० ॥
केश विंचरुनि मोकळे केले । जनी म्हणे निर्मळ झाले ॥ २ ॥

१५

तुळशीचे वनीं । जनी उकलीत वेणी ॥ १ ॥
हातीं घेऊनिया लोणी । डोई चोळी चक्रपाणी ॥ ध्रु० ॥
माझे जनीला नाही कोणी । म्हणोनी देव घाली पाणी ॥ २ ॥
जनी सागे सर्व लोका । न्हाऊं घाली माझा सखा ॥ ३ ॥

१६

देव तारक तारक । देव दुष्टासी मारक ॥ १ ॥
गीतेमध्यें आदिअंत । ऐसें बोले तो भगवत ॥ २ ॥
शत्रुलागी आधी मारी । भक्ता सकटीं रक्षी हरी ॥ ३ ॥
जनी म्हणे कृपा करी । भाव पाहोनी अतरीं ॥ ४ ॥

१७

दळण्याच्या मिषें । विठ्ठल आला सावकाशें ॥ १ ॥
देहबुद्धीचें वैरण । द्वैत खडा रे निसून ॥ ध्रु० ॥
एकलीच गाणें गातां । दुजा साद उमटता ॥ २ ॥
कोण ग तुझे बरोबरी । गाणें गातो निरतरीं ॥ ३ ॥
अतरींच विचारिता । देव दिसे तया भक्ता ॥ ४ ॥
खूण कळली नामदेवा । विठ्ठल भुले जनिच्या भावा ॥ ५ ॥

१८

ज्याचा सखा हरी । त्यावरी विश्व कृपा करी ॥ १ ॥
उणें पडों नेदी त्याचें । वारें सोसी आघाताचें ॥ ध्रु० ॥
तयावीण क्षणभरी । कदा आपण नव्हे दुरी ॥ २ ॥

आग आपुले वोढोनी । त्याला राखे जो निर्वाणीं ॥ ३ ॥
ऐसा अंकित भक्तासी । म्हणे नामयाची दासी ॥ ४ ॥

१९.

चिंतन चित्ताला । लावीं मनाच्या मनाला ॥ १ ॥
उन्मनीच्या सुखाआंत । पांडुरंग भेटी देत ॥ ध्रु० ॥
कवटाळुनी पाठीपोटी । जनी म्हणे सांगू गोष्टी ॥ २ ॥

२०

आता पुरे हा संसार । कुठें फेडूं उपकार ॥ १ ॥
साडूनिया थोरपण । करी दळणकांडण ॥ ध्रु० ॥
नारीरूप होउनी हरी । माझें न्हाणेंधुणें करी ॥ २ ॥
राना जाये वेंची शेणी । शेखी वाहे घरीं पाणी ॥ ३ ॥
ठाव मागे पायापाशी । ह्मणे नामयाची दासी ॥ ४ ॥

२१

जनी जाय शेणीसाठीं । उभा आहे तिच्यापाठी ॥ १ ॥
पितांबराची कांस खोवी । मागें चाले जनाबाई ॥ ध्रु० ॥
गौऱ्या वेंचुनि बांधिली मोट । जनी ह्मणे द्यावी गांठ ॥ २ ॥
मोट उचलून डोई घेई । मागें चाले जनाबाई ॥ ३ ॥

२२

सिंव्हाचें तें नख पतिव्रतेचें स्तन । वेंचिलिया प्राण हातां नये ॥ १ ॥
शूराचें तें शस्त्र कृपणाचें धन । वेंचिलिया प्राण हाता नये ॥ २ ॥
गजमाथां मोती सर्पाचा तो मणी । वेंचिलिया प्राण हातां नये ॥ ३ ॥
विराल्यावांचून देहीं देहभाव । जनी ह्मणे देव हाता नये ॥ ४ ॥

२३

आंधळ्याची काठी । आडकली कवणे बेटीं? ॥ १ ॥
माझिये हरिणी ! गुंतलीस कोणे रानी ? ॥ २ ॥

मुकें मी पाडस । चुकलें भावें पाहे वास ॥ ३ ॥
तुजवीण काय करूं ? । प्राण किती कंठीं धरूं ? ॥ ४ ॥
आतां जीव जाऊं पाहे । धांव घाली माझे आये ॥ ५ ॥
माझी भेटवा जननी । संतां विनवी दासी जनी ॥ ६ ॥

२४

हेंचि देईं हृषीकेशी । तुझें नाम अहर्निशी ॥ १ ॥
रूप न्याहाळीन डोळां । पुढें नाचेन वेळोवेळां ॥ २ ॥
सर्वांठाईं तुज पाहे । ऐसें देउनि करी साहे ( साह्य ) ॥ ३ ॥
धांवा करितां रात्र झाली । दासी जनीसी भेटी दिली ॥ ४ ॥

२५

विवेकसागर । सखा माझा ज्ञानेश्वर ॥ १ ॥
मरोनीया जावें । बा माझ्याऱ्या पोटा यावें ॥ २ ॥
ऐसें करिं गा माझ्या भावा । सख्या माझ्या ज्ञानदेवा ॥ ३ ॥
जाइन ओंवाळुनी । म्हणे जन्मोजन्मीं जनी ॥ ४ ॥

२६

चोखामेळा संत भला । तेणें देव भुलविला ॥ १ ॥
भक्ति असे ज्याची मोठी । त्याला पावे तो संकटीं ॥ २ ॥
चोखामेळ्याची करणी । तेणें देव केला ऋणी ॥३॥
लागा विठ्ठलचरणीं । ह्मणे नामयाची जनी ॥ ४ ॥

२७

नोवरियासंगें वऱ्हाडिया सोहळा । मांडे पुरणपोळ्या मिळे अन्न ॥ १ ॥
परिसाचे संगें लोहो होय सोनें । तयाची भूषणें श्रीमंतासी ॥ २ ॥
जनी ह्मणे जोड जाली विठोबाची । दासी नामयाची ह्मणौनिया ॥ ३ ॥

२८

माझा शीणभाग गेला । तुज पाहतां विठ्ठला ॥ १ ॥

पाप ताप जाती । तुझें नाम ज्याचे चित्तीं ॥ २ ॥
अखंडित नामस्मरण । बाधू न सके तया विघ्न ॥ ३ ॥
जनी ह्मणे हरिहर । भजता वैकुंठीं त्या घर ॥ ४ ॥

२९

सुखें संसार करावा । माजीं विठ्ठल आठवावा ॥ १ ॥
असोनीया देहीं । छायापुरुष जैसा पाहीं ॥ २ ॥
जैसा सूर्य घटाकाशीं । तैसी देहीं जनी दासी ॥ ३ ॥

३०

धरिला पंढरीचा चोर । गळा बांधोनीया दोर ॥ १ ॥
हृदय बंदिशाळा केलें । आंत विठ्ठला कोंडिलें ॥ ध्रु० ॥
शब्दें केली जडाजुडी । विठ्ठलपायीं घातली बेडी ॥ २ ॥
सोहंशब्दाचा मार केला । विठ्ठल काकुळती आला ॥ ३ ॥
जनी म्हणे बा विठ्ठला । जीवें न सोडी मी तुला ॥ ४ ॥

३१

पक्षी जाय दिगंतरा । बाळकांसी आणी चारा ॥ १ ॥
घार हिंडते आकाशीं । झांप घाली पिलांपाशीं ॥ २ ॥
माता गुंतली कामासी । चित्त तिचें बाळापाशीं ॥ ३ ॥
वानर हिंडे झाडावरी । पिलीं बांधूनी उदरीं ॥ ४ ॥
तैसी आह्मा विठ्ठलमाये । जनी वेळोवेळां पाहे ॥ ५ ॥

३२

माझे मनीं जें जें होतें । तें तें दीधलें अनंतें ॥ १ ॥
देह नेऊनि देही केलें । शांति देऊनि मीपण नेलें ॥ २ ॥
मूळ दिले हें क्रोधाचें । ठाणें केलें विवेकाचें ॥ ३ ॥
निजपदीं दिला ठाव । जनी म्हणे दाता देव ॥ ४ ॥

३३

देव खाते देव पिते । देवावरी मी निजते ॥ १ ॥
देव देते देव घेते । देवासवें व्यवहारिते ॥ २ ॥
देव येथें देव तेथें । देवाणीण नाहीं रितें ॥ ३ ॥
जनी म्हणे बिठाबाई । भरुनि उरली अतर्बाहीं ॥ ४ ॥

३४

अरे विठ्या विठ्या विठ्या । मूळमायेच्या कारट्या ।१ ॥
तुझी राड रंडकी जाली । जन्मसावित्रीचुडा ल्याली ॥
तुझ गेल मढ । तुला पाहुनि काळ रडें ॥ ३ ॥
उभी राहुनी अगणीं । शिव्या देते दासी जनी ॥ ४ ॥

३५

रक्तवर्ण त्रिकूट स्थान । श्रीहाट पाहे श्वेतवर्ण ॥ १ ॥
श्यामवर्ण तें गोल्हाट । नीळबिंदु औटपीट ॥ २ ॥
वरि भ्रमरगुफा पाहे । दशमद्वारीं गुरु आहे ॥ ३ ॥
नवद्वारातें भेदुनि ।[1] दशमद्वारीं गेली जनी ॥ ४ ॥

३६

देव भावाचा लंपट । सांडुनि आलासे वैकुठ ॥ १ ॥
पुडलिकापुढें उभा । समचरणाची शोभा ॥ २ ॥
हातीं चक्र पायीं वाकी । मुख भक्ताचें अवलोकी ॥ ३ ॥
उभा बैसेना सर्वथा । पाहे कोठें भक्तकथा ॥ ४ ॥
सर्वसुखाचा सागर । जनी ह्मणे सारंगधर ॥ ५ ॥

३७

यातिहीन चोखामेळा । त्यासी भक्तीचा कळवळा ॥
जाला त्याचा म्हणियारा । राहे घरीं करी थारा ॥

---

1 पाठभेद:—माझे वेळीं कुठें गेला । जनी हाकारी विठ्ठला.

देव बाटविला त्याणें । हासे जनी गाय गाणें ॥

### १ दळण.

पहिली माझी ओवी । ओवीन जगत्र । गाईन पवित्र पाडुरग ।
सावळा पांडुरग ॥ ध्रु० ॥
दुसरी माझी ओवी । दूजा नाही कोठें । जनी वनी भेटे । पांडुरग सा०
तिसरी माझी ओवी । तीजा नाही ठाव । अवघाचि देव । पांडुरग सा
चवथी माझी ओवी । वैरीलें दळण । गाईन निदान । पाडुरग ॥ सा०॥ ३
पाचवी माझी ओवी । माझीया माहेरा । राहे निरतरा । पाडुरग ॥सा० ॥३
सहावी माझी ओवी । सहाही शिणले । गुरुमूर्ती भेटले । पाडुरग ॥सा०॥५
सातवी माझी ओवी । आठवे बेळोवेळा । देखीले म्या डोळा । पाडुरग ॥६
आठवी माझी ओवी । अठ्ठाविसी युगें । उभा चद्रभागें । पाडुरग ॥ ७
नववी माझी ओवी । सपलें दळण । चुकवी मरण । पांडुरग ॥सा० ॥ ८
दहावी माझी ओवी । दहा अवतारी । यावें सवसारी पाडुरग ॥ ९ ॥

### २ लिहिणें ( मुक्ताबाईच्या प्रश्नास उत्तर. )

बाइ ! मी लिहिणें शिकलें सद्गुरुरायाशीं ॥ ध्रु० ॥
ब्रह्मीं झाला जो उल्लेख[1] । तोचि नादाकार देख ।
पुढें ओंकाराची रेख । तुर्या म्हणवी तीशीं ॥ बाइ० ॥ १ ॥
माया महत्त्वाचें[2] सूत्र । तीन[3] पाचाचा प्रकार ।
पुढें पचवीसाचा[4] भार । गणती केली छत्तीशीं[5] ॥ बाइ० ॥ २ ॥

---

१ 'मी एक आहे बहु व्हावे' हा आदिसकल्प. २ महत्तत्वाचें. ३ ती गुण व पचभूतें यांचा ४ पिंडाची पचवीस तत्वें. ५ क्षेत्राचे छत्तीस गुण. गीत अ० १३ श्लोक ५।६ पहा ' आणि जीवेसी पाडवा । हा छत्तिसाचा मेळावा तो हा येथ जाणावा । सघात पै गा ' ( ज्ञाने० १३-१४९ ).

चोर खोल्या चार घरीं । चार पुरुष चार नारी ॥
करूनी चौघाचा अव्हेर । बसल्ये पांचव्यापाशीं ॥ बाइ० ॥ ३ ॥
पांच शाहणे पांच मूर्ख । पांच चाळक असती देख ।
पांच कळभखोर आणिक । मी वळखे दोघांसी ॥ बाइ ॥ ४ ॥
बीजापासूनी अंकूर । होय वृक्षाचा उभार ।
शाखापुष्पे पत्रफळभार । सामावे बीजाचे पोटीं ॥ बाइ० ॥ ५ ॥
कांतिण तंतूसी काढून । वरती क्रीडा करिती जाण ।
शेवट तंतूसी ग्रासून । एकली राहे आपणासी ॥ बाई ० ॥ ६ ॥
वेदशास्त्र आणि पुराण । याचा अर्थ मनी आणून ।
कनक नगाचें भूषण । अनुभव वाटे जीवासी ॥ बाइ ० ॥ ७ ॥
नामदेव प्रतापवंत । मस्तकिं सद्‌गुरूचा हस्त ।
जनी म्हणे केली मात । पुसा ज्ञानदेवासी ॥ बाइ ० ॥ ८ ॥

## १३ कान्हो पाठक.

१

जरी तुज देवाची चाड । तरी न करी बडबड ।
बहुत बोलतां वाड । पडसी पतनीं ॥ १ ॥
जरी तुज देवाची बाधा । तरी न करी वेवादा ।
वाद करितां निंदा । घडती दोष ॥ २ ॥
जरी तुज देवाचा छंद । तरी सांडी कामक्रोध ।
तेणें परमानंद । होउनी ठासी ॥ ३ ॥

---

१ जारज, अंडज, स्वेदज व उद्भिज हीं चार घरें, ब्राह्मणादि चार वर्ण या चार खोल्या. २ चार देहाचे अभिमानी प्राज्ञ, तैजस, विश्व व प्रत्यगात्मा. ३ जागृति, स्वप्न, सुषुप्ति व तुर्या. ४ चार देहाचा निरास ५ ज्ञानेंद्रियें. ६ कर्मेंद्रियें. ७ पंचप्राण. ८ कलह करणारे, पंचविषय. ९ प्रकृतिपुरुष. १० मोठमोठ्या बाता. ११ राहसी. ठाणें-राहणें. ठा-स्या.

जरी तुज देवाचि होवों । तरी मौन धरीं पा जिव्हा ।
तेणें तू अनुभवा । पावसील ॥ ५ ॥
जरी तुज देवाचा सांगात । होतां अखडित ।
तरी बैस पा निवात । साधुमर्गीं ॥ ६ ॥
जरी तुज देवाचा विश्वास । तरी हृदयीं धरीं नागेश ।
म्हणे कान्हो पाठक । अरे जना ॥ ७ ॥

२

पेंधा म्हणे हृषीकेशी । आरुषें[2] बोबडें हें परियेसी ॥ १ ॥
या रे नाचों अवघे जन । गावों हरिनामकीर्तन ॥ २ ॥
कान्हो पाठक बागडा[3] । नाचे वैष्णवां पुढां ॥ ३ ॥

३

गाये तो गाणु नाचे तो नाचणु । परिसे तो जाणु भेदवादी ॥१॥
नव्हे तो सतु योगी ना भक्तु । जो लोकांतु डर्ब करी ॥ ध्रु० ॥
पढे तो पढता उपलवी भक्ता । कवित्व करिता ख्यातीलागी ॥२॥
पाठक कान्हो म्हणे वरदळ लटिकें। जव जीव सात्विकें विनॅटेना३

४

वेद गणितां मर्यादला । तरि तू अगाध बा विठ्ठला ॥ १ ॥
येवढें माप कैचें थोर । ज्याणें उमाणे[6] तुमचा पार ॥ ध्रु० ॥
शेष वर्णितां श्रमला । जिव्हा दुखड होउनि ठेला ॥ २ ॥
म्हणौनि कान्हो पाठक उगा । मौनें मवी[7] पाडुरगा ॥ ३ ॥

---

१ होआवा, व्हावा. २ आर्ष, बोबडें, अज्ञानाचें. ३ सोंगाडा, चेष्टा करणारा. 'तिन्ही गुण आपुलालिये प्रौढी । देहीं नाचविती बागडीं ' ( ज्ञाने० १४-३११ ). ४ दभ, वृथा खटाटोप. ( विवेकसिंधु ७-३१ ). ५ सत्वगुणानीं सपन्न होत नाहीं. ६ झाडा होणें, आकळणें. ७ मोजतो.

## १४ सच्चिदानंद बाबा.

१

ब्रह्म ब्रह्मा चळैसी खरी । प्रगट गीता ज्ञानेश्वरी ॥ १ ॥
गीता गभीरगगा । ज्ञानदेवीं प्रगट जगा ॥ २ ॥
तीहीं ठाईं वक्र वाहे । पूर्वपरा जात आहे ॥ ३ ॥
श्लोक सातशतें । बोध चालती कौतुकें ॥ ४ ॥
सच्चिदानंदबाबा सिंधु । संगम जाला सोहंबोधु ॥ ५ ॥

२

स्नानसध्या न घडे येका । तयासी कर्म अतिजड देखा ॥ १ ॥
ते जीव उद्धरले उद्धरले । ज्ञानदेवीं मुक्त झाले ॥ २ ॥
सच्चिदानद बाबा साचा । त्यासी प्रसाद ज्ञानदेवाचा ॥ ३ ॥

---

## १५. परिसाभागवत.

१

अणुमाजी राम रेणुमाजी राम । तृणकाष्ठीं राम वर्ततसे ॥ १ ॥
बाहीजुभींतरीं[1] राम चराचरीं । विश्वीं विश्वाकारी व्यापलासे ॥२॥
रामेंविण स्थळ रितोंचि पै नाहीं । वर्ते सर्वांठायीं रामराम ॥ ३ ॥
परिसा भागवत कायावाचामनें । श्रीरामावाचून आन नेणे ॥ ४ ॥

२

टाळ मादळी[2] नाहीं चाड । गोड नाम विठोबाचें ॥ १ ॥
वाहों टाळिया नाचों बागडें । गाचों नामें गोड विठोबाचीं ॥२॥
परिसा ह्मणे येर अवघी उपाधी । नाम गातां सिद्धी होईल रोकडी ३

३

आषाढ शुद्ध एकादशी । नामा विनवी विठोबासी ।

---

१ बाहेर व आत, अतर्बाह्य. २ वाद्यविशेष, तुड्डुब. ( ज्ञाने० १-१३२ ).

आज्ञा द्यावी हो मजसीं । समाधि विश्रांतीसी ॥ १ ॥
आयुष्य कळसासी आलें । अभग त्वा सिद्धी नेलें ।
ज्ञानेश्वरसगती घडलें । तीर्थमिसें जगदुद्धार ॥ २ ॥
जन्मा आलियाचें कृत्य । जन लावावे सुपंथें ।
विठ्ठलमत्र त्रिभुवनातें । जग जाणत महिमा हा ॥ ३ ॥
सकलसिद्धी मनोरथ । तुझे कृपें पावलों सत्य ।
ह्मणे परिसा भागवत । नामा नाम जपतसे ॥ ४ ॥

४

बिब उमटलें अबरीं । गरुड झळके टकयावरी ॥ १ ॥
पैल टका कोणाचा । नामा येतो केशवाचा ॥ ध्रु० ॥
नामा येतो लोटागणीं । परिसा लागतो चरणी ॥ २ ॥

**संतांची आरती.**

क्षार उदक देउनि मधुरता आली । तैसी लवणास्थिती अमृत खोली ।
तयाच्या अतरी प्रवृत्ति मुराली । परी साखरेची गौल्यतां कवणें आणिली १
जय जय आरति प्रेमसिंधु पुरा । ऐक्या ऐक्य केले तुवा एकसरा ॥ ध्रु० ॥
नित्य प्रेमें जागति जागरणी जागा । आणिक उद्धरण जगासी सांगा ।
येकी येकादशी पुण्य आले ते पहा या । द्वादशि लाधली ते भक्तासि मागा २
ऐसे परउपकारी लोळावे त्यांच्या द्वारी । तेंचि केशवध्यान येर लटके ससारी ।
त्याच्या रगणीची शीळा देवा मज करी । ते येता जाता चरण ठेविती वरी ३
ते ही उद्धरले माझे येकवट । पूर्वज उद्धरण दिसे वैकुंठ ।
हरिदासाचे भार गरुडटके मोठे । धन्य तप्तीतीर बरवे वाळवंट ॥ ४ ॥
लाधलों समसुख काशिये जाता । विश्वनाथीप्रेमा याचिया सत्ता ।
बाणली विरश्री पढरीनाथा । जिकडे तिकडे देखे हरिदास गर्जता ॥५॥

---

१ अग्रभागीं. २ गौल्य, माधुर्य, 'साखर आणि दूध। हें गौल्यें कीर प्रसिद्ध' ( ज्ञाने० ३-२२६ ). ३ सभामडपाची.

निवृत्ति सोपान हे ज्ञानेश्वर । मुक्ताई चागदेव वटेश्वरु ।
निरतर खेचरविसा ब्रह्मी देखे आनदाचा पूर।अवधिया अवघा साक्षात्कारु ६
त्याचे चरणीचा रजरेणु हा नामदेव शिंपा । तयासि पाहता अनुभव सोपा ।
हे एकाचि मूर्ति पावलों अशेखा । सकळा चरणीं परसा भागवत देखा ॥७॥

## १६. चांगा केशवदास.

१

हाती राख पायी राख । मातें राख विठ्ठला ॥ १ ॥
येथें राख तेथें राख । मातें राख विठ्ठला ॥ ध्रु० ॥
केशवदास चागा पाई राख । मातें राख विठ्ठला ॥ २ ॥

२

शखचक्रीं तनु शोभत । मुखी नामसे गर्जत ॥ १ ॥
वैष्णव तेज रे झळाळ । सूर्यापरीस ते निर्मळ ॥ ध्रु० ॥
सदा नेत्रीं आनदजळ । हृदयी सतत गोपाळ ॥ २ ॥
केशवदास शरणागत । त्यासागातें पंढरीनाथ ॥ ३ ॥

३

येथुनि दिसे महाद्वार । काठी काबळी अपार ॥ १ ॥
चागा येतो लोटागणी । रुळत वैष्णवा चरणीं ॥ ध्रु० ॥
केशवदासा आनंद मनीं । देव बसले सिंहासनी ॥ २ ॥

४

तोचि नामा तोचि देवो । ऐसे म्हणता न धरा सदेहो ॥
म्हणा विष्णुदासा नामा । तो नेईल मुक्तिग्रामा ॥
केशवदासी चागा निरुता जाण । पंढरीनाथें सांगितली खूण ॥

५

ज्ञानदेवो सोपानदेवो निवृत्ति । तिहींची येकी मूर्ति होउनि ठेली ॥ १ ॥
ब्रह्म नाम देवों ह्मणा नाम देवो । फिटला सदेहो ससारींचा ॥ २ ॥
हेचि जीवीं मनीं ध्यातु असे चागा । विष्णुदास नामा उद्धरील ॥ ३ ॥

६

आरतियाचीं ताटें चाललीं वनदाटें । साही दारवटें उल्लघुनिया ॥ १ ॥
लेखितसे आगोळी आली असे दिवाळी । चला जाऊ वनमाळी वोवाळावया
दिवाळीचें सणी घालिती वोवाळणी । नाही येणें जाणें गर्भवासी ॥ ३ ॥
चौधियाचा सोहळा कृष्ण परवडी वोवाळा । जाऊ त्या राउळा नदाचिया॥
केशवदास चांगया कृष्णा दृष्टी न्याहाळी । जीवेभावें वोवाळी यादवराया ५

७

सकल मगळा मगळाचें । नाम गोपाळरायाचें ॥ १ ॥
निरतर म्हणा साचे । फळ जालें रे जन्माचें ॥ २ ॥
कल्पतरुतळीं बैसावें । तेणें फळेसी उगवें ॥ ३ ॥
जें जें मनी अभिलाषावे । ते तें गोपाळें पुरवावें ॥ ४ ॥
चागा म्हणे हरि म्हणावें । मुक्ति पावाल केशवें ॥ ५ ॥

## १७ बहिरा पिसा.

१

शेळी साप देखे चरेना राहती । टॅक लागले चित्ती । तैसें जालें ॥ १ ॥
नवल वीतलें माझें म्या देखिलें । बोलणे खुटलें बाइयानो ॥ ध्रु० ॥
सोहबोध कैसा अतरी वोळला । निवात राहिला बहिरा पिसा ॥ २ ॥

### १ प्राचीन संतांचें स्मरण.

सनक सनदन सनत्कुमार सनातन । हे ब्रह्मनदन चौघेजणे ।
नारद पाराशर वसिष्ठ वामदेव । मैत्रेय शुकदेव सारव्यायन हे ॥ १ ॥
हरि वेदास नित्य स्मरण करिता । कृष्ण पाविजे थाप देउनि कृताता ध्रु०॥
हनुमंत सेखु यम जनकु । रुद्रांग भिक्षु यतींमाजी जडभरत । कवि ।
हरि अंतरिक्ष प्रबुद्ध पिप्पलायन आविर्होत्र हे ॥ २ ॥

---

१ तटस्थपणा. २ चापट, धक्का. ३ हे नवयोगी होते ( भागवत स्कध ११ पहा ).

द्रुमिळ चमस करभजन । सौरस अबरीष दास श्रीहरीचा ।
प्रल्हाद बळी ध्रुवपद अढळी सुत देवाजवळी हे ॥ ३ ॥
भीष्म विदुर उद्धव उत्तम बिभीषण जाण रामाकित जो ।
सुदामदेवो विप्र पुण्यश्लोक युधिष्ठिर जवळील अक्रूर अतरगृहे ॥ ४ ॥
हरिश्चद्र सिभ्रु पुरीखा धुधुमारी मुचकुद श्रीहरी रुक्मागद धौम्य भुरीभूषण
परीक्षिती सुजाण रतिदेव पावन पुडरीक हे ॥ ५ ॥
भीमकी ती कृष्णा गोपिका यज्ञपत्न्या युयुधान करूणारूप जालया ।
जटायु सव्यसाची माळी सुदामा पिगळ व्याधमूर्ती तुळाधार हे ॥ ६ ॥
येंहीं अनता हरिदासी तारिले जगासी जे पूर्ण हरीसी शरणागत ।
चीमताणौप्रसादें कौण्डिण्यगोत्री वदे पिशा बहिऱ्यानें जातवेदें स्मरण केलें हें ७

## १८ जोगा परमानंद.

१

मन निवालें निवालें । कैसे समाधान जालें ॥ ध्रु० ॥
सत आलिया अवसरी । नवल आरतीयांची पैरी ।
आनदले नरनारी । परमानद प्रगटले ॥ १ ॥
द्यावया आलिंगन । बाह्या येतसें स्फुरण ।
सजळ जाले लोचन । जैसे मेघ वरुपती ॥ २ ॥
आजी सुदीन सोहळा । सत जीवनाची कळा ।
जोगा विनविता सकळा । भेटी परमानदेसी ॥ ३ ॥

२ गुरगुडी.

बैसुनि सतांघरी हो । घेतालि गुरगुडी हो ॥ ध्रु० ॥
आधी ब्रह्माड नारळ । मेरु सत्व तो आढळ ।
निर्मळ सत्रार्वाचे जळ । सोह गुरगुडी हो ॥ १ ॥

---

१ प्रकार. २ तेज, काति ३ तबाखु ओढायची गुरगुडी, पक्षीं, गुरुगोडी किंवा गुरुसेवनामृत.

चिलमी त्रिगुण त्रिविध । मीपण खडा तो अभेद ।
तमतमाखु जाळुनि शुद्ध । वैराग्यविंगळ[1] धडधडी हो ॥ २ ॥
सावधान लावुनि नळी । मीपण झुरका विरळा गिळी ।
जन्ममरणमुरकुडी साभाळी । विषयधूर सोडी हो ॥ ३ ॥
लागला गुरगुडीचा छद । त्याला प्रसन्न परमानद ।
जोगा स्वामी तो अभग । गुरुचरण न सोडी हो । ॥ ४ ॥

३

सतजन ते साचार । राया विठोबाचे डिगर ।
नामकीर्तनी अपार । अहर्निशी गर्जती ॥ १ ॥
प्रेमें बोधलें डुलती । रामनाम जपती ॥ ध्रु० ॥
आसलेन देहें वेगळाले । सदा हृदयी निवाले ।
देशकाळातें विसरले । ते सत माउली ॥ २ ॥
ते सत सच्चिदानंदाचिया मूर्ती । रामनाम जपती ।
जोगा विनवी पुढतोपुढती । ते सत हो माहेर ॥ ३ ॥

४

चदना आगीचा परिमळ निघे । निर्जीव काष्ठान्या हृदयी रिघे॥१॥
ऐसें जयाचें बोलणें आहे । तयाची मज दाखवा सोये[2] ॥ ध्रु० ॥
वचन जव रिसवे कानीं । तव तों परिपूर्ण[3]कुचि मनी ॥ २ ॥
श्रवणद्वारा पीयूष रिघे । वोसडोनी[4] मग बाहेरि निघे ॥ ३ ॥
विवेकसुखें विचरे जनीं । सुबुद्धि सदा वावरे मनीं ॥ ४ ॥
जोगा म्हणे नामभेदें तो साधु । अनुभवी तोचि परमानदु ॥ ५[5] ॥

---

१ वैराग्याचे निखारे. २ मार्ग, चाल, स्थिति, सगती. ३ पूर्णता. ४ उच बळून. ५ ' तेवीं आम्हा तया परस्परें । बाहेर नामाचींच अतरें । वांचूनि आतुवट वस्तुविचारें । मी तेचि ते ॥ ' ( ज्ञाने० ९–४११ ).

५

हृदयीं प्रगटला साकार । जो लावण्यगुणसागर ।
परमानंदें वाहे पूर । तेणें गहिंवर न सवरे ॥ १ ॥
प्रेमें पाझरती लोचन । पाहतां जगजीवन ॥ ध्रु० ॥
मेघश्याम पाहतां आपेआप । डोळ्यां लागलें वडप ।
अष्टही सात्त्विकाचें रोप । हृदय-आळां उगवलें ॥ २ ॥
भक्तिभावें वोल्हावलें । प्रेमफळासी पै आलें ।
नवविधा हे पिकलें । परमानंद ह्मणे जोगा ॥ ३ ॥

६

वाचा लोंधावली गुणा । स्वरूपीं राहिले लोचन ।
चरणीं स्थिरावलें मन । जगजीवन देखिलियां ॥ १ ॥
तो म्यां देखिला देखिला । विठ्ठल पंढरीचा राजा ॥ ध्रु० ॥
भानुबिंबें अतिसुढाळ । मन्मंडित वक्षस्थळ ।
चरणीं तेजाचे झळाळ । मुगुटीं किरणें फाकती ॥ २ ॥
ऐसा नयनीं देखिला । तो मज असुमाई जाला ।
जोगा विनंवितो विठ्ठला । वोसंडला आनंदु ॥ ३ ॥

७

भक्ती हे घोंगडी पांघरलों फुडी । उतरलों थडी भवनदीची ॥ १ ॥
घोंगडें खांदीं उभा महाद्वारीं । वाचे निरंतरीं नामघोष ॥ ध्रु० ॥
रगठिंया पाटोळ्या दिधलीसे गांठी । केली सँवसाटी घोंगडीया ॥ २ ॥
जोगया स्वामी गोपाळ हरी । घोंगडिया थोरीं देत असे ॥ ३ ॥

---

१ वृष्टि, अश्रुधारा. ' गुरुकृपामृताचें वडप । आपण सेवावृत्तीचें होय रोप ' ( ज्ञाने० १३-३९९ ). २ आळ्यात ३ ओलावले, शांत झालें निवालें. ४ लुब्ध झाली. ५ न सामावणारा. ६ रगटे व शाल यांची गांठ झाली. ७ अदलाबदल. ८ मोठेपण.

८

रोमांच रवरवितु स्वेदबिंदु डळमळितु ।
पाहता नेत्र उन्मीळितु[1] । मग मिळोत मागुते ॥ १ ॥
ऐसा हृदयी प्रगटसी । कै माझा नरहरी ॥ ध्रु० ॥
तुज देखता तनु कापे । मनबुद्धी पै हारपे ।
सकळही अहभाव लोपे । येक तत्वचि उरे ॥ २ ॥
अष्टही[2] सात्विक गुण । प्रेमभरित अतःकरण ।
तें मज देई गा नारायणा । जोगा शरण तुज आला ॥ ३ ॥

## १९ नरहरी सोनार.

१

निगम[3] हा वेल प्रकाशमान जाला । भक्तिफुलें त्याला शोभताती ॥ १ ॥
निवृत्ति ज्ञानदेव सोपान मुक्ताबाई । घनदाट पाही फळें आली ॥ २ ॥
तयाचिये चरणी सोनार नरहरी । झाडलोट करी तयाद्वारीं ॥ ३ ॥

२

शिव आणी विष्णु एकचि प्रतिमा । ऐसा ज्याचा प्रेमा सदोदीत ॥ १ ॥
धन्य ते ससारी नर आणि नारी । वाचे हरहरी उच्चारिती ॥ ध्रु० ॥
नाही पै तो भेद अवघाचि अभेद । द्वेषाद्वेषसबधा उरी[4] नुरे ॥ २ ॥
सोनार नरहरी न देखे पै द्वैत । अवघा मूर्तिमत एकरूप ॥ ३ ॥

३

सुखाची विश्राती सुख आले भेटी । प्रेम दुणावे पोटी वोसडलें[5] ॥ १ ॥
सावळें सगुण साजिरें निर्गुण । पाहता आनद पूर्ण मना होय ॥ २ ॥
अलक्ष अपरपार न कळे विचार । नरहरी सोनार ध्यात चित्ती ॥ ३ ॥

---

१ ‘ अर्धोन्मीलित डोळे । वर्षताति आनदजळें ’ (ज्ञाने० ९–५२८ ). २ कप, रोमाच, स्फुरण, स्वरभग, खेद, हास्य, लास्य ( नृत्य ) व प्रेमाश्रु हे सात्विक अष्टभाव. ३ वेदश्रुति ४ अवशेष, वाकी ५ उचबळले.

४

नामाची आवडी जिव्हेसी तो चाळा । तेणें कळिकाळा भयत्रास ॥
गोमटें[1] गोजिरें[2] नाम हें विठ्ठल । बोला वाचे बोल प्रेमभरें ॥ ध्रु० ॥
न सरे कल्पना न निवारे भ्रांती । नामें होय प्राप्ती नित्यानंद ॥ २ ॥
सोनार नरहरि प्रेमाचा भुकेला । म्हणोनी छंद त्याला नामस्मरणीं ॥ ३ ॥

५

भोळा हा शंकर पुढें नंदीश्वर । तेथें मी पामर काय वानूं ॥ १ ॥
भूषण जयाचें भुवनावेगळें । रुंडमाळ रुळे[3] गळ्यामध्यें ॥ २ ॥
कर्पूरगौर भोळा हातीं तो त्रिशूळ । भूषण धवल विभूतीचें ॥ ३ ॥
माथां जटाभार करी श्वेत शंख । सदाशिव साज फुंकीतसे ॥ ४ ॥
नाम घेतां ज्याचें पापताप जाती । पापी उद्धरती क्षणमात्रें ॥ ५ ॥
नरहरी सोनार भक्तिप्रियकर । पार्वतीशंकर हृदयीं ध्यातो ॥ ६ ॥

६

सवगडे[4] निवृत्ती सोपान मुक्ताबाई । ज्ञानदेवापायीं भाव माझा ॥ १ ॥
धन्य ते वैष्णव मिळाले सकळी । जीवभाव मी वोवाळी तया चरणीं॥२
अखंड ध्यानीं ध्यातो हृदयीं साचार । नरहरी सोनार कायामनें ॥ ३ ॥

७

नाम फुकाचें फुकाचें । देवा पंढरीरायाचें ॥ १ ॥
नाम अमृत हें सार । हृदयीं जपा निरंतर ॥ २ ॥
नाम संताचें माहेर । प्रेमसुखाचें आगर ॥ ३ ॥
नाम सर्वांमध्यें सार । नरहरी जपे निरंतर ॥ ४ ॥

८

माझें प्रेम तुझे पायीं । राहो ऐसें करी कांहीं ॥ १ ॥

---

१ चांगलें. २ सुंदर. ३ लोळते, झुलते, शोभते ' कंठीं रुळताति अलौकिक । माळादंड ' ( ज्ञाने० ११-२२० ) ४ सोबती

मागणें तें हेंचि मागों । आणिका न लागो छंदासी ॥ ध्रु० ॥
काया वाचा आणि मन । केलें समर्पण तव चरणीं ॥ २ ॥
हाचि माझा नित्य निर्धार । म्हणे नरहरी सोनार ॥ ३ ॥

९

पाहता पाहता वेधलेसें मन । जालें तें उन्मन दृष्टीभरी ॥ १ ॥
आनंदीआनंद नित्य परमानंद । ध्याती चरणारविंद शिवादिक ॥२
तोचि उभा हरी पंढरीनायक । पाहता सम्यक सुख वाटे ॥ ३ ॥
सोनार नरहरी तयाचिये वरीं । झाडलोट करी जीवेंभावें ॥ ४ ॥

१०

कारणें महाकारण यान्याहीपरता । भरुनी पुरता उरलासे ॥ १ ॥
तें हें विटेवरी समचरण साजिरें । पाहता गोजिरें नीलवर्ण ॥ ध्रु० ॥
उदंड वर्णिलें उदंड ध्याइलें । उदंड गाइलें परी न सरेचि ॥ २ ॥
म्हणे नरहरी सोनार अलक्ष्यावेगळें । पाहता न कळे भक्तीविण ॥३॥

११

नव्हे तें सगुण नव्हे तें निर्गुण । जाणती ते खुण तत्वज्ञानी ॥ १ ॥
आहे ते अंबर निःशब्द निराळें । अद्वय केवळ जैसे तैसे ॥ ध्रु० ॥
म्हणे नरहरी सोनार तें क्षर ना अक्षर । परेहुनि पर विटेवरी ॥ ३ ॥

१२

देवा तुझा मी सोनार । तुझे नामाचा व्यवहार ॥ १ ॥
देह बागेसरी[3] जाण । अंतरात्मा नाम सोनें ॥ ध्रु० ॥
त्रिगुणाची करुनी मूस[4] । आत ओतिला ब्रह्मरस ॥ ३ ॥
जीव शिव करुनी फुंकी[5] । रात्रदिवस ठोकाठोकी ॥ ४॥
विवेक हातवडा घेऊन । कामक्रोध केला चूर्ण ॥ ५ ॥

---

१ तिसरा अज्ञान देह २ निराश्रय. ३ वागीश्वरी, मातीची शेगडी.
४ धातूचा रस करण्याचें पात्र. ५ फुकणी

मनबुद्धीची कातरी । रामनाम सोनें चोरी ॥ ६ ॥
ज्ञान ताजवा घेऊनि हातीं । दोन्ही अक्षरें जोखिती ॥ ७ ॥
खाद्या वाहोनी पोतडी । उतरला पैलथडी ॥ ८ ॥
नरहरी सोनार हरीचा दास । भजन करी रात्रंदिवस ॥ ९ ॥

१३

भस्म उटी रुंडमाळा । हातीं त्रिशूळ नेत्रीं ज्वाळा ॥ १ ॥
गजचर्म व्याघ्रांबर । कंठी शोभे वासुकीहार ॥ २ ॥
भूतें वेताळ नाचती । हर्षयुक्त रमापती ॥ ३ ॥
सर्व सुखाचे आगर । म्हणे नरहरी सोनार ॥ ४ ॥

## २० सेना न्हावी.

१

उदार तुम्ही संत । मायबाप कृपावंत ॥ १ ॥
केवढा केला उपकार । काय वानूं मी पामर ॥ २ ॥
जडजीवा उद्धार केला । मार्ग सुपंथ दाविला ॥ ३ ॥
सेना म्हणे उतराई । होता न दिसे काही ॥ ४ ॥

२

सांडोनि कीर्तन । आणिक न करी साधन ॥ १ ॥
पुरवा आवडीचें आर्त । तुम्हा आलों शरणागत ॥ ध्रु० ॥
मुखी नाम वाहिन टाळी । नाचे निर्लज्ज राउळीं ॥ ३ ॥
सेना म्हणे नुपेक्षावें । हेंचि मागें जीवें भावें ॥ ४ ॥

३

स्वहित सांगावें भलें । जैसें आपणासी कळे ॥ १ ॥
त्यान्या पुण्या नाहीं पार । होय अगणित उपकार ॥ २ ॥
मोहपाशें बांधिला । होता तोही मुक्त केला ॥ ३ ॥

---

१ वजन करितात. २ भवसागराचें परतीर.

जेणें वाट दाखविली । सेना म्हणे कृपा केली ॥ ४ ॥

४

असाल तेथें नामाचें चिंतन । याहूनी साधन आणिक नाहीं ॥ १ ॥
साडवाल माझा भक्ताचा कैवारी । प्रतिज्ञा निर्धारी केली आम्हा ॥ २ ॥
गुणदोषयाती न विचारी काही । धावे लवलाही भक्तकाजा ॥ ३ ॥
अवघे काळीं वाचे म्हणा नारायण । सेना म्हणे क्षण जाऊ न द्या ॥४॥

५

लेंकुराची आळी मायबापापुढें । पुरवी लाडेंकोडें लळे त्याचे ॥ १ ॥
करावा साभाळ सर्वस्वी गा आता । काहो अव्हेरिता जवळीचा ॥ ध्रु० ॥
आम्हावरी चाले सत्ता आणिकाची । थोरीव तुमची काय मग ॥ ३ ॥
आला सेना न्हावी पायापे जवळी । आता टाळाटाळी नका करू ॥ ४ ॥

६

देहुडे[२] ठाण सकुमार गोजिरें । कल्पद्रुमातळी उभा देखिला रे ॥ १ ॥
मनी वेध लागला त्या गोपाळाचा । जो जिवलग गोपगोपिकाचा ॥ध्रु०॥
सावळी सगुण घनानदमूर्ती । पाहता वेधली माझी चित्तवृत्ती ॥ ३ ॥
जो उभाचि राहिला व्यापुनी सकळ । भेटिलागी सेना न्हावी उतावीळ४

७

जो हा दुर्लभ योगिया जनासी । उभाचि देखिला पुडलीकापासी ॥ १ ॥
हारपलें दुजेपण फिटला सदेह । निमाली वासना गेला देहभाव ॥ ध्रु० ॥
विटेवरी उभा पढरीचा राणा । सेना म्हणे बहु आवडतो मना ॥ ३ ॥

८

जे म्हणविती न्हावियाचे वशी । तेणे पाळावें स्वधर्मासी ॥ १ ॥
येर अवघे बटकीचे । नव्हे न्हावियाचे वशीचे ॥ २ ॥
शास्त्रें नेम नेमियला । साडोनि अनाचार केला ॥ ३ ॥

---

१ हट्ट. २ दीड पायावर उभें.

जन्मलों ज्या वंशात । धंदा दोन प्रहर नेमस्त ॥ ३ ॥
सत्य पाळा रे स्वधर्मासी । सेना म्हणे आज्ञा ऐसी ॥ ५ ॥

९

करिता परउपकार । त्याच्या पुण्या नाहीं पार ॥ १ ॥
करिता परपीडा । त्याच्या पापा नाहीं जोडा ॥ २ ॥
आपुलें परावें समान । दुजा चरफडे देखून ॥ ३ ॥
आवडे जया जें काही । तैसें पाही करावें ॥ ४ ॥
उघडा घात आणि हित । सेना म्हणे आहे निश्चित ॥ ५ ॥

१०

उच्चारीत कोडें[१] । नाम अबद्ध[३] वाकुडें ॥ १ ॥
मना आवडे त्यावेळी । भलत्या काळीं उच्चारी ॥ ध्रु० ॥
कैसें नाम ठेवूं आता । कोठें न मिळे पाहता ॥ ३ ॥
सेना म्हणे आनंदे धालों[४] । सुख लाधलों परिपूर्ण ॥ ४ ॥

११

जन्मासी येवोनी पहारे पंढरी । नाचा महाद्वारीं देवापुढें ॥ १ ॥
चंद्रभागेतीरीं करा तुम्ही स्नान । घ्या रे दरुशन पुंडलीकाचें ॥२॥
सेना ह्मणे माझा पुरलासे हेत । डोळे भरूनी पहात विठोबासी ३

१२

करिता नित्यनेम । रायें बोलाविलें जाण ॥ १ ॥
पांडुरंगें कृपा केली । राया उपरती झाली ॥ ध्रु० ॥
मुख पाहता दर्पणी । आंत दिसे चक्रपाणी ॥ ३ ॥
कैसी झाली नवलपरी । वाटीमाजी दिसे हरी ॥ ४ ॥
रखुमादेवीवर । सेना म्हणे मी पामर ॥ ५ ॥

---

१ दुसरें. २ प्रेमानें. ३ असंबद्ध रीतीनें वेडेंवाकडें घेतलें तरी. ४ तृप्त झालों.

१३

आम्ही वारीक[1] वारीक । करू हजामत बारीक ॥ १ ॥
विवेकदर्पण दाऊ । वैराग्यचिमटा हालऊ ॥ २ ॥
उदकशांती डोई घोळू । अहंकाराची शेंडी पिळू ॥ ३ ॥
भावार्थाच्या बगला झाडू । कामक्रोध नखें काढू ॥ ४ ॥
चौवर्णा देउनि हात । सेना राहिला निवांत ॥ ५ ॥

१४

अलकापुरवासिनी । ज्ञानाबाई मायबहिणी ॥ १ ॥
आम्हां लेकुराची चिंता । वागवावी कृपावंता ॥ ध्रु० ॥
मी तों आहे यातीहीन । माझा राखा अभिमान ॥ ३ ॥
करूनी विनवणी । सेना लागला चरणी ॥ ४ ॥

## २१ गोरा कुंभार.

१

केशवाचे भेटी लागलेसें पिसें । विसरलों कैसे देहभावा ॥ १ ॥
जाली झडपणी जाली झडपणी । संचरलें मनी आदिरूप ॥ २ ॥
न लिंपेचि कर्मी न लिंपेचि धर्मी । न लिंपे षडूर्मी पुण्यपापा ॥ ३ ॥
म्हणे गोराकुंभार सहजीं जीवन्मुक्त । सुखरूप अद्वैत नामदेवा ॥ ४ ॥

२

मुकिया साखर चाखाया दिधली । बोलतांही बोली बोलवेना ॥ १ ॥
तो काय शब्द खुंटला संवाद । आपला आनंद अवघाराया ॥ २ ॥
आनंदीं आनंद मिळोनी राहणें । अखंडित होणें नहोनियां ॥ ३ ॥
म्हणे गोराकुंभार जीवन्मुक्त होणें । जग हें करणें शाहणें बापा ॥ ४ ॥

३

कासयासी बहु घालिसी मळण । तुज येणेंवीण काय काज ? ॥ १ ॥

---

1 नापीक, न्हावी.

एकपणें एक एकपणें एक । एकाचे अनेक विस्तारले ।। २ ।।
अनेकत्व पाहता शिणले अवधारा । न चुके येरझारा चौऱ्याशीच्या ।।३।।
म्हणे गोराकुमार कोणी नाहीं दुजें । विश्वरूप तुझें नामदेवा ।। ४ ।।

४

कवण स्तुति करूं कवणिया वाचे । बोध सकल्पाचे गिळिले चित्तें ।।१।।
मन हें जालें मुकें मन हें जालें मुकें । अनुभवाचें सुख हेलावलें ।। २ ।।
दृष्टीचें पाहणें परतलें मागुती । राहिलीं निवात नेत्रपातीं ।। ३ ।।
म्हणे गोराकुमार मौन्यसुख घ्यावें । जीवें ओवाळावें नामयासी ।। ४ ।।

५

स्थूल होतें तेंचि सूक्ष्म पै जालें । मन हें बुडाले महासुखी ।। १ ।।
माझें रूप माझे विरालेसें डोळा । सामावलें बुबुळा माझें ध्यान ।। २ ।।
म्हणे गोराकुमार नवल जाली भेटी । तुह्मा आह्मा तुटी उरली नाहीं।।३।।

६

सरितेचा ओघ सागरीं आटला । विदेही भेटला मनोमन ।। १ ।।
कवणाचा सग पुसावा कवणातें । सागते ऐकते तेथें कैचें ? ।। २ ।।
नाहीं दिवसराती नाहीं कुळयाती । नाथिली मायाभ्राती अवघीच ।। ३ ।।
म्हणे गोराकुमार परियेसी नामदेवा । सापडला ठेवा विश्रातीचा ।। ४ ।।

७

ब्रह्ममूर्ती सत जगीं अवतरले । उद्धराया आले दीनजना ।। १ ।।
ब्रह्मादिक ज्याचे वदिती पायवणी । नाम घेता वदनीं दोष जाती ।। २ ।।
हो का दुराचारी विषयी आसक्त । सतकृपें त्वरित उद्धरती ।। ३ ।।
अखडित गोरा त्याची वास पाहे । निशिदिनीं ध्याये संतसंग ।। ४ ।।

## २२ सावतामाळी.

१

कादा मुळा भाजी । अवघी विठाबाई माझी ।। १ ।।

लसूण मिरची कोथिंबिरी । अवघा झाला माझा हरी ॥ २ ॥
मोट नाडा विहीर दोरी । अवघी व्यापिली पंढरी ॥ ३ ॥
सावता म्हणे केला मळा । विठ्ठलपायीं गोंविला गळा ॥ ४ ॥

२

नामाचिया बळें न भीऊं सर्वथा । कळिकाळाच्या माथां सोटे मारूं ॥१॥
वैकुंठीचा देव आणूं या कीर्तनीं । विठ्ठल गाऊनी नाचों रंगीं ॥ २ ॥
सुखाचा सोहळा करुनी दिवाळी । प्रेमें वनमाळी चित्ती धरूं ॥ ३ ॥
सावता म्हणे ऐसा भक्तिमार्ग धरा । तेणें मुक्ति द्वारा वोळगती ॥ ४ ॥

३

का बा रुसलासी कृपाळुवा हरी । तुजवीण दुसरा भाकूं कोण ? ॥ १ ॥
दीन रंक पापी हीन माझी याती । सांभाळा श्रीपती पांडुरंगा ॥ २ ॥
मोह आशा माझ्या लागलीसे पाठी । काळ क्रूरदृष्टी पाहतसे ॥ ३ ॥
सावता म्हणे देवा नका ठेवूं येथें । उचलोनी अनाथा न्यावें मज ॥ ४ ॥

## २३. धोंगडा.

गरुडटके ज्याचे भारी । कुंचे झळकती अंबरी ॥ १ ॥
पैल आले वारकरी । नामें गर्जते पंढरी ॥ ध्रु० ॥
येक बागडी धरिती । येक हुंबरु घालिती ॥ २ ॥
येका हातीं चिपळिया । येक वातातीं टाळिया ॥ ३ ॥
तया देखोनी पंढरीनाथ । मोहरे सामोरा धावत येत ॥ ४ ॥
देवा भक्ता जाल्या भेटी । धोंगडा लोळे वाळुवंटीं ॥ ५ ॥

## २४. वत्सरा.

१

सीर विकलें चरणासी । वाचा तुझिया नामासी ॥ १ ॥
आइकें प्रल्हाद पुरपती । नयन तुझिया रूपासी ॥ २ ॥
परिचर्या दंडपाणी । देहें घालिन लोटांगणी ॥ ३ ॥

वत्सरा ह्मणे संतसंगीं । काहीं नुरेचि येमालागी ॥ ४ ॥

## २५. जगमित्र नागा.

१

हीच उपासना धरा । नरदेही सार्थक करा ॥ १ ॥
भक्ति देवाची करावी । भेददृष्टी हे सोडावी ॥ २ ॥
आत्मा आहे हा भूतात । भूतें आहेती आत्म्यात ॥ ३ ॥
ऐसा धरा दृढभाव । जगमित्र नाग्याचा हा ठाव ॥ ४ ॥

२

कृष्ण लोणी खाया गेला । येउनि गोपीनें धरिला ॥ १ ॥
मायेपाशी घेउनि आली । तेथें कृष्णा पाहती जाली ॥ २ ॥
येथें कृष्ण तेथे कृष्ण । जिकडेतिकडे अवघा कृष्ण ॥ ३ ॥
ऐसें आश्चर्य गे माये । जगमित्र नागा पाहुनि धाये ॥ ४ ॥

३

शुकव्यासादिक भुलले । लीला गाता वेडावले ॥ १ ॥
उपनिषदें श्रुतिशास्त्रें । गाता सिणली स्तुतिस्तोत्रें ॥ २ ॥
हरिकीर्तनाचे रंगीं । नाचे देहभाव विसरुनि अंगी ॥ ३ ॥
कीर्तनाची आवडी गाढी । जगमित्र नागा उभवी गुढी ॥ ४ ॥

४

भक्तासाठीं रूपें धरी । त्याचें काम अंगें करी ॥ १ ॥
आला पुंडलिकासाठीं । अकस्मात जगजेठी ॥ २ ॥
अनंत ब्रह्मांडें रचिलीं । नानापरी क्रीडा केली ॥ ३ ॥
हें तंव न कळे कोणासी । जगमित्र नागा ध्याय मानसीं ॥ ४ ॥

५

अग्नि जाळी तरी न जळे प्रल्हादु । हृदयीं गोविंदु ह्मणोनिया ॥ १ ॥
अग्नि जाळी तरी न जळती गोपाळु । हृदयी देवकीबाळु ह्मणोनिया ॥२॥

अग्नि जाळी तरी न जळती पाडव । हृदयी वासुदेव ह्मणोनिया ।। ३ ।।
अग्नि जाळी तरी न जळे बिभीषणाचें घर । हृदयीं सीतावर ह्मणोनियां ॥४॥
जगमित्र नागा न जळे जरि अग्नि जाळी । हृदयी वनमाळी ह्मणोनिया ॥५॥

६

सकळ भूषणाचें भूषण । कठी धरा नारायण ॥ १ ॥
तेणें तुटती यातना । चुकती यमाच्या पतना ॥ २ ॥
शिव मस्तकीं धरिला । भेद भक्ताचा काढिला ॥ ३ ॥
अवघ्या देवांचें हें ध्यान । जगमित्र नागा वदी चरण ॥ ४ ॥

७

आपला भक्त भीष्म पडियेला रणीं । त्यासी गोविंदें निर्वाणी भेट दिल्ही ॥१॥
कर्ण विदारिला अर्जुनाच्या बाणी । ,, ,, ,, ॥२॥
हरिश्चद्र वाहे डोंबाघरीं पाणी । ,, ,, ,, ॥३॥
राजापरिक्षिती बैसला मरणाच्या आसनी । ,, ,, ॥४॥
जगमित्र नामा ह्मणे गोविंद धरा मनी । तेणें त्रिभुवनी सरता होसी ॥५॥

## २६ भागु महारीण.

१

मी रे अपराधी मोठी । मज घालावे बा पोटी ।। १ ।।
मी रे तान्हुलें अज्ञान । म्हूण का देऊ नये स्तन ।। ध्रु० ॥
अवघ्या संता तू भेटसी । मी रे येकली परदेशी ॥ २ ।।
भागु म्हणे विठोबासी । मज धरावें पोटिसी ।। ३ ।।

२

आलों तुझ्या दर्शनासी । भेट द्यावी बा आम्हासी ।
सर्व संत हो राउळीं । मी रे येकली तळमळी ।। ध्रु० ।।
करुणा आईक विठाई । मज बाळा भेटी देई ।। २ ।।
देव आले हो बाहेरी । मज नेले खाद्यावरी ।। ३ ।।

भागु म्हणे भेट झाली । माझी चिंता ही हारली ॥ ४ ॥

३

कृपेच्या सागरा । मायबापा ज्ञानेश्वरा ॥ १ ॥
देहभाव हो सोडुन । बा माझे धरा ध्यान ॥ ध्रु० ॥
जेणें पाषाण तारिले । मुखें पशु वेद बोले ॥ २ ॥
भिंती चालविली । ऐसी कृपाळु माउली ॥ ३ ॥
ऐसा कृपाळु भक्ताचा । मायबाप हा आमुचा ॥ ४ ॥
विश्रांतीचा ठाव । भागु म्हणे ज्ञानदेव ॥ ५ ॥

४

तुज असता मज गांजिती जन । मग काय जिणें देवा तुझें ॥ १ ॥
अनाथाचा नाथ ऐसें म्हणविसी । करुणा कैसी नये तुज ॥ ध्रु० ॥
अनाथ म्हणऊनी धरियेलें दूर । मग कैसा दातार म्हणविसी ॥ २ ॥
भागु म्हणे मज न सोडवावें आता । पावे कृपावंता पांडुरंगा ॥ ३ ॥

५

काज नाही हो जनासी । रिझवावें त्या देवासी ॥ १ ॥
जन हासतील मज । आता जाले मी निर्लज्ज ॥ ध्रु० ॥
मागे पुढें नाहीं कोणी । सख्या विठ्ठलावाचुनी ॥ २ ॥
अनाथाचें करितो काज । म्हणोनि भरोसा आहे मज ॥ ३ ॥
भागु म्हणे झाले निर्भई । आहे माझी विठाई ॥ ४ ॥

## २७ चोखामेळा.

१

ऊंस डोंगा[1] परी रस नोव्हे डोंगा । काय भुललासी वरलिया रंगा ॥ १ ॥
कमान डोंगी[2] परी तीर नोहे डोंगा । काय भुललासी वरलिया रंगा ॥२॥
नदी डोंगी परी जळ नोहे डोंगें । काय भुललासी वरलिया रंगें ॥ ३ ॥

---

1 वेडावाकडा, वाईट. २ तिरपी.

चोखा डोंगा परी भाव नोहे डोंगा । काय भुललासी वरलिया रंगा ॥४॥

२

जोहार मायबाप जोहार । तुमचे महाराचा मी महार ॥ १ ॥
बहु भुकेला झालों । तुमच्या उष्ट्यासाठी आलों ॥ ध्रु० ॥
बहु केली आस । तुमच्या दासाचा मी दास ॥ २ ॥
चोखा म्हणे पाटी । आणली तुमच्या उष्ट्यासाठीं ॥ ३ ॥

३

धाव घाली विठू आता चालू नको मंद ।
बडवे मज मारिति ऐसा काही नाही अपराध ॥ १ ॥
विठोबाचा हार तुझे कंठी कैसा आला ।
शिव्या देउनि म्हणती महारा देव बाटविला ॥ २ ॥
अहो जी महाराज ! तुमचे द्वारीचा कुतरा ।
नका जी मोकलू[1] चक्रपाणी दुजे द्वारा ॥ ३ ॥
जोडूनीया कर चोखा विनवितो देवा ।
बोलिलों उत्तरी परी राग न धरावा ॥ ४ ॥

४

देही देखिली पंढरी । आत्मा अविनाश विटेवरी ॥ १ ॥
तो हा पांडुरंग जाणा । शांति रुक्मिणी निजांगना ॥ २ ॥
आकारलें तितुके नासे । आत्मा अविनाश विठ्ठल दिसे ॥ ३ ॥
ऐसा विठ्ठल हृदयीं ध्यायीं । चोखामेळा जडला पायीं ॥ ४ ॥

५

विठोबा पाहुणा आला आमुचे घरा । निंबलोणें करा जीवेंभावें[2] ॥ १ ॥
पंचप्राण ज्योती ओवाळुनि आरती । ओवाळिला पती रखुमाईचा ॥२॥
षड्रस पक्वान्न विस्तारिलें ताट । जेवूं एकवट चोखा म्हणे ॥ ३ ॥

---

१ त्यागू, टाकू नका. २ जीवभाव त्यावरून साडा

६

विठ्ठल विठ्ठल गजरीं । अवघी दुमदुमली पंढरी ॥ १ ॥
होतो हरिनामाचा गजर । दिड्या पताकाचे भार ॥ २ ॥
निवृत्ति ज्ञानदेव सोपान । अपार वैष्णव ते जाण ॥ ३ ॥
हरिकीर्तनाची दाटी । तेथें चोखा घाली मिठी ॥ ४ ॥

७

टाळी वाजवावी गुढी उभारावी । वाट ही चालावी पंढरीची ॥१॥
पंढरीचा हाट कैवल्याची पेठ । मिळाले संतुष्ट वारकरी ॥ २ ॥
पताकाचे भार मिळाले अपार । गर्जे भीमातीर जयजयकारें ॥३॥
खटनेट यावें शुद्ध होउनि जावें । दवंडी पिटी भावें चोखामेळा ॥४॥

८

अनादि निर्मळ वेदांचें जें मूळ । परब्रह्म सोज्ज्वळ विटेवरी ॥ १ ॥
कर दोन्ही कटीं राहिलासे उभा । नीळवर्ण प्रभा फांकतसे ॥ २ ॥
आनंदाचा कंद पाउलें साजिरीं । चोखा म्हणे हरि पंढरीये ॥ ३ ॥

९

ज्याकारणें वेदश्रुती अनुवादती । तो हा रमापति पंढरीये ॥ १ ॥
सुखाचें ठेवणें क्षीरसागरनिवासी । तो हा पंढरीसी उभा विटे ॥ २ ॥
भाविकाकारणें उभॅवोनि हात । उदारपणें देत भुक्ति मुक्ति ॥ ३ ॥
न पाहे उंचनीच यातीकुळ । स्त्रीशूद्र चांडाळ सरते पायीं ॥ ४ ॥

१०

मज तों नवल वाटतसें जीवीं । आपुली पदवी विसरलों ॥ १ ॥
कवणिया सुखा परब्रह्म भुललें । गुंतोनि राहिले भक्तभाकें ॥ २ ॥
निर्गुण होतें तें सगुण पैं जालें । विसरोनी गेलें आपआपणा ॥ ३ ॥

---

१ बाजार २ लढाऊ ३ बोलतात 'प्रेमळाची वार्ता । जे अनुवादती पांडुसुता' (ज्ञाने० १२–२३८) ४ उंच करून ५ सरते ह्म० मान्य.

चोखा म्हणे ऐसा कैसा हा नवलाव । देवाधिदेव वेडावला ॥ ४ ॥

११

देखिला देखिला योगियाचा रावो । रुक्मादेवीनाहो[1] पंढरीचा ॥ १ ॥
पुंडलीकासाठीं युगें अठ्ठावीस । धरुनि बाळवेष भीमातटीं ॥ २ ॥
गाई गोपाळ वत्सें वैष्णवाचा मेळ । नाचती गोपाळ विठ्ठलछंदें ॥ ३ ॥
चोखामेळा तेथें वंदितो चरण । घाली लोटांगण महाद्वारा ॥ ४ ॥

१२

भेदाभेदकर्म न कळे त्याचें वर्म । वाउगाच श्रम वाहता जगीं ॥ १ ॥
नामापरता मंत्र नाहीं त्रिभुवनीं । पापताप नयनीं न पडेचि ॥ २ ॥
वेदाचा अनुभव शास्त्राचा अनुवाद । नामचि गोविंद एक पुरे ॥ ३ ॥
चोखा म्हणे मज काहींच न कळे । विठ्ठलाचें बळे नाम घेतों ॥ ४ ॥

१३

आम्हा अधिकार उच्छिष्टसेवन । संताचें पूजन हेंचि बरें ॥ १ ॥
सुलभ सोपारें[2] विठोबाचें नाम । आणिक नाहीं वर्म दुजें काहीं ॥ २ ॥
आवडीनें नाम गाईन उल्हासें । संतांच्या सहवासें खेळीमेळी ॥ ३ ॥
चोखा म्हणे माझी आवडी ही देवा । पुरवावी केशवा जन्मोजन्मीं ॥ ४ ॥

१४

आम्हा न कळे ज्ञान न कळे पुराण । वेदाचें वचन न कळे ॥ १ ॥
आगमाची आटी[3] निगमाचा भेद । शास्त्राचा संवाद न कळे आम्हा ॥
योगयाग तप अष्टांग साधन । न कळेचि दान व्रत तप ॥ ३ ॥
चोखा म्हणे माझा भोळाभाव देवा । गाईन केशवा नाम तुझें ॥ ४ ॥

१५

अवघा आनंद राम परमानंद । हाचि लागो छंद माझे जीवा ॥ १ ॥

---

१ नाहो म्ह० नाथ, पति 'देवी लक्ष्मीयेचा नाहो' (ज्ञाने० ३-२७३).
२ अनायासानें घेण्यासारखे ३ श्रम, कष्ट.

हेंचि साधन निकें जगासि उद्धार । आणिक साचार दुजें नाही ॥ २ ॥
कामक्रोधाचे न पडती आघात । वाचे गाता गीत रामनाम ॥ ३ ॥
चोखा म्हणे ऐसा भरवसा नामाचा । जेथें कळिकाळाचा रीघ नाही ॥४॥

१६

नवल पाही नवल पाही । पाहों जाणे तेणें पाहिले नाही ॥ १ ॥
निर्गुणी सगुण सगुणी निर्गुण । दोहींचें कारण तेचि ठाईं ॥ २ ॥
चोखा ह्मणे पाहता पाहणें लपालें । हृदयी बिंबलें हृदयाचे ॥ ३ ॥

१७

उपजलें विटाळीं मेले विटाळीं । राहिले विटाळी तेहि जाती ॥ १ ॥
रडती पडती तेही वेगें मरती । परि नाम न गाती भ्रांतिभ्रमे ॥ २ ॥
काय रे हा देह सुखाचा तयासी । उघडाचि जासी अंतकाळीं ॥ ३ ॥
चोखा म्हणे याचा न धरी भरवसा । अंती यमफासा गळा पडे ॥ ४ ॥

१८

पंचही भूताचा एकचि विटाळ । अवघाचि मेळ जगी नांदे ॥ १ ॥
तेथे तो सोंवळा ओवळा तो कोण । विटाळाचें कारण देह मूळ ॥ २ ॥
आदिअंती अवघा विटाळ संचला । सोवळा तो झाला कोण न कळे ॥३॥
चोखा म्हणे मज नवल वाटतें । विटाळापरतें आहे कोण ॥ ४ ॥

१९

कोण तो सोवळा कोण तो ओवळा । दोहींच्या वेगळा विठू माझा ॥१॥
कोणासी विटाळ कशाचा जाहला । मुळीचा संचला सोंवळाचि ॥ २ ॥
पापाचा विटाळ एकाचिये अंगा । सोवळा तो जगामाजी कोण ॥ ३ ॥
चोखा म्हणे माझा विठ्ठल सोवळा । अरूप आगळा विटेवरी ॥ ४ ॥

२०

बैसोनी निवांत करीन चिंतन । कायावाचामनसहित देवा ॥ १ ॥

नामाचा आठव हेंचि सोपें वर्म । अवघे कर्माकर्म पारुषती ॥ २ ॥
यापरते साधन आन काही नेणें । अखंड वाचे ह्मणे रामकृष्ण ॥ ३ ॥
सुलभ हा मंत्र तारक जीवासी । येणें या भवासी उतार होय ॥ ४ ॥
चोखा ह्मणे सांगितले कानी । रामकृष्ण वाणी जप सदा ॥ ५ ॥

२१

ज्ञानेश्वर नामें धरिला अवतार । क्षेत्र अलकापूर इंद्रायणी ॥ १ ॥
अद्वैतज्ञानाची करूनी उजरी । टीका ज्ञानेश्वरी ग्रंथ केला ॥ २ ॥
अमृतअनुभवी गुरुगम्य ज्ञान । दाऊनीया जन उद्धरीले ॥ ३ ॥
बारा शतें अठरा शक शालिवाहन । दुर्मुख अभिधान संवत्सर ॥४॥
कृष्ण त्रयोदशी कार्तिक मास । बैसे समाधीस ज्ञानदेव ॥ ५ ॥
जातिहीन चोखा विनवी जोडुनि कर । समाधी निर्धार सजीवनी ॥६

## २८. चोखोबाची स्त्री.

१

माझें माझें म्हणुनि गुतलें हावभरी । वाया या संसारी मृगजळी ॥१॥
आपुली आपण करा सोडवण । संसारबंधन तोडा वेगीं ॥ २ ॥
निजनामनौका विठ्ठल हें तारूं । भवाचा सागरु उतरील ॥ ३ ॥
हाचि पै विश्वास धरावा अंतरी । म्हणतसे म्हारी चोखयाची ॥ ४ ॥

२

नाही उरली वासना । तुह्मा नारायणा पाहता ॥ १ ॥
उरला नाहीं भेदाभेद । झालें शुद्ध अंतर ॥ २ ॥
विटाळाचें होतें जाळें । तुटलें बळें नामाच्या ॥ ३ ॥
चौदेहाची तुटली दोरी । ह्मणे चोखयाची ह्मारी ॥ ४ ॥

---

१ बंद होतात, संपतात ' मनाची धाव पारुषेल ' ( ज्ञाने० ३-२६९ )

३

येई येई गा गरुडध्वजा । विटेसहित करीन पूजा ॥ १ ॥
धूपदीप पुष्पमाळा । तुज समर्पू गोपाळा ॥ ध्रु० ॥
पुढें ठेवोनिया पान । वाढी कुटुंबी ते अन्न ॥ २ ॥
तुम्हा योग्य नव्हे देवा । गोड करूनिया जेवा ॥ ३ ॥
विदुराघरच्या पातळकण्या । खासी मायबापा वन्या ॥ ४ ॥
द्रौपदीच्या भाजीपाना । तृप्ति झाली नारायणा ॥ ५ ॥
तैसी झाली येथे परी । म्हणे चोखयाची ह्मारी ॥ ६ ॥

४

देहासी विटाळ म्हणती सकळ । आत्मा तो निर्मळ शुद्धबुद्ध ॥ १ ॥
देहीचा विटाळ देहीच जन्मला । सोवळा तो झाला कवण धर्म ॥ २ ॥
विटाळावाचोनी उत्पत्तीचें स्थान । कोण देहनिर्माण सागा जगी ॥ ३ ॥
ह्मणोनि पांडुरगा वानितसे थोरी । विटाळ देहातरी वसतसे ॥ ४ ॥
देहाचा विटाळ देहीच निर्धारी । म्हणतसे ह्मारी चोखयाची ॥ ५ ॥

## २० बंका महार

१

आदिनाथ गुरु सकळ सिद्धाचा । मच्छेंद्र तयाचा मुख्य शिष्य ॥ १ ॥
मच्छेंद्रानें बोध गोरक्षासी केला । गोरक्ष बोळला गहिनीप्रति ॥ २ ॥
गहिनीप्रसादे निवृत्ति दातार । ज्ञानदेवा सार चोजविले ॥ ३ ॥
ज्ञानियाचा राजा ज्ञानेश्वरमाउली । खेचरा बोळली कृपासिधु ॥ ४ ॥
ज्ञानदेवाचरणी खेचर शरण । नामदेवा पूर्ण कृपा त्याची ॥ ५ ॥
नामदेवें हात चोखयाचें शिरी । विठ्ठल ती अक्षरी उपदेशिले ॥ ६ ॥
बका ह्मणे माझी गुरु चोखामाउली । तियेचे पाउली लोटागण ॥ ७ ॥

---

